# "मराठी वाङ्मयातून निर्माण झालेली छत्रपती संभाजी राजांची अनैतिहासिक प्रतिमा : एक अभ्यास"




**स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठ, नांदेड**

**सामाजिकशास्त्रे विद्याशाखेअंतर्गत इतिहास विषयातील पीएच.डी. पदवीसाठी सादर केलेला शोधप्रबंध.**


**-: संशोधक :-**

**श्री सोमवंशी गिरीधर नागोराव**

M.A., M.Ed., SET

इतिहास विभाग,

सहाय्यक प्राध्यापक

श्री छत्रपती शिवाजी महाविद्यालय, उमरगा,

ता. उमरगा जि. उस्मानाबाद.

**-: मार्गदशक**

**डॉ.रामभाऊ राजाराम मुटकुळे**

M.A., M.Phil., Ph.D.

इतिहास विभाग,

बहिर्जी स्मारक महाविद्यालय, वसमत

ता. वसमत, जि.हिंगोली


**संशोधन केंद्र**

**सामाजिकशास्त्रे विद्याशाखा,**

**स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठ, नांदेड.**

**डिसेंबर- २०१६**

# स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठ, नांदेड




## प्रमाण पत्र

प्रमाणित करण्यात येते की, **प्रा.गिरीधर ना**गोराव सोमवंशी यांनी ***"मराठी वाङ्मयातून निर्माण झालेली छत्रपती संभाजी राजांची अनैतिहासिक प्रतीमाः एक अभ्यास"*** हा शोध प्रबंध स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठ, नांदेडच्या सामाजिक शास्त्रे विद्याशाखे अंतर्गत **इतिहास** विषयातील पीएच. डी. पदवीसाठी सादर केलेला आहे.

तसेच त्यांनी हा शोध प्रबंध माझ्या मार्गदर्शनाखाली स्वतंत्ररित्या लिहीला असून तो इतर कोणत्याही विद्यापीठातील अन्य पदवीसाठी सादर केलेला नाही.

स्थळ :

दिनांक : / /२०१६

संशोधन मार्गदर्शक

प्राध्यापक डॉ.रामभाऊ राजाराम मुटकुळे

वसमत,जि.हिंगोली.

# प्रतिज्ञा पत्र

**मी** प्रतिज्ञापूर्वक निवेदन करतो की, **"मराठी वाङ्मयातून निर्माण झालेली छत्रपती संभाजी राजांची अनैतिहासिक प्रतीमा: एक अभ्यास"** हा शोध प्रबंध मी स्वत: माझे मार्गदर्शक **प्राध्यापक डॉ. रामभाऊ राजाराम मुटकुळे** यांच्या मार्गदर्शनाखाली संशोधनपूर्वक लिहिलेला आहे. त्यातील सर्व मजकूर माझ्या अभ्यासावरच अधारलेला आहे.

हा शोध प्रबंध या विद्यापीठाव्यतिरिक्त कोणत्याही विद्यापीठात अन्य पदवीसाठी सादर केलेला नाही.

ठिकाण : उमरगा

दिनांक : / /२०१६

**संशोधक**


प्रा.गिरीधर नागोराव सोमवंशी

सहाय्यक प्राध्यापक, इतिहास विभाग,

श्री. छत्रपती शिवाजी महाविद्यालय, उमरगा,

ता. उमरगा, जि. उस्मानाबाद.

# ऋणनिर्देश

छत्रपती संभाजीराजांची सर्वसामान्य जनमाणसात असलेली प्रतीमा, त्यांच्याबद्दलचे असलेले समज-गैरसमज यांतून मी हा विषय निवडला. या विषयाच्या माध्यमातून छत्रपती संभाजी राजांवर साहित्यातून झालेल्या आरोपांचा खऱ्या अर्थाने शोध घेऊन त्यांचे वास्तविक व्यक्तिमत्त्वासमोर आणण्याचा प्रयत्न मी या संशोधनातून केला आहे.

संशोधन ही एक जटील व तांत्रिक प्रक्रिया असते. ती योग्य मार्गदर्शन आणि सहकार्याशिवाय ती तडीस नेणे कठीण असते. या संशोधनाला पूर्णत्वास नेण्यासाठी अनेक मान्यवरांचे प्रत्यक्ष-अप्रत्यक्ष सहकार्य व आशिर्वाद लाभले आहेत.

या संशोधनासाठी गुरूवर्य डॉ. रामभाऊ मुटकुळे सर मला मार्गदर्शक म्हणून लाभले हे माझे भाग्यच. त्यांचे मार्गदर्शन दिपस्तंभासारखे ठरले. अनेक व्यापांतून वेळ काढून सतत प्रोत्साहन देऊन त्यांनी माझ्याकडून हे काम करवून घेतले, त्याबद्दल त्यांचा शतशः ऋणी आहे. माझ्या कुटुंबातील इतर व्यक्तींचे सहकार्य आणि आशिर्वाद मला लाभले. त्यामध्ये माझी आई, वडील, भाऊ, बहिण, पत्नी, मुलगी, काका, काकु, आजोबा यांचा आवर्जुन ऊल्लेख करावा लागेल. या सर्वांनी घरची जबाबदारी उचलल्यामुळे मला संशोधनासाठी वेळ देता आला. याचे औपचारीकरित्या ऋण व्यक्त न करता त्यांचे आशिर्वाद माझ्या पाठीशी कायम रहावेत अशी मी प्रार्थना करतो.

कोणतेही संशोधनकार्य पूर्ण करण्यासाठी संदर्भग्रंथाची आवश्यकता असते. ती गरज पूर्ण करण्यासाठी मला भरतनाट्य मंदिर येथील ग्रंथपाल मुळे सर आणि आमच्या महाविद्यालयातील सहाय्यक ग्रंथपाल सतिष जगताप सर यांनी सहकार्य करुन संदर्भग्रंथ उपलब्ध करून दिले. त्याबद्दल मी त्यांचाही ऋणी आहे.

माझ्या संशोधन कार्यासाठी मार्गदर्शन करणारे डॉ. बा. आं. म. वि. औरंगाबाद येथील इतिहास विभागाचे प्रो. उमेश बगाडे सर,

*इतिहास विभागाच्या हिस्ट्री म्युझियममधील प्रा.कुमार भवर सर, डॉ. बा. आं. म. वि. औरंगाबाद येथील भूगोल विभागाचे विभाग प्रमुख मदन सुर्यवंशी सर, पुणे येथील शालीनी मोहोड मॅडम त तसेच निलंगा येथील महाराष्ट्र महाविद्यालयाचे इतिहास विषयाचे प्राध्यापक व मित्र सुभाष बेंजलवार, गुंजोटी येथील माझे प्राध्यापक मित्र प्रा. बालाजी बोटेवाड या सर्वांनी मला संशोधनासाठी मोलाचे सहकार्य व मार्गदर्शन केल्याबद्दल मी त्यांचे ऋण व्यक्त करतो.*

*सदर संशोधन पूर्णत्वास नेण्यासाठी मला सहकार्य करणारे आमच्या महाविद्यालयाचे प्राचार्य डॉ. घनशाम जाधव सर, इतिहास विभागाचे विभाग प्रमुख व सहकारी डॉ. दिलीप बिराजदार सर, तसेच सहकारी प्रा. सुनिल बिराजदार, डॉ. वसंत हिस्सल, डॉ.सुभाष वाघमारे, डॉ. सुभाष इंगळे, प्रा. अर्जुन कटके, प्रा.श्रीशैल्य तोडकर, डॉ. ज्ञानोबा ढोबळे, डॉ. चद्रसेन करे, प्रा.प्रदीप पाटील, प्रा. अनिल गाडेकर, प्रा. डॉ. अनिल देशमुख, डॉ. इटले, डॉ. जाजणूंकर यांचे सहकार्य व प्रेरणा या कार्याच्या पूर्णत्वाला सहाय्यक ठरली त्यामुळे त्यांचे ऋण व्यक्त करतो.*

*संशोधन अहवालाची आकर्षक व निर्दोष छपाई करणे हे संशोधन प्रबंधाचे मुलभूत वैशिष्टचे आहे. या संशोधन कार्याची नियोजित वेळेत आकर्षकछपाई करून देण्याचे कार्य श्री. बाळू सगट व श्री. जय राठोड यांनी करून दिले. तसेच मुखपृष्ठ सजावट व बांधणीचे कार्य परफेक्ट बाईंडिंग सेंटर यांनी वेळेत पूर्ण करून दिल्याबद्दल त्यांचाही मी आभारी आहे. अजूनही प्रत्यक्ष-अप्रत्यक्ष स्वरूपात संशोधन कार्यासाठी आशिर्वाद, मार्गदर्शन व सहकार्य मिळालेल्या सर्वांचे ऋण व्यक्त करतो.*

डिसेंबर २०१६ — श्री. गिरीधर नागोराव सोमवंशी

# अनुक्रमणिका

## प्रकरण पहिले

# ऐतिहासिक पार्श्वभूमी

## प्रकरण पहिले

# ऐतिहासिक पार्श्वभूमी

### १.१ प्रस्तावना

साहित्य हा समाजाचा आरसा असतो. समाजजीवानचे काळानुसार बदलणारे प्रतिबिंब साहित्यात दिसते. त्यामुळे साहित्य वाङ्मय हे समाजजीवनावर प्रभाव टाकणारे सर्वात प्रभावी साधन आहे. भारतामध्ये खऱ्या अर्थाने मराठी साहित्यलेखनाला सुरुवात ब्रिटिश आल्यानंतर किंवा पाश्चात्य साहित्यिकांच्या प्रभावातून सुरुवात झाली. त्यातूनच मराठी वाङ्मयामध्ये ऐतिहासिक वाङ्मय प्रकाराला सुरुवात झाली. वाङ्मयामध्ये भाव-भावना, विचार, कृती यांचे प्रतिबिंब असते. त्यामुळे ऐतिहासिक वाङ्मयास मराठी वाङ्मयामध्ये विशेष आसे स्थान आहे.

नाटक, काव्य, निबंध, कथा, कादंबरी, पोवाडे, लावणी, गीत इ. वाङ्मय प्रकारातून मानवाच्या कर्तृत्वाचा उल्लेख येतो. साहित्य गद्यात्मक असो अथवा पद्यात्मक त्याचा इतिहासाशी संबध असतो. मराठ्यांच्या इतिहासाचा मराठी ऐतिहासिक वाङ्मयावर मोठा प्रभाव दिसून येतो. मराठी सत्तेचे संस्थापक श्री छत्रपती शिवाजी महाराजापासून ते शेवटचा पेशवा दुसरा बाजीरावपर्यंत सर्वांच्या व्यक्तिमत्वावर मराठी साहित्यात विपूल असे लेखन झाले.

मराठी वाङ्मयामध्ये ऐतिहासिक वाङ्मयाची सुरुवात ही बखर वाङ्मय प्रकारापासून होते. बखर वाङ्मयाचे हे वैशिष्ट्य आहे. मराठी सत्तेच्या उदयाबरोबर हा वाङ्मय प्रकार उदयास आला व मराठी सत्तेच्या अस्ताबरोबर समाप्त झाला. त्यानंतर ऐतिहासिक वाङ्मयामध्ये कथा, नाटक, कादंबरी लेखनास सुरुवात झाली. मराठ्यांच्या इतिहासात सर्वात प्रभावी व्यक्तिमत्व मराठी सत्तेचे संस्थापक छत्रपती शिवाजी महाराजांचे असल्यामुळे त्यावर

मोठ्या प्रमाणात ऐतिहासिक वाङ्मयाचे लेखन झाले. त्यानंतर मराठी सत्तेचे पहिले युवराज छत्रपती संभाजी यांच्या आकर्षक व्यक्तिमत्वामुळे त्यांच्या संदर्भातही विपूल अशा ऐतिहासिक वाङ्मयाची निर्मिती झाली.

छत्रपती संभाजी महाराजांच्या जीवनावर मराठी साहित्यामध्ये साठपेक्षा अधिक नाटके लिहिली गेली. तसेच बारा-पंधरा कादंबऱ्या आणि कथा, कविता इ. मोठ्या प्रमाणावर मराठी वाङ्मयांची निर्मिती केली गेली, परंतु अनेक ऐतिहासिक नाटक, कथा, कादंबरी या वाङ्मय प्रकारातून संभाजीराजांची कामांध, बदफैली, व्यसनी, लहरी, खुनशी, तापट, क्रोधी, दुर्वर्तनी, दुराचारी, राज्यक्षयास नेणारा अशी प्रतिमा रंगवलेली आहे. अशा प्रकारची अनैतिहासिक प्रतिमा निर्माण करून रुजवण्याचे कार्य वाङ्मयातून झाले. हे लेखन इतिहासाचा विपर्यास करणारे असल्यामुळे समाज घातक आहे. संभाजी राजांच्या कार्य, कर्तृत्वाची उपेक्षा करणारे आहे. त्यामुळे अशा ऐतिहासिक मराठी वाङ्मयाची चिकित्सा करून खरा इतिहास समाजापुढे मांडणे हा प्रस्तुत संशोधनाचा हेतू आहे.

## १.२ विषयाची निवड

मराठी सत्तेचे पहिले युवराज म्हणून संभाजी राजांच्या व्यक्तिमत्वाचे आकर्षण सर्वसामान्य जन-माणसात दिसून येते. तसेच त्यांच्या संदर्भातील जनतेमध्ये असलेले समज-गैरसमज यांचे खऱ्या अर्थाने आवलोकन करणे गरजेचे वाटत होते. तसेच लोकमनावर मराठी वाङ्मयातील अनैतिहासिक प्रतिमांचा जास्त प्रभाव दिसतो. संभाजी राजांच्या व्यक्तिमत्वाबाबत तसेच झाले आहे. संभाजी राजांच्या जीवनावर आधारित अशा मराठी ऐतिहासिक वाङ्मयाचे संशोधन करून चिकित्सा करणे आवश्यक होते. त्यामुळे प्रस्तुत विषयाची निवड केली.

छत्रपती संभाजी महाराजांचा कार्यकाल (१६८०-१६८९) हा मराठ्यांच्या इतिहासातील एक रोमांचकारी कालखंड होय. या कालखंडामध्ये त्यांनी अत्यंत प्रतिकूल अशा परिस्थितीमध्ये

हिंदवी स्वराज्याचे जतन, संरक्षण व संवर्धन केले. त्यामुळे स्वराज्य रक्षक म्हणून त्यांच्या इतिहासाची पुनर्मांडणी करणे गरजेचे होते. त्यामुळे या विषयाची निवड केली आहे.

## १.३ संशोधनाची उद्दिष्टे

१. मराठी वाङ्मयात निर्माण झालेल्या संभाजी राजांच्या अनैतिहासिक प्रतिमेचा शोध घेणे.

२. मराठी ऐतिहासिक वाङ्मयीन साधनांतून संभाजीच्या कार्य, कर्तुत्व व व्यक्तिमत्वावर झालेल्या अन्यायाचा संशोधनातून शाेा घेणे.

३. संभाजी राजांच्या अनैतिहासिक आणि ऐतिहासिक प्रतिमांची चिकित्सा करणे.

४. मोगल व सागरीय सत्तांशी केलेल्या संघर्षाचे भूराजनीतीक व डावपेचांच्या आधारे अभ्यास करणे.

५. संभाजी महाराजांच्या ऐतिहासिक कार्याचे नव्याने पूनर्मुल्यंकन करणे.

## १.४ संशोधन पद्धती

प्रस्तुत संशोधनात ऐतिहासिक संशोधन पद्धतीचा अवलंब करून तथ्यांचे संकलन आणि विश्लेषण खालील पद्धतीने केले आहे. महाराष्ट्रातील अनेक संशोधन संस्था, ग्रंथालये यांना भेटी देऊन विषयासंदर्भातील साधने मिळविली.

१. संभाजी राजांवरील बखरी, कथा, कादंबऱ्या, नाटके, अशा ऐतिहासिक मराठी वाङ्मयातून अनैतिहासिक प्रतिमांचा शोध घेतला आहे.

२. मराठी ऐतिहासिक वाङ्मयातील अनैतिहासिक व ऐतिहासिक पुराव्यांच्या अधारे संभाजीराजांच्या ऐतिहासिक प्रतिमेची चिकित्सा केली आहे.

३. स्वराज्य रक्षक संभाजी म्हणून त्यांच्या कार्य-कर्तृत्वाचा आढावा घेतला आहे.

४. आवश्यक त्या ठिकाणी संशोधनासंबंधीत छायाचित्रे व नकाशे जोडलेले आहेत.

## १.५ संशोधनाच्या मर्यादा

१. मराठी ऐतिहासिक वाङ्मयामयातील बखर, कथा, नाटके, कादंबऱ्या या वाङ्मय प्रकारामध्ये संभाजी राजांवर भरपूर लेखन झाले आहे. त्यापैकी अनैतिहासिक प्रतिमा निर्माण करण्याऱ्या वाङ्मयाचा आढावा घेतला आहे.

२. संभाजी राजाचे संपूर्ण चरित्र लेखन न करता त्यांनी दिलेल्या स्वराज्य रक्षणाचा आढावा घेतला आहे.

## १.६ संशोधनाची गृहीतकृत्ये

१. इतिहास हे साधनांच्या आधारे चालणारे शास्त्र आहे. त्यामुळे ऐतिहासिक साधनांचा शोध घेऊन तथ्यांचे संकलन केलेले आहे.

२. "No Document No History" या सुत्राचा आधार घेऊन बखर व मराठी वाङ्मयातील निराधार आरोप हे कागदपत्रांच्या आधारे खोडून काढलेल आहेत.

३. वाङ्मयीन साधने ऐतिहासिक साधने यांमध्ये समन्वय साधून नवीन मांडणी केली आहे.

४. मराठी ऐतिहासिक वाङ्मयातील संभाजी राजांची अनैतिहासिक प्रतिमा आणि ऐतिहासिक साधनांच्या आधारे ऐतिहासिक प्रतिमांची चिकित्सा करून संभाजी राजांचा खरा इतिहास मांडण्याचा प्रयत्न केला आहे.

## १.६ पूर्व संशोधन साहित्याचा आढावा

मराठी वाङ्मयातून निर्माण झालेली संभाजी राजांची अनैतिहासिक प्रतिमा या विषयांवर यापूर्वी संशोधन झाले नाही. तरी प्रस्तुत विषयाच्या वेगळ्या अंगाने संशोधनाच्या संदर्भात जे संशोधन पुढे आलेले आहे त्याचा आढावा घेतलेला आहे.

१. **पवार जयसिंगराव :** यांनी संपादित केलेल्या 'छत्रपती संभाजी स्मारक ग्रंथ' या ग्रंथातील प्रस्तावनेमध्ये साहित्यिक संभाजी व खरा या संदर्भात चर्चा केली आहे. याच ग्रंथामध्ये संभाजी महाराजांवरील मराठी ऐतिहासिक नाटके, डॉ भीमराव कुलकर्णी यांची मराठी बखर वाङ्मयातील संभाजीराजे, डॉ मु. श्री. कानडेंचे मराठी साहित्यातील

संभाजीराजे, डॉ. सौ. शालिनी मोहोड इत्यादी लेखनांमध्ये संभाजींच्या साहित्यातील प्रतिमेवर प्रकाश टाकण्याचा प्रयत्न केला आहे.

२. **मोहोड शालिनी :** यांनी 'साहित्यातील छत्रपती संभाजीराजे एक चिकित्सक अभ्यास' या पीएच.डी शोध प्रबंधात कथा, कादंबरी, नाटक, इत्यादीमध्ये संभाजीराजेंचे चित्रण मांडले आहे.

३. **बेंद्रे. वा. सी. :** यांनी 'श्री छत्रपती संभाजी महाराज यांचे विचिकित्सक चरित्र' या ग्रंथात संभाजी महाराजांचे पहिले ऐतिहासिक चरित्र लेखन केले आहे.

४. **डॉ. कमल गोखले :** यांनी 'शिवपुत्र संभाजी' या ग्रथांत संभाजीचे चरित्र लेखन केले आहे.

५. **दारवटकर अनंत :** यांनी 'अद्वितीय छत्रपती श्री संभाजी महाराज' या ग्रथांची ५ खंडामध्ये विभागणी करून संभाजी राजांचा संपूर्ण इतिहास मांडला आहे.

## १.७ शोधप्रबंधाचा आराखडा

प्रस्तुत संशोधन प्रबंधाचा आराखडा हा सहा प्रकरणे, संदर्भग्रंथ सूची व परिशिष्ठामध्ये करण्यात आला आहे.

### प्रकरण पहिले - ऐतिहासिक पार्श्वभूमी

प्रस्तुत प्रकरणात संपूर्ण भारतावरती स्वतःचे वर्चस्व प्रस्थापित करणाऱ्या मोगल सत्तेला शह देण्याचे कार्य दक्षिणभारतामध्ये ज्या भोसले घराण्यानी केले त्या घराण्याचा थोडक्यात इतिहास या प्रकरणात मांडला आहे.यानंतर दक्षिणभारताच्या राजकारणात स्वकर्तृत्वाचा ठसा उमटविणारे स्वराज्य संकल्पक शहाजीराजे भोसले यांची माहिती दिलेली आहे. तसेच शककर्ता स्वराज्य संस्थापक श्री. छत्रपती शिवाजी महाजांचा इतिहास मांडण्याचा प्रयत्न केला आहे. ज्यांनी अतिशय कठिण परिस्थिींमध्ये स्वराज्याचे रक्षण केले. असे स्वराज्य रक्षक श्री छत्रपती संभाजी महाराजांचा थोडक्यात इतिहास रेखाटला आहे. याशिवाय संशोधन

विषयाच्या आनुषंगाने इतिहास व साहित्य संबंध, मराठ्यांच्या इतिहासाचा ऐतिहासिक मराठी वाङ्मयावर झालेला परिणाम यांची माहिती प्रस्तुत प्रकरणात दिलेली आहे.

**प्रकरण दूसरे - बखरकारांनी निर्माण केलेली संभाजी राजांची अनैतिहासिक प्रतिमा**

मराठी वाङ्मयामध्ये बखर वाङ्मयास विशेष असे महत्त्व आहे. या वाङ्मयाचे महत्त्वाचे वैशिष्ट्य म्हणजे मराठी सत्तेच्या उदयाबरोबर या वाङ्मय प्रकाराचा उदय झाला व मराठी सत्तेच्या अस्ताबरोबर समाप्त झाला. या प्रकारणामध्ये बखर वाङ्मयाचा अर्थ, स्वरुप, प्रकार यांची साधक-बाधक चर्चा करून माहिती दिलेली आहे. शिवाजी महाराजांवर लिहिल्या गेलेल्या; परंतु संभाजी महाराजांची माहिती देणाऱ्या बखरींमधून संभाजी महाराजांच्या अनैतिहासिक प्रतिमेचा शोध घेतलेला आहे. एकूण आठ बखरी शिवाजी महाराजांच्या जीवन चरित्राची माहिती देतात. त्यातुनच संभाजी महाराजांची माहिती मिळते. म्हणून पाच बखरींमध्ये सभासद बखर (१६९७), ९१ कलमी बखर (१७८०), सप्तप्रकरणात्मक बखर (१८१०) शिवदिग्विजय बखर (१८१८), शेडगावकर बखर (१८३४), या बखरींमध्ये संभाजी राजांवर लिहिलेल्या अनैतिहासिक माहितीचा आढावा घेतलेला आहे. तसेच छत्रपती संभाजी महाराजांवरील बखर स्वतंत्र बखरीतील अनैतिहासिक प्रतिमा प्रस्तुत प्रकरणात लिहीली आहे. ज्यामध्ये सभासदकाराने शिवाजी महाराजांच्या मृत्यूसमयी संभाजीविषयी चिंता व भविष्य शिवाजीच्या तोंडी वदवून संभाजीराजांची अनैतिहासिक प्रतिमा निर्माण केली आहे. त्याबरोबर संभाजीविषयीची चिंता त्यांचे दूर्वर्तन यासंदर्भात शिवदिग्विजय करांनी सईबाईंच्या तोंडी वदवले आहे तर श्रीमंत महाराज भोसले यांच्या बखरीमध्ये औरंगजेबास झेबुन्नीसाची मागणी करणारा संभाजी चित्रित केला आहे. मल्हार रामराव चिटणीसांच्या सप्तप्रकरणात्मक बखरींमध्ये संभाजी महाराजांच्या अनैतिहासिक प्रतिमेचा शोध घेतला आहे.

**प्रकरण तिसरे - कथा, कादंबरी व नाटकातून निर्माण झालेली छत्रपती संभाजीराजांची प्रतिमा**

प्रस्तुत प्रकरणामध्ये मराठी ऐतिहासिक साहित्यातून मांडलेल्या संभाजी महाराजांच्या प्रतिमेचा शोध घेतला आहे. त्यासाठी कथा, कादंबरी व नाटक या ऐतिहासिक

वाङ्मयप्रकारांची निवड केली आहे. ऐतिहासिक वाङ्मयामध्ये 'गोदावरीची लोककथा', कादंबऱ्यांमध्ये ना. वि. बापटांची 'छत्रपती संभाजी महाराज', हरी नारायण आपटे यांची 'केवळ स्वराज्यासाठी', नाथमाधव यांच्या 'स्वराज्याचा कारभार' व 'स्वराज्यावरील संकट' या दोन कादंबऱ्या तसेच लोककवि मनमोहन नातू यांच्या 'संभवामि युगे युगे' आणि 'छत्रपती संभाजी' या दोन कादंबऱ्या, वा. ना. देशपांडे यांची 'आम्ही यातनांचे स्वामी', रणजित देसाई यांची 'श्रीमानयोगी', नयनतारा देसाई यांची 'अर्घ्य', अनंत तिबिलेंची 'शापित राजहंस'. नाटक यामध्ये वासुदेव शास्त्री खरेंचे 'गुणोत्कर्ष', आत्माराम पाठारेंचे 'सं. श्री छत्रपती संभाजी', सो-नाबाई केरकरांचे 'संगीत छत्रपती संभाजी', वा. ना. शहांचे 'प्रणयी युवराज', राम गणेश गडकरींचे 'संगीत राजसंन्यास', वि. ह. औधकरांचे 'बेबंदशाही', द. स. सुकेंचे 'राजसंन्यास नाटकाची पुरवणी', वि. वा हडपांचे 'रायगडची राणी', य. ना. टिपणीसांचे 'शिवाजीला शह', मालती तेंडुलकरांचे 'मराठ्यांचा राजा', ना. के सानेसुखारांचे 'थोरातांची कमळा', ना. घ. कोचरेकरांचे 'सं. मानी मराठा', आबासाहेब आचरेकरांचे 'अमर जहाले छत्रपती संभाजी', ल. वि. सांडवांचे 'छत्रपती संभाजी', गोडसे द. ग. यांचे 'राजाचा पुत्र अपराधी देखा', अर्जुनराव झेंडेंचे 'अश्रु ढळले रायगडचे', चव्हाण श. ब. यांचे 'सं. सती गोदावरी', आबासाहेब आचरेकरांचे 'सहयाद्री सांगे कथा शूभूंची', वसंत कानेटकरांचे 'इथे ओशाळला मृत्यू' या मराठी ऐतिहासिक साहित्यातून निर्माण झालेल्या संभाजी राजांच्या प्रतिमांचा शोध घेतला आहे.

**प्रकरण चौथे - संभाजी राजांचा वास्तविक इतिहास**

प्रस्तुत प्रकरणामध्ये बखर, कथा, कादंबरी व नाटक या ऐतिहासिक मराठी वाङ्मयामध्ये संभाजी महाराजांची अनैतिहासिक प्रतिमा निर्माण केलेली आहे. अशा अनैतिहासिक प्रतिमांची ऐतिहासिक पुराव्यांच्या आधारे खंडन करून वास्तविक इतिहास मांडण्याचे कार्य केले आहे. सर्वपथम बखर वाङ्मयात संभाजीराजांचे अनैतिहासिक लेखन झाले. त्यांची ऐतिहासिक साधनांच्या आधारे चिकित्सा करून वास्तविक आणि सत्यइतिहास मांडण्याचे कार्य केले आहे. यानंतर बखर, कथा, कादंबरी व नाटके या ऐतिहासिक मराठी

वाङ्मय प्रकारातून संभाजीराजांची कामांध व बदफैली संभाजी, व्यसनी संभाजी, दारूबाज संभाजी, सोयराबाईंस भिंतीत चिणून मारणारा संभाजी, शिर्क्यांचे शिरकाण करणारा संभाजी, मुत्सद्दी मंत्र्यांना ठार मारणारा संभाजी, कवी कलुषाच्या आहारी जाणारा संभाजी, मोगलांच्या कैदेत पश्चातापाग्नित जळत असलेला संभाजी, धर्मवीर संभाजी, खुनशी, तापट, मातृसुखास पारखा असलेला संभाजी. अशी नानाविध अनैतिहासिक प्रतिमा मराठी वाङ्मयामध्ये निर्माण केलेली आहे. त्यांची ऐतिहासिक पुराव्यांच्या आधारे खंडण करून वास्तविक इतिहास मांडण्याचे संशोधन कार्य केले आहे.

**प्रकरण पाचवे - स्वराज्य रक्षक संभाजी**

मोगलांविरुद्ध संघर्षाची सुरवात छत्रपती शिवाजी महाराजांनी इ.स. १६५७ मध्ये संभाजी राजांच्या जन्माच्या वर्षी जुन्नरवर हल्ला करून सुरु झाली होती. ते सुरू झालेले युद्ध औरंगजेबाच्या मृत्यूनंतर इ.स. १७०७ मध्येच थांबले. याच मोगल-मराठा संघर्षाला 'मराठ्यांचे स्वांतत्र्ययुद्ध' म्हणून संबोधले जाते.

या स्वातंत्र्य युद्धातील दुसऱ्या कालखंडाचे (इ.स. १६८० ते १६८९ या) नेतृत्व संभाजी महाराजांनी केले होते. संभाजी राजांनी अतिशय कठीण परिस्थितीमध्ये स्वराज्यावर चालून आलेल्या मोगल बादशहापासून मराठयांच्या राज्याचे रक्षण केले. यामध्ये सर्वप्रथम संभाजी राजांनी राज्याभिषेकानंतर मोगल प्रदेशावर केलेली चढाई त्यात बऱ्हाणपूरची लूट, औरंगाबादेवर हल्ला, अंतुरवरील स्वारी इत्यादी समावेश होतो. त्यानंतर औरंगजेब बाहशहाचे दक्षिणेकडील आगमन होईपर्यंत केलेल्या हालचालींमध्ये धरणगावाची लूट, बऱ्हाणपुरचा बालेकील्ला उडवून देण्याचा झालेला प्रयत्न, कल्याण-भिवंडीचा संघर्ष, अहमदागरवरील हल्ला, बागलान व सोलापूरावरील आक्रमण हे प्रमुख आहेत. औरंगजेब दखखनमध्ये दाखल झाल्यानंतरचा मोगल-मराठा संघर्ष यात प्रमुख नाशिक बागलान प्रदेशातील संघर्ष, तळकोकणात मोगल-मराठा संघर्ष, स्वराज्याच्या इतर प्रदेशातील मोगल-मराठा संघर्ष इत्यादी समावेश होतो.दक्षिण कोकणाच्या स्वारीत शहाआलमचा केलेला परभव इत्यादींचा समावेश होतो. याशिवाय संभाजी महाराजांची मोगल प्रदेशावर केलेली चढाई,

संभाजी राजांच्या कर्नाटकातील हालचाली, संभाजी महाराजांचा सागरी सत्तेशी झालेला संघर्ष इत्यादी यामध्ये येतात. याप्रकारे संभाजी राजांनी आपल्या अल्पशा कारकीर्दीत चहूबाजूंनी वेढलेल्या शत्रुपासून स्वराज्याचे संरक्षण केल्याचे या प्रकरणामध्ये मांडले आहे.

**प्रकरण सहावे - समारोप**

प्रस्तुत प्रकरणात संशोधन कार्यासाठी निवडलेल्या उद्दिष्टांची सिद्धता आणि गृहीतकृत्याची पडताळणी करत असताना अभ्यासातून प्राप्त झालेले निष्कर्ष नोंदवण्यात आले आहे.

## १.८ ऐतिहासिक पार्श्वभूमी

### १.८.१ भोसले घराणे :

'महाराष्ट्रातील भोसले घराण्यांचा समावेश मराठा क्षत्रीयांच्या ९६ कुळामध्ये होतो. त्यांचे मूळ पूर्वज हे राजस्थान मधील शिसोदे वंशातील होते. शिसोदे ऊर्फ भोसले घराणे हे सूर्यवंशी असून त्यांचे गोत्र कौशिक आहे.'[१] महाराष्ट्रातील निंबाळकर, यादव, मोहिते, शिर्के, गायकवाड, पवार इत्यादी क्षत्रीय घराण्याशी त्याचे नातेसंबंध प्रस्थापित झालेले होते. 'छत्रपती शिवाजी महाराजांनी राज्यभिषेकसमयी आपल्या कुळाबद्दल आणि वंशाबद्दल माहिती दिलेली होती. ती अशी (सूर्यवंशी - चितोड - उदेपूर - वेरुळ - राजगड - रायगड - सातारा कोल्हापूर - नंतर अनेक ठिकाणी वंशविस्तार) श्रीमन्नारायण - ब्रह्मा - मारीची - कश्यप - १८२ व्या पिढीत भिमासिंगराणाजी १८३ व्या पिढीत १८४ व्या पिढीत लक्ष्मणसिंग राणाजी १९७ व्या पिढीत बऱ्हारजी राणाजी १९८ व्या पिढीत, खेलोजीराणाजी, १९९ व्या पिढीत मलकर्ण ऊर्फ मालजी राणाजी भोसले.'[२]

---

[१] *शिंदे अशोकराव सरकारः महापराक्रमी व परमप्रतापी छत्रपती संभाजी महाराज, सह्याद्री प्रकाशन, इस्लामपूर, (१९९०), पृ. क्र. २०*
[२] *शिंदे अशोकराव सरकारः उपरोक्त पृ. क्र. २०.*




भोसले घराण्याची सुरुवात ही मारीचीच्या पुत्रापासून सुरु झालेल्या सूर्यवंशातून होते. यानंतर १८२ व्या पिढीतील या कुळातील वंशज भिमसिंगराणाजी याची पत्नी राणी पद्मीनी करिता अल्लाउद्दीन खिलजीने राजपुतांच्यावर आक्रमण करून राजपुताचा मोठ्या प्रमाणावर

नाश केला. यानंतर १८३ व्या पिढीमध्ये जयसिंगराणाजी हा आपल्या पित्याच्या सुचनेनुसार राजवंशाचे रक्षण करण्याकरिता वनात जाऊन राहिला यानंतर १८५ व्या पिढीमध्ये अजयसिंगराणाजी ऊर्फ अरसिंगराणाजी यांच्या वंशजापासून उदयपूरची शाखा निर्माण झाली. त्यानंतर १८९ व्या पिढीमध्ये भोसाजीराणाजी हा गादीवर होता. त्यानंतर देवराजराणाजी हा दक्षिणेत आला. त्याने महाराष्ट्रातील वऱ्हाड येथे वास्तव केले. देवराजराणाजी हा भोसाजी याचा पुत्र असल्याने त्यास भोसले नावाने संबोधण्यात येऊ लागले. याशिवाय वेरुळ, दौलताबाद परिसरात भोसाजी नावाचे गाव आहे. यावरून ही भोसले असे म्हणण्याची शक्यता नाकारता येत नाही. यानंतर १९१ व्या पिढीमध्ये प्रतापसिंहराणाजी महादेव हा हिगडी, बेरडी, वेरुळ, खाणवट, देऊळ, गाव वगैरे गावाचा मुळ प्रस्थापक समजला जातो. याच पुढे १९७ व्या पिढीत बऱ्हारजी राणाजी १९८ व्या पिढीत खेलोजीराणाजी, १९९ व्या पिढीत मलकर्ण ऊर्फ मालाजी राणाजी २०० व्या पिढीत बाबाजी राणाजी, २०१ व्या पिढीत मालोजी यानंतर २०२ व्या पिढीत शहाजीराजे भोसले त्यानंतर त्यांच्या वंशावळीची सुरुवात होते.

### १.८.२ 'स्वराज्य संकल्पक' शहाजी राजे :

'शहाजी राजाचा जन्म वेरुळ घृष्णेश्वर मुक्कामी फाल्गुण अमावस्या (जय संवत्सराच्या शके १५१६ ची) संपताना, चैत्र शु-१ प्रतिपदारंभ, सूर्योदय, मन्मथ नाम संवत्सर शके १५१७, रविवार दिनांक २ मार्च १५९५ रोजी झाला.'[३] शहाजीराजांच्या पित्याचे नाव मालोजी होते तर आईचे नाव दिपाबाई ऊर्फ उमाबाई होते. शहाजीच्या अजोबाचे नाव बाबाजी होते ते निजामशाहीच्या पदरी चाकरी करत होते. त्यांची दोन्ही मुले मोलोजी व विठोजी ही पराक्रमी निघाली. त्यामुळे निजामशाहाने त्यांना वेरुळच्या आसपास देशमुखी वतन दिले होते. मोलोजीच्या राजकीय कार्याबद्दल जरी फारशी माहिती मिळत नसली तरी त्यांच्या धार्मिक कार्याची माहिती मिळते. भोसल्याचे कुलदैवत शिखरशिंगणापूर शंभूमहादेव हे देवस्थान तेथे पाण्याची सोय नव्हती. संपूर्ण परिसर ओसाड होता. तेव्हा मालोजीने तेथे एक मोठा तलाव

---

[३] *दारवटकर अनंत :अद्वितीय छत्रपती श्रीसंभाजी महाराज (खंड १ ला ), श्रीशंभु प्रेरणा प्रकाशन, पुणे (प्रथमावृत्ती ) २००७ पृ. क्र. ७*

बांधून पाण्याची सोय केली. याशिवाय वेरुळ येथील घृष्णेश्वराजवळ एक उत्तम पाण्याची विहिर बांधली, औरंगाबादेस मालपुरा, परसपुर, विठपुरा व खेलपुरा असे चार पुरे वसविले.

शहाजीराजे पाच वर्षांचे असताना निजाम शाहाच्या अज्ञेने मालोजी राजे इंदापूरच्या स्वारीवर गेले. तेथे पराक्रम गाजवला त्याच स्वारीमध्ये त्यांचा मृत्यू झाला. त्यांच्या मृत्यूनंतर निजामशाहने त्यांच्या वारसांना इंदापुरची जहागीर दिली. मालोजीच्या मृत्यूनंतर शहाजीचे पालणपोषण चुलता विठोजी व आई उमाबाई यांनी केले. शहाजी राजांचा विवाह वयाच्या नवव्या - दहाव्या वर्षी निजामशाहीतीलच मातब्बर मराठा सरदार लखुजी जाधव यांची कन्या जिजाबाई यांच्याशी १६०५ च्या डिसेंबर महिन्यात झाला. त्यांच्या विवाह संबंधात बखरीमध्ये सांगितलेला रंगपचमीचा प्रसंग हा काल्पनिक असून समकालीन कागदपत्रांत कोठेच सापडत नाही. उलट भोसले, जाधव व निंबाळकर यांच्यामध्ये पूर्वीपासूनच नातेसंबंध असल्याचे दिसून येतात. शहाजी राजाची आई दिपाबाई ऊर्फ उमाबाई वणगोजी नाईक निंबाळकराच्या कन्या होत्या. वणगोजी राजाची बहिण अंबिकाबाई या लखोजी जाधवाच्या पत्नी होत्या. त्याचीच कन्या जिजाऊ होती. म्हणजे शाहजीराजांच्या आईच्या आत्याची मुलगी जिजाऊ होती. शहाजीराजांच्या विवाहानंतर खंडागळे हत्ती प्रकरणामुळे शहाजीराजे व सासरे लखूजी जाधव यांच्यात वैर निर्माण झाले. यावेळी भोसल्याची बाजू निजामशाहाने घेतल्यामुळे लखूजी जाधवाने निजामशाही सोडून मोगलाईचा स्वीकार केला.

**[अ] भातवडीचे युद्ध आणि शहाजीराजांचा दक्षिण भारताच्या राजकारणात उदयः**

शहाजी राजांच्या दृष्टीने भातवडीचे युद्ध अत्यंत महत्त्वाचे आहे. या युद्धानंतरच शहाजी राजाचे व्यक्तिमत्व प्रकर्षाने पुढे आले. या युद्धानंतर 'शहाजी राजे' हे व्यक्तिमत्व राजकीय पटलावर विशेष चमकू लागले. भातवडीची लढाई शहाजी राजांच्या आणि मराठ्यांच्या इतिहासास कलाटणी देणारी घटना आहे. या लढाईचे मुख्य कारण निजामशाही व अदिलशाहीतील बेबनाव आणि मोगलांची दक्षिण देश जिंकण्याची इच्छा हे होय. निजामशाहीचा वजीर मलिकांबर याचे दक्षिण भारतातील वाढते वर्चस्व हे अदिलशाहीस धोक्याचे वाटत होते. तत्कालीन मोगल बादशहाचा बंडखोर मुलगा खुर्रम (शहाजहान) यास

मलिकअंबरने अपली मुलगी देऊन त्यास मदत देण्याचे अभिवचन देऊन सहकार्य दिले होते.[४] "या सर्व पार्श्वभूमीवर मोगल व अदिलशाही सैन्य निजामशाहीवर चालून आले. या दोन्ही सैन्याचा प्रतिकार करण्यासाठी मलिकांबरने अहमदनगरपासून दहा मैल पूर्वेस असलेल्या भातवडीच्या गडीमध्ये आश्रय घेतला. कारण हा प्रदेश गनिमी युद्धतंत्रास अत्यंत अनुकूल होता. तेथे एक मोठा तलाव होता. मोगल व अदिलशाही सैन्य निजाम सैन्यावर चालून येताच प्रथम मलिकांबरने तलाव फोडून चहूबाजूने पाणी सोडले. त्यानंतर त्यांच्यावर हल्ले केले." ह्या युद्धात शहाजी राजे व शरीकजी राजे यांनी अतुलनीय पराक्रम केला. शहाजी राजे, शरीकजी, खेळोजी, सिद्दी, हंबीरराव इत्यादिंनी मोगल सैन्याची कत्तल उडवली.

ह्या घनघोर युद्धात शरीफजी राजाची आहुती पडली. शरीफजीस आपल्या बाणांनी पाडणाऱ्या मोगल सैन्यावर शहाजी राजे तुटून पडले व त्यांनी मोगलाची दाणादाण उडविली. मोगल सैन्य हत्तीसह माघारी वळून पळू लागले. ते पाहून अदिलशाही सैन्यही पळू लागले. (३१ ऑक्टोबर १६२४) अखेर शहाजी राजांनी अनेक मोगलाना पकडून मलिकांबराच्या पुढे आणून उभे केले.[५] या युद्धातील व्यूहरचना जरी मलिकांबरची असली तरी पराक्रम मात्र शहाजी राजानी गाजवला होता. शहाजी राजाच्या या युद्धातील पराक्रमामुळे दक्षिण भारताच्या राजकारणात वजन वाढू लागले.

### [ब] शहाजीराजांच्या राजकीय हालचाली (१६२५-१६२९) :

भातवडीच्या युद्धामध्ये शहाजीराजाने मोठा पराक्रम गाजवला होता. तसेच त्याचे चुलतबंधुने या लढाईमध्ये पराक्रम दाखला होता. भोसले घराण्याचे निजामशाहीतील वाढते वर्चस्व हे मलिकांबरास सहन होणारे नव्हते. त्यामुळे त्यांनी शहाजी व त्यांच्या चुलतबंधुमध्ये फुट पाडण्याचा प्रयत्न केला. याशिवाय निजामशहाचे शाहाजीच्या विरुद्ध कान भरण्यास सुरुवात केली. त्यामुळे निजामशाहीत आपल्या पराक्रमाचे योग्य चीज होत नाही असे पाहून

---

[४] *दारवटकर अनंत : अद्वितीय छत्रपती श्रीसंभाजी महाराज (खंड १ ला ), श्रीशंभु प्रेरणा प्रकाशन, पुणे (प्रथमावृत्ती ) २००७ , पृ. क्र. ३९*

[५] *दारवटकर अनंत : उपरोक्त, पृ. क्र.४१*

शहाजीराजांनी निजामशाही सोडली. याच सुमारास अदिलशाहीत दुसरा इब्राहीम अदिलशाह सत्ताधारी होता. तो हिंदू सरदार व कर्तबगार व्यक्ती याविषयी अधिक समजुतदारपणे वागायचा त्यांनी  शहाजीराजांना अदिलशाहीत  येण्यासाठी पाचारण केले. शहाजी राजे अदिलशाहीत फेब्रुवारी १६२५ च्या दरम्यान गेले असावेत. तेथे त्यांना मानमरातब देऊन 'सरलष्कर' करण्यात आले. अदिलशाहीत आल्यानंतर त्यांनी निजामशाहीतील मुधोजी फलटणकरावर स्वारी करून त्यांचा पूर्ण पराभव केला. यानंतर केरळ व कर्नाटक प्रातांवर स्वाऱ्या करून अनेक राजांचा पराभव केला. अदिलशाहीस मोठ्या प्रमाणात संपत्ती मिळवून दिली. शहाजीराजेचे अदिलशाहीत बस्तान बसले असताना इ.स. १६२७ च्या सप्टेंबरमध्ये इब्राहीम अदिलशाह दुसरा मरण पावला. त्यांनतर त्याचा मुलगा मुहम्मद अदिल गादीवर आला. हा दुसऱ्या इब्राहीम अदिलशाह इतका समजूतदार नव्हता. यामुळे शहाजीला आपल्या कर्तबगारीचे तेथे उचित चीज होईल असे वाटणासे झाले. तसेच या वेळी निजाम शाहीचा वजीर मलिकांबरचा मृत्यू झाला होता. यामुळे शहाजीराजांना अदिलशाही सोडून निजामशाहीत जाणे अधिक सोईस्कर वाटले. म्हणून ते इ.स. १६२८ च्या आरंभी अदिलशाही सोडून पुन्हा निजामशाहीत परत आले. यावेळी मोगलाच्या गादीवर शहाजहान बसला होता. त्याने दक्षिण भारतातील आक्रमण तीव्र केले. यामुळे शहाजीराजे निजामशाहीत आल्यानंतर प्रथम मोगलाशी लढण्याचा प्रसंग आला. त्याअगोदरच शहाजीचे सासरे लखोजी जाधवही निजामशाहीत आले होते. शहाजीराजे मोगलाशी लढाईमध्ये गुंतले असता २५ जुलै १६२९ रोजी लखोजी जाधव यांस निजामाने दौलतबादला बोलावून घेतले. त्यांचे दोन पुत्र व एक नातू यांची हत्या केली. या हत्याकांडामुळे शहाजी राजांच्या मनात निजामशहाबद्दल चीड निर्माण झाली व त्यांनी निजामशाही व अदिलशाहीच्या प्रदेशावर आक्रमण करून स्वतंत्र राज्य प्रस्थापित करण्याचा प्रयत्न चालवला.

### [क] शहाजीचा स्वतंत्र राज्याचा पहिला प्रयत्न :

छत्रपती शिवाजी महाराजांना स्वराज्य निर्मितीची प्रेरणा ही त्यांच्या पित्याकडून मिळाली होती. त्याची राजमुद्रा ही सुद्धा शहाजी राजानीच दिलेली होती. शहाजीराजाने सुद्धा

आपल्या कारकिर्दीमध्ये स्वराज्यासाठी प्रयत्न केले याबदद्दल इतिहासकार वि. का. राजवाडे म्हणतात "शहाजीने प्रकट स्वराज्य, प्रच्छन्न स्वराज्य, मांडलिकी स्वराज्य व स्वतंत्र स्वराज्य स्थापनेसाठी उत्तरोत्तर प्रयत्न केले."[६] निजामशहाने आपल्या बापाचा खून केलेला पाहून जिजाबाई संतप्त झाली. शहाजीराजे सासऱ्यांच्या खुनाचा सूड घेण्यासाठी त्यांनी निजामशाहीवर स्वारी केली. शहाजीराजाने बंडखोर लोदींना हाताशी धरून जुन्नर आणि संगमनेरपासून नगर आणि दौलतबादपर्यंतचा सर्व मुलूख आणि बालेघाटाजवळील प्रांत शहाजीराजानी जिंकला मुर्तजानिजामशाहकडे फक्त राजधानी व पूर्वेकडील प्रदेश तेवढा राहिला होता. यावेळी शहाजीने अदिलशाहीचा काही प्रदेश जिंकला होता. यावेळी शहाजीराजांनी आपली राजधानी किंवा मुख्य ठिकाण हे निजामशाहीच्या ताब्यातील भिमगड किल्ला दुरुस्त करून त्यास 'शहागड' असे नाव देऊन तेथून सर्व कारभार करण्यास सुरुवात केली होती. शहाजीचे स्वतंत्र राज्य स्थापन करणे हे अदिलशाही व निजामशाहीस सहन होणारे नव्हते. त्यामुळे दोन्ही शाह्यांनी एकत्रित येऊन शहाजी विरुद्ध मोहिम उघडली. याचवेळी अदिलशाहीचा सेनापती मुरारजगदेव यांनी शहाजीची जहागीरी पुणे प्रातांवर आक्रमण केले. दुसरीकडे शहानजहान फौजेसह दक्षिण भारतात उतरला होता. लोदीशी संधान बांधल्यामुळे मोगलाची स्वारी त्यांच्यावर येणार हे उघड होते. अशा परिस्थितीमध्ये आपले स्वतंत्र्य राज्य या तिन्ही आघाडयांपुढे टिकणे शक्य नाही. हे ओळखून शहाजी राजांनी मोगलाचा दक्षिणेतील सरसेनापती आजमखान यांच्याशी पत्र व्यवहार करून मोगलाईचा स्वीकार केला. मोगलाईत शहाजीना पंचहजारी मनसबदारी मिळाली त्यामुळे शहाजीच्या राज्याचे संरक्षण झाले.

### [ड] शहाजीचा स्वतंत्र राज्याचा दुसरा प्रयत्न :

शहाजीराजे मोगलाईत असताना मूर्तजा निजामशहाने मलिकांबरचा मुलगा फत्तेखान याला वजीर केले. फत्तेखानाने मुर्तजास ठार करून त्याचा मुलगा हुसेन हाताशी धरुन संपूर्ण

---

[६] *पाटील लांडे त्र्यंबक रामरावः संशोधन प्रबंध शहाजी महाराज एक चिकित्सक अभ्यास, डिसेंबर २००२ पृ. क्र. ९*

सत्ता आपल्या ताब्यात घेतली. मोगलाशी तह करून संपूर्ण निजामशाही बुडवण्याचा प्रयत्न चालवला. त्याच्या बदल्यात शहाजीराजांच्या जहागीरीचा प्रदेश देण्याचे मोगलांनी ठरविले . त्यामुळे इ.स. १६३२ मध्ये शहाजीने मोगलाईचा त्याग केला आणि बुडत असलेल्या निजामशाहीला वाचवण्यासाठी प्रयत्न चालवले. इ.स. १६३३ मध्ये निजामशाहीतील एका लहानग्या वारसाला गादीवर बसवुन जुन्नर येथे स्वतंत्र निजामशाही कारभार पाहू लागला शहाजीराजांचे वाढते वर्चस्व मोगलशाहीस मान्य होणारे नव्हते त्यामुळे मोगलांनी अदिलशाहाशी संगनमत करून शहाजीराजांविरुद्ध मोहीम उघडली. शहाजीराजाने प्रारंभी प्रेमगिरी, दौलताबाद, कोणकणातील माहुली या किल्ल्यांचा आश्रय घेत, अदिलशाही व मोगल सैन्याशी जवळपास तीन वर्षे झगडा दिला. यावेळी शहाजीराजांनी पोर्तुगीज व जंजिऱ्याच्या सिद्दीशी मोगल व अदिलशाही विरुद्ध मदत मिळवण्याचा प्रयत्न केला; पण त्यात यश आले नाही. शेवटी रणदुल्लाखान, कानोजी जेधे यांच्या मध्यस्थीने मोगल व अदिलशाहीशी तह करून मुर्तजा निजामशाहास त्यांच्याकडे सर्पुद केले. यामुळे निजामशाही कायमची बुडाली.

### [इ] शहाजी राजांचा स्वतंत्र राज्याचा तिसरा प्रयत्न :

निजामशाहीच्या अस्थानंतर शहाजीराजांनी अदिलशाही स्वीकारली इ.स. १६३७ मध्ये अदिलशाहाने शहाजीराजांची रवानगी रणदुल्लाखानासोबत कर्नाटकावर केली. १६३७-४० या काळात शहाजीराजाने कर्नाटकावर तीन स्वाऱ्या केल्या. त्यात रयगिरीच्या वीरभद्राचा पराभव करून खंडणी वसुल केली. बसवपट्टम सर केले. या कामगिरीवर खूष होऊन महंमदशहाने त्यांना कनकगिरीच्या सनदा दिल्या. शहाजीने नंकापूर, हरहीर, शिरा, बसवपट्टम श्रीरंग पट्टण, तालीखेडा वगैरे प्रदेश जिंकला. शहाजीराजांच्या पराक्रमामुळे शांतता व सुव्यवस्थेमुळे लोकप्रियता प्रचंड वाढली. शहाजीराज्यांच्या कर्नाटकातील वाढत्या वर्चस्वाची अदिलशहास धास्ती वाटू लागली तेव्हा मुस्तफाखानामार्फत शहाजींना झोपेत असताना २५ जुलै १६४८ रोजी कैद करण्यात आले. विजापूरास त्यांस नजर कैदेत ठेवण्यात आले. त्याच वेळी शहाजीच्या पुत्रांनी संभाजीने कर्नाटकात व शिवाजीने महाराष्ट्रात

अदिलशाही सैन्याचा प्रराभव केला. त्यामुळे महंमदशहाच्या तोंडचे पाणी पळाले. त्यांनी १६४९ मध्ये शहाजी राजांची सुटका केली. यानंतर शहाजीराजे यांनी बंगलोर येथे स्वतंत्र राजा म्हणून जहांगीर प्रस्थापित केली. त्यांनी त्यांच्या दरबारामध्ये अनेक संस्कृत कवी, विद्वान यांना राजाश्रय दिला होता. इ.स.१ ६४९ ते १६६४ पर्यंत बंगलोर येथे राज्य केले. शेवटी २३ जानेवारी १६६४ रोजी कर्नाटकातील हौदेगीरी येथे घोडयावरून खाली पडून शहाजीराजांचे निधन झाले.

### १.८.३ 'स्वराज्य संस्थापक ' छत्रपती शिवाजी महाराज :

छत्रपती शिवाजी महाराजांचा जन्म शुक्रवार दि. १९ फेब्रुवारी १६३० (फाल्गुन वद्य तृतीया, शके १५५१) या दिवशी सायंकाळी सूर्यास्तानंतर शिवनेरी किल्यावर झला. वडील शहाजीराजे यावेळी निजामशाही वाचविण्यासाठी प्रयत्नात असल्यामुळे अतिशय धामधुमीत होते. त्यामुळे शिवाजीराजांची पहिली साह-सात वर्षे शिवनेरी, प्रेमगिरी, माहुली, शिवापूर, पुणे इत्यादी ठिकाणी गेली. शहाजी राजांच्या धावपळीमुळे शिवाजीच्या पालण-पोषणाची जबाबदारी मातोश्री जिजाऊ साहेबांवर येऊन पडली होती. जिजाऊंनी शिवाजीराजांच्या शिक्षणाची उत्तम सोय केली होती. शिवाजीराजांना प्रेरणा आणि स्फुर्ती देऊन मार्गदर्शन करण्याचे कार्य जिजाऊंनी केल्यामुळेच शिवाजी राजांनी स्वतंत्र राज्याची निर्मिती केली.

### [अ] स्वराज्य निर्मितीस प्रारंभ :

इ.स. १६४२ च्या सुमारास शहाजीराजांनी आपल्या पुणे आणि सुपे परगण्याची जहाँगीरीची जबाबदारी जिजाऊ व मुलगा शिवाजी यांच्यावर सोपवली होती; परंतु त्यापूर्वी इ.स. १६३० मध्ये अदिलशाहीचा सेनापती मुरार जगदेव यांनी पुण्यावर आक्रमण करून संपूर्ण प्रदेश बेचिराख केला होता. पुन्हा तेथे वस्ती होऊ नये म्हणून गाढवांचा नांगर धरला होता. शिवाजी राजांनी तेथे सोन्याचा नांगर धरला व पुणे कसबा बसवण्यासाठी प्रोत्साहन दिले. यानंतर जहागीरीचा उत्तम बंदोबस्त करण्यासासाठी बारा मावळ प्रदेशातील देशमुखांना

साम, दाम, दंड, भेद या मार्गाने वठणीवर आणण्याचे कार्य शहाजीराजांनी पाठवलेल्या मुत्सद्दयांच्या सहकार्याने जिजाऊ व शिवाजी राजांनी केले.

शिवाजी राजांनी मनोमन निर्धार करून वयाच्या पंधरा-सोळव्या वर्षी स्वराज्य स्थापनेच्या कामाला सुरुवात केली. मुलखाच्या संरक्षणासाठी बळकट व दुर्गम किल्ल्यांचे महत्त्व शिवाजीराजांना चांगलेच माहित होते. त्यामुळे आपल्या जहागीरीच्या प्रदेशातील गडकोटाकडे लक्ष गेले. यावेळी विजापुरचा अदिलशहा मुहम्मद हा आजारी पडला होता. याच संधीचा फायदा घेऊन मुरुबदेव आणि तोरणा हे किल्ले ताब्यात घेतले. मुरुबदेव म्हणजे राजगड जो इ स. १६७० पर्यंत शिवाजी महाराजांच्या राजधानीचे ठिकाण होते. मार्च १६४८ मध्ये त्यांनी कोंढाणा किल्ला ताब्यात घेतला. कोंढाणासारखा महत्त्वाचा किल्ला शिवाजीच्या ताब्यात गेल्यामुळे शिवाजीराजांच्या वाढत्या कारवायांना पायबंद घालणे अदिलशहाला आवश्यक वाटू लागले. त्याच सुमारास २८ जुलै १६४८ रोजी शहाजी राजांना गावकरी गोवळकोंडा आणि जिंजीच्या किल्लेदारास हात मिळवणी केल्याच्या संशयावरून कैद केले होते. या दोन्ही पार्श्वभूमीवर अदिलशहाने आपला सेनापती फत्तेखान खुदावदखानाची रवानगी शिवाजीच्या विरुद्ध केली. ऑक्टोबर १६४८ मध्ये शिवाजी राजे व फत्तेखान याच्यात पुरंदर येथे युद्ध झाले. या युद्धामध्ये शिवाजी राजांनी फत्तेखानाचा पराभव केला. शिवाजी राजाच्या दृष्टीने हे युद्ध अतिशय महत्त्वाचे होते. कारण या युद्धाने 'अदिलशहीशी घोषित शुत्रुत्व व राज्यास स्वतंत्र अस्तित्व प्राप्त झाले. यानंतर शिवाजी राजांनी अतिशय मुत्सद्दीगीरीने' अदिलशाहीवर मोगलांचे दडपण आणून शहाजीराजांची १६ मे १६४९ रोजी मुक्तता करून घेतली. शहाजीराजांच्या सुटकेनंतर ची ६-७ वर्षे शिवाजीराजाने आपल्या प्रदेशाचा योग्य बंदोबस्त करण्यासाठी घालवली.

### [ब] शिवाजी अदिलशाही संघर्ष :

विजापुरच्या अदिलशाह मुहम्मद यांचा आजार अधिक बळावल्यामुळे अदिलशाहीमध्ये कटकारस्थानांना ऊत येऊन दरबारामध्ये दुफळी निर्माण झाली होती. या राजकीय परिस्थितीचा फायदा घेण्याचे ठरवून शिवाजी महाराजांनी जावळी प्रदेश ताब्यात

घेण्याचे ठरवले. जावळीचा प्रदेश डोंगरी दऱ्या खोऱ्याचा असल्यामुळे संरक्षणाच्या दृष्टीने अगदी अभेद्य होता. अशा दुर्गम प्रदेशावर मोरे घराण्याची सत्ता होती. त्यांना अदिलशाहीने 'चंद्रराव' हा किताब दिला होता. त्यामुळे त्यांच्या सत्ताधाऱ्यांस 'चंद्रराव मोरे' असे संबोधले जाते. यावेळी  यशवंतराव हा जावळीचा सत्ताधिश होता. यशवंतराव शिवाजीराजांच्या मदतीने सत्तेवरती बसला होता. त्यामुळे शिवाजीराजांचे त्यांच्यावर उपकार होते; परंतु तो त्याच्या उलट वागत होता. शिवाजीराजांचे अधिपत्य मानण्यास तयार नव्हता. शिवाजी राजांनी चालवलेल्या देशमुखांच्या एकजुटीच्या प्रयत्नास त्याने विरोध केला. तसेच स्वराज्यातील गुन्हेगारांना आश्रय देऊ लागला. या कारणांमुळे शिवाजीराजे व जावळीचे मोरे यांच्यात वितुष्ट आले. प्रथम शिवाजीराजांनी समोपचाराने मार्ग काढण्यासाठी पत्र पाठविले. त्यात शिवाजी राजे लिहतात "आम्ही राजे श्री शंभुमहादेवांनी आम्हास राज्यपद दिले. तुम्ही यापुढे स्वतःस राजे म्हणून घेऊ नये."[७] याला चंद्रराव मोरे यांनी मग्रुरीचे उत्तर पाठविले "तुम्ही कालचे राजे हे राज्यपद तुम्हास कोणी दिले ? तुमच्यात काही शौर्य असेल तर तुम्ही आजच यावे उद्यावर चालढकल करू नये. यानंतर शिवाजी महाराजांनी सैन्यासह जावळी कुच करून हल्ला केला. यावेळी झालेल्या युद्धात हणमंतराव मोरे मारला गेला. इतर मोरे मंडळी पळून गेली . त्यामुळे जावळी शिवाजी राजांच्या ताब्यात आली. याबाबत जेधे शकावली आणि जेधे करीना यात अशी नोंद मिळते, "२७ जानेवारी १६५६ शिवाजी महाराजांनी  कुच केले आणि जावळी घेतली, त्यावेळी त्यांच्या बरोबर  कानोजी जेधे, बांदल, सिलिमकर आणि मावळचे देशमुख यांची पथके होती." [८] पुढे शिवाजीराजांनी सुपे प्रांताचा ताबाही संभाजी मोहितेकडून घेतला. तसेच कल्याण भिवंडीचा प्रदेश जिंकून स्वराज्यात सामील केला.

शिवाजी राजांच्या वाढत्या वर्चस्वाला पायबंद घालण्यासाठी अदिलशाहीने अफझलखानाची नेमणूक केली. १६ जून १६५९ रोजी अलीअदिलशहाने कोन्होजी जेध्यांना फर्मान पाठविले होते. त्यात असा हुकुम होता की, "शिवाजी निजामशाही कोकणातील मुसलमानाचा उच्छेद व लुट करून किल्ले हस्तगत केले. त्याचे परिपत्यासाठी

---

[७] *जोशी द. प., उषा जोशी (संपा): समग्र सेतुमाधवराव पगडी , मराठी साहित्य परिषद, हैद्राबाद २०००, पृ.क्र. ४४७*
[८] *जोशी द. प., उषा जोशी (संपा) : उपरोक्त, पृ.क्र. ४४७*

अफझलखानास रवाना केले आहे तरी त्यास तुम्ही सामील होऊन शिवाजीचा पराभव करून निर्मूल फडशा करावा; त्याच्या लोकांस आश्रय न देता ठार मारून या दौलतीचे कल्याण इच्छिणे."[९] अदिलशाही दरबारातील एक सरदार तवारिखकार सय्यद नुरुल्ला आपल्या तारीख इ-अली अदिलशाहीमध्ये लिहितो, "सुलतानाने अफझलखानास सांगितले की, शिवाजीला निपटून काढले पाहिजे. तो शरण येण्याचे ढोंग करील, पण त्याच्यावर विश्वास ठेवू नकोस. मृत्युचा अग्नी त्याच्या जीवनाच्या शेतावर पडला पाहिजे."[१०] अदिलशहाच्या आज्ञेने अफझलखान सप्टेंबर १६५९ मध्ये प्रचंड सैन्य सामग्रीसह निघाला. यापूर्वी सन १६५९ च्या ११ जुलै रोजी शिवाजीराजे पुण्याजवळील आपली राजधानी राजगडाहून निघून महाबळेश्वराच्या डोंगरातील प्रतापगड येथे ठाण मांडून बसले होते. त्यामुळे अफझलखान विजापुरहून निघून वाईस येऊन डेरेदाखल झाला. तेथून त्याने शिवाजी राजाच्या प्रदेशावर सैन्य पाठवून बराचसा मुलुख उद्धवस्त केला. आपल्या अस्तित्वालाच धोका निर्माण झाला आहे. ह्याची कल्पना शिवाजी महाराजांना झालेली होती. तसेच अफझलखानास शरण जाणे म्हणजे राजकीय आत्महत्याच आहे. शिवाजीराजांना माहित होते. त्यामुळे अफझलखानाशी मुकाबला करण्याची योजना आखली. याअगोदरच शिवाजीराजे कोणत्याही हालचाली करत नाही म्हणून आपला वकील कृष्णाजी भास्कर यांना शिवाजीकडे पाठविले होते. शिवाजी महाराजांनी आपला वकील पंताजी गोपीनाथ बोकील यांना खानाकडे पाठवून अतिशय मुत्सद्देगीरीने अफझलखानाला प्रतापगडावर येण्यासाठी मन वळवले १० नोव्हेंबर १६५९ रोजी शिवाजी महाराज आणि अफझलखानची भेट झाली. भेटी दरम्यान झालेल्या चकमकीमध्ये शिवाजीराजांनी अफजलखानाला ठार केले. यानंतर अगोदरपासूनच दबा धरून बसलेल्या मराठ्यांच्या सैन्याला इशारा मिळताच त्यांनी अफझलखानाच्या सैन्यावर तुटून पडले. हा हल्ला अचानक झाल्यामुळे अफझलखानाचे संपूर्ण सैन्य नष्ट झाले. मराठ्यांना प्रचंड लुट मिळाली. ह्या विजयामुळे मराठ्यांचे नीतिधैर्य खुपच वाढले. शिवाजी महाराजांच्या

---

[९] *गर्गे स. मा (संपा) :मराठी रियासत गोविंद सखाराम सरदेसाई (खंड १ ला) ,पॉप्युलर प्रकाशन, मुंबई २०१० प्र. क्र. १८९*

[१०] *कुलकर्णी अ. रा., खरे ग.ह. (संपा) : मराठयांचा इतिहास( खंड१ला), कॉन्टीनेन्टल प्रकाशन, पुणे (प्रथमवृत्ती ) १९८४, पृ. क्र. १५५*

एका सैन्याच्या तुकडीने सातारा आणि सांगली हे जिल्हे पादाक्रांत करून पन्हाळगड गाठले. दुसरे सैन्य कोकणात उतरले आणि कोकणाच्या दक्षिण टोकापर्यंत पसरले[११].

अदिलशाहीच्या दुबळेपणाचा फायदा घेऊन शिवाजीराजांनी आणखी चढाईचा नेत आखला. नेताजी पालखराबरोबर एक सैन्याची तुकडी देऊन विजापुरकडे पाठविले. स्वतः शिवाजी मिरजेवर चालून गेले. शिवाजीचा बंदोबस्त करण्यासाठी अदिलशहाने कर्नुल प्रांताचा सुभेदार सिद्दी जौहर याला बोलावणे पाठवून कळविले की "शिवाजीवर चालून जाऊन त्याची तुम्ही खोड मोडाल, तर तुम्हावरील आमची इतराजी नाहीशी होईल."[१२] सिद्दी जौहरचे दहा हजार स्वार व चौदा हजार पायदळ तसेच बाजी घोरपडे, रस्तुमी जमाल यांचेही सैन्य एवढ्या मोठ्या सैन्यबळासह शिवाजी महाराजांवर चालून गेला. यावेळी शिवाजीराजे पन्हाळगडावर होते. त्यामुळे २ मार्च १६६० मध्ये सिद्दी जौहरने पन्हाळगडास वेढा घातला. जवळपास साडे चार महिने हा वेढा चालूच राहिला. त्यामुळे शिवाजीराजे पुरते अडकून पडले. वेढ्यातून सुटण्याचे सर्वतोपरी प्रयत्न अयशस्वी होत होते, शेवटी सिद्दी जौहरशी सलोख्याची बोलणी सुरु करण्यासाठी वकील पाठवला. यामुळे त्याचे सैन्य गाफील राहीले. याचाच फायदा घेऊन १३ जुलै १६६० रोजी रात्री पन्हाळ गडावरून निसटले व विशालगडाकडे निघाले. याची बातमी सिद्दी जौहरला समजताच त्याने मुलगा सिद्दी मसूद याला शिवाजीच्या पाठलागावर पाठवले. पुढे दळवी व सुर्वे यांचे सैन्यानेही विशालगडास वेढा दिलेला होता. या दोन्ही सैन्यामध्ये अडकू नये म्हणून बाजीप्रभुच्या नेतृत्वाखाली सिद्दी मुत्सुद्दीच्या सैन्यास रोखण्यासाठी घोडखिंड लढवली या संघर्षात बाजू प्रभूने बलिदान दिले. शिवाजी राजे विशालगडावर सुस्वरुप पोहचले. तेथून पुरंदरवर नंतर राजगडावर गेले. शाहिस्तेखान प्रचंड सैन्यासह दक्षिण भारतात आला होता. त्यामुळे अदिलशाही व शिवाजीने संघर्ष बंद करून मैत्रीचा तह केला. पुढे इ. स. १६६० ते १६७४ पर्यंत शिवाजी राजांनी

---

[११] *जोशी द. प., उषा जोशी (संपा) :समग्र सेतुमाधवराव पगडी (खंड २ रा), मराठी साहित्य परिषद, हैद्राबाद २०००, पृ.क्र. ४४७*

[१२] *गर्गे स. मा. (संपा): मराठी रियासत गोविंद सखाराम सरदेसाई (खंड १ ला) , पॉप्युलर प्रकाशन, मुंबई २०१० प्र. क्र. ११९*

अदिलशाहीकडे फारसे लक्ष घातले नाही. इ. स. १६७६-७७ साली शिवाजी महाराजानी कर्नाटक मोहीम हाती घेतली. तेव्हा अदिलशाही शिवाजी संघर्ष पुन्हा प्रारंभ झाला.

**[क] शिवाजी मोगल संघर्ष (मराठ्यांच्या स्वातंत्र्ययुद्धाचे पहिले पर्व) :**

शिवाजी महाराजांचा मोगलांशी सर्व प्रथम राजकीय संबंध सन १६४९ मध्ये आला होता. अदिलशहाने शहाजी राजांना कैद केले होते. त्यावेळी शिवाजी महाराजांनी त्यावेळचा मोगलांचा दक्षिण सुभेदार मुराद बक्ष यांच्याकडे वकील पाठवून त्याच्याकडून अदिलशाहीवर दबाव आणून वडिलांची सुटका केली होती. यानंतर १६५३ मध्ये औरंगजेबाची दक्षिणेचा सुभेदार म्हणून नेमणूक झाली तेव्हा १६५७ च्या मार्च महिन्यात शिवाजी राजांनी आपला वकील सोनाजी विश्वनाथ यास औरंगजेबाकडे बीदर मुक्कामी पाठवून आदीलशाही प्रदेशातील जिंकलेल्या प्रदेशास मान्यता मागितली होती. याकडे औरंगजेबाने दुर्लक्ष केले. कोणताही निर्णय दिला नाही. कारण अदिलशाहीशी तह केलेला होता. पुढे ४ जून १६५७ मध्ये शहाजहान आजारी पडल्यामुळे त्यांच्या मुलांमध्ये सत्ता संघर्ष चालू झाला होता. त्यामुळे औरंगजेबानेही उत्तरेकडे कूच केली. या संधीचा फायदा घेण्यासाठी शिवाजी राजांनी मोगलविषयक धोरणात बदल करून ३० एप्रिल १६५७ रोजी मोगलांच्या जुन्नर ठाण्यावर हल्ला करून ते लुटले. अहमदनगरवर मराठ्यांनी हल्ला केला. पुढे औरंगजेबाने आपल्या सर्व भावांना ठार करून व वडिलांना कैद करून दिल्लीचा तख्ताधिश झाला. यानंतर लगेच त्याने दक्षिणचा सुभेदार म्हणून आपलाच मामा अमिरुल उमराव शहिस्तेखान याची नेमणूक केली. शाहिस्तेखानाला दक्षिण भारतात पाठवण्यासाठी आलमगीरनामामध्ये म्हटले आहे की, शिवाजीचे दक्षिणेतील वाढते वर्चस्व व मोगली ठाण्यावरी हल्ले यामुळे बादशहाने दक्षिणेतील आपला सुभेदार अमीरुल उमरा याला पुढील प्रमाणे आज्ञा केली "भक्कम सैन्य घेऊन तुम्ही चाल करून जा त्या दुष्टाचे परिपत्य करण्यासाठी झटा, त्याचा प्रदेश आणि किल्ले जिंकून घ्या आणि त्या प्रदेशातील सगळी बंडाळी मोडून टाका."[१३] वरील आज्ञेप्रमाणे शाहिस्तेखान

---

*[१३] जोशी द. प., उषा जोशी (संपा) :समग्र सेतुमाधवराव पगडी (खंड २ रा) , मराठी साहित्य परिषद, हैद्राबाद २०००, पृ.क्र. ४६१*

२८ जानेवारी १६६० रोजी दक्षिणेकडील प्रचंड सैन्य सामग्रीसह निघाला. यावेळी शिवाजीराजे पन्हाळगडावर आडकून पडले होते. ३ मार्च १६६० ला शाहीस्तेखानाने भिमा नदी ओलांडून दौंड, बरामती, सुपे, शिरवळ आणि सासवड हा पद्रेश घेतला. यावेळी मराठ्यांनी टोळयाटोळयांनी मोगलाच्या सैन्यावर हल्ले केले; परंतु त्यांचा फारसा परिणाम झाला नाही. मैदानी प्रदेश जरी मोगलांनी बळकावला असला तरी किल्ले मात्र मराठ्यांच्या ताब्यात होते. त्यामुळे सर्व प्रथम शाहिस्तेखनाने पुण्याजवळील चाकणचा भुईकोट घेण्यासाठी २१ जून १६६० वेढा दिला. मराठ्यांनी हा किल्ला ५६ दिवस लढवला. किल्ल्याचा किल्लेदार फिरंगोजी नरसाळा होता. चाकणसारख्या लहान भुईकोट घेण्यासाठी ऐवढा वेळ लागतो. हे पाहून शहिस्तेखानाने उत्तर कोकण घ्यायचे ठरवून पराक्रमी सरदार कारतलबखान यास या मोहिमेवर नेमले. कारतलबखानाच्या मोहीमेवर शिवाजी राजांनी बारीक नरज ठेवून त्यांना उंबरखिंडीत उतरु दिले. खिंडीत येताच कारतलबखानावर दोन्ही बाजुने हल्ले करून पूर्ण कोंडी केल्यामुळे शरण येण्याशिवाय त्यास पर्याय नव्हता. त्याचे सर्वसाहित्य व भरपूर खंडणी घेऊन त्यास सोडून दिले. यानंतर शिवाजी राजांनी आपल्या सैन्याची दोन भागांत विभागणी करून एका सैन्याचे नेतृत्व नेताजी पालकरकडे देऊन मोगलांशी चढा चालू ठेवला. दुसऱ्या सैन्याची तुकडी स्वतःच्या नेतृत्वाखाली घेऊन तळकोकणावर चढाई केली. त्यात दाभोळ, पाली, संगमेश्वर, चिपळुण, राजापूर, शृंगारपूर आणि इतर महत्त्वाची ठिकाणे मराठ्यांच्या ताब्यात आली; परंतु उत्तर कोकणात मराठ्यांचा मोगलांशी संघर्ष चालू होता. मे १६६१ मध्ये कल्याण मोगलांच्या ताब्यात गेला. १६६२ मध्ये पेणवर चालून आलेल्या नामदारखानाचा शिवाजी राजांनी पराभव केला; परंतु अशा एखाद्या-दुसऱ्या सरदाराच्या पराभवाने शाहिस्तेखानावर काहीही परिणाम पडत नव्हता. दिवसेंदिवस त्याच्या कारवाया वाढत होत्या. त्यामुळे शिवाजी महाराजांनी शाहिस्तेखानावरच हल्ला करण्याची धाडसी योजना आखली इ.स. ५ एप्रिल १६६३ रात्री ४०० निवडक सैन्यासह पुण्यातील लाल महालावरील त्याच्या स्थळावर हल्ला केला. तो पूर्णपणे यशस्वी झाला. शहिस्तेखान त्यात बचवला, पण त्याची तीन बोटे कापली गेली. यानंतर भयभित होऊन ८ एप्रिलला शहिस्तेखानाने पुण्याचा मुक्काम हलवून तो औरंगाबादला रवाना झाला. बादशहाने त्याची रवानगी बंगालच्या सुभ्यावर केली.

शाहिस्तेखान हा स्वराज्यात तीन वर्षे ठाण मांडून बसल्यामुळे प्रचंड नुकसान झाले होते. त्याची भरपाई करण्यासाठी त्यावेळचे मोगलांचे सर्वात संपन्न शहर सुरत लुटण्याचे ठरवून ६ डिसेंबर १६६३ रोजी राजगडवरून नाशिक दिशेने शिवाजी राजे गेले. बातमी पसरवून दिली की, त्यांचे सैन्य औरंगाबादकडे हल्ला करण्यासाठी जात आहे. अतिशय चपळतेने ५ जानेवारी १६६४ रोजी सुरत शहराच्या जवळ जाऊन थडकले. यानंतर ५ ते ९ चार दिवस संपूर्ण सुरत बेमुरद लुटली. १० जानेवारी १६६४ रोजी स्वराज्याच्या दिशेने कूच केली. या लुटीत रोकड आणि मालमत्ता दोन्ही स्वरुपात जवळपास १ कोटी रुपयांपेक्षा जास्त संपत्ती मराठ्यांना मिळाली.

सुरतेची बेसुरत आणि शहिस्तेखानावरील हल्ल्यामुळे शिवाजीराजांचा बंदोबस्त करण्यासाठी अधिक कार्यक्षम, कुशल, मुत्सद्दी अशा सेनापती मिर्झाराजे जयसिंगची नेमणूक केली. (३० सप्टेंबर १६६४) जयसिंगासोबत दिलेरखान, राजा रायसिंह, सुजानसिंह व पुरणमल बुंदेला हे सरदार होते. १९ जानेवारी १६६५ रोजी जयसिंग बऱ्हाणपुरास पोहचला. पुढे १० फेब्रुवारीला औरंगाबाद तेथून ३ मार्चला पुण्यास आला. स्वराज्यात दाखल होण्यापूर्वीच त्याने शिवाजीराजांची चहुबाजुने कोंडी करण्यासाठी पावले उचलली होती. शिवाजीराजांच्या सर्व शत्रु सरदाराना मदतीचे आव्हान केले होते. अदिलशाहीस सहकार्य अथवा तटस्थ राहण्यास सांगितले होते. यानंतर पुण्यात पोहोचताच मिर्झाराजांनी स्वराज्यातील महत्त्वाची किल्ले काबिज करण्याचे धोरण आखले. सर्व प्रथम त्यांनी ३० मार्च १६६५ रोजी पुरंदरला वेढा दिला. दुसरीकडे मिर्झाराजांनी दाऊदखानाच्या नेतृत्वाखाली फिरत्या सैन्याची तुकडी नेमून स्वराज्याचा मुलुख उद्धवस्त करण्यास पाठवले. दाऊदखानाने रोहिडा ते राजगड या भागातील ५० खेडी उध्वस्त केली.

"खेडी जाळणे, स्त्रीपुरुष आणि गुरेढोरे ताब्यात घेणे. हा मोगालांच्या हल्ल्याचा एक ठराविक साचाच बनुन गेला."[१४] याच दरम्यान सतत तोफेच्या भडिमारामुळे १४ एप्रिल

[१४] *जोशी द. प., उषा जोशी (संपा) :समग्र सेतुमाधवराव पगडी (खंड २ रा) , मराठी साहित्य परिषद, हैद्राबाद २०००, पृ.क्र. ४७४*

१६६५ रोजी रुद्रमाळ (वज्रगड) मोगलांनी घेतला आणि आपला मोर्चा पुरंदरकडे वळवला. यावेळी पुरंदरच्या संरक्षणाची जबाबदारी किल्लेदार मुरारबाजी देशपांडे ३०० मावळ्यांसह संभाळीत होते. दिलेरखानानी सतत दोन आठवडे पुरदंरवर तोफांचा मारा केला. त्यामुळे मराठ्यांचे बरेच सैन्य मारले गेले. जास्त काळ किल्ला लढवणे शक्य नव्हते. स्वराज्यातील जनतेचे होणारे हाल व किल्यावर मरणारे मराठा सैनिक या सर्व पार्श्वभूमीवर शिवाजीराजांनी मिर्झाराजे जयसिंगाशी तहाच्या बोलणीसाठी आपला वकील रघुनाथ बल्लाळास पाठविले. ९ जून १६६५ रोजी शिवाजी राजे व मिर्झाराजे जयसिंग पुरंदर येथे भेटीगाठी होऊन तह झाला. तहानुसार शिवाजीने मोगलांना २३ किल्ले व ४ लाख उत्पन्नाचा प्रदेश द्यावा, मोगलांची मनसबदारी स्वीकारून एकनिष्ठ राहावे. मोगलांस अदिलशाही घेण्यास मदत करावी इत्यादी अटी होत्या.

पुरंदरच्या तहानंतर मिर्झाराजेंनी अदिलशाही घेण्यासाठी प्रयत्न चालवले. त्यात शिवाजी राजाचे साह्य घेतले; परंतु त्यात अपयश आले. यानंतर शिवाजींना पन्हाळ किल्ला घेण्यासाठी पाठविले.तो प्रयत्न अयशस्वी ठरला. त्यातच शिवाजीचा सेनापती नेताजी पालकर अदिलशाहीस जाऊन मिळाला. यामुळे शिवाजीराजे दक्षिण भारतात राहणे मिर्झाराजांना धोक्याचे वाटत असल्यामुळे बादशाहाला शिवाजी महाराजांना उत्तर भारतात भेटीस बोलावण्याची विनंती केली. तसे बादशाही फर्मान शिवाजीराजांना आले. औरंगजेबासारख्या धुर्त बादशहाच्या भेटीस जाणे शिवाजीराजांना मान्य नव्हते; परंतु मिर्झाराजांनी शिवाजीच्या जिवाची हामी घेऊन अनेक प्रलोभने दाखवली. त्यामुळे ते जाण्यास तयार झाले. ५ मार्च १६६६ रोजी शिवाजीराजे मुलगा संभाजीसह राजगडाहून आग्र्यास निघाले. १२ मे १६६६ हा दिवस औरंगजेबाच्या भेटीचा ठरला होता. मे १६६६ रोजी दुपारी राजे आगऱ्याजवळ पोहचले. राजगड ते आग्रा या दरम्यान बादशाहाने शिवाजीची यशोचित व्यवस्था केली होती; परंतु आगऱ्यास पोहोचल्यानंतर औरंगजेबाच्या दरबारी मंडळीपैकी कोणीही विचारपूस करण्यासाठी आला नाही. दुसऱ्या दिवशी सकाळी रामसिंग शिवाजीला दरबारात घेऊन जाण्यासाठी लवकर आला नाही. शेवटी मुन्शी गिरिधरलाल यांच्या सोबत शिवाजी

आगऱ्यास गेले तेव्हा नूरगंज बागेजवळ रामसिंग व शिवाजीराजांची भेट झाली. शिवाजीराजांना दरबारात नेईपर्यंत बराच वेळ झाल्यामुळे दरबार बरखास्त झाला होता. शिवाजीराजे आणि औरंगजेबाची भेट घुसलखान्यात झाली. औरंगजेबाने शिवाजीची फारशी दखल घेतली नाही. तसेच त्यांना पंचहजारी मनसबदाराच्या रांगेत जसवंतसिंगाच्या मागे उभे करण्यात आले. खिल्लती वस्त्रेही दिले नाहीत. शिवाजीराजाला ही वागणूक कमीपणाची वअपमानास्पद वाटली. शिवाजीराजांना फार राग आला. हे पाहून रामसिंग शिवाजीराजांच्या जवळ आला तेव्हा शिवाजी राजे त्याला म्हणाले "मी कसा मनुष्य आहे हे तुम्ही पाहिलेत, तुमच्या वडिलांनी पाहिले आणि तुमच्या बादशहाने पाहिले मला गैरवाजवी रीतीने उभे करण्यात आले. मी तुमची मनसब सोडली. मला उभेच करावयाचे होते तर ते रितसर तरी करायचे होते."[१५] यानंतर तडक पाठ फिरवून निघून गेले रामसिंगाने शिवाजीची बरीच समजूत घालण्याचा प्रयत्न केला; पण त्याला त्यात यश आले नाही.

शिवाजीराजांचे दरबारातील असे वागणे म्हणजे जयसिंगाच्या विरोधीगटास संधीच होती. त्यामध्ये जसवंतसिंह, जाफरखान आणि जेहानआरा बेगम यांनी या शिवाजीच्या वर्तनाची शिक्षा शिवाजीला झालीच पाहिजे. अशी रट लावली. औरंगजेबाचा मनसुबा शिवाजीराजांना ठार करण्याचाच होता; परंतु रामसिंगाकडून समजले की, शिवाजीच्या जीवाची हामी मिर्झाराजे जयसिंगाने घेतली आहे. मारण्याचा बेत सोडून शिवाजी पळून जाणार नाही. याचे हमीपत्र त्यांनी रामसिंगास घ्यावयास लावले. दरम्यानच्या काळामध्ये शिवाजीराजांनी वजीर जाफरखानाला अमिष दाखवून स्वतःची सुटका करून घेण्याचा प्रयत्न केला; पण त्यास यश आले नाही. उलट पाहरा अतिशय कडक केला व बादशाहाच्या परवानगी शिवाय शिवाजीना कोणीही भेटू नये असे फर्मावले. अशा बिकट परिस्थितीतून स्वतःच्या सुटकेची योजना आखली सर्वप्रथम शिवाजींनी रामसिंगास सांगून त्याची जामिनकी रद्द करविली. त्यानंतर बादशहाच्या परवानगीने आपल्या बरोबर आलेल्या मंडळीना परतीचे परवाने देऊन स्वतः रायगडाकडे रवाना केले. यानंतर आजारपणाचा देखावा करून प्रकृती

[१५] *जोशी द. प., उषा जोशी (संपा) :समग्र सेतुमाधवराव पगडी (खंड २ रा), मराठी साहित्य परिषद, हैद्राबाद २०००, पृ.क्र. ४८१*

आराम पडण्यासाठी गोर-गरीब, साधु फकीर तसेच दरबारी लोकांना मिठाई दान देण्याचा नवीन उपक्रम सुरु केला. प्रारंभी मिठाईच्या पेठाऱ्यांची कसून तपासणी केली जाई; परंतु नंतर तो नित्याचाच भाग आहे म्हणून ढिलाई झाली. याचाच फायदा शिवाजीराजांनी घेऊन १७ ऑगस्ट १६६६ च्या दुपारी पेठाऱ्यावाल्याचा वेश करून तेथून निसटले. औरंगजेबास दुसऱ्या दिवशी बातमी समजली तेव्हा फार उशीर झाला होता. २५ दिवसाचा प्रवास करून शिवाजी राजे १२ सप्टेबरला १६६६ रोजी रात्री राजगडास सुखरुप पोहोचले.

आगऱ्याहून सुटून आल्याबरोबर मोगलांशी लढण्याची बिलकूल इच्छा दाखवली नाही. शिवाजीराजांनी यावेळी आपले सर्व लक्ष राज्याची बिघडलेली घडी पुन्हा बसविण्यावर केंद्रीत केले. इ. स. १६६७ -१६७८ पर्यंत मोगलांशी सलोख्याचे संबंध ठेवण्याचा प्रयत्न केला होता. पुढे १६७० प्रारंभीपासून मोगल मराठा संघर्षास सुरुवात झाली. औरंगजेबानेही शहजादा मुअज्जम व दिलेरखानास शिवाजी विरुद्ध मोहिमा काढवायास फर्माविले. पुरंदरच्या तहान्वे दिलेली किल्ले तसेच मिर्झाराजे व इतर मोगल सरदारांनी ताब्यात घेतलेले सर्व किल्ले व प्रदेश चार महिन्यात शिवाजीराजांनी हस्तगत केला. ३ ऑक्टोबर १६७० रोजी १५ हजार स्वारासह सुरतेस धडक मारुन सुरतेची दुसऱ्यांदा लुट केली. यावेळी शहाजादा मुअज्जमने शिवाजीराजांचा पाठलाग करण्यासाठी दाऊदखानास पाठविले. मराठे-मोगल यांच्या १६ ऑक्टोबर १६७० रोजी वणीदिंडोरी जवळ लढाई झाली. त्यात मोगलाचा पराभव झाला. इ.स. १६७० च्या डिसेंबर महिन्यात शिवाजीराजाने खानदेश व वऱ्हाडाची लूट केली. यानंतर शिवाजीराजांच्या विरुद्ध सेनापती महाबतखान व दक्षिणेचा सुभेदार म्हणून बहादुरखानाची नेमणूक केली. शिवाजीराजांच्या मृत्युपर्यंत हा संघर्ष चालूच राहिला.

### [ड] राज्यभिषेक आणि कर्नाटक मोहिम :

शिवाजी महाराजांनी अनेक प्रदेश जिंकून घेतले असले तरी इ.स. १६७४ पर्यंत तांत्रिक दृष्टीने ते मोगल साम्राटाच्या प्रजाजनांपैकीच होते. मोगलाची चाकरी बजावणारे मातब्बर मराठे सरदार काय किंवा विजापुरचे बादशहा काय हे महाराजांना अद्यापही अदिलशहापेक्षा दर्जाने कमी लेखीत. महाराजांनी आपल्या कर्तबगारीने जे स्थान मिळविले

होते त्याला कायदेशीर स्वरुप देणे आवश्यक होते. यासाठीच शिवाजी राजांचा राज्यभिषेक झाला पाहिजे. ही इच्छा मातोश्री जिजाऊपासून ते सर्व प्रजाजनात पसरली होती. या निमित्तानेच शिवाजीराजांनी राजधानीचे ठिकाण निवडून काशीचा प्रसिद्ध पंडित गागाभट्टास राज्याभिषेकासाठी बोलावले. गागाभट्टाने राज्यभिषेकांच्या निमित्ताने 'राज्यभिषेक प्रयोग' हा ग्रंथ लिहिला. राज्यभिषेकास प्रारंभ केला. राज्यभिषेक समारंभाच्या घटनेचा जेधे शकावलीत असा उल्लेख येतो, "इ. स. १६७४ च्या मे महिन्यात चिपळुणास जाऊन लष्कराची पाहणी केली आणि नंतर परशुरामाची मंदिरात पूजा करून तो ११ मे रोजी रायगडास आला. तेथे हंबीरराव मोहिते यांस सरनोबती दिली. नंतर प्रतापगडावर जाऊन तुळजाभवानीचे दर्शन घेतले. त्या प्रसंगी देवीस सुवर्ण छत्र अपर्ण केले. तदुत्तर परत रायगडास आल्यावर जेष्ठ शु. ४, (=२९ मे) स राजश्रीची मुंज झाली. नंतर षष्ठीस समंत्रिक विवाह केला. लुप्तविधीबद्दल प्रायश्चित्ते, पुण्याहवाचन, होम, शांती वगैरे झाली. ब्राह्मण भोजनाचे मुक्तद्वारसारखे चालूच होते. शके १५९६ आनंद संवत्सर जेष्ठ शु. १२ शुक्रवार (=ता. ५.६.१६७४) रोजी तीन घटका रात्र उरली तेव्हा राजे सिंहासनी बैसले."[१६] म्हणूनच शिवाजी महाराज अभिषेकविधी पार पडल्यानंतर ६ जून १६४७ रोजी पहाटे सिंहासनारुढ झाले. याच शुभमुहर्तावर त्यांनी 'शिवराई' हे नाणे त्यांनी सुरु केले 'जरीपटका' म्हणजे 'भगवा ध्वज' यास राज्यचिन्ह म्हणून मान्यता दिली. यानंतर इ.स.२४ सप्टेंबर १६७४ रोजी लोकांच्या मनामध्ये कोणतीही शंका राहू नये म्हणून निश्चलपुरी गोसावी यांच्या हस्ते तांत्रिक पद्धतीने दुसरा राज्यभिषेक करून घेतला. शिवाजी राजांचा राज्यभिषेक म्हणजे भारताच्या इतिहासातील एक लक्षणीय घटना आहे.या राज्यभिषेकामुळे शिवाजीराजांना 'राजा' म्हणून कायदेशीर मान्यता मिळाली. सह्याद्रीच्या कुशीत एक स्वतंत्र राज्य जन्मास आल्याची ग्वाही म्हणजे हा राज्यभिषेक होता.

राज्यभिषेकानंतर स्वराज्याची तिजोरी रिकामी झाली होती. त्यामुळे शिवाजी महाराजांनी समृद्ध अशा कर्नाटक प्रांतावर चढाई करण्यासाठी मोहीम हाती घेतली. यावेळी

---

[१६] *गर्गे स.मा.(संपा):मराठी रियासत गोविंद सखाराम सरदेसाई (खंड १ ला) पॉप्युलर प्रकाशन , मुंबई २०१० , पृ. क्र. २१४*

अदिलशाही अंतर्गत संघर्षाने पोखरुन गेली होती. त्याच संधीचा फायदा घेऊन ६ डिसेंबर १६७६ रोजी प्रत्यक्ष मोहिमेस प्रारंभ केला. सर्वात पहिल्यांदा भागानरगरच्या वाटेवरील कोपालच्या अदिलशाही सरदार मियांना बंधूचा पराभव केला.यानंतर इ.स.१६७७ च्या फेब्रुवारी महिन्यात शिवाजीराजे कुतुबशहाच्या राजधानीभागानगरातआले. गोवळकोंडयाचा बादशहा अबुल हसन आणि त्याचे मंत्री यांनी महाराजाचे भव्य स्वागत केले. कुतुबशहा आणि शिवाजीराजे यांच्यात मैत्रीचा तह झाला. या तहानुसार कुतुबशाहीत शिवाजीराजांना कर्नाटक मोहिमेसाठी अर्थिक व लष्करी मदत करण्याच्या मोबदल्यात शिवाजीराजांनी विजापुरचा जिंकलेला प्रदेश द्यावा असे ठरले. इ.स. १६७७ च्या मार्च अखेरीस शिवाजीराजांनी हैद्राबाद सोडले. आपल्या जवळपास ५० हजार सैन्यासह कर्नाटक प्रदेशावर चाल करून प्रथम कर्नुलवर हल्ला केला व तेथून प्रचंड खंडणी वसूल केली. त्यानंतर श्रीशैलम् मल्लिकार्जुनाचे व तिरुपती बालाजी देवताचे दर्शन घेऊन जिंजी परीसरावर हल्ला केला. जिंजीचा किल्लेदार नासीर मोहम्मद खानाकडून १३ मे १६७७ ला जिंजीचा किल्ला घेतला. २३ मे १६७७ रोजी मराठ्यांनी वेल्लोरच्या भुईकोट किल्यास वेढा दिला. त्याचवेळी शिवाजीराजांनी सात हजाराची एक तुकडी तिरुवाडी प्रदेशावर चढाईसाठी तिरुवाडीच्या शेरखानाचा पराभव करून त्याचा संपूर्ण प्रदेश ताब्यात आणला. तिरुमळपाडी येथे मुक्कामी असताना सावत्र बंधू व्यंकोजी राजांना भेटीसाठी बोलावले. १६ जुलै ते २३ जुलै दरम्यान यांच्यात भेटीगाठी झाल्या; परंतु कर्नाटकातील जहाँगीरीच्या वाटणीवर कोणताही तोडगा निघाला नाही. म्हणून व्यंकोजीराजे रुसून निघून गेले. याच मुक्कामी मुराईच्या नायकाने शिवाजीराजांचे प्रभुत्व स्विकारुन खंडणी देण्याचे कबुल केले. या मोहीमेतच शिवाजीराजांनी उत्तर व दक्षिण अर्काटचा प्रदेश म्हैसूर प्रातातील बंगलौर, कोलार, होरकोट, बाळापूर व शिरा इत्यादी ठिकाणे, धारवाड परगण्यातील बंकापूर, लक्ष्मणेख इत्यादी प्रदेश जिंकून जून १६७८ मध्ये शिवाजीराजे रायगडावर पोहचले. कर्नाटक मोहिम ही त्यांच्या आयुष्यातील शेवटची मोहीम ठरली. कारण लवकरच गुडघेदुखीच्या आजाराने आजारी पडून ३ एप्रिल १६८० रोजी निधन झाले. एका युग पुरुषाचा शेवट झाला.

### १.८.४ स्वराज्य रक्षक छत्रपती संभाजी महाराज

### [अ] राष्ट्रमाता जिजाऊंच्या छत्रछायेखाली वाढलेले बाल संभाजी :

हिंदवी स्वराज्याचे पहिले युवराज छत्रपती संभाजी राजे यांचा जन्म जेष्ठ शु. १२ शके १५७९ म्हणजे दि. १४ मे १६५७ रोजी शिवाजी महाराजांची जेष्ठ पत्नी सईबाई यांच्या पोटी पुरंदर गडावर झाला. संभाजीराजांच्या जन्मानंतर त्यांच्या आई सईबाई साहेब अजारी पडून भाद्रपद पद्य १४ शके १५८१ म्हणजे दि. ५ सप्टेंबर १६५९ ला मरण पावल्या. त्यामुळे बाल संभाजीची सांभळण्याची संपूर्ण जबाबदारी आजी मातोश्री जिजाबाईंवर आली. भोसले घराण्यात संभाजी हा त्यावेळी एकुलता एकच मुलगा होता[१७] व इतर बहीणींपेक्षा तो सर्वात लहान होता. त्यामुळे इतर मातांचाही लळा त्याच्याकडेच होता. आईवेगळ्या नातवाकडे जिजाऊंचा ओढा आणि प्रेम असणे साहजिकच होते.[१८] त्यामुळे संभाजीच्या शिक्षणाची जबाबदारी स्वतःकडे घेऊन त्याकडे विशेष लक्ष दिले.

मातोश्री जिजाबाईंनी शिवाजी महाराजांना लहान वयात शिक्षण दिलेच होते. त्यांच्याच तालमीत तयार होऊन छत्रपती शिवाजी राजेंनी 'स्वराज्य स्थापन' केले होते. संभाजी राजेंच्या जन्मानंतर राजकीय परिस्थितीत जरी बदल झाला असला तरी शिक्षण पद्धतीत कोणताही बदल झालेला नव्हता. जिजाऊने आपल्या लहान नातवाला रामायण आणि महाभारताच्या गोष्टी सांगीतल्याच; परंतु त्याच्या सोबत आपल्या शूर आणि पराक्रमी मुलाच्या जीवनातील अनेक रोम हर्षक प्रसंगांचा जिवंत इतिहासही संभाजीला सांगीतला. संभाजी राजांना उत्तम शिक्षण मिळावे म्हणून जिजाऊने व शिवाजी महाराजांनी गुरुची नेमणूक केली होती. केशवभट्ट आणि उमाजी पंडित हे संभाजीचे गुरु होते.[१९] संभाजी महाराजांनी या केशवभट्ट बिन दामोदर भट पुरोहित यांच्या मुखे प्रयोगरुप श्री रामयण श्रवण

---

[१७] *गोखले कलम श्रीकृष्ण : शिवपुत्र संभाजी, ज्ञान-विज्ञान विकास मंडळ, पुणे (प्रथमावृत्ती ) १९७१ पृ. क्र.२५*
[१८] *गोखले कलम श्रीकृष्ण : उपरोक्त पृ. क्र. २५*
[१९] *गोखले कलम श्रीकृष्ण : उपरोक्त पृ. क्र. २५*

केले.[२०] याशिवाय घोड्यावर बसणे, मल्लयुद्ध खेळणे, धनुष्यबाण चालविणे, तलवारीचे पट्ट्याचे हात, भाल्याची फेक तसेच दंडबैठका, सूर्यनमस्कार, घोडदौड इत्यादीचे शिक्षण बाल संभाजीना मिळाले होते.

मातोश्री जिजाऊ व शिवाजी महाराजांनी संभाजी राजांना कशा प्रकारे शिक्षण दिले यांची बरीच माहिती आपणास सभासद बखर व चिटणीस बखरीमध्ये मिळते. गडावरील कारभाराचा बंदोबस्त कसा करावा, घोडदळातील पागे व शिलेदाराची व्यवस्था, पायदळाची व्यवस्था, लष्करी शिस्त आदींचे शिक्षण संभाजी राजांना देण्यात आले होते. तसेच मुलखाची मोजणी कशी करावी. शेतसारा कसा गोळा करावा, प्रांताचा बंदोबस्त कसा करावा, बारा महाल व अठरा कारखाने या सर्वांची माहिती संभाजी राजांना देण्यात आली होती. "रणांगणावर सैनिकी हालचालींचे डावपेच कसे करायचे शत्रुची कोंडी कशी करायची, कमीत कमी रसदीमध्ये जास्तीत जास्त हालचाली कशा करायच्या त्यासाठी आवश्यक असणारा दम कसा टिकवायचा, कमी चारा खुराक व पाणी देऊन काटक मराठ्याप्रमाणे काटक घोडे कसे निर्माण करायचे आणि प्रसंगी मोगलाच्या घोड्यापेक्षा अनेक पटीच्या वेगाने घोडे कसे फेकायचे याचे उत्तम शिक्षण शिवाजी महाराजानी संभाजी राजांना दिले होते. छत्रपती संभाजीराजांना राज्यपद मिळाल्यानंतर म्हणजे इ. स. १६८० मध्ये बाकरे शास्त्री यांना त्यांनी दिलेल्या संस्कृतमधील 'दानपत्र' त्यांच्या संस्कृत पांडित्याची प्रचिती आणुन देते. याशिवाय राजपत्रे, इनामपत्रे, फडणविशीतील पत्रे, पायश्चित पत्रे यांचा ही त्यांनी सखोलपणे अभ्यास केलेला दिसून येतो."[२१] परमानंद काव्यामध्येही संभाजी राजांच्या विद्वत्तेबदल अशी माहिती मिळते. "अनेक सदगुणांचा साठा असलेले संभाजी महाराज (सांग वेद) शिकलेले होते."[२२] त्यामुळे लोकांच्या मनामध्ये ते तीर्थजलाप्रमाणे ठामपणे बसलेले होते. संभाजी राजांनी धनुर्विद्येचाही अभ्यास करून ते त्यात पारंगत झाले होते.[२३] ज्याचे वचन मोडणे नाही असे

---

[२०] *दारवटकर अनंत :अद्वितीय छत्रपती श्रीसंभाजी महाराज (खंड १ ला), श्रीशंभु प्रेरणा प्रकाशन, पुणे (प्रथमावृत्ती) २००७ पृ.क्र.३५६*

[२१] *मोहोड शालिनी : शिवपुत्र छत्रपती संभाजीमहाराज, कलादत्त प्रकाशन , पुणे २०१२, पृ.क्र. ३९*

[२२] *सरदेसाई गो. स. (संपा) : परमानंदकाव्यम, ओरिएंटल इन्स्टियुट, बडोदा १९५२, पृ.क्र.४० श्लोक १३*

[२३] *सरदेसाई गो. स. (संपा) : उपरोक्त पृ.क्र. ८९ श्लोक १८*

संभाजी राजे आपल्या धनुष्याने आश्चर्यकारक जय मिळवीत होते.[२४] संभाजी राजांनी अष्टादश पुराणे क्रमाने अभ्यासून जाणली होती. कांमदकीचा व इतिहासाचा अभ्यास त्यांनी स्वतःच्या डोळ्यांने केला होता.[२५] संभाजी राजे भाला फेकीत पटाईत होते.[२६] संभाजीराजे सुसंस्कृत सुशिक्षित होते. त्यांच्याजवळ प्रचंड विद्या होती. ते प्रचंड विद्येच्या शास्त्रासाठी प्रसिद्ध होते.[२७] अशा प्रकारे जिजाऊंच्या मातृछायेखाली संभाजीराजांचे संपूर्ण बालपण व्यतीत झाल्यामुळे ते एक स्वयंपूर्ण सर्वगुणसंपन्न, सुशिक्षित, संस्कारीत असे बाल संभाजी राजे तयार झाल्याचे आपणास दिसून येते.

### [ब] युवराज संभाजी :

संभाजी महाराजांच्या जन्मानंतर जवळपास तेरा वर्षांनंतर राजारामाचा जन्म झाल्यामुळे हिंदवी स्वराज्याचा पहिला युवराज म्हणूनच संभाजी राजांचे लालन-पालन झाले. तसेच संस्कार त्यांच्यावर करण्यात आले. त्याचबरोबर अफझलखानाच्या स्वारीच्या वेळेस सुद्धा छत्रपती शिवाजी महाराजांनी माझे काही बरेवाईट झाले तर घाबरून न जाता बाल संभाजीला गादीवर बसवून मातोश्री जिजाऊंच्या मार्गदर्शनाखाली राज्यकारभार करा, असा आदेश दिल्याचे कळते. पुरंदरच्या तहाच्या वेळी शिवाजी महाराजांनी संभाजीस सोबत नेऊन मोगलांचे पंचहजारी मनसबदार बनवले होते. तसेच आग्रा भेटीत व तेथील नजर कैदेच्या काळातही संभाजी राजे शिवाजी महाराजांसोबत होते. तेथे त्यांना अनेक अनुभव आले. मोगलांच्या दरबाराचे बारकाईने निरिक्षण करता आले. या सर्व प्रसंगांवरून संभाजी राजे हेच भावी युवराज आहेत. म्हणून त्यांना वेगवेगळे अनुभव देण्यासाठी शिवाजी महाराजांनी प्रयत्न केल्याचे समजते. त्यावेळीच संभाजी राजांकडे अघोषित राज्याचा वारस म्हणूनच पाहिले जात होते. इ.स.१६६७ पासूनच संभाजी राजांना काही प्रमाणात राज्यकारभाराचे अधिकार प्राप्त झाले होते. कारण २१ नो. १६६७ रोजी गोव्याच्या व्हॉइसरॉयने "आम्ही गोव्यास

[२४] *सरदेसाई गो. स. (संपा) : परमानंदकाव्यम, ओरिएंटल इन्स्टियुट, बडोदा १९५२, पृ.क्र. ९२ श्लोक ४९*
[२५] *सरदेसाई गो. स. (संपा) : उपरोक्त पृ.क्र. ६९ श्लोक २०*
[२६] *सरदेसाई गो. स. (संपा) : उपरोक्त, पृ.क्र. ३९ श्लोक १०*
[२७] *सरदेसाई गो. स. (संपा) : :उपरोक्त पृ.क्र. ८७,६१, श्लोक ३१,३२,२७*

सुखरुपपणे येऊन पोहोचलो"[२८] असे पत्र संभाजी राजांना पाठविले होते. त्याचबरोबर कारभारासाठी काही व्यक्तींची नेमणूक केल्याचेही दिसून येते. १९ सप्टेंबर १६७१ शके १५९३ भाद्र १२ इसवी हे दिवशी महाराजांनी धारराव निंबाळकर सुभेदार यांना पाठविलेल्या पत्रात नमुद केले आहे की, मा. महादजी यमाजी... मा. इळे हुजूर चिरंजीव संभाजीराजे याकडे वाकेनिवीसिचे मुतालिकीस होते. या पत्रावरून असे स्पष्ट दिसत आहे की, १६०९-१६७१ पूर्वीच महादजी यमाजी हा चिरंजीव संभाजीराजे याकडे वाकेनिविसचे मुतालिकीस होता. त्याला दरबारात येण्याजाण्याचे काम करावे लागे. म्हणून वार्षिक १०० होन मुकर्रर केले होते. लिहिण्यासाठी कागद शाई, सिरे व मदतनीस देण्यास शिवाजी महाराजांनी धाररा व निंबाळकर यास लिहिले होते.[२९] यावरून असे स्पष्ट होते की, संभाजी राज्याकडे वयाच्या १० व्या वर्षापासून कारभाराची जबाबदारी दिलेली होती.

राज्यकारभाराचे शिक्षण घेत असतानाच युवराज संभाजींचा संबंध इंग्रज वखार-वाल्याशी आला होता. शिवाजीशी तह करण्यासाठी टॉमस निकल्सला सूचना दिलेली होती की, शिवाजीची भेट न झाल्यास त्याचा मुलगा किंवा जो कोणी अधिकारी असेल त्याला भेटून परत यावे.[३०] मुंबईचा गव्हर्नर आणि हिंदूस्थानचा प्रेसिडेंट यांच्या हुकुमावरून इंग्रज वकील टॉमस निकल्स हे शामजी आणि इतर ३७ लोकासह दि. १९ मे १६७३ रोजी मुंबईहून निघाले. २१ मे ला रायगडाच्या पायथ्याशी पोहचले. त्यावेळेस छत्रपती शिवाजी महाराज दोन दिवसांच्या मुक्कामावर एका तीर्थक्षेत्रात स्नानासाठी गेले असल्याचे तेथे त्यांना समजले. महाराज नसल्यामुळे टॉमस निकल्स गडावर येऊन बोलण्यासाठी युवराज संभाजीराजांची परवानगी मागितली ती त्यांनी लगेच दिली. त्या दिवशी पाऊस फार पडत असल्यामुळे टॉमस निकल्स गडावर गेले नाहीत. दि. २३ मे १६७३ रोजी ते आणि त्यांचे सहकारी गडावर गेले. टेकडीच्या माथ्यावरील मोठ्या शहरात महाराजांचा चौसोपी वाडा होता. त्याच्या मध्यभागी

---

[२८] *दारवटकर अनंत : अद्वितीय छत्रपती श्रीसंभाजी महाराज (खंड २रा), श्रीशंभू, प्रेरणा प्रकाशन, पुणे (प्रथमावृत्ती) २००९ पृ.क्र. ६८४*

[२९] *आपटे द. वि, केळकर, न. चि (संपा) : शिवकालीन पत्रसार संग्रह , खंड २ रा, श्रीशिवचरित्र कार्यालय, पुणे, १९३० पृ.क्र.३९७ पृ.क्र. १४११*

[३०] *आपटे द. वि, केळकर, न. चि (संपा) : उपरोक्त पृ.क्र. ४४० पत्र क्र. १५३५*

मोठी इमारत होती. तेथे बसून युवराज संभाजी राजे कारभार पाहत असत. टॉमस निकल्स यांना पिलाजी भेटले. महाराजांनी इंग्रजाशी तह करण्याचे सर्व अधिकार पिलाजींना दिले होते. राजे लहान आणि अननुभवी असल्यामुळे त्यांच्यावर महत्त्वाच्या गोष्टी सोपविलेल्या नसल्याचे पिलाजींनी सांगितले. दि. २४ मे ला टॉमस निकल्सला भेटावयास बोलाविले. तेथे महाराजांचे चिटणीस बसले होते. त्यांनी इकडचे तिकडचे प्रश्न विचारले तेवढ्यात युवराज संभाजीराजे तेथे गेले. त्यांनी निकल्सचे काय काम आहे ? हे समजावून घेण्याची इच्छा दाखविल्यामुळे त्यांना आपल्या कामाचे स्वरुप सांगितले ते ऐकल्यावर "मला याबाबतीत काही करता येत नाही. मी तुमच्या आगमनाबद्दल महाराजांना कळवितो. म्हणजे ते लवकर येतील तुमच्या प्रकृतीलाही उंचावरची हवा माणवणार नाही. तेव्हा तुम्ही खाली जाऊन रहा." असे युवराज संभाजीराजांनी सांगितले. टॉमस निकल्स गडाखाली आले. ते पायथ्याशी ५-६ दिवस राहिले. त्यांना मोठ आणि लाकुड या संबंधात हुकूम हावा होता. त्यामुळे दि. २-६-१६७३ रोजी निकल्सने शामजीला राजाकडे पाठविले; परंतु तेवढ्यात महाराज आल्याचे कळल्यामुळे दि. ३-६-१६७३ ला निकल्स पुन्हा रायगडावर गेले.[३१] महाराजाच्या गैरहजेरीत संभाजीला इंग्रज वकिलाशी बोलण्याची संधी मिळालेली होती.

लष्करी मोहीमांचाही अनुभव युवराज संभाजींना यावा म्हणून रणांगणावर पाठवायला सुरुवात अतिशय लहान वयात केली होती. वयाच्या ९ व्या वर्षी मोगलांचा मनसबदार बनवण्यासाठी स्वतंत्ररित्या औरंगाबादला पाठविले होते. त्यानंतर वयाच्या सोळाव्या-सतराव्या वर्षी युवराज संभाजी स्वतंत्रपणे मोठ्या युद्ध मोहीमांवर जात असलेले दिसून येते. इ.स. १६८८ ते १६७२ या काळात फ्रेंच प्रवासी ॲबे करे हा भारतात गुजरातमध्ये आलेला होता. त्याने संभाजीच्या शौर्याचे, युद्ध कौशल्याचे आणि सैनिकांच्या त्यांच्यावरील निष्ठेचे अतिशय सुंदर वर्णन केले आहे. ॲबे करे लिहितो की, "शिवाजी राजांनी दहा हजार शूर अशा सैन्याचा विभाग आपल्या मुलाच्या (संभाजी राजांच्या) ताब्यात दिला होता. हा युवराज

[३१] *आपटे द. वि., केळकर, न. चि. (संपा): शिवकालीन पत्रसार संग्रह (खंड २ रा), श्रीशिवचरित्र कार्यालय, पुणे, १९३० पृ.क्र. ४४० पत्र क्र. १५३६*

लहान असला तरी धैर्यशील आणि आपल्या पित्याच्या कीर्तीस साजे असाच शूर वीर आहे. शिवाजी महाराजांसारख्या युद्धकुशल बापाबरोबर राहून तो युद्धकलेत तरबेज झालेला असून चांगल्या वयोवृद्ध सेनापतीचीही बरोबरी करील इतका तो तयार आहे. तो मजबूत बांध्याचा असून अतिस्वरुपवान आहे. त्याचे सौंदर्य हाच सैनिकांचे त्याचेकडे आकर्षण वाढविणारा मोठा गुण आहे. सैनिकांचे त्याच्यावर फार प्रेम आहे आणि ते त्याला शिवाजीसारखाच मान देतात. फरक इतकाच की, ह्या सैनिकांना संभाजीच्या हाताखाली लढण्यात विशेष धन्यता वाटते. ते आपल्या कर्तबगारीचे सारे श्रेय आपल्या छोट्या सेनापतीस देतात. संभाजीही कोणीही कर्तबगारी करून दाखविली तर त्यांचे कौतुक करतात. त्यांच्यासमोर घडलेल्या शौर्याचे चीज संभाजीकडून ताबडतोब बक्षीसरुपाने  झाल्याशिवाय राहत नाही." यापुढे ॲने कॅरे असे लिहतो की, "संभाजीस स्वायत आणि गुजरात प्रांतामधील राज्यांवर स्वारी करण्याचा हुकूम देण्यात आला होता. आपल्या वडिलांनी आपणास एवढी महत्त्वाची व मोठी कामगिरी सांगितलेली पाहून त्यास धन्यता वाटली आणि मोठ्या उत्साहाने कार्य प्रेरित होऊन ते आपल्या सैन्यानिशी विशेष पराक्रम करून दाखविण्यास उद्युक्त झाले. ज्याच्यावर ते स्वारी करणार ते त्यांच्या नावाच्याच दराऱ्याने पळून गेले. त्यामुळे त्यांना यश व किर्ती मिळविणे सोपे गेले. थोडक्याच अवधित त्यांनी बराचसा प्रांत कब्जात आणला. या बालराजांची सर्वत्र इतकी वाहवा करितात की, खास त्यांच्या वडिलांनाही त्यांचा हेवा वाटावा."[३२] १६७५ मध्ये शिवाजी महाराजांनी संभाजीला पुन्हा युद्धाच्या आघाडीवर पाठवलेले दिसते. याची माहिती आपणास जॉन फ्रायरनी दिलेली आहे. हा एक पेशाने डॉक्टर होता. १६७६ साली तो वेंगुर्ल्याला होता आणि काखार गोकर्ण भागात प्रवास करीत होता. तो लिहितो, मध्यंतरीच्या काळात अदिलशाहीला सरदाराच्या बेबनावाचा फायदा घेऊन मन मानेल तिकडे शिवाजी राजाचे सैन्य दौड करीत आहे. त्याच्या सैन्यातील संभाजीच्या नेतृत्वाखाली तुकडी थेट गोवळकोंडा राज्यातल्या भागानगरपर्यंत गेली आणि दुसरी तुकडी गोव्याजवळील फोंड्याचा कोटावर चालून गेली. शिवाजी राजांच्या मुलाने भागानगरमधील काही भाग लुटला व शहरात

[३२] *दारवटकर अनंतः अद्वितीय छत्रपती श्रीसंभाजी महाराज (खंड २रा), श्रीशंभू प्रेरणा प्रकाशन, पुणे (प्रथमावृत्ती) २००९ पृ.क्र. ६८४*

जाळपोळ केली. तोच बहलोलखान आडवा आल्यामुळे त्याला चुकीवत दुसऱ्याच रस्त्याने परत फिरला. वाटेत संभाजीने हुबळी यारबाण आणि इतर बाजार पेठांवर छापे घालून त्या लुटल्या.[३३] १६७५ च्या एप्रिल महिन्यात शिवाजी महाराजांनी फोंड्याच्या किल्ल्याला वेढा दिला होता. त्यावेळीही संभाजी महाराजांनी त्यांना मदत केली होती. फोंडा किल्ला घेतल्यावर त्याच्या खाली येणारी ६० गावे सोडून देण्याचे संभाजीने गोवेकर पोर्तुगीजांना कळविले होते.[३४]

## [क] साहित्यिक संभाजीराजे :

संपूर्ण मराठ्यांच्या इतिहासात छत्रपती संभाजी महाराजांसारखा साहित्याची जाण असणारा सुविध राजा सापडणार नाही. संभाजी राजाचे आजोबा शहाजीराजे महापंडित, राजनीतिज्ञ होते. त्यांनी आपल्या दरबारामध्ये अनेक पंडित, विद्वानांना आश्रय दिला होता. शहाजीराजांचे सहा भाषांवर पूर्ण प्रभुत्व होते व इतर काही भाषाही आवगत होत्या. त्यांच्या या प्रेरणेतूनच जिजाऊंनी शिवरायांना शिक्षणाचे चांगले धडे दिले. रायगडावर राजधानी बसवतांना ग्रंथ, ग्रंथालय अभ्यासक यांना प्रचंड महत्त्व दिले होते. अशा अभ्यासप्रिय जिजामाता व शिवाजी महाराजांनी आपल्या युवराज संभाजी राजे यांच्या शिक्षणाची उत्तम सोय केली होती. त्यामुळे संभाजीराजांना लहानपणापासूनच साहित्य, भाषा यांची आवड निर्माण झाली. लहान असतानाच त्यांनी अनेक भाषेतील राजकीय, सामाजिक, धार्मिक, साहित्यिक, तांत्रिक, शास्त्रीय, पौराणिक अशा विविध विषयांशी संबंधित भरपुर ग्रंथ वाचले होते. संभाजी राजे मागधी, पाली, प्राकृत, हिंदी, उर्दु, संस्कृत या भारतीय भाषांचे उत्तम जाणकार होते तर इंग्रजी, फ्रेंच, पोर्तुगीज, डच, फारशी या परकीय भाषाही त्यांना अवगत होत्या. त्यावेळी भारताची धर्मभाषा ही संस्कृत होती. इ.स. १६८० मध्ये राज्यपद स्वीकारल्यानंतर त्यांनी बाकरेशास्त्री यांना दिलेले दानपत्र आणि इ.स. १६८२ मध्ये रामसिंह

[३३] *बेंद्रे वा. सी. : श्री. छत्रपती संभाजी महाराज यांचे विचिकित्सक चरित्र, मनोरमा प्रकाशन, मुंबइ (तृतीयावृत्ती) २००१, पृ.क्र.८९,९०,*

[३४] *आपटे द. वि., केळकर न. चि (संपा ) : शिवकालीन पत्रसार संग्रह (खंड २ रा) श्री शिवचिरत्र कार्यालय, पुणे . १९३० पृ.क्र. ५५५ पत्र क्र. १८८२*

हाडा याला लिहिलेले पत्र संभाजीच्या संस्कृत पांडित्याची साक्ष देतात.[३५] संभाजी महाराजांचे एकूण चार ग्रंथ उपलब्ध आहेत १) बुधभूषणम्, २) नायिकाभेद, ३) नखशिख आणि ४) सातसतक. यापैकी बुधभूषण हा ग्रंथ संस्कृतमध्ये असून, राजनीतीवर आहे. इतर तिन्ही ग्रंथ हिंदीमध्ये (वज्रभाषा) आहेत. नायिकाभेद आणि नखशिख हे शृंगारप्रधान आहेत तर सातसतक हा ग्रंथ अध्यात्मवादी आहे. या ग्रंथसंपदेवरून संभाजी महाराजांच्या व्यक्तिमत्वामधील राजनीती, शृंगार आणि अध्यात्म असे विविध रंग दृष्टीस येतात. या बाबतीत हिंदी साहित्यामधील प्रसिद्ध साहित्यिक आणि विद्वान संशोधक डॉ. कृष्णा दिवाकर म्हणतात की, "संभाजीराजे केवळ पराक्रमी, शूर, राजनीतिज्ञ कर्तृत्वसंपन्न प्रशासकच नव्हते तर ते उत्कृष्ट कवी होते."[३६] संभाजी महाराजांच्या सर्व ग्रंथामध्ये आपले लक्ष वेधून घेतो, तो त्यांचा अध्यात्मवादी 'सातसतक' हा ग्रंथ. नायिकाभेदसारखा शृंगार-रसप्रधान काव्य लिहिणारा राजा 'सातसतक'सारखा अध्यात्मवादी ग्रंथ ही रचू शकतो ही गोष्ट संभाजी महाराजांच्या साहित्यिक व्यक्तित्वाची खरी ओळख आहे.

संभाजी राजांचे साहित्यिक नाव नृपशंभू आहे. त्यांनी आपल्या साहित्यामध्ये नृपशंभु शिवाय ही शंभुराज, संभकवी, शंभराज, संभा, संभजू, इत्यादी नावांचेही उल्लेख केलेले आहेत. महाराष्ट्राचे प्रसिद्ध विद्वान व संस्कृतचे प्राध्यापक हरी दामोदर वेलणकर यांनी 'बुधभुषणम्' या ग्रंथाचे जेवढे लिखाण सापडले त्याचे चांगल्या प्रकारे वर्गीकरण करून पुणे येथील भांडाकर प्राच्यविद्या संशोधन संस्थेने इ.स. १९२६ मध्ये प्रकाशीत केले. बुधभुषण या ग्रंथाच्या इंग्रजी प्रस्तावनेत वेलणकरांनी संभाजीचे लिहिलेले 'नखशिख' आणि 'नायिकाभेद' ही दोन हिंदी काव्य वाचल्याचा उल्लेख केला आहे. वाराणसी येथील नागरी प्रचारिणी सभा येथे नायिकाभेद व नखशिखा या दोन्ही काव्यांची हस्तलिखित प्रति असल्याचे निदर्शनास आले आहे.

---

[३५] *मोहोड शालिनी : शिवपुत्र छत्रपती संभाजी महाराज, कलादत्त प्रकाशन, पुणे २०१२, पृ.क्र.२७६*

[३६] *पवार जयसिंगराव (संपा) : छत्रपती संभाजी स्मारक ग्रंथ, रिया पब्लिकेशन, कोल्हापूर (द्वितीयावृत्ती ) २००९ पृ.क्र. ६४२*

## [ड] संभाजीराजांचा युवराज्याभिषेक :

स्वराज्याला स्वतंत्र व सार्वभौम राज्याचे स्थान प्राप्त करून देण्यासाठी छत्रपती शिवाजी महाराजांनी राज्यभिषेक करून द्यावयाचे ठरविले व गागाभट्टांनी तो करण्याचे मान्य केले. त्यानिमित्ताने 'राज्याभिषेक प्रयोग' हा ग्रंथ तयार केला. त्यानुसार राज्याभिषेकाच्या सोहळ्याला रायगडावर सुरुवात झाली. २९ मे पासूनच अनेक धर्मविधीला सुरुवात झाली. यामध्ये सर्वप्रथम शिवाजी महाराजांचे व्रतबंधविधी, पटबंधनविधी आणि तुलादानविधी झाले. याचवेळी युवराज संभाजीचे ही व्रतबंधविधी व पटबंधन विधी करण्यात आले. यामुळे संभाजीराजे सविध हिंदवी स्वराज्याचे धर्मसिद्ध व जन्मसिद्ध असे वारस झाले. पुढे ६ जून १६७४ रोजी पहाटे पाच वाजण्याच्या शुभमुहुर्तावर शिवाजी महाराजांचा राज्याभिषेक झाला. त्यावेळी संभाजीचा युवराज्याभिषेक करण्यात आला. सिंहासनरोहणामध्येही संभाजीराजांनाही शिवाजी महाराजांच्या उजव्या बाजूला आसनस्थ करण्यात आले. या राज्याभिषेकाच्या निमित्ताने भव्य दरबार भरवून शिवाजी महाराजांस मुजरे करून नजराणे भेट दिले गेले. अष्टप्रधानमंडळ मानाप्रमाणे उजव्या आणि डाव्या बाजूला उभे होते. यावेळी इंग्रजाचा वकील हेनरी ऑक्सिडन हा नजराना देण्यासाठी आला होता. शिवाजी महाराजांबरोबर संभाजीराजांसही नजराणा दिला. तो असा होता, "दोन लालखचित सलकडी, किंमत रु. १२५ आणि एक ८ हिऱ्यांची अंगठी किंमत रु. २५० असा एकूण रु ३७५ किंमतीचा नजराणा भेट केला." डच वखारखालाही या प्रसंगाचा वृत्तांत देताना लिहितो की "नंतर इतर मंत्री शिवाजी समोर आले व त्यांनी त्यास मुजरा करून सिंहासनाच्या बाजूस दोन रांगा करून उभे राहिले. त्याचा जेष्ठ मुलगा संभाजीराजा मात्र सिंहासनाच्या पायथ्याशी बसला."[३७] "ज्या ज्या वेळी इंग्रज वकील व शिवाजीराजे यांच्यात बोलणी झाली त्या त्या वेळी संभाजीराजे शिवाजी महाराजांजवळच बसले होते व ते शिवाजी राजांबरोबच निघून जात असत." असे ऑक्सिडन व फ्रायर सांगतात.[३८]

---

[३७] *बेंद्रे वा. सी.: श्री. छत्रपती संभाजी महाराज यांचे चिकित्सक चरित्र, मनोरमा प्रकाशन, मुंबई (तृतीयावृत्ती) २००१ पृ.क्र. ८७*

[३८] *बेंद्रे वा. सी.: उपरोक्त पृ. क्र. ८७*

### १.८.५ इतिहास आणि साहित्य

इतिहासाची सुरुवातच मुळात साहित्याच्या स्वरुपात झालेली आहे. अतिशय आलीकडील काळामध्ये इतिहास एक शास्त्र म्हणून विकास पावले आहे. प्रो. जी. एम. टव्हेलिन म्हणतो की, "इतिहास म्हणजे शास्त्र, वाङ्मय, कल्पनेचा सुंदर मिलाप होय."[३९] इतिहास व साहित्याचा 'मानवी जीवन' हा समान विषय आहे. त्यामुळे इतिहास व साहित्याचा घनिष्ठ संबंध आहे. तसेच ऐतिहासिक घटनांचा साहित्यावर व साहित्याचा इतिहासावर परिणाम होत असतो. साहित्य हे भाव-भावना, विचार, कृती यांचे प्रतिबिंब आहे. तसेच नाट्य, काव्य, निबंध, कथा, कादंबरी, पोवाडे, लावणी, गीत इत्यादी ललित साहित्यातून मानवाच्या कर्तृत्वाचा उल्लेख येतो. इतिहासामध्येही मानवी कृतीची नोंद घेतलीच जाते.

इतिहासकार इतिहास लिहित असताना साधनांचा आधार घेतो. अर्थातच व्यक्ती, समाज, स्थळ आणि काळ यांचे संदर्भ इतिहासात असतात. "इतिहास म्हणजे केवळ घटनावर्णन नसून ते मुख्यतः अन्वयार्थी परिशीलन (Interpretion) असते."[४०] सामान्यपणे इतिहासाच्या अभ्यासकाला तीन प्रश्नांची उत्तरे द्यावी लागतात. What म्हणजे काय घडले किंवा कोणती घटना घडली ते सांगणे; How म्हणजे कसे घडले ते सांगणे आणि why म्हणजे का घडले हे सांगणे. याशिवाय घडलेल्या घटनेच्या संदर्भातील व्यक्तीचे स्वभाव, त्यांच्या हालचाली मधील प्रेरणा, चळवळीचे मूळ उद्देश त्यात भाग घेणाऱ्या व्यक्तीचे स्वभाव विशेष आणि त्याचे भलेबुरे परिणाम याबद्दल तो शक्य तितकी उपलब्ध असलेली साधने वापरतो. "इतिहासकाराच्या प्रतिभेला कितीही मोकळीक असली तरीही तो साधने आणि पुरावे यांनी बांधला गेला आहे."[४१] साहित्यकाराचे तसे नाही त्याच्या प्रतिभेचा संचार मुक्त असतो. अमकेच विषय त्यांनी हताळले पाहिजेत आणि अमक्याच पद्धतीने हाताळले पहिजे. ही बंधने साहित्यकारावर लादता येत नाहीत. "कल्पित अगर वास्तव, चेतन अगर अचेतन,

---

[३९] *व्यास प्रकाशचंद्र, (१९९९), इतिहास लेखनशास्त्र, अभिजीत प्रकाशन, लातूर, पृ. क्र.३०*

[४०] *साने ह. मी (संपा) : सामाजिक शास्त्रे आणि साहित्य अंत- संबंध, प्रतिमा प्रकाशन, पुणे. १९९५ (प्रथमावृत्ती), पृ.क्र. १०२.*

[४१] *जोशी द. प., जोशी उषा (संपा): समग्र सेतुमाधवराव पगडी (खंड १ ला), मराठी साहित्य परिषद, हैद्राबाद २०१० पृ.क्र. ८६५*

भौतिक अगर अधिभौतिक, मानसिक अगर आध्यात्मिक कोणताही विषय तो हाताळेल.[४२] साहित्यकाराला आपल्या प्रतिभेच्या आविष्कारासाठी तो हवा तो विषय हव्या त्या पद्धतीने मांडू शकतो. त्याची दृष्टी भूत, वर्तमान आणि भविष्य या तिन्ही काळात संचार करू शकते. इतिहासकार आणि साहित्यिक यांच्यातील साम्य सांगतांना प्रा. अरविंद देशापांडे म्हणतात, "स्थलकालांनी बंदिस्त केलेल्या घटना वा व्यक्तीची गोष्ट सांगण्याचा इतिहासकाराचा प्रयत्न असतो. साहित्यिक लेखकाचा प्रयत्नही असाच असतो. दोघानाही एक सुसुत्र, सुसंगत अशी कथा सांगावयाची असते. एकाची बंधने जास्त स्पष्ट असतात; पण दुसऱ्यालाही ती किंवा तत्सम बंधने असतातच."[४३] तसेच इतिहासकार आणि साहित्यकार आपल्या लेखनातून आपल्या कालखंडाचे प्रतिनिधित्व करतातच.

"ललित साहित्य आणि इतिहास यांचे हे विलक्षण नाते आहे."[४४] ललित साहित्याच्या जगात सर्वश्रेष्ठ अशी गणली गेलेली कादंबरी म्हणजे टॉलस्टायची 'वॉर अँड पीस' ही ऐतिहासिक कादंबरीच आहे. फ्रेंच राज्यक्रांतीवर आधारलेली चार्लस डिकल्स यांची कृती, 'दोन नगराची कहाणी', ही सुद्धा एक ऐतिहासिक कादंबरीच होय. तसेच शेक्सपिअरची 'ज्युलियस सीझर', 'अॅटोनी आणि क्लिओपात्रा', 'मॅकबेथ', 'पाचवा हेनरी' या साहित्यकृती तर बनार्ड शॉचे 'जोन ऑफ आक' या साहित्यकृती ऐतिहासिकच आहेत. संस्कृतमधील महाकवी कालिदास याचे 'मालविकाग्निमित्र', हे नाटक व 'रघुवंश' हे काव्य ही ऐतिहासिकच आहेत. हिंदीमध्ये अतिशय प्रसिद्ध असेलेले मलिक मुहंमद जायसी याचे 'पद्मावत' हे काव्य ऐतिहासिकच आहे. मराठीतील ललित साहित्यातील प्रसिद्ध कादंबऱ्या व नाटके ही ऐतिहासिक आहेत जसे रणजित देसाई यांची, 'स्वामी', 'श्रीमान योगी', विश्वास पाटीलाची 'पानिपत', शिवाजी सावंतांची 'छावा' या कादंबऱ्या, वसंत कानेटकरांचे 'रायगडाला जेव्हा

---

*[४२] जोशी द. प., जोशी उषा (संपा ): समग्र सेतुमाधवराव पगडी (खंड १ ला) , मराठी साहित्य परिषद, हैद्राबाद २०१०, पृ.क्र. ८६५*

*[४३] साने ह. मी. (संपा): सामाजिक शास्त्रे आणि साहित्य अंत- संबंध, प्रतिमा प्रकाशन, पुणे. १९९५ (प्रथमावृत्ती) पृ.क्र. १०४.*

*[४४] जोशी द. प., जोशी उषा (संपा ) : समग्र सेतुमाधवराव पगडी (खंड १ ला) , मराठी साहित्य परिषद, हैद्राबाद २०१०, पृ.क्र. ८६४*

जाग येते', वि. ह. औंधकराचे 'बेबंदशाही', रामगणेश गडकरींचे 'राजसंन्यास, पु. भाव्यांचे 'महाराणी पद्मीनी', विद्याधर गोखलेंचे 'पंडितराज जगन्नाथ' ही नाटके ऐतिहासिकच आहेत.

"ललित साहित्यात इतिहासाला जे काही स्थान आहे ते मर्यादित आहे."[४५] त्याप्रमाणे पौराणिक, सामाजिक, घटनाप्रधान, विचारप्रधान, संघर्षात्मक अशा विभागाप्रमाणे सोयीचे विभाग करण्यात आले आहेत. त्यापैकी ऐतिहासिक असा एक विभाग करण्यात आला आहे. ऐतिहासिक ललित साहित्य हा एक प्रकार रुढ झाला आहे. साहित्यकार आपल्या ऐतिहासिक ललितकृतीध्ये गतकाळाचे वातावरण साकार करण्याचा कशोशीने प्रयत्न करतो; परंतु ते करत असताना एका बाजूस ऐतिहासिक सत्याचा विपर्यास झाल्याबद्दल इतिहासकार त्याला दोष देण्यास टपलेला असतो तर दुसरीकडे प्रमाणाबाहेर इतिहास म्हणजे ती नीरस होण्याची भिती असते.[४६] या बाबत श्री. ना. वि. बापट यांनी इतिहास व ऐतिहासिक ललित साहित्य या दोघांचा संबंध शुक्र - रंभेसारखा आहे असे म्हटले आहे. इतिहास हा शुक्राचार्यासारखा स्पष्टवक्ता व सत्य वक्ता तपोनिधी आहे. त्याला मोहजालात गुंतविणारी ऐतिहासिक ललित कृती ही रंभेचा अवतार आहे. साहित्यिक आपल्या प्रतिभेने संभवनीयतेवर अधिक भर देतो. त्यामुळे त्याची कृती सामान्य वाचकाला ऐतिहासिक ललित रंभामय सौंदर्याची मोहीनी सर्वांना भुरळ घालते. मनाची पकड सहजच घेतात. अशा ऐतिहासिक साहित्याचा वाचकाच्या मनावर अतिशय पक्का ठसा उमटतो . ते त्या ऐतिहासिक साहित्यातील घटना पूर्णपणे सत्य ऐतिहासिक आहेत अशी समजूत होते व त्यांचा परिणाम त्यांच्या इतिहासासंबंधी ज्ञानावर होतो. की ड्यूक ऑफ मालबरोसारखा एखादा माणूस आपण आपला इतिहास शेक्सपीअरच्या वाङ्मयावरून शिकलो. अशी ग्वाही देऊ शकतो.[४७] यावरून सामान्य वाचकावर ललित साहित्यातील ऐतिहासिक कृतीची पकड कशी मजबूत असते हे समजते. महाराष्ट्रातही अशी असंख्य उदाहरणे पाहवयास मिळतील.

---

[४५] *जोशी द. प., जोशी उषा (संपा ): समग्र सेतुमाधवराव पगडी (खंड १ ला) , मराठी साहित्य परिषद, हैद्राबाद २०१० पृ.क्र. ८६५*

[४६] *बापट प्रभाकर वासुदेव : मराठी कादंबरी तंत्र आणि विकास व्हिनस प्रकाशन, पुणे १९७३ (आवृत्ती तिसरी ) पृ.क्र. १५१.*

[४७] *साने ह. मी. (संपा ) : सामाजिक शास्त्रे आणि साहित्य अंत- संबंध, प्रतिमा प्रकाशन, पुणे. १९९५ (प्रथमवृत्ती) पृ.क्र. ९४*

इतिहासाकडे लक्ष वेधण्याच्या कामात ललित साहित्याने जी प्रचंड कामगिरी केली आहे ती इतिहासाच्या अभ्यासकास मान्य आहे; परंतु त्याचबरोबर ललित लेखकाकडून आवश्यक असलेल्या माफक अभ्यासाची अपेक्षा इतिहासकार करतो. ललित साहित्यिकाचे स्वातंत्र्य तो पूर्णपणे मानतो; पण ललित लेखकाच्या मर्यादा असतात हे त्याने विसरता कामा नये. ऐतिहासिक ललित साहित्यात ज्या चूका होतात त्याचे कारण साहित्यीकाराचे इतिहासाच्या आणि सहज उपलब्ध होणाऱ्या साधनाच्या अभ्यासाकडे जाणुनबुजून केलेले दुर्लक्ष होय. असे सेतुमाधवराव पगडी सांगतात. अपल्या ज्ञानावर आधारलेल्या मोगल ललित कृती या नेहमीच मारक ठरतात. समाजावर त्यांचा नकारात्मक परिणाम होतो. त्या समाज घातक असतात. ऐतिहासिक ललित साहित्याच्या निर्मिती करिता हा धोका निर्माण होण्याची संभावना अधिकच असते. त्यास मराठी साहित्यामध्ये 'ऐतिहासिक विपर्यास' हा शब्द प्रयोग केला आहे. ऐतिहासिक विपर्यास म्हणजे ऐतिहासिक घटनांचे संमिश्रण करताना प्रस्थापित ऐतिहासिक सत्य असेल त्याच्या उलट घटनांचे निवेदन करणे किंवा आपल्या कल्पनाविलासाने आक्षेपर्ह कालविपर्यास, पात्रविपर्यास करणे. तसेच नायकाचे उदत्तीकरण करताना ऐतिहासिक विपर्यास करणे होय. ललित साहित्यामध्ये असा दोष आला तर समीक्षकाला तो दोष दाखवावा लागतो.

मराठी भाषेतील ऐतिहासिक ललित साहित्यामध्ये 'ऐतिहासिक विपर्यास' झालेल्या बहुसंख्य ललित कृती आपणास सापडतात. यामध्ये मराठी सत्तेचे पहिले युवराज छत्रपती संभाजी महाराजांवरच जास्त आकर्षण असल्यामुळे मराठी साहित्यात त्यांच्यावरच बहुसंख्य साहित्य लिहिले गेले. त्यातील बहुसंख्य ललितकृतीमध्ये 'ऐतिहासिक विपर्यास' झाल्याचा दिसतो. यात कादंबऱ्यांमध्ये वा. ना. बापटांची 'छत्रपती संभाजी', नाथमाधवांची 'स्वराज्यावरील संकट', मनमोहन नातु यांच्या 'छत्रपती संभाजी', 'संभवा मी युगे युगे', ह. ना. आपटे यांची 'केवळ स्वराज्यासाठी' इत्यादी. नाटकांमध्ये पाठारे आत्माराम मोरेश्वर कृत 'सं. श्री. छत्रपती संभाजी', केरकर सेनाबाईंचा 'संगीत छत्रपती संभाजी', वा. ना. शहांचा 'प्रणयी युवराज', राम गणेश गडकऱ्याचा 'राजसंन्यास', वि. ह. औंधकरांचा 'बेबंदशाही', श. ब.

चव्हाणांचा 'सती गोदावरी', ना . के. सोनसुरकरांचे 'थोरातांची कमळा' इत्यादी तसेच बी. कवीची 'कमळा' हे प्रदीर्घ काव्य या ललित कृतींचा समावेश होतो. महाराष्ट्रात बहुतांश समाज हा अशाच ललित कृतींतून इतिहास शिकणारा असल्यामुळे सर्वसामान्य जनमाणसात या साहित्याने संभाजी राजांची प्रतिमा मलिन केलेली आहे. प्रस्तुत संशोधनात त्यांचीच समीक्षा आणि चिकित्सा केली आहे.

### १.८.६ ऐतिहासिक मराठी साहित्यावर मराठ्यांच्या इतिहासाचा प्रभाव

पाश्चात्यांच्या आगमनानंतर छापण्याची कला भारतात आली. त्याचबरोबर पाश्चात्य साहित्याचा प्रभावही भारतीयांवर पडू लागला. त्यातुनच ऐतिहासिक ललितकृतीचा उदय झाला. मराठी साहित्यही त्यापासून अभिज्ञ राहिले नाही. मराठीतील ललित साहित्यावर सर्वात जास्त प्रभाव हा मराठ्यांच्या इतिहासाचा असल्याचा दिसून येतो. मराठी सत्तेचे संस्थापक छत्रपती शिवाजी महाराजांपासून ते शेवटचा पेशवा दुसरा बाजीरावपर्यंत अनेक व्यक्तिमत्वांवर बहुसंख्य ऐतिहासिक ललित कृतीची निर्मिती झालेली दिसते. मराठी ऐतिहासिक कथा वाङ्मयामध्ये अनेक दंतकथा या मराठ्यांच्या इतिहासावरच प्रचलित आहेत 'भवानी तलवार', 'सति गोदावरी', 'सुभेदाराची झेबुन्निसा' या प्रमुख आहेत. सन १८६३ मध्ये मोरोबा कान्होबा विजयकर यांनी 'घाशीराम कोतवाल' या नावाचा पहिला ऐतिहासिक कथा संग्रह तयार केला.[४८] करमणुकीच्या काळातील हरिभाऊंच्या ऐतिहासिक कथा प्रसिद्ध आहेत. त्यासुद्धा मराठ्यांच्या इतिहासावरच आधारित आहेत. जसे 'स्वत्व प्रेम कलह' ही चंद्रराव मोरे यांची कन्या हरिणी व शिवाजीचा सरदार संभाजी कावाजी यांची प्रेमकथा आहे.[४९] 'मराठ्यांचा शब्द' यात मराठ्यांनी सुरतेत केलेली लूट हा विषय आहे. 'एक मराठा सरदार' व 'सारजा' या ही कथा मराठ्यांच्या इतिहासाशी संबंधित आहेत.'

ऐतिहासिक मराठी कादंबऱ्यांमध्ये रा. भि. गुजीकरांची मोचनगड (१८६७) ही पहिली ऐतिहासिक कादंबरी शिवकाळाशी संबंधित आहे. यानंतर विष्णू जनार्दन पटवर्धनकृत

---

[४८] *जोशी प्र. न. : अर्वाचीन मराठी वाङ्मयाचा इतिहास (१८०-१९५०) ,स्नेहवर्धन प्रकाशन, पुणे २००० पृ.क्र. १२५.*
[४९] *जोग स. श्री. (संपा ) : मराठी वाङ्मयाचा इतिहास (खंड ५ वा भाग एक ) ,महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ पुणे. १९७३ पुणे पृ.क्र. ३६२*

'हंबीरराव व पुतळीबाई (१८८८)', नागेश विनायक बापट यांची 'पहिली बाजीराव पेशवे' आणि 'छत्रपती संभाजी (१८८८)', चिंतामणी मोरेश्वर आपटे यांची 'उषःकाल (१८८९)' , 'गड आला पण सिंह गेला (१९०३)', 'केवळ स्वराजयासाठी (१८९९)', 'रुपनगरची राजकन्या (१९०२)', 'सुर्योदय' या कादंबऱ्या शिवशाहीवर आधारित मालिकेतील 'स्वराज्याचा श्रीगणेशा', 'स्वराजाची स्थापना', 'स्वराज्याचा कारभार', 'स्वराज्यावरील संकट', 'स्वराज्याचे परिवर्तन', 'स्वराज्यातील दुफळी' या कादंबऱ्या तसेच गो. नी. दांडेकरांच्या 'बया दार उघड', 'हर हर महादेव', 'दर्या भवानी', 'झुंजारमाची' या शिवकाळावर आधारित आहेत. रणजित देसाईंच्या 'स्वामी (१९५९)', 'श्रीमानयोगी (१९६९)', ना. म. इनामदाराच्या 'झेप', 'मंत्रावेगळा', 'झुंज (१९६६)', 'राऊ (१९७२)', भिमराव कुलकर्णी यांचे 'ओंकार', विश्वास पाटीलांची 'पानिपत', शिवाजी सावंताची 'छावा' (१९८०) या सर्व ऐतिहासिक कादंबऱ्या मराठ्यांच्या इतिहासातील व्यक्तिमत्वांवर आधारित आहेत.

ऐतिहासिक नाटक हा एकंदर नाटक कलेच्या ऐतिहासिक विकासातील महत्त्वाचा टप्पा ठरतो.[५०] यामध्ये मराठ्यांच्या इतिहासातील शिवाजी महाराजांपासून ते दुसऱ्या बाजीरावांपर्यंतच्या अनेक व्यक्तिमत्वांवर असंख्य नाटके लिहिले गेलीत. "विनायक जनार्दन कीर्तने यांचे 'थोरले माधवराव पेशवे' (१८६१) हे मराठी वाङ्मयातील पुस्तकरुपाने प्रसिद्ध झालेले पहिले स्वतंत्र नाटक असल्यामुळे तेच बुकिश नाटक ठरले.[५१] यानंतरची विरेश्वर सदाशिव छत्र्ये यांचे 'नारायणराव पेशवे (१८७०)', कोंडो सखाराम घाटे यांचे 'अफझलखानाच्या मृत्यूचे श्री १८७१' तसेच वि. वा. शिरवाडकर यांचे 'दुसरा पेशवा १९४८', श्री. के. ओक यांचे 'पराक्रमी पेशवा १९४१', श्री. रा. बा. गावडे यांचे 'जय महाराष्ट्र', र. गा. यांचे 'सरनौबत १९५१', छत्रपती संभाजी राजावरील जवळपास साठ-सत्तर नाटके लिहिले गेली आहेत. सर्व ऐतिहासिक आहेत. या सर्व ललित कृतींवरून मराठी ऐतिहासिक ललित साहित्यावर मराठ्यांच्या इतिहासाचा प्रभाव प्रचंड असल्याचे दिसून येते.

---

[५०] *जोग स. श्री. (संपा ) : मराठी वाङ्मयाचा इतिहास (खंड चौथा ), महाराष्ट्र साहित्य परिषद प्रकाशन १९६५ पुणे (प.आ ) पृ.क्र. ३६२*

[५१] *जोग स. श्री. (संपा ) : उपरोक्त पृ.क्र. ३६२*

## प्रकरण दुसरे

# बखरकारांनी निर्माण केलेली संभाजी राजांची अनैतिहासिक प्रतिमा

**प्रकरण दुसरे**

# बखरकारांनी निर्माण केलेली संभाजी राजांची अनैतिहासिक प्रतिमा

## २.१ प्रस्तावना

मराठी वाङ्मयात बखरीचे स्थान अत्यंत महत्त्वपूर्ण आहे. मराठी सत्तेच्या उदयाबरोबर हा वाङ्मय प्रकार उदयास आला व अस्ताबरोबर समाप्त झाला. कृष्णाजी अनंत सभासद याने छत्रपती राजारामाच्या सांगण्यावरुन इ.स. १६९७ मध्ये सभासद बखर लिहिली आणि तेव्हापासून मराठी बखरीचे खरे युग सुरू झाले. इ.स. १८४२ मध्ये पटवर्धन घराण्याचा इतिहास सांगणारी हरिवंशाची बखर लिहिली गेली आणि बखर वाङ्मय प्रकारचे लेखन थांबले. म्हणूनच मराठ्यांचा इतिहास लिहिण्यासाठी व समजून घेण्यासाठी बखर वाङ्मयचा उपयोग होतो.

'बखर शब्द हा इंग्रजी News, Information, report, Story, account of असा अर्थ स्टेनगेसनने दिला.'[१] इतिहासाचार्य वि. का. राजवाडे यांच्या मते 'बखर' हा शब्द 'बक' पासून बनला. 'बक या अरबी शब्दाचा अर्थ 'बकणे' किंवा बोलणे होय.'[२] डॉ. पटवर्धन, या. रा. दाते, य. न. केळकर या शब्दकोशकारांनी खबर हा मूळ शब्द गृहित धरुन बातमी, हकीगत, इतिहास, अर्ज इत्यादीसाठी ही बखर हा शब्द वापरलेला दिसतो.[३] श्री. र. कुलकर्णी बखरीची व्याप्ती मांडतांना लिहितात, "पत्र लिहिण्यापूर्वी वर क्षेम वा कुशल असे शब्द लिहिण्याची पद्धत होती. या क्षेम अथवा कुशलचा फारसी भाऊ आहे. "बिलखैर" अथवा बखैर या शब्दाचे बखर हे रूप होण्याची शक्यता वाटते. बखरी देखील पत्रारुपात ते सादर होत

---

[१] *सोहमी भालचंद्र कृष्ण( संपा): भाऊसाहेबांची बखर , श्रीप्रसाद प्रकाशन, नागपूर १९७३( प्रथमावृत्ती) पृ.क्र.४.*

[२] *हेरवाडकर र. वि.: मराठी बखर, व्हीनस प्रकाशन, पुणे, पृ.क्र.९.*

[३] *संकपाळ बापूजी, गोरे दादा:(संपा) निवडक बखरवाङ्मय, कैलाश पब्लिकेशन्स, औरंगाबाद२००३ (प्रथमावृत्ती) पृ.क्र. ६.*

असत[४] बखर हे सही शिक्का असलेले प्रमाण माहिती पत्र.[५] श. न. जोशी यांनी सभासद बखरीच्या प्रस्ताविकात बखर वाङ्मयाची गुणलक्षणात्मक व्याख्या सांगितली आहे. "बखर हा पत्रप्रकार वेगळा आणि वाङ्मय प्रकार वेगळा ज्यात विषय प्रतिपादन व्यावहारिक जीवनांचे आहे. तात्विक वा साहित्य इत्यादीपर नाही. लिपी मोडी, भाषा मराठी, काल यादवोत्तर व आग्लपूर्व असून लेखन गय आहे."[६]

बखरीचे विषय सामान्यपणे युद्धवर्णने, राजा अथवा सरदार यांची कथा, कुणाची कैफियत तर कुणाचे चरित्र अशा स्वरुपात आहे. यादृष्टीने बखरीचे पुढील प्रकारात विभाजन केले जाते.

अ) चरित्रात्मक बखर

ब) युद्धवर्णपर बखर

क) दौलत किंवा साम्राज्य बखर

ड) स्फूट किंवा इतर बखरी

मराठी बखर वाङ्मय निर्मितीचा आढावा घेतला तर असे दिसून येते की, शिवाजी महाराजांच्या चरित्राचे गुणगान करणाऱ्या अनेक बखरी लिहिलेल्या आहेत; परंतु नंतरच्या छत्रपतींवर एकाद दुसरी बखर लिहिलेली दिसून येते. छत्रपती संभाजी, राजाराम, रामराजा व धाकटा शाहू यांच्या संबंधी प्रत्येकी एक बखर तर छत्रपती शाहू जीवनावर दोन बखरी लिहिलेल्या आहेत. छत्रपती संभाजी महाराजांवर स्वतंत्र एकच बखर लिहलेली असली तरी छत्रपती शिवाजी महाराजांच्या बखरीमधून संभाजीराजांविषयी बरीच माहिती मिळते. त्यामुळेच खालील बखरी संभाजी महाराजांच्या जीवनावर प्रकाश टाकण्यासाठी महत्त्वपूर्ण आहेत.

---

[४] *कुलकर्णी श्री. र., प्राचीन मराठी गद्य, प्रेरणा आणि परंपरा, १९७०, सिंधू पब्लिकेशन्स प्रा.लि., मुंबई १९७०( प्रथमावृत्ती) पृ.क्र. ९८-९९.*

[५] *जोशी श. न. (संपा), कृष्णाजी अनंत सभासद विरचित छत्रपती श्री. शिवाजीराजे यांची बखर, १९६० चित्रशाळा प्रकाशन, पुणे, पृ.क्र.४.*

[६] *जोशी श. न. (संपा.):उपरोक्त पृ.क्र.७.*

१. सभासद बखर (इ.स. १६९७)

२. चित्रगुप्त सभासद बखर (इ.स. १७५९)

३. एक्याण्णव कलमी बखर (इ.स. १७८०)

४. सप्तप्रकरणात्मक बखर (इ.स. १८१०)

५. मराठी साम्राज्याची छोटी बखर (इ.स. १८१७)

६. शिवदिग्विजय बखर (इ.स. १८१८)

७. शिवप्रताप बखर (इ.स. १८२९)

८. शेंडगावकर बखर (इ.स. १८३४)

९. श्रीमंत छत्रपती संभाजी महाराज आणि थोरले राजाराम महाराज यांची बखर

## २.२ सभासद बखर

कृष्णजी अनंत सभासदाने राजाराम महाराजांच्या आदेशावरुन जिंजी येथे १६९४ मध्ये ही बखर लिहिण्यास सुरुवात करून ती तीन वर्षांनी म्हणजे इ.स. १६९७ मध्ये लिहून पूर्ण केली. कृष्णाजी अनंत सभासदाला शिवाजी महाराजांच्या राजकारणाची प्रत्यक्ष माहिती असल्यामुळे ही बखर मोठ्या प्रमाणात विश्वसनीय मानण्यात येते. त्याचबरोबर शिवाजी महाराजांच्या जीवनावरील ही पहिली बखर असल्यामुळेही या बखरीचे अधिक महत्त्व आहे.

सभासदाने या बखरीमध्ये शिवाजी महाराजांच्या चरित्राच्या अनुषंगाने छत्रपती संभाजी महाराजांची माहिती दिलेली आहे; परंतु छत्रपती संभाजी महाराज सत्तेवर आल्यानंतरची माहिती सभासदकाराने दिलेली नाही. छत्रपती संभाजी महाराजांच्या युवराज काळातील कोणत्याही दूर्वर्तनाचा उल्लेख सभासदकाराने केलेला नाही. संभाजी राजे दिलेरखानास जाऊन मिळाल्याविषयी तो इतकच म्हणतो "इतकियात संभाजी राजे यांचे पुत्र जेष्ठ रजियावर रूसुन मोगलाईत गेले. ते जाऊन दिलेरखानास भेटले."[७] भेटी मागचे

[७] *जोशी श. न. (संपा.): कृष्णाजी अनंत सभासद विरचित छत्रपती श्री. शिवाजीराजे यांची बखर, १९६० चित्रशाळा प्रकाशन, पुणे, पृ.क्र.७*

कोणतेही कारण बखरकाराने दिलेले नाही. पुढे शिवाजी महाराज व छत्रपती संभाजी राजे यांची भेट पन्हाळ्यावर फार ममतेच्या वातावरणात झाल्याची सभासदकाराने वर्णीलेली आहे.

सभासदकाराने पुढे शिवाजी महाराजांचा अंतकाळ सांगताना शिवाजी महाराजांच्या तोंडी संभाजी राजांचे भविष्य वदवून वेगळी प्रतिमा निर्माण केली. ती अशी "संभाजीराजे हे आपले वेळचे थोर थोर ब्राह्मण यास मारील, ब्राह्मणहत्या करील, पुढे मराठे यांस लष्करच सरदारासही मारील, धरील, इजत होईल. लहान माणुसे, गुलाम यांचा पगडा पडेल आणि थोर लोकांची चाल मोडील, संभाजी कैफ खाईल, गांजा ओढील इषकबाजी करील. गडकोट देशामध्ये अनाईक होईल. राजा परामृष करणार नाही द्रव्य खजिना सर्व उडवील सर्व राज्य गमाविल."[८] सभासदकारने संभाजी महाराजांविषयी अशा प्रकारचे अनैतिहासिक लेखन केले.

## २.३ एक्यान्नव कलमी बखर

अण्णाजी रंगनाथ मालकरे यांचा मुलगा खडी अण्णाजी याने इ.स. १७८० मध्ये ही बखर लिहिली. या बखरीत संभाजीच्या बालपणाची माहिती दिलेली आहे. संभाजी राजे यांच्या अंगी चांगले गुण यावेत म्हणून शिवाजी महाराजांनी केलेल्या उपयाची माहिती बखरकार अशी वर्णितो, "संभाजीराजे शिवाजी राजे यांचे पुत्र यांनी निळोपंताशी कब्जा केला. त्यावरुन महाराजांनी वर्तमान जाणुन सज्जनगड किल्ला परळीस संभाजीस ठेवले तेथे रामदासस्वामी राहत होते. त्याचे सहवासे करून उत्तम गुण लागतील याकरिता ठेविले."[९]

## २.४ शिवदिग्विजय बखर

शिवदिग्विजय बखर १८१८ साली लिहिण्यात आली. बडोदे येथील चिटणीस घराण्यातील कोणीतरी ही लिहिलेली असावी. श्री. पा. रा. नंदूरबारकर आणि श्री. ल. का.

---

[८] *जोशी श. न. (संपा.): कृष्णाजी अनंत सभासद विरचित छत्रपती श्री. शिवाजीराजे यांची बखर, १९६० चित्रशाळा प्रकाशन, पुणे, पृ.क्र.७.*

[९] *वाकसकर वि.स. (संपा.): श्री. मंजी दत्ताजी त्रिमल वाकेनिविस रचित्र शिवछत्रपतीची "एक्यान्नव कलमी बखर", १९३०, पृ.क्र. १४९-१५०*

दांडेकर यांनी संपादित करून १८९५ मध्ये छापली. या बखरीत संभाजी महाराजांबद्दलची बरीच अनैतिहासिक माहिती मिळते. त्यांच्या जन्माचा उल्लेख असा आला आहे, "प्रथम जेष्ठ पुत्र संभाजी महाराज सईबाई साहेबास धाकटे स्त्रीस जाले."[१०] त्याचबरोबर संभाजी महाराजांच्या शिक्षण व्यवस्थेबद्दलचीसुद्धा शिवदिग्विजयकार माहिती देतो. "जेष्ठ पुत्राची चाल चांगली नाही. म्हणोन शिक्षागार ठेविले. महाराजांनी श्री. स्वामी समर्थास विनंती केल्यावरुन श्री. समर्थानी राजपुत्रास नीति सांगितली. तो दासबोधातील एकादश दशक, पांचवा समास सांगितला व राज उपाध्ये यांनीही राजनीती, विद्याभ्यास सांगितले."[११] परंतु संभाजी महाराजांमध्ये काहीही गुण आले नाही. अष्टप्रधान मंडळीतील व्यक्ती राजारामाची बाजू घेण्यामागे शिवदिग्विजयकाराने संभाजी महाराजांस जबाबदार ठरविले आहे. "संभाजी महाराजांच्या अंगी अनावर, जलदभाषी, कठोर वचनी इत्यादी गुणामुळे दौलतीतील सर्वच लहान थोर मंडळींवर लगाम राहिला नाही. सर्वांची निष्ठा राजारामाकडे राहिली."[१२] कारभारी निळोपंत मुजूमदार यांच्याशी अयोग्य तऱ्हेने वागल्याबद्दल महाराजांनी संभाजी राजाची निर्भत्सना केली. त्यामुळे उदावृत्ती झालेले संभाजी राजे पत्नी येसूबाईसह दिलेरखानकडे गेल्याचे शिवदिग्विजयकार लिहतो.[१३]

शिवदिग्विजयकार सईबाईसाहेब मृत्युशय्येवर असतानाच्या प्रसंगाच्या वर्णनातून शिवाजी महाराजांकडे संभाजीची चिंता व्यक्त केल्याचे दर्शिवतो, "संभाजी तुमचा आहे. मी त्याविशी सांगावे असे नाही; परंतु तापिष्ट, क्रुरता त्याची जात नाही, प्रकृती पुढे उपाय काय ? त्योच ठायी जनाची अलोनता वागती. मी जाणते; परंतु पोटचा गोळा दैववान आहे. या करिता सांभाळ नीट करावा".[१४] तसेच भेटिला आलेल्या संभाजीसही जवळ घेऊन हात फिरवून सईबाईसाहेब समजावून सांगते. "आजपर्यंत मूलपणा केला महाराजाचे आज्ञेत राहिला नाही. म्हणून दूर ठेविले. त्यात तुम्हांस अक्कल यावी. ती आली असल्यास नीटच आहे नसली

---

[१०] *नंदुरबार पा. रा. आणि दांडेकर ल.का. (संपा.): श्रीशिवदिग्विजय, श्री. शिवाजी महाराजांची बखर श्री. पुरातनेतिहास प्रकाशन मंडळाची ग्रंथमाला, बडोदे येथे फत्तेसिह छ.छा., १९९५, पृ.क्र. २२४.*

[११] *नंदुरबार पा. रा. आणि दांडेकर ल.का. (संपा.): उपरोक्त, पृ.क्र.२४३*

[१२] *नंदुरबार पा. रा. आणि दांडेकर ल.का. (संपा.): उपरोक्त पृ.क्र.२२६.*

[१३] *नंदुरबार पा. रा. आणि दांडेकर ल.का. (संपा.) :उपरोक्त पृ.क्र. २६४.*

[१४] *नंदुरबार पा. रा. आणि दांडेकर ल.का. (संपा.), उपरोक्त १९९५,पृ.क्र.२४३.*

आली तरी पुनः पन्हाळ्यास जा रहा तेथेच. असा महाराजांची अज्ञा भंग करु नका."[१५] शेवटी शिवाजी महाराजांना बोलल्या की, "सर्व इच्छा परिपूर्ण झाल्या एक संभाजी उद्दाम येवढा घोर होता तो तुम्ही सांभाळलाच आहे आपल्य समुख रामस्मरण करून देह ठेविते."[१६] अशा प्रकारचे भावनिक प्रसंगातून संभाजीराजांवर अनेक आरोप शिवदिग्विजयकाराने ही केले आहे.

## २.५ श्रीमंत महाराज भोसले यांची बखर

प्रस्तुत बखर साताऱ्याच्या श्रीमंत बापूसाहेब अबुजी भोसले शेंडगावकर यांच्या संग्रहित होती. इ.स. १९१७ मध्ये विनायक लक्ष्मण भावे यांनी मराठी दफ्तर ठाणे येथून संपादित करून प्रकाशित केली. या बखरीमध्ये संभाजी महाराजांबद्दल बरीच माहिती मिळते; परंतु ती इतर बखरीमधून घेतलेली आहे. जसे की, संभाजीराजांचे भविष्य शिवाजी महाराजांच्या तोंडून वदवले आहे. हे जसेच्या तसे सभासद बखरीतून घेतल्याचे दिसून येते. शेंडगावकर या बखरीत असेही लिहतो की, शिवाजी महाराजांनीच राजारामास सत्तारूढ करण्याची आज्ञा केली होती.

"संभाजी राजे पन्हाळ्या किल्ल्यावर नजरबंद आहेत. राजाराम जवळ आहे. त्याच्या हातुन उत्तर कार्य करावे व त्यास राज्यभिषेक करून तखतावर बसवुन चालवावा."[१७] शेंडगावकराने आपल्या बखरीमध्ये संभाजी महाराजांनी सत्ता मिळवण्यासाठी काय काय केले त्याचेही वर्णन केले आहे. "मी वडील-पुत्र असता असे मनात आणून बहुत क्रोध येऊन रागास आले मग तेथील किलेदार व कामगार व कारकून व जासूद याचे पारिपत्य करोन पन्हाळ्या किल्ल्यावरील आपण लोक समवेत होऊन निघोन सातारियास दाखल जाहाले. नंतर बाळाजी आवजी प्रभु चिटणीस यास धरोन पाराखाडीचे रानात अंबराईत नेऊन हत्तीचे पायास बांधोन ठार मारिला व आणखी ब्राह्मण तीन कारकुन जिवंत धरुन चुण्याचे भटीत

[१५] *नंदुरबार पा. रा. आणि दांडेकर ल.का. (संपा.), श्रीशिवदिग्विजय, श्री. शिवाजी महाराजांची बखर श्री. पुरातनेतिहास प्रकाशन मंडळाची ग्रंथमाला, बडोदे येथे फत्तेसिह छ.छा., १९९५, पृ.क्र.४४४.*

[१६] *नंदुरबार पा. रा. आणि दांडेकर ल.का. (संपा.), उपरोक्त पृ.क्र.४४४.*

[१७] *भावे वि. ल. (संपा), श्रीमंत महाराज भोसले यांची बखर मराठी दफ्तर रुमाल पहिला (१), १९१७, ठाणे पृ.क्र. १०५.*

घालोन ठार मारिले मग सातारियाहून निघोन लोकसुद्धा रायगडास दाखल जहाले आणि आपली सावत्रे मातोश्री सोयराबाई साहेब यासी खोलीत चिनुन मारिली."[१८] याच बखरीमध्ये संभाजी महाराजांच्या आयुष्याशेवटचा औरंगजेबाने कैद केल्यानंतरचा प्रसंग असा दिला आहे. जो की संपूर्णपणे अनैतिहासिक व काल्पनिक आहे. तो असा आहे. "औरंगजेबने पादशाहा यांनी संभाजी महाराज यास बोलावून नेले. तेव्हा राजे यांनी पादशहास खुमसान न करिता तसेच धटाईने कचेरीत उजवे बाजुस जाऊन बसले. नंतर दुसरे दिवसी पुन्हा मागती पादशहाने राजे यास बोलावुन नेले तेथे मुळीच डेऱ्याचे दार लहान केले होते की, राजे वाकून येतील म्हणजे खुर्नसा केल्या दाखल होईल; परंतु राजे यांनी डेरियाचे दारात पाय आधी घालावे आणि तसेच म्हणजे न करता उजवे बाजूस जाऊन बसावे असा राबता चालविला तेंव्हा औरंगजेब बादशहा यास मोठा घुसा येऊन संभाजी महाराज यास विचारीले की, आमचे तगरित जेवावे असे बादशहाने बोलल्यानंतर संभाजी यांनी उत्तर दिधले की, तुमची झुलपुकार बेगम आम्हास द्यावी म्हणजे तुमचे फुडयात जेवितो. त्यावरुन औरंगजेब पादशाहास मोठा घुस्सा येऊन संभाजी महाराज याचे डोळयात सळया फिरवून डोळे तबीबकडून काढविले."[१९]

## २.६ सप्तप्रकरणात्मक बखर

मल्हार रामराव चिटणीस यांनी दुसऱ्या शाहू महाराज ऊर्फ आबासाहेब सातारकर ह्यांच्या आज्ञेने लिहिले आहे; परंतु धाकटे शाहू महाराज दि. ४ मे इ.स. १८०८ रोजी वारले. चिटणीसाने प्रत्यक्ष लिखान सुरू केलेले वर्ष इ.स. १८११ हे आहे. यावरून धाकटे शाहू यांच्या सांगण्यावरुन हे चरित्र लिहिले या विधानात विसंगती निर्माण होते.

मल्हार रामराव चिटणीस हे सातारकर छत्रपती धाकटे शाहू यांचे चिटणीस होते. सुप्रसिद्ध खंडो बल्लाळ चिटणीस यांचे ते पंतु (बाळाजी आबाजी - खंडो बल्लाळ जिवाजी- रामराव - मल्हारराव) होते. संभाजी राजे दिलेरखानाकडे जाण्याचे कारण सप्तप्रकरणात्मक

---

[१८] *नंदुरबार पा. रा. आणि दांडेकर ल.का. (संपा.), श्रीशिवदिग्विजय, श्री. शिवाजी महाराजांची बखर श्री. पुरातनेतिहास प्रकाशन मंडळाची ग्रंथमाला, बडोदे येथे फत्तेसिह छ.छा., १९९५, पृ.क्र.१०६.*
[१९] *नंदुरबार पा. रा. आणि दांडेकर ल.का. (संपा.), उपरोक्त पृ.क्र. १०८*

बखरीत मल्हार रामराव चिटणीस असो सांगतो की, "महाराजांचे मनात हेतु हे राजपुत्र सर्व गुणसंपन्न असोन (यांनी) राज्यभार चालवावा. आपणास विसावा व्हावा म्हणून बहुता रितीने मार्गे करून चालावे हा बोध त्याचा व्रतबंध करून युवराज्याभिषेक करावासे मनात आणुन व्रतबंध केला; परंतु संभाजी महाराजाची मर्जी एक प्रकारची ! कोन्हे ऐके दिवशी हळद-कुंकू समारंभ, शीतलगौरी यास सर्व सुवासिनी स्त्रियां राजवाड्यात येणार त्यात कोण्ही रूपवान स्त्री आली. तिजला महालात नेऊन बलात्कार- अविचार जाला. हे व्रत महाराजासही समजले. ते समयी बहुत तिरस्कार येऊन बोलले जे "राज्याचे अधिकार हे अगभ्यागमन श्रेष्ठ वर्णाचे ठायी जाले तरी काय करावयाचे ? याचां त्याग करीन, शिक्षा करीन" ऐसे आग्रह करून बोलले ही बातमी संभाजी महाराज यास समजली. त्यावरून दोन घोडियावारी आपण व स्त्री ऐसे बसोन, पाच-पंचवीस माणसे मावळे आपले खासगीची होऊन रात्रीसच निघोन पाचवडास असता. तेथून गेले ते वेळे दिलेरखान औरंगाबादेत होते त्यान पाशी गेले."[२०]

संभाजी राजे दिलेरखानाच्या गोटातून परत आल्यानंतर पन्हाळावरील भेटीत पिता-पुत्रात जे संभाषण झाले त्याचा संदर्भ ही मल्हार रामराव दुसराच देतो. "ते समयी एकांती बसवुन तुम्ही सदृश तुम्हासाठी राज्य किती संपादिले ? याचे अधिकार तुम्ही सर्व प्रजा हे तुमचे कुंटूंब लेकराचे ठायी मोजावे राजे लोक तुम्ही शतावधी स्त्रियांशी लग्न केले असता अथवा शक्तीनुसार शतावधी उपस्त्रियां नाटकशाळा ठेवुन (वर्तन) केले असता युक्त आहे; परंतु अविचार अगभ्यागमन करणे व परस्त्री बलात्कार हे दोन्ही यशक्षयास कारण पूर्वी मोठे-मोठे राजे व रावणादिक राज्यकर्ते या दोषे करून राज्य (क्षयास) व कुलशयास गेले. राज्यशयाचे कारणे (योग्य न होय)."[२१] अशा रितीने समाधान करून पन्हाळा प्रांत खर्चास नेमून नजरबंदीत ठेवून महाराज रायगडी गेल्याचे सांगतो. पुढे सभासदाप्रमाणेच मल्हार रामरावाने शिवाजी महाराजांच्या तोंडी मृत्यूपुर्वीची भाविष्यवाणी घातली आहे. ही सभासदाची सही सही नक्कलच आहे.

---

[२०] *हेरवाडकर र. वि. (संपा):मल्हार रामराव चिटणीसविरचित शककर्ते श्रीशिवछत्रपती महाराज ह्यांचे सप्तप्रकरणात्मक चरित्र, १९६७, व्हीनस, प्रकाशन, पुणे, पृ.क्र. २३५.*

[२१] *हेरवाडकर र. वि. (संपा):उपरोक्त पृ.क्र. २३८.*

## २.७ छत्रपती संभाजी महाराजांवरील बखर

मल्हार रामराव चिटणीस यानी ही बखर लिहिली. छत्रपती संभाजी महाराजांच्या जीवनावर लिहिलेली ही एकमेव बखर आहे. मल्हार चिटणीसांनी सप्तप्रकरणात्मक या शिवाजी महाराजांच्या बखरीच्या नंतरही बखर लिहिलेली असावी. या बखरीत स्थळ व काळ यांचा उल्लेख नाही. छत्रपती संभाजी महाराजांच्या या बखरीत छत्रपती शिवाजी महाराजांच्या मृत्यूनंतरचा वृत्तांत वर्णीलेला आढळतो; परंतु त्यामध्ये काल्पनिक व अनैतिहासिक घटनेचा जास्तच भरणा असलेला दिसून येतो.

मल्हार रामराव चिटणीस या बखरीत असा लिहितो की, शिवाजी महाराजांच्या निधनानंतर राणी सोयराबाईच्या पुढारपणाखाली राजाराम महाराजास गादीवर बसण्याच्या कटात सरसेनापती हबीरराव मोहिते होते; पण वास्तविकतः हबीरराव मोहिते यांनी तर संभाजी महाराजांना मदत करून हा कट उधळून लावला आहे. चिटणीस पुढे असे लिहितो की, शिवाजी महाराजांनी आज्ञा केली आहे की, "संभाजी महाराज यांची उग्र प्रकृती यांस राज्य आवणार नाही सर्वांचा नाश करून आपणही नाश पावतील. औरंगजेब महाशत्रू भागानगर प्रांतासमित येऊन पावला.त्याचा पराभव याचे वस्तु होणार नाही राजाराम सुबुद्ध तसेच तेथील बंदोबस्त करवून, कैदेत राखून राजाराम यांसच घेऊन राज्य रक्षन्न कारभार चालवावा."[२२]

यावेळी संभाजी राजाच्या बंदोबस्तासाठी रायगडावरुन जी पत्रे गेली ती बाळाजी आवजीच्या हातची नव्हती.ती त्याच्या पुत्राच्या हातची होती. अशी ती मल्हार रामरावाने कथा रचलेली आहे. ती काल्पनिक व बाळाजी आवजीस दोषमुक्त करण्यासाठी होय. तसेच बाळाजी आवजीच्या वधासंबंधीही मल्हार रामराव सत्येतिहास सांगत नाही. दादाजी रघुनाथ प्रभु देशपांडे याने व्यक्तिगत स्वार्थासाठी संभाजी महाराजांना बाळाजी फितवित होते. अशी दिशाभूल करून मारावयास लावले अशी कथा सांगतो. एवढेच नाही तर मल्हाररावांनी

[२२] *हेरवाडकर र. वि. (संपा): मल्हार रामराव चिटणीसविरचित श्रीमंत छत्रपती संभाजी महाराज आणि थोरले राजाराम महाराज यांची चरित्रे १९७२, व्हीनस, प्रकाशन, पुणे, पृ.क्र. १-६.*

संभाजी महाजांवर सोयराबाई साहेबांना भिंतीत चिणून मारण्याचा आरोप याच बखरीत केला आहे. तो असा, "वाड्यात आले सोयराबाई साहेब याजपाशी जाऊन बाईसाहेब कोठे आहेत. म्हणून बहुत क्रोधे करून विचारले. ते समयी जवळील बायका सर्व भये करून निघाल्या. तुम्ही राज्य-लोभास्तव महाराजास विषप्रयोग करून मारीले असा आरोपशब्द बोलून कोनाडा भिंतीस करून त्यात सोयराबाईसाहेबास चिणोन दुध मात्र घालीत जावे असे सांगून आता पुत्रास घेऊन राज्य करावे असे बोलीले. त्यानंतर तीन दिवस ती तशीच होती. तिसरे दिवशी प्राण गेला."[२३] संभाजी महाराजांच्या कारभारासंबधी जे मल्हार रामरावाने बेबंदशाहीचे चित्र रेखाटले आहे तेही वस्तुनिष्ठ नाही, "न्यायाची रित राहिली नाही. देवब्राह्मणाचे ठायीही निष्ठा राहिली नाही असे आचरण धारिले. एक कबजी सांगतील ते प्रमाण."[२४] असे मल्हार रामरावाने बखरीत लिहिले आहे. संगमेश्वर येथे संभाजी महाराज कबजीच्या नादाने बेहोश होऊन कैदेत गेले हा वृत्तांत ही असत्यावर आधारित आहे. याविषयी मल्हारराव असे लिहितात, "इलायचीबेग विशाळगडाचे घाट उतरुन हजार पाचशेनिशी पुढे आला बातमी नेली. त्यात महाराज बेहोष तजवीज तयारी काही एक नाही त्याआर्थी वकिलीस आलो ऐसा बाहाणा करून पुढे पत्रे पाठवून दौड करून संगमेश्वरा जाऊन पोहोचाला ते समयी सर्व लोक राहिले तेही पळाले आणि रायगडास गेले... फौज येऊन पावली इत्ताची बेग आला म्हणून महाराजास बातमी सांगितली तेंव्हा बाबा कोठे आहेत ? त्यास बोलवा का आले ते शोध करून त्यास पुढे भेटीस जावयास सांगा. ऐसे म्हणतात ते दरवाज्याजवळ येऊन पावले. तेंव्हा लोकांनी अद्यापि सावध व्हावे. आपणास पाठीशी बांधुन काढून पन्हाळ्यात नेतो ऐसे बोलले असता न ऐकता तो जवळ शेपन्नास मात्र माणूस राहिले. खासाच उठोन दरवाज्यात आले. तो इलायचीबेग याने पुढे होऊन धरले आणि कैद केले."[२५]

मल्हार रामरावाने संभाजी महाराजांविषयी औरंगजेबाच्या कैदेतील व वधासंबंधी ही अनैतिहासिक माहिती लिहिली आहे. तो लिहितो की, जेव्हा संभाजी महाराजांना कैद करून

---

[२३] *हेरवाडकर र. वि. (संपा): मल्हार रामराव चिटणीसविरचित श्रीमंत छत्रपती संभाजी महाराज आणि थोरले राजाराम महाराज यांची चरित्रे १९७२, व्हीनस, प्रकाशन, पुणे, पृ.क्र. ६.*
[२४] *हेरवाडकर र. वि. (संपा): उपरोक्त पृ.क्र.२१.*
[२५] *हेरवाडकर र. वि. (संपाः उपरोक्त, पृ.क्र.२६.*

औरंगजेबासमोर उभे केले तेंव्हा तरूण तडफदार व सुंदर संभाजी पाहूण बादशाहच्या मनात संभाजीला मुसलमान करावयाचा विचार आला. त्यांनी संभाजीस विचारायला पाठविले की, "तुम्ही बाटावे म्हणजे जीव वाचवून तुमची दौलत तुमचे स्वाधीन करतो, त्यावरुन राजे यांनी उत्तर केले की "बाटा म्हणता तरी हे गोष्ट घडावयाची नाही. ज्या अर्थी कैदेत आलो. तेंव्हा वाचणे ते काय ? तुमचे  विचारास येईल ते करावे. तथापि तुमची बेटी द्यावी म्हणजे बाटतो ऐसे उत्तर सांगून पाठविले."[२६] त्यावर बादशाहा क्रोधीत झाला व त्यांने संभाजीचे शिरच्छेद करावयास सांगितले.

[२६] *हेरवाडकर र. वि. (संपा): ): मल्हार रामराव चिटणीसविरचित श्रीमंत छत्रपती संभाजी महाराज आणि थोरले राजाराम महाराज यांची चरित्रे १९७२, व्हीनस, प्रकाशन, पुणे,  पृ.क्र. २८,२९.*

# प्रकरण तिसरे

# कथा, कादंबरी व नाटकातून निर्माण झालेली छत्रपती संभाजीराजांची प्रतिमा

३.१ प्रस्तावना

३.२ कथा वाङ्मयातून निर्माण झालेली संभाजी राजांची प्रतिमा

३.३ कादंबरीतून निर्माण झालेली संभाजीराजांची प्रतिमा

३.४ नाटकातून निर्माण झालेली छत्रपती 'संभाजी राजाची प्रतिमा'

# प्रकरण तिसरे

# कथा, कादंबरी व नाटकातून निर्माण झालेली छत्रपती संभाजीराजांची प्रतिमा

## ३.१ प्रस्तावना

ब्रिटिश सत्तेचे भारतीय लोक जीवनावर जे दुरगामी परिणाम झाले आहेत. त्यात वाङ्मयीन परिणामही अतिशय महत्त्वाचा आहे. ब्रिटिश भारतामध्ये आल्यानंतर येथे त्यांनी सत्ता स्थापने बरोबरच त्यांची संस्कृती रुजविण्याचा प्रयत्न केला. त्यातून भारतीयांना पाश्चात्य वाङ्मयाची ओळख झाली. तसेच इंग्रजी राजवटीतच छापण्याची कला भारतात आली. या दोन्हीचा परिणाम मराठी वाङ्मयांवर झाला. त्यामध्ये विशेष करून मराठी गद्याला निराळे स्वरुप प्राप्त झाले. मोठ्या प्रमाणात मराठी भाषेमध्ये कथा, कादंबऱ्या व नाटके लिहिण्यास सुरुवात झाली. सुरुवातीचे त्यांचे स्वरुप हे भाषांतरित, अनुकरणात्मक असे होते. नंतर त्यामध्ये विकास झाला स्वतंत्र्य वाङ्मय निर्मितीला सुरुवात झाली.

शेक्सपिअरच्या प्रभावातून आणि पौराणिक संस्कृत साहित्याच्या परिणामुळे मराठी वाङ्मय ऐतिहासिक व्यक्तिरेखेकडे वळले. मोठ्या प्रमाणात मराठी ऐतिहासिक वाङ्मयाची निर्मिती झाली. ऐतिहासिक वाङ्मयामध्ये इतिहास व कल्पकता यांचे संमिश्रण कमी अधिक प्रमाणात असते. तसेच लेखकाच्या कल्पकतेला वाव असतो त्यामुळे माहित असलेल्या ऐतिहासिक माहितीला कल्पना शक्तीने रंजकता देता येतो.ऐतिहासिक वाङ्मयाचा प्रमुख उद्देश हा राष्ट्रीय अस्मितेची जागृती करणे, गतकालीन मानवी जीवनाचे आकलन होणे, सांस्कृतिक पुनर्जीवन निर्माण करणे इत्यादी होता.

मराठी भाषेतील ऐतिहासिक वाङ्मयामध्ये सर्वात जास्त मराठ्यांच्या इतिहासातील व्यक्तिरेखावर मराठी ऐतिहासिक वाङ्मयाचे लेखन झाले. यामध्ये कथा, कादंबरी व नाटक

या तिन्ही ऐतिहासिक वाङ्मय प्रकाराचा समावेश होतो. मराठी सत्तेचे संस्थापक म्हणून छत्रपती शिवाजी महाराज व मराठी सत्तेचे पहिले युवराज म्हणून छत्रपती संभाजीराजे या दोन व्यक्तिरेखांचे आर्कषण सर्वात जास्त मराठी साहित्यिकांना असल्याचे दिसून येते. छत्रपती संभाजी महाराजांच्या जीवनावर अनेक कथा, बारा-पंधरा कादंबऱ्या आणि साठपेक्षा अधिक नाटकांची निर्मिती मराठी वाङ्मयामध्ये झालेली आहे. त्यातुन बहुतांश कथा, कादंबऱ्या व नाटके हे बखरकारांनी रेखाटलेल्या संभाजीराजेंच्या अनैतिहासिक प्रतिमेला प्रमाणभूत माणून ऐतिहासिक वाङ्मयाची निर्मिती केलेली आहे. यामध्ये कथा वाङ्मयामध्ये 'गोदावरीची लोककथा', ना. ग. गोऱ्हे यांची 'झेबुन्नीसाचे स्वप्न ' या कथा तसेच कादंबऱ्यामध्ये ना वि. बापट याची 'छत्रपती संभाजी महाराज' पासून ते राजकुंवर बोबडे यांची 'छत्रपती संभाजी' या कादंबऱ्याचा समावेश होतो तर नाटकामध्ये वा. ना. खरे यांचे 'गुणोत्कर्ष' नाटकापासून ते वसंत कानेटकर यांच्या 'येथे ओशाळला मृत्यू ' ही नाटके त्यामध्ये येतात. या सर्व मराठी ऐतिहासिक वाङ्मयामध्ये संभाजीराजेंची प्रतिमा बदफैली कामांध, व्यसनी, लहरी, संतापी, क्रोधी, राज्य बुडवणारा, सोयराबाईंस भिंतीत चिणून मारणारा, राजारामास कैद करणारा शिर्क्याचे शिरकाण करणारा, अष्टप्रधान मंडळातील ज्येष्ठ मंत्र्यांना ठार करणारा अशी अनैतिहासिक प्रतिमा रेखाटली आहे. प्रस्तुत प्रकरणात संभाजी राजांच्या अशा अनैतिहासिक प्रतिमेचा शोध घेतला आहे तो पुढील प्रमाणे.

## ३.२ कथा वाङ्मयातून निर्माण झालेली संभाजी राजांची प्रतिमा

माणसांना गोष्टी सांगण्याची व ऐकण्याची आवड फार पूर्वीपासून आहे. आख्यायिका, दंतकथा, कल्पितकथा, सत्यकथा अशा नाना प्रकारच्या गोष्टी मनुष्य सांगत आला आहे. कहाणी, गोष्टी, कथा यात फारसे अंतर नव्हते. या कथांचा प्रमुख हेतू करमणूक करणे, नीतिपर उपदेश देणे, बोध अथवा उपदेश सांगणे हा होता. पूर्वी देव देवतांच्या संबंधित कथा सांगण्याचा प्रघात होता. त्या कथा पद्यात व ओव्यात असायच्या; परंतु जेव्हा मुद्रणास प्रारंभ झाला तेव्हा कथा गद्यात लिहिण्याची प्रथा सुरु झाली .

मराठी वाङ्मयामध्ये अशा प्रकारच्या असंख्य कथा किंवा गोष्टी लिहिल्या गेल्या. ऐतिहासिक कथा प्रकारामध्ये दंतकथेवर आधारित अनेक लोककथांचा जन्म झाला. तसेच ऐतिहासिक कथा लेखनासाठी दंतकथेचा आधार घेतला गेला. मराठ्यांच्या इतिहासावर व त्यातील बहुसंख्य व्यक्तिरेखांवर अनेक कथा लिहिल्या गेल्या. त्यामध्ये छत्रपती संभाजी राजावर लिहिलेली किंवा प्रचलित असलेली गोदावरीची लोककथा अतिशय प्रसिद्ध आहे.

### ३.२.१ संभाजी राजा आणि गोदावरीची लोककथा

"गडाच्या पायथ्याशी बघा.. इथून दोन कोसाच्या अंतरावर पाचाड गाव आहे... तुम्ही शिवाजीराजांच नाव ऐकलं असलं त्याच्या आईचं नांव जिजाबाई आई करता राजानं पाचाडला मोठा वाडा बांधला व्हता म्हातारी तिथं ऱ्हायची. शिवाजीचा ल्योक संभाजीला घेऊन ! संभाजी राजांचा मुलगा, गुमान देखणा, जवान तरनाबांड मोठ्या हिमतीचा गडी. संभाजी ऐनं उमेदीत आला अन् म्हातारी मेली. संभाजीला शिकारीचा शोक भारी. गडाभोवतालच्या जाळी जंगलात तो शिकार खेळायचा. आता कशी अन् कुठं ? माहित नाही; पण गोदावरी त्याच्या नजरेस पडली. गोदावरी बामनाची पोर... ऐन जवानीत आलेली अन् रुपाने भलती देखणी ! तिचं लगीन झालेलं... दुसऱ्याची ! पण संभाजी गुमान भुलला... तिचं रुप पाहुन बेभान झाला तोही जवानीत आलेला, अन् हिमतीचा ! झडप घालून वाघनं जसं अवचित मेंढरु, पकडावं तशी संभाजीनं गोदावरीला पकडली बघा... अन् बंदोबस्तात ठेवली. ती ब्राह्मण हाय... लगीन झालेली हाय ! त्या जोशात कुणाला कसलं भान राहात नाही बगा !सांगतात संभाजी तिची रोज भेट घ्यायचा.. पण कसा ? आदब राखून.. जुलूम जबरी त्यांनं तिच्यावर केली नाही..आपलं खानदान विसरला नाही. पण बघा गोदावरीही पक्की ! गुमान ती संभाजीला वधली नाही।

आता संभाजीनं शिवाजीराजाच्या लेकान ब्राह्मणाची पोरगी पळवली ही गोष्ट काय लपून राहते ? आमच्या पहाडी मुलकात जरा कुठं काही खुट्ट वाजलं तर सारं रान कान टवकारुन सावध होतं. ही बातमी तर वणव्यासारखी गावोगाव पसरली. शिवाजीराजाच्या कानावर गेली. तडक त्यानं गोदावरीची सुटका केली. राजाच्या पोरानंच तिला पळवली.

कोनाकडं ती फिर्याद करणार ? अन् तिची दाद कोण घेणार ? म्हणतात शिवाजीराजानं तिच्या पायावर डोई ठेवली. त्याचाच दाम, खोटा ठरला व्हता !!

शिवाजीराजानं तिला तिच्या घरी पोहचती करायचा विचार चालवला. माहेरी नाही तर सासरी... नवऱ्याकडं ! पण गंमत बघा... गोदावरी गुमान कुठं जायला कबूल होईना ! तिचं म्हणणं एकच " माझी चिता रचा। आता मी सती जाणार ! शिवाजीराजनं, आणखी कोनी कोनी तिची समजूत काढली. पण गुमान ती ऐकेना. तिचा हट्ट कायम " मी सती जानार"

शेवटी तिनं आपला हट्ट पुरा केला... ती सती गेली । पन.. पन... गोदावरी सती कशी गेली ? सती जातेवेळी तिनं सांगीतलं "माझी चिता संभाजीनं पेटवली पाहिजे". गोदावरीची चिता संभाजीनंच पेटवली म्हणतात. तिची ही समाधी " [१]

वरील लोककथा रायगडाच्या परिसरात प्रचलित असलेली आहे आणि सुप्रसिद्ध साहित्यिक व समीक्षक श्री. द. ग. गोडसे यांना एका धनगराने त्यांना सांगीतलेली आहे. अनेक मराठी वाङ्मयात याच प्रकारे गोदावरीचा संबध संभाजीशी लावलेला दिसून येतो.

## ३.३ कादंबरीतून निर्माण झालेली संभाजीराजांची प्रतिमा

कादंबरी हा ललित वाङ्मयातील सर्वात महत्त्वाचा प्रकार आहे. कारण वाङ्मयास 'जीवनाचा आरसा' असे पुष्कळ वेळा संबोधण्यात येते.'[२] जीवनाचे काल्पनिक चित्र आकर्षक रितीने मांडणे हेच कादंबरीकाराचे ध्येय व कार्य आहे.[३] एका विशिष्ट तऱ्हेच्या कल्पित कथेला कादंबरी म्हणण्याचा प्रघात मराठीत जरी असला तरी हा मुळचा प्रकार इंग्रज भारतात आल्यापासून रूढ झाला. इंग्रजीमध्ये त्यास 'नॉवेल' म्हणतात. नॉवेल म्हणजे चमत्कारिक गोष्ट असाच होत असला तरी कादंबरीच्या कथासुत्रामध्ये सेंद्रिय एकात्मतेच्या तत्वानुसार

*[१] पवार जयसिंगराव : छत्रपती संभाजी स्मारक ग्रंथ, रिया पब्लिकेशन , कोल्हापूर २००९ प्र.क्र. २८५.*
*[२] बापट प्रभाकर वासूदेव : मराठी कादंबरी तज्ञ आणि विकास , व्हीनस प्रकाशन, पुणे १९७३ पृ.क्र. ४०.*
*[३] बापट प्रभाकर वासूदेव : उपरोक्त, पृ. क्र. १४९*

त्याचा विकास होत असतो. तसेच कादंबरीच्या कथात्मक रुपाला अभिव्यक्तीत अंतर्भूत असलेली जीवनदर्शनाची जाणीव अधिक महत्त्वाची असते.

ऐतिहासिक कादंबरी हा त्यातीलच एक महत्त्वाचा प्रकार आहे. अशा प्रकारच्या कादंबऱ्या या गतकालीन जीवनावर आधारित असतात. 'जुन्या काळचे वातावरण साकार करण्याचा प्रयत्न ऐतिहासिक कादंबरीत असतो.'[४] ऐतिहासिक कादंबरीत इतिहास व कल्पकता याचे संमिश्रण कमी अधिक प्रमाणात आपल्याला आढळते. ऐतिहासिक कादंबरीत लेखकाच्या कल्पकतेला वाव असतो व ज्ञात असलेल्या ऐतिहासिक माहितीला कल्पनाशक्तीने रंजकता दिली जाते. या ऐतिहासिक कादंबरीचा मुख्य उद्देश हा राष्ट्रीय अस्मिता जागृत करणे आहे. मराठीतील ऐतिहासिक कादंबरीतून प्राचीन काळापासून ते आजपर्यंत अनेक ऐतिहासिक व्यक्तीचा जीवनपट उलगडण्याचा प्रयत्न केला गेला. 'मराठीत ऐतिहासिक कादंबरीतून इतिहासातील अनेक व्यक्तिमत्वाबरोबरच छत्रपती संभाजी राजांच्यावर कादंबरीकारांनी मोठ्या प्रमाणात प्रकाश टाकला; परंतु बखरकारांनी रंगवलेल्या प्रतिमेला प्रमाण माणून अनेक कादंबरीकारांनी संभाजीराजांची प्रतिमा रंगवली आहे.

### ३.३.१ 'छत्रपती संभाजी महाराज' अथवा 'राजाचे दुष्कर्म राजालाही भोवते आणि प्रजेलाही भोवते' - नागेशराव विनायक बापट (१८८९)

नागेशराव विनायक बापट यांनी सन १८८०-८९ मध्ये छत्रपती संभाजी महाराज अथवा 'राजाचे दुष्कर्म राजाला भोवते आणि प्रजेलाही भोवते' ही संभाजी राजांच्या जीवनावर मराठीतील पहिली कादंबरी लिहिली. कादंबरीच्या शीर्षकावरुन लेखकाचा संभाजी महाराजावरील पूर्वगृह स्पष्ट होतो. त्यामुळे प्रस्तूत कादंबरीत संभाजीविषयी योग्य लेखन अपेक्षित नव्हतेच, या कादंबरीमध्ये संभाजी राजाची मद्यधुंध, व्यसनी, बाहेरख्याली, कामांध, नादान, लहरी, तापट, खुनशी, दुर्वर्तनी, दुराचारी असी प्रतिमा लेखकाने रेखाटल्या आहेत.

---

[४] *बापट प्रभाकर वासूदेव : मराठी कादंबरी तंत्र आणि विकास , व्हीनस प्रकाशन, पुणे १९७३ पृ. क्र. १४९*

लेखकाने संभाजीची प्रतिमा बदफैली रेखाटण्यासाठी तुळशी, गोदावरी, रोशणार या काल्पनिक स्त्री पात्राचा आधार घेतला आहे. तुळशी जी फिरोजी फर्जदाची मुलगी आपल्या बापाला संभाजी राजांनी कुस्तीमध्ये कपटाने मारले म्हणून त्याचा सूड घेण्यासाठी संभाजीस वरकरणी प्रेम असल्याचे दाखवून आपल्या मोहपाशात ओढते. संभाजीला तुळशीचे प्रेम हे ओढते संभाजीला तुळशीचे प्रेम हे खरे वाटते तो तिच्या मोहजाळात पूर्णपणे आडकतो. तुळशीला म्हणतो, "मी तुझ्या गळ्याची शपथ खाऊन सांगतो की, तुझी माझ्यावर खरी प्रीती आहे. कोणतीही स्त्री खऱ्या प्रिती शिवाय एखादयास आपला गुप्त ठेवा जो रात्रंदिवस उराशी घट्ट बाळगून ठेवलेला आपला खजिना लुटू देत नाही. तो खजिना तू मजकडून लुटविलास हा मजवर तुझा केवडा उपकार आहे... लग्नाचे दिवस आले की, मी तुझ्याबरोबर लग्नसुद्धा लावण्यास तयार आहे." [५]अशा प्रकारे रात्रंदिवस तुळशीच्या सहवासात स्वतःला झुकवून दिलेला संभाजी कादंबरीकाराने दाखवला आहे.

संभाजी गोव्याच्या लढाईवरुन परत येताना वाटेमध्ये पंधरा सोळा वर्षांची एक ब्राह्मण कन्या स्वरुपसुंदर असते. ती संभाजीच्या दृष्टीस पडते त्यास दुवर्तन करावे असे मनात आणून तिला पुण्यातील एका कनोज ब्राह्मणाच्या घरी ठेवतो. जी गोदावरीच्या कथेशी मिळती-जुळती आहे. त्याचे वर्णन कादंबरीकाराने केले आहे. पुढे शिवाजी महाराजांस ही गोष्ट कळल्यानंतर त्या मुलीची खनानारळाने ओटी भरुन तिची रवानगी स्वगृही करतात. संभाजीस ताकीत देताना दाखवले आहे, "तू माझ्या मागे गोब्राह्मणांचा असाच प्रतिपाल करणार की काय ? ह्या वेळेस तुला क्षमा करितो, पण पुन्हा असले दुराचरण माझ्या नजरेस पडल्यास मला तुझा पक्का बंदोबस्त करावा लागलं. हे खूप ध्यानात ठेव."[६]

रोशणार संभाजी याच्या प्रणयाचे चित्रण कादंबरीकाराने मोहक रंगवले आहे. रोशणार जी की औरंगजेब बादशाहाची मुलगी बादशहा दक्षिण भारतात आल्यानंतर त्याच्या सोबत येते. म्हैसूर प्रांतात औरंगजेबाकडे जाताना संभाजीचे सैनिक तिला पकडून आणतात आणि

---

[५] *बापट नागेशराव विनायकः छत्रपती संभाजी महाराज, निर्णयसागर छापखाना, मुंबई, १८८९ (दुसरी आवृती) पृ. क्र. २१०*

[६] *बापट नागेशराव विनायकः उपरोक्त, पृ. क्र. ३१*

संभाजीच्या सांगण्यावरून रोशणारला पन्हाळगडावर ठेवतात. तेव्हा संभाजी रोशणार भेटीगाठी होऊन दोघांचेही प्रेमसंबंध जुळतात; परंतु रोशणार संभाजीची रखेल म्हणून राहण्यास स्पष्ट शब्दात नकार देते. आजन्म अविवाहीत राहील असे सांगते. यानंतर पुढे संभाजी रोशणारचे प्रेमसंबंध दृढ होत जातात. संभाजी रोशणारला म्हणतो, "तुझ्या प्रितीचे शीतल किरण जसजसे वृद्धिंगत होत जाताहेत तसतसे ते मला अधिकाधिक सुखदायक होताहेत. ह्यासाठी सूर्यकिरणापेक्षाही तुझ्या प्रीतीला मी अधिक चाहतो." [७] संभाजी राजांना औरंगजेबने कैद करून मुस्लीम धर्माचा स्वीकार केल्यानंतर जीवनदान व सर्व संपत्ती देण्याचं अमिष दाखवतो. त्यावेळी संभाजी त्यास म्हणतो, "तुमची मुलगी रोशणार आता भर उमरीत आली असून तिचे अजून लग्न झालेले नाही. तिच्या ठिकाणी माझे मन गुंतले आहे तर तिजबरोबर माझा निक्का लावलं तर तिच्यासाठी मात्र मी बाटण्यासही कबूल आहे."[८] अशा प्रकारे रोषणारवर असक्त असलेल्या संभाजीचे चित्रण रेखाटले आहे.

कादंबरीकाराने व्यसनी, दारुबाज संभाजी राजेंचे चित्रण रेखाटले आहे. तुळशी संभाजीस दारुचे व्यसन लावते. संभाजी दारुच्या नशेत धुंद होऊन तुळशी संगे रममान झाल्याचे चित्र दर्शविले आहे. कलशा कबजीच्या संगतीने त्याच्या व्यसनाशिनतेमध्ये प्रचंड वाढ झाल्याचे चित्रण रेखाटले आहे.

संभाजीराजाला शुद्धीवर आणण्यासाठी त्याची आई सईबाईनी अनेकवीध उपाय केल्याचे ही लेखक सांगतो; परंतु संभाजी राजांमध्ये कोणताही गुण आला नाही. शेवटी, ती पुत्राच्या काळजीत झुरुण मरण पावल्याचे लेखकाने चित्रण रेखाटले आहे. तसेच दुवर्तनी, दुराचारी संभाजीस वडील शिवाजीराजे व तत्कालीन अनेक वरिष्ठ मंडळीनी समजावून शुद्धीवर आण्यासाठी त्यांना रायगडावर कोंडून विठ्ठल त्रिंबक महाडकर देशपांडयास त्याला बोध करण्यासाठी नेमल्याचे बखरकार सांगतो. संभाजीस शिवाजी म्हणतो, "शंभू आज पावेतो तू खेळ केलेस ते केलेस, आता तरी ते सोडून दे आणि शुद्धीवर ये इतक्या उपर तुझे

---

[७] *बापट नागेशराव विनायकः छत्रपती संभाजी महाराज, निर्णयसागर छापखाना, मुंबई, १८८९ (दुसरी आवृती)* *पृ. क्र. १६६*

*८ बापट नागेशराव विनायकः उपरोक्त, पृ. क्र. २२२*

डोळे न उघडले तर मी तुला राज्याचा मालक करणार नाही." [१] अशा प्रकारे शिवाजीराजाने संभाजीची चिंता व्यक्त करून राजारामास गादीचा वारस नेमल्याचे लेखकाने रेखाटले आहे.

कलशा कबजी तंत्राप्रमाणे संभाजी वागत असल्याचे कादंबरीकार चित्रण करतो. संभाजी कलशा कबजीच्या हातातली कळसुत्री बाहुली झाल्याचे लेखक सांगतो. संपूर्ण राज्याचा कारभार कलशाने आपल्या हातांमध्ये घेतल्याचे चित्र दाखवले आहे. कलशाच्या हुकुमाशिवाय राज्याची काडी हालत नसल्याचे चित्रण लेखकाने रेखाटले आहे. त्यामुळे राज्यामध्ये सर्वत्र अंधाधुंदी माजल्याचे चित्रण दाखवले आहे. राज्यातील तिजोरीतील पैसा तुळशीबाईच्या रंगमहालात खर्च होऊ लागल्याचे दर्शविले आहे. कलशाच्या मध्यस्थीशिवाय संभाजीस कोणी भेटू शकत नव्हते. शिवाजी महाराजांच्या वेळेसच्या सर्व शिस्ती ढिल्या पडल्या. सैनिक लोक पूर्वी लुटीचा माल खजिण्यात जमा करत, ते आता स्वत:ची घरे भरू लागले. स्वारीमध्ये बायकामुले घेऊन जाण्यास व शिपाई शत्रुच्या बायकामुलास त्रास देणाऱ्यास शिरच्छेदाची शिक्षा होती; परंतु आता शिपाई लोक परमुलूखातल्या बायकांना आणून त्यांचा सरेदोस्त विक्रय करू लागले, राज्याचा संपूर्ण खजिना संभाजीनी खाजगी चैनीसाठी व ऐषआरामासाठी उधल्यामुळे सैन्यास पगार मिळेना झाले. शेतजमिनी ओसाड पडू लागल्या, असे सर्वच अनागोंदीचे राज्य पसरल्याचे चित्रण लेखकाने रेखाटले आहे.

संभाजीराजांनी कलशाच्या सांगण्यावरून शिवाजी महाराजांच्या वेळचे सर्व जुने विश्वासू हुशार, मुत्सद्दी लोकांना ठार मारुन यमाजी भास्कराचा दरबार सुरू केल्याचे चित्रण लेखकाने रेखाटले आहे. सोमाजी नाईक व सूर्याजी कंक ह्याचा शिरच्छेद केला, जर्नादनपंत सुमंत, सोमाजी नाईकचा कडेलोट केला. बापुजी भाऊराव व सूर्याजी काळे यांची डोके उडविली, मोरोपंत पिंगळे यांना हत्तीच्या पायी चिरडून टाकले, अण्णाजी दत्तोस चुण्याच्या भट्टीत टाकून जाळले. सावत्रभाऊ राजारामास कैदेत टाकिले. सावत्रआई सोयराबाईंना भिंतीत चिणून ठार मारिले. अशा प्रकारे २०० पेक्षा जास्त वरिष्ठ व्यक्ती ठार केले. असे

*१ बापट नागेशराव विनायक: छत्रपती संभाजी महाराज, निर्णयसागर छापखाना, मुंबई, १८८९ (दुसरी आवृती) पृ. क्र. ७९,*

अरोप लेखकाने कादंबरीमध्ये केले आहेत. संभाजीच्या दुर्वर्तनामुळे व दुराचारामुळे समर्थ रामदासही नाराज होऊन त्यांनी संभाजीस बोधपर पत्र पाठविले; परंतु त्याचीही संभाजी व त्याच्या सहकाऱ्यांनी विटंबना केल्याचे चित्रण कादंबरीमध्ये रेखाटले आहे.

कादंबरीमध्ये मोठ्या प्रमाणात काल्पनिक कथाशय आहे. संभाजी आपल्या सोबत्यांना शिकारीला सोबत घेऊन जाण्यासाठी घोडे खरेदी करण्यासाठी स्वतःच्या जामदारखाण्यात चोरी करतो. त्याची संभाजी १०-१५ कोड्याची, खोलीत कोंडून ठेवण्याची शिक्षा भोगतो. या सर्वास कारणीभूत जामदार हिरोजी फर्जद याच्यावर खुन्नस धरुन त्यास कुस्तीमध्ये कपटाने ठार करतो. त्यामुळे हिरोजीची मुलगी तुळशी व ऐसाजी संभाजीचा सुड घेण्याचा प्रयत्न चालवतात. तसेच गणोजी शिर्के संभाजीस कैद करून, तेवीस दिवस रायगडावर कैद करून ठेवतात; तेव्हा तेथून औरंगजेबाची मुलगी रोशणार आणि त्याचा मुलगा अकबर हे दोघे ऐंशी वर्षांच्या फकीरामार्फत संभाजीची सुटका करतात. पुढे संभाजी राज्यास पुन्हा रायगडाच्या गादीवर बसतात; परंतु संभाजी अकबराचे उपकार विसरतो. त्यास कोणतीच मदत करत नाही त्यामुळे अकबर इराणला जातो. एकूण संभाजीराजावरील ही कादंबरी पूर्वग्रहदुषित दृष्टिकोनातुन लिहिल्यामुळे त्यात कल्पना विलास, अदभुतरम्यता, अतिश्योक्तीपणा, प्रणय प्रसंग इत्यादीचा भरणा असल्याचे दिसून येते.

### ३.३.२ 'केवळ स्वराज्यासाठी' - हरी नारायण आपटे (१९१८)

हरी नारायण आपटे यांनी १९१८ मध्ये 'केवळ स्वराज्यासाठी' नावाची छ. राजाराम महाराजाच्या जीवनावर आधारित ऐतिहासिक कादंबरी लिहिली. या कादंबरीमध्ये लेखकाने ऑगस्ट १६८९ म्हणजे संभाजी राजांच्या कैदेपासून ते राजाराम महाराजाच्या मृत्यूपर्यंतच्या अनेकवीध घडामोडींवर प्रकाश टाकला आहे; परंतु राजाराम महाराजाचे व्यक्तिचरित्र रेखाटताना मोठ्या प्रमाणात उदात्तीकरण करण्याचा प्रयत्न केला. छत्रपती संभाजीचे दुर्गुणयुक्त व्यक्तिमत्व रेखाटले आहे. कादंबरीकारांनी या कादंबरीमध्ये कामांध, व्यसनी बेजबाबदार, क्रूर, जुलमी, दुर्वर्तनी, राज्यक्षय करणारा, दुराभिमानी, कलंक लावणारा अशी प्रतिमा संभाजी राजांची निर्माण केली आहे.

तसेच कादंबरीकार लिहितो, संभाजीराजांनी सोयराबाईला भिंतीत चिणून मारले. शिर्क्यांचे शिरकाण केले. राजारामास आजन्म कैदेत टाकले. आण्णाजी दत्तो, मोरोपंत प्रधान, बाळाजी आवजी, हिरोजी फर्जद आदींना हत्तीच्या पायी दिले. कंक कन्होजी भांडवलकर, सोमाजी बंकी अदिचा टकमक टोकावरुन कडेलोड केला. त्यांची घरेदारे लुटली. त्यांच्या घरावरुन नांगर फिरविला. असे अनेक गंभीर आरोप लेखकाने संभाजी राजांवर कादंबरीमध्ये करून संभाजीची क्रूर, जुलमी दुर्वर्तनी अशी प्रतिमा रेखाटली आहे. संभजीच्या दुर्वर्तनामुळे त्याच्या दरबारात कोणतेही शहाणी, दुरदर्शी, मुत्सद्दी व्यक्ती राहिली नाही. स्वराज्यातील अब्रुदाराना बाहेर पडण्याचीही सोय नव्हती, असे चित्रण लेखकाने रेखाटले आहे.

कादंबरीतून संभाजीराजाचे व्यसनी दारुबाजपणाचे चित्र लेखकाने रेखाटले आहे. कवी कलशासोबत संभाजीराजे मदिरा आणि मदिराक्षी मध्ये सतत गुंतून असायचे. दारुच्या नशेत अनेक स्त्रियांचे पतिवृत्य भ्रष्ट केल्याचे त्याचबरोबर कधी पन्हाळावर तर केव्हा रायगडी, संगमेश्वरी चैनबाजीत राहत असत असे लेखकाने चित्र रेखाटले आहे. "लाव्याजाम्यानिशी तिला तिच्या गोटात पाठविणारा तो साधुपुरुष कोणीकडे आणखी स्वराज्यांतल्या पतिवृत्यांवर तिलांजली देण्यास उठलेला." दुष्ट संभाजी कोणीकडे अशा शब्दात संभाजीचा बदफैलीपणा सूचित करण्याचा प्रयत्न लेखकाने केला आहे. संभाजी महाराज केवळ व्यसनाधीन बेहोष झाल्यामुळे मोगलाच्या ताब्यात सापडल्याचे लेखक नमूद करतो. औरंगजेबाच्या कैदेत शेवटी संभाजीस ठार करत असताना औरंगजेब, 'तुला क्षमा करतो. इस्लाम धर्म स्वीकार कर म्हणतो', तेव्हा संभाजी त्यास म्हणतो. "अरे दुष्टा, नीच्या जे मी एकदा बोललो तेच सातदा. तुझी पोरगी मी पाहिली ती मला फार सुंदर दिसली. तिचे भाषणही ऐकले ते फार मधुर वाटले. तर तू आता आधी तिचा माझा निका लाव म्हणजे मी मुसलमान झालोच."[१०] म्हणजे शेवटी संभाजीराजांनी औरंगजेबाकडे मुसलमान धर्म स्वीकारण्याच्या मोबदल्यात त्याची मुलगी रोशणारची मागणी केल्याचे चित्रण कादंबरीकाराने रेखाटले आहे. या कादंबरीमध्ये संभाजीराजाच्या वेळेस संपूर्ण स्वराज्यामध्ये बेबंदशाही

[१०] *आपटे हरि नारायण: केवळ स्वराज्यासाठी, रम्यकथा प्रकाशन, पुणे (पाचवी आवृत्ती), १९७२, पृ. क्र. २८*

असल्याचे चित्रण दर्शविले आहे. संभाजीराजे स्वराज्याच्या गादीवर येतानाचा कडकपणा दाखविला; परंतु नंतर कोणताही पराक्रम दाखविला नाही. दुष्टपणा कायम राहिला. दोन तीन वर्षात चार दोन मोहिमा करण्याचा घाट घातला; परंतु त्यात ही मराठ्यांच्या नावाचा, माणसाचा आणि द्रव्याचा खराबाच पदरात पडल्याचे लेखकाने नमूद केले आहे. संभाजीच्या नीच वर्तनामुळे अनेक पराक्रमी सरदार, देशमुख, वतनदार स्वस्थ बसून राहिली होती. कोणी मोगलास जाऊन मिळत असल्याचे लेखकाने दर्शवले आहे.

संपूर्ण कारभार कलशा कबजीच्या हातात होता. दरबारात शहाणा दूरदर्शी, मत्सुद्दी असा कोणी नव्हता. सर्वत्र व्यसनाधिनता, अनाचार बोकाळला होता. औरंगजेब जेव्हा दक्षिण भारतातील शाह्या गिळंकृत करून मराठ्यांकडे मोर्चा वळविला तेंव्हा फक्त पाच पंचवीस किल्ले ताब्यात होती. संपूर्ण स्वराज्य लयास गेले होते. असे चित्रण संभाजीवेळेसचे लेखकाने केले आहे.

संभाजीराजास औरंगजेबाने कैद केल्यानंतर पश्चातापाच्या अग्निमध्ये जळत असल्याचे चित्रण लेखकाने रेखाटले आहे. मोगलाच्या कैदेत असताना आपल्या विश्वासू सेवक अंबाजीस म्हणतो, "थोरल्या महाराजांनी इतक्या कष्टाने, आणखी शौर्याने पैदा केलेल्या गादीवर बसण्याला मी खरोखर योग्य नव्हतो. मी आपला अपवित्र देह तिच्यावर बसवून केवळ ती विटाळली मात्र गादीला योग्य खरोखर तोच होता मी त्याच्या हाताखाली केवळ एक सरदार म्हणून राहिलो पाहिजे होतो जा त्याला सांग मागल्या साऱ्या गोष्टी आता विसर आणखी माझे काय होईल याचा विचार सुद्धा मनात न आणता... "[११] तसेच अंबाजी सोबत राजाराम महाराजांना दिलेल्या पत्रामध्ये संभाजी लिहितो, "मला चांडाळाला सोडविण्याच्या भानगडीत आता पडो नये... माझे दुर्वर्तनास त्रासून गेलेली सरदार मंडळी आणि मुत्सद्दी ताबडतोब जमवून त्यांना माझा निरोप सांगावा की तुम्ही माझे नोकर नव्हे थोरल्या महाराजांनी स्थापलेल्या गादीचे नोकर ती गादी मी विटाळली त्याबद्दल देहान्त

*११ आपटे हरि नारायण: केवळ स्वराज्यासाठी, रम्यकथा प्रकाशन, पुणे (पाचवी आवृत्ती)१९७२, पृ.क्र. १३६*

प्रायश्चित मी घेतल्याचे आपले कानी येईल पुढे गादी चालविणे आपले कडे आणखी काय लिहू ? शिवाजीस गादीवर बसवू नये, आपण गादी चालवावी."[१२]

कादंबरीकाराने संभाजीराजे यांचे औरंगजेबाच्या कैदेतील चित्रणात इतिहासाचा विपर्यास मोठ्या प्रमाणात केला आहे. मोगलाच्या तुळजापुरच्या छावणीत कैदेत असलेल्या संभाजीकडून संपूर्ण हयातभर घडलेल्या अपकृत्याबद्दल पश्चाताप व्यक्त करतात. दरबारात हजर केल्यानंतर आपण त्याच्या फितुरीमुळे मोगालाच्या कैदेत अडकलो, तो कवी कलश समोर आल्यानंतर त्याच्या अंगावर धावून जातात. कैदेतील संभाजीस जीवनदान देण्यासाठी इस्लाम धर्माचा स्वीकार व दक्षिणेतील सुभेदारीचे आमिष औरंगजेब बादशहा दाखवतो तेव्हा संभाजी त्यास व इस्लाम धर्मास शिव्या देतो आणि बादशाहाच्या अंगावर धावून जाऊन म्हणतो, "माझी स्थिति तू काय चांगली करणार? चल तुझी बेटी मला देतोस? देत असल्यास तर तुझा अतिशय निंद्य असा धर्महीं पत्करतो. आण तिला इथे आण लाव तू आपल्या देखत तिचा व माझा निका."[१३] असे चित्र कादंबरीकराने रेखाटले आहे.

याच कादंबरीमध्ये संभाजीराजे रोशणार यांच्या प्रेम प्रकरणाचे अतिरंजक चित्र रेखाटलेले आहे. मोगलकैदेत असलेल्या संभाजी राजांवर रोशणारचे प्रेम जडते. त्याच प्रेमापोटी ती संभाजी राजाच्या कैदेतून सुटकेचा प्रयत्न चालवते; परंतु त्याअगोदर संभाजीस दरबारामध्ये हजर करून शिक्षा दिली जाणार असल्याची वार्ता समजल्यावर प्रत्यक्ष दरबारात हजर राहते. भर दरबारात संभाजी जेव्हा रोशणारची मागणी बादशहास करतो तेव्हा त्याला देहदडांची शिक्षा फर्मावली जाते. या घटनेमुळे रोशणार संभाजीविषयीचे प्रेमभाव अधिक दृढ होतात. आपल्यामुळेच संभाजीस प्राण गमवावा लागला. म्हणून आजन्म अविवाहित राहण्याची प्रतिज्ञा करते. इतकेच नव्हेतर संभाजीराजाच्या शवास अग्नी देण्याच्या प्रसंगीही रोशणारने उपस्थित राहून संभाजीप्रती प्रेमभाव दर्शविले. या प्रसंगी राजारामास म्हणते, "या घटनेपासून मी तुमच्या घरातलीच एक समजा." [१४] राजारामास पुढील काळात मदतीसाठी

---

[१२] *आपटे हरि नारायण: केवळ स्वराज्यासाठी, रम्यकथा प्रकाशन, पुणे (पाचवी आवृत्ती), १९७२, पृ. क्र. १०*
[१३] *आपटे हरि नारायण: उपरोक्त, पृ.क्र.११-१२*
[१४] *आपटे हरि नारायण: उपरोक्त, पृ. क्र.१३७*

अंगठी देते. रोशणारच्या याच अंगठीच्या साहय्याने संतीन येसूबाई व बालशिवाजी, याचे मोगलाईत चांगल्या प्रतिपाळासाठी वापर करून घेते. संभाजीराजावरील प्रेमापोटीच रोशणार येसूबाई व बालशिवाजी यांना सन्मानाने वागवत असत. या प्रकारचे अद्भुतरम्य कथानक कादंबरीकाराने रंगवले आहे.

एकंदरीत कादंबरीमध्ये काल्पनिक प्रसंगाचा मोठा भरणा उभा केलेला दिसून येतो. हिराजी शंकराजी शिर्के यांची संभाजीस कैद करण्याची योजना, राजाराम महाराजांनी संभाजी महाराजांस कैदेतून सोडवण्याचा प्रयत्न, संभाजी राजांच्या चितेस अग्नी देणारा प्रसंग, दरबारातील कवी कलश संभाजी राजे यांच्यातील संघर्ष तसेच राजाराम स्वतः स्वराज्याच्या गादीवर बसण्याऐवजी संभाजीच्या मुलास बाल शिवाजीस गादीवर बसवून कारभार संभाळतो असे अनेक कल्पनिक प्रसंग रंगवले. त्यामुळे ही कादंबरी रहस्यमय, अद्भुत कथाच असल्याचे जाणवते.

### **३.३.३ 'स्वराज्याचा कारभार' - नाथमाधव (१९२३)**

मराठीतील प्रसिद्ध कादंबरीकार नाथमाधवांच्या स्वराज्यमालेतील असून या कादंबरीचा काळ इ. स. १६७४ ते १६८० असा आहे. छत्रपती शिवाजी महाराजांचा उत्तरार्ध आणि संभाजीराजाचा युवराज वयातील महत्त्वपूर्ण कालखंड या कादंबरीमध्ये रेखाटला आहे. या कादंबरीमध्येही संभाजीराजांची नादान, अविचारी, आडदांड, हट्टी, दुर्वर्तनी विषयांध, बदफैली, अशी अैनितिहासिक प्रतिमा लेखकाने रेखाटली आहे.

कादंबरीच्या सुरुवातीलाच जिजाऊ मासाहेब आपल्या अंतकाळामध्ये संभाजीला जवळ घेऊन चांगले वर्तन करण्याची समज देत असलेली दाखवली आहे. जिजाऊमासाहेब म्हणतात, "ये बाळ शंभू, जवळ ये नीटवाग हूडपन सोडून दे."[१५] पुढे संभाजीराजे आपल्या मित्रासोबत खेळ म्हणून रायगडावरील टकमकीच्या बुरुजावरुन लिंगाण्याकडे गोफणीने दगड

---

[१५] *नाथमाधव ऊर्फ द्वारकानाथ माधव पितळेः स्वराज्याचा कारभार कॉन्टिनेन्टल प्रकाशन विजयानगर पुणे, १९४७ (पहिली आवृती.) पृ . क्र.२*

मारतानाचे चित्रण लेखकाने निर्माण केले आहे. संभाजीराजांच्या या गोफणीच्या खेळामुळे अनेकांची घरे मोडतात, गायी-म्हशी घायाळ होतात अनेकजण त्यामुळे जखमीही होतात. संभाजीराजाच्या खेळामुळे जखमी झालेले लोक महाराजाकडे तक्रार घेऊन येत असतानाच, संभाजीराजे निळोबाकडून खोट्या आशयाचे पत्र लिहून घेण्यासाठी त्याच्यावर जरब दाखवितात असेही चित्र लेखकाने रेखाटले आहे.

संभाजीराजाची दुर्वर्तनी व बदफैली प्रतिमा निर्माण करण्यासाठी जमुना, यशोदा आणि राधा या काल्पनिक स्त्री पात्राची  निर्मिती केली आहे.कादंबरीत विवाहित स्त्रियांना पळवून नेणारे, स्वराज्यनिष्ठ सेवकांच्याच कुटुंबियातील स्त्रियांकडे बद नजरेने पाहणारे संभाजीराजे असे चित्रण लेखकाने रेखाटले आहे. संभाजी राजांनी जमुना शिर्के या स्त्रीची संकटातून सुटका केल्यानंतर ती बेशुद्ध अवस्थेत पडली असता संभाजीराजे तिच्याकडे कामुक नजरेने पाहतात. विश्वासाने खंडोबाने जमुनाला संभाजीराजाकडे सुपूर्द केल्यानंतर संभाजी त्याचाही विश्वासघात करून तिला बावड्याच्या किल्यात बंदिवासात ठेवतात. जमुनेला मिळविण्यासाठी तिची आर्जव करतात. तिला खोटे आमिष दाखवितात. "जमुना मी युवराज आहे, हे तू विसरलीस वाटतं ? मी होऊन स्वसंतोषानं तुझा दास व्हायला तयार असता माझ्यापासून दूर पळतेस ?" आता तूच इथं राणीसरकार पण खरोखरीच तुला राणीसरकार व्हायचं असेल तर माझं म्हणणं मान्य कर."[१६] असे चित्रण लेखकाने निर्माण केले आहे. संभाजीराजे जमुनाच्या सौंदर्यावर लुब्ध होऊन येसूबाईचाही तिरस्कार करतात. याविषयी ते जमुनेस म्हणतात, "तुझ्या सौंदर्यावरुन, अशा कितीतरी येसू ओवाळून टाकाव्यात."[१७] जमने प्रमाणेच विवाहित ब्राह्मण स्त्री यशोदेस हळदीकुंकवाच्या कार्यक्रमाच्या दिवशी पळवून आणून बावड्याच्या किल्ल्यावर बंदिवासात ठेवतात. पळवून आणलेल्या बायकांस धाक दाखवतात, त्यांच्यावर बळजबरीही करतात, कडेलोटाची धमकी देतात. असे चित्रण लेखकाने रेखाटले आहे. याशिवाय राधा आणि संभाजीचे प्रणयवर्णन कादंबरीमध्ये

[१६] *नाथमाधव ऊर्फ द्वारकानाथ माधव पितळे : स्वराज्याचा कारभार कॉन्टिनेन्टल प्रकाशन विजयानगर पुणे, १९४७ (पहिली आवृत्ती) पृ. क्र. ११७ , ११८,*

[१७] *नाथमाधव ऊर्फ द्वारकानाथ माधव पितळे : उपरोक्त पृ. क्र. १३९*

केले आहे. राधेच्या शुद्ध व सात्विक प्रेमापोटी संभाजीराजे तिचा स्वीकार करतात. याच राधेच्या उपदेशाने संभाजीराजे दिलेरखानाच्या गोटातून स्वराज्यात परत येतात, म्हणतात "मी संभाजी, युवराज स्वराज्याचा भावी मालक आज शत्रुला येऊन मिळलो काय ? राधे, माझ्या देवते, तुझा युतिवाद मात्र पटला चल, माझ्या बरोबर चल आणि हया महान अपराधी संभाजीला आबासाहेबांच्या चरणांवर नेऊन टाक !"[१८] पुढे राधाची स्वराज्याप्रती असलेली निष्ठा व संभाजीवर असलेले प्रेम पाहून शिवाजी महाराज राधेला संभाजीराजासोबत पन्हाळगडावर राहण्याची मुभा देतात असे, या कादंबरीकाराने रेखाटले आहे.

संभाजीराजे व कवी कलश यांचा सहसबंध दर्शवित असताना लेखकाने काल्पनिकतेचा आधार घेतल्याचे दिसते. संभाजी व कवी कलश यांचे गरूशिष्याचे संबंध कादंबरीमध्ये दाखविले आहे. एवढेच नव्हेतर संभाजीराजे पूर्णपणे कवी कलशाच्या आहरी गेलेले, त्याच्याच सल्यानुसार वर्तन करीत असल्याचे चित्र लेखकाने रेखाटले आहे. कवी कलशाच्या तंत्र विद्येवर संभाजी राजाचा पूर्ण विश्वास असल्याचे कादंबरीकाराने चित्र रंगवले आहे. संभाजीराजे आपल्या भावी आयुष्यात पुढे येणाऱ्या संकटाचे निवारण करण्यासाठी कवी कलशांना होम करण्यास सांगतात आणि त्याच्यासाठी जिवंत वाघ पकडून आणण्याची योजना आखतात. तसेच कवी कलशासोबत संभाजी राजे वर्षानुवर्षे कुस्ती खेळताना दर्शीविले आहे. यासंबधी संभाजी म्हणतात, "पंडितजी आज कोणताच खेळ मनासारखा झाला नाही. वाघाशी झुंजलो; पण हाताची रग काही शमली नाही. आपण आता गडावर गेल्यावर आखाड्यात उतरू. आज तुमच्यासाठी दंड थोपटावेत अशी माझी इच्छा आहे."[१९] कवी कलश कुस्ती खेळण्यासाठी तयार होतात; परंतु त्यासाठी संभाजी राजे छत्रपती झाल्यावर मुख्यप्रधान करील असा पण लावतात. संभाजीराजे चीत होतात. असे चित्र कादंबरीकारानी रेखाटले आहे. पुढे छत्रपती शिवाजीमहाराज कवी कलशाच्या सानिध्यापासून

---

[१८] *नाथमाधव ऊर्फ द्वारकानाथ माधव पितळे : : स्वराज्याचा कारभार कॉन्टिनेन्टल प्रकाशन विजयानगर पुणे, १९४७ (पहिली आवृत्ती) पृ. क्र. १७७ ८/७८*

[१९] *नाथमाधव ऊर्फद्वारकानाथ माधव पितळे उपरोक्त, पृ. क्र . १३ .*

संभाजीराजांना दूर ठेवण्यासाठी कवीजींना एकहजार दिवसाच्या मौन वृतामध्ये गुंतवुन टाक तात. अशा सारख्या प्रसंगातून कादंबरी रंजक करण्याचा प्रयत्न लेखकाने केलेला आहे.

संभाजीराजे वर्तन सुधारण्यासाठी शिवाजी महाराज संभाजीराजांना समर्थाकडे पाठविण्याचा निर्णय घेतात. सज्जनगडावर जाण्यासाठी छत्रपती शिवाजी महाराज स्वहस्ते संभाजी राजाकडे पत्र देतात. संभाजीराजे व समर्थ यांचा सज्जन गडावरील सहवासाचा वृत्तांतही लेखकाने कादंबरीमध्ये रेखाटला आहे. तसेच सज्जनगडावरील वास्तव्यात संभाजीराजे दुष्टपणा सोडून नेटके वागत असल्याचे व समर्थाशी पटल्याचेही चित्र लेखकाने रेखाटले आहे. सज्जनगडावरील वास्तव्यामुळे संभाजीराजांमध्ये झालेला विलक्षण बदल क्षणिक काळापुरताच आढळतो. कारण सज्जनगडावरुन खंडबा सोनत परत येत असतानाच संभाजी राजे जमुनेवर अत्याचार करित असल्याचे चित्रण लेखकाने निर्माण केले.

या कादंबरीमध्ये संभाजीराजे दिलेरखानास जाऊन मिळण्यामागचे कारण प्रामुख्याने संभाजी राजाकडून झालेली दुर्वर्तन व त्यामुळे शिवाजी महाराज आपणास शिक्षा करतील या भीतीपोटी संभाजी दिलेरखानाकडे गेले असे चित्र लेखकाने रेखाटले आहे. संभाजीराजे दिलेरखानास का मिळाले ? याची कारणमीमांसा सांगताना लेखकाने संभाजीराजांच्या जन्माच्या काळची परिस्थिती, त्यावेळची नैसर्गिक स्थिती सभोवतालची परिस्थिती, गर्भसंस्कार, तत्कालीन काळातील शिवाजीराजे व सईबाई यांची मनःस्थिती यांसारख्या पूर्वसंचितामुळे भविष्यात संभाजीराजे मोगलाकडे गेल्याचे लेखकाने समर्थाचा हवाला देऊन स्पष्ट केले आहे. संभाजीराजाच्या दुर्वतनामुळेच छत्रपती शिवाजीराजे कर्नाटक मोहीमेवरुन आल्यानंतर विरक्तावस्था धारण करतात.त्यासाठीच श्रीशैल्लम मल्लीकार्जुना पुढे आपले शिरकमल अर्पण करण्याचीही तयारी करतात. राजाकारणातून संन्यास घेण्यास महाराजांची ही इच्छा समर्थाच्या उपदेशाने नाहीसी झाल्याचे लेखक दर्शवितात. एकूणच या कादंबरीतून संभाजीराजांचे विकृत चित्रण लेखकाने निर्माण केले आहे. जनतेला विनाकारण त्रास देणारे, परस्त्रियांवर अत्याचार करणारे, वडिलांच्या नावास काळिमा फासणारे, एवढेच नव्हे तर

शिवाजीरजांच्या मृत्यूसही संभाजी राजेच कारणीभूत असल्याचा खटाटोप लेखकाने केला आहे.

### ३.३.४ 'स्वराज्यावरील संकट' - नाथमाधव (१९२३)

मराठीतील लोकप्रिय कादंबरीकार द्वारकानाथ माधव पितळे ऊर्फ नाथमाधव यांनी संभाजी महाराजांच्या जीवनावर १९२३ मध्ये स्वराज्यावरील संकट ही कादंबरी प्रकाशित केली. या कादंबरीमध्ये इ.स. १६८१ ते १६८९ पर्यंतची संभाजीराजांची राजकीय कारकींद चित्रलेली आहे. या कादंबरीच्या शीर्षकावरुनच लेखकाचा कादंबरी लेखनाचा हेतू आणि आशय स्पष्ट होते. छत्रपती शिवाजी महाराजांच्या विरोधी अशी संभाजीराजांची प्रतिमा या कादंबरीमध्ये निर्माण करण्याचा प्रयत्न कादंबरीकाराने केलेला दिसतो. संपूर्ण कादंबरी काल्पनिक कथांनी व्यापलेली दिसते. सर्व कादंबरीभर कवी कलशा वावरताना दिसतो. लेखकाने संभाजीराजे क्रूर, व्यसनी, रंगेल, दुराग्रही, हेकेखोर, दुरदृष्टीचा अभाव असलेला, कवी कलशाच्या आहारी गेलेला असे चित्रण केलेले आहे.

कादंबरीची सुरुवातच संभाजीराजे पन्हाळगडावर नजरकैदेत असल्यापासून करून तो स्वतःची सुटका करून कशा प्रकारे आपल्या रक्तलांछित कारकिर्दीला सुरुवात करतो. याचे अतिशय भडक चित्रण कादंबरीध्ये लेखकाने रेखाटले आहे. रायगडावरील बातमीचा सुगाता न लागू दिल्यामुळे सूर्याजी कंक, सोमाजी बकी यांना ठार करतो. एवढेच नव्हे तर संपूर्ण कारस्थानाचे मूळ समजून, सोयराबाईसाहेबांना भिंतीत चिणून मारतो, राजारामास कैदेमध्ये टाकतो, बाळाजी आवजी व त्यांचे बंधु, मुलगा यांना हात्तीच्या पायाखाली देतो, जगदेवराय सरनाईक यांना कडेलोटाची शिक्षा फर्मावितो, मोरोपंतास अंधारकोठडीत टाकतो, शिर्क्यांचे शिरकाण करतो, शिवाजीराजाच्या काळातील विश्वासू व राजनिष्ठ मनुष्याविषयी संशय घेऊन त्यांच्या घरादारावरुन गाढवाचा नांगर फिरविला. स्वामिभक्ताचे कडेलोट केले. अष्टप्रधानाचे धिंडोळे काढले असे अनेकवीध आरोप लेखकाने संभाजीवर केले आहेत.

"तुम्ही राज्य लोभास्तव महाराजांना विषप्रयोग करून मारिले." असा आरोपकरून संभाजीने सोयराबाईला भिंतीच्या कोनाड्यात चिणून टाकण्याचा आदेश दिला[२०] असे लेखक सांगतो तर, "पंडितजी खेचा ह्या पोराला आणि फेका त्या अंधारकोठडीत" म्हणून राजारामाला कैदेमध्ये टाकले. "ह्या वृद्ध कपीचा एकदम कडेलोट करा."[२१] असा आदेश देऊन जगदेवराव या राष्ट्रभक्तलाच कडेलोट केला असे कादंबरीमध्ये रेखाटले आहे. संभाजीराजे व कवी कलश यांचे सहसंबंध रेखाटताना कादंबरीकाराने अतिशयोक्ती व कल्पनेचा आधार घेतला आहे. कपटी, दुर्व्यसनी, संधीसाधू व स्वार्थी कलशाच्या तंत्रानुसार संभाजी चालत असल्याचे चित्रण लेखकाने निर्माण केले आहे. कवी कलशावर पूर्णपणे विसंबून राहणारा, कवीजीच्या पूर्ण आहारी गेलेला, संभाजी कादंबरीमध्ये रेखाटण्यात आलेला आहे. चंडीमातेचा प्रसाद म्हणून कलशा संभाजीना मदिरेचे व्यसन लावतो. मदिरेच्या व्यसनामध्ये धुंद असलेला संभाजी कादंबरीकाराने चित्रित केलेला आहे. मद्यधुंद संभाजी म्हणतो, -

"पंडितराव, तुम्ही - तुम्ही आमच्या राज्याचे खरे खरे हितचिंतक, तुमच्या तुमच्यासारखे सेवक असता माझ्या राज्याला अपाय होण्याची का - काय भी- भीती आहे ? "... दुष्ट फितुरी आहे ? ... फितुरी आहे ? ... माझ्या राज्यात आहे ? ... कवीराज पंडितराव ... सांगा ...त्यांची नाव सांगा- सांगा त्या चांडाळांना ...आता-आता हत्तीच्या पायी तुडवितो सांगा..."[२२] कलशा बाळाजी आवजी व त्यांचे बंधु मुलगा ही राजारामाशी फितुर असल्याचे सांगतो. संभाजी मद्यधुंद अवस्थेमध्ये आदेश देतो. "बस्स दया त्यांना एकदम हतीच्या पायी ...तुडवा ... मारा...आताच्या आता तुडवुन तुडवून मारा."[२३] अशाप्रकारे दारुच्या नशेमध्ये संभाजीकडून बाळाजी आवजी व त्यांच्या कुटूंबाला मारण्याचा आदेश घेऊन कलशाने कशाप्रकारे त्यांची हत्या केली. आवजीच्या संपूर्ण कुटुंबाचा छळ कशाप्रकारे केला. याचे

---

[२०] *पितळे द्वारकानाथ माधव (नाथमाधव) :स्वराज्यावरील संकट, वरदा प्रकाशन प्रा. लि ३९७/१ सेनापती बापट मार्ग, पुणे. १९२३ (पहिली आवृत्ती) पृ. क्र. ४*
[२१] *पितळे द्वारकानाथ माधव (नाथमाधव) : उपरोक्त पृ. क्र. ५*
[२२] *पितळे द्वारकानाथ माधव (नाथमाधव) : उपरोक्त पृ. क्र. ८९*
[२३] *पितळे द्वारकानाथ माधव (नाथमाधव) : उपरोक्त पृ. क्र. ८९*

अतिशय भडक चित्रण कादंबरीमध्ये केलेले आहे. मोरापंत पिंगळे या पेशव्यास संभाजीच्या विरोधामध्ये कटकारस्थान केले म्हणून कलशा संभाजीचे कानभरुन पेशव्यांना कैदखान्यात टाकल्याचे कादंबरीमध्ये रेखाटले आहे. कादंबरीच्या उत्तरार्धात कलशा मोठ्या अनुष्ठानामध्ये राजबळी देण्यासाठी संभाजीराजांना संगमेश्वरी घेऊन जातो. चंडीमातेचा प्रसाद म्हणून भरपूर मदिरा पाजवतो. अशा मद्यधुंद अवस्थेतच संभाजी राजे पकडले जातात. असे चित्र लेखकाने रेखाटले आहे.

संभाजीराजांची दुर्वर्तनी व रंगेल प्रतिमा निर्माण करण्यासाठी कादंबरीकाराने राधा या काल्पित स्त्री पात्राची निर्मिती केली आहे. राधा एक सुंदर, शीलवान, लावण्यवती तरुणी संभाजीराजे पन्हाळगडावर नजरकैदेत असताना त्यांच्या गुणावर लुब्ध होते. संभाजीराजेही तिच्या प्रेमाचा स्वीकार करून तिच्या सहवासात जगातील सर्व सुखे तुच्छ मानतात. तिच्या प्रेमजाळात गुरफटून जातात. एवढेच नव्हे तर तिला राज्यभिषेकाच्या वेळी महाराणी पदाचा मान देण्याचीही तयारी करीत असल्याचे लेखकाने रेखाटले आहे. कादंबरीमध्ये राधाबाईना संभाजीपासून मदनसिंग मुलगाही होतो. येसूबाई तिला रायगडावर आणून ठेवते. त्यासुमारास संभाजी पावसाळ्यामध्ये जंजिऱ्याची मोहीम अर्धवट सोडून रायगडावर येतात. यानंतर आपला मोर्चा मोगलाकडे वळवितात. त्यावेळेस मोहीमेवर राधाबाईला आपल्या सोबत घेऊन लष्कराची पहिली शिस्त संभाजीने मोडल्याचा आरोपही लेखकने या कादंबरीमध्ये केलेला आहे . पुढे संभाजीचे अनुकरण त्याच्या सैनिकाने केले. संभाजीचे लष्कर ही आपल्याबरोबर बायकांना घेऊन जाऊ लागले. एवढेच नव्हे तर लूट करताना दुस-याच्या बायकांनाही पकडून आणू लागले. याशिवाय मराठ्यांच्या लष्करात कलावंतीणीचे ताफे जाऊ लागल्याचेही वर्णन कादंबरीकाराने केले आहे. संभाजीने पुढे राधाबाईंना करवीर प्रांतात 'राधानगरी ' येथे स्वतंत्र महाल बांधून दिल्याचे कादंबरीमध्ये लिहिले आहे.

संभाजी राजांच्या दुर्वर्तनामुळे आणि रयतेवरील अनन्वित अत्याचारामुळे रयतेची निष्ठा राजा प्रति नसून स्वराज्या प्रति असल्याचे लेखकाने या कादंबरीमध्ये रेखाटले आहे. त्यासाठी लेखकाने जंजिऱ्यावरच्या मोहीमेच्या प्रसंगाचे वर्णन केलेले आहे. संभाजीला

अन्यायी, दुष्ट म्हणणारे लोक महाराजांचा जंजिऱ्याच्या मोहिमेवर जाण्याचा हुकुम येताच सर्वजण एक दिलाने आणि अतिशय उत्साहाने मोहिमेची तयारी करत असल्याचे कादंबरीत चित्रित केलेले आहे. आपल्या स्वराज्य निष्ठेसाठी मल्हारी शिर्के, जगदेवरावाची नात तारा, मानाजी, राजकुंवर, सूर्याजी पिसाळाची पत्नी सावित्रीबाई प्रयत्नाची पराकाष्टा करतांना दाखवले आहे; परंतु राजनिष्ठ कुटुंबियांचा मात्र कादंबरीकाराने शोकपर्यावसाचा शेवट कादंबरीतून दर्शविला आहे. त्यासाठी लेखकाने संभाजीराजालाच जबाबदार धरले आहे.

संभाजी राजांच्या कारभारासंदर्भात लेखकाने या कादंबरीमध्ये बेबंदशाहीचे दर्शन घडवले आहे. स्वराज्याला त्यांच्या काळामध्ये उतरती कळा लगली, शिवाजी महाराजांनी भरलेला खजिना संभाजीराजांच्या काळामध्ये रिकामा झाला. त्याचबरोबर संभाजी राजांच्या कारभारात लायक माणसे नव्हती. त्यामुळे संपूर्ण राज्यात अराजकता निर्माण झाली. लष्करास वेळेवर पगार मिळत नसे. म्हणून पगारासाठी परस्पर लुटीचे आदेश दिले. लूट करताना सैनिक बायकाही पळवू लागले. जमिनीचे सारे वाढविले अशा प्रकारे संभाजीराजाच्या राजवटीचे चित्रण लेखकाने केले आहे. त्याचबरोबर संभाजीराजाच्या राजवटीत प्रजा न्यायासाठी कंठशोष करीत असताना, संभाजीराजांना मात्र ती ऐकू येत नाही अशीही परिस्थिती असल्याचे चित्र लेखकाने रेखाटले आहे.

संभाजीराजे व येसूबाई यांच्यातील सहसंबंध चांगले नसल्याचे चित्रण लेखकाने कादंबरीतून केले आहे. संभाजीराजांच्या हातून नेहमीच अत्याचार होत असल्यामुळे येसूबाई निस्तेज होतात. येसूबाईनी संभाजीराजांना स्वराज्याच्या हिताच्या गोष्टी सांगण्याचा प्रयत्न केल्यानंतरही त्या संभाजीराजांना मात्र अहितकारकच वाटतात. या संदर्भात संभाजी येसूबाईस म्हणतो, "आपल्या म्हणण्याप्रमाणे मी चालत आलो असतो तर आज पन्हाळ्याच्या कोणत्या कोणाकोपऱ्यात धूळ खात पडलो असतो, याचा आपण विचार केला का ?"[२४] याशिवाय येसूबाई ह्या शिर्क्यांच्या घराण्यातील असल्यामुळे त्यांच्याविषयी संभाजीराजांचे मन साशंक

[२४] *पितळे द्वारकानाथ माधव (नाथमाधव) : स्वराज्यावरील संकट, वरदा प्रकाशन प्रा. लि ३९७/१ सेनापती बापट मार्ग, पुणे. १९२३ (पहिली आवृत्ती) पृ.क्र.६९*

असल्याचे लेखकाने दर्शविण्याचा प्रयत्न केला आहे. येसूबाई काहीतरी सांगण्याकरिता आल्याचे जाणून संभाजी त्यांना येताच म्हणतात, -

"मी हल्ली जी जी गोष्ट करतो ती आपणास पसंत पडत नाही. त्याला माझा नाईलाज आहे; परंतु आता मी थोडक्यात सांगतो की, माझ्या इभ्रतीला कमीपणा आणणारी अशी जर एखादी गोष्ट मला सांगणार असाल तर ती ऐकून घेण्यास मी मुळीच तयार नाही."[२५] अशाप्रकारे कादंबरीतून संभाजी राजे-येसूबाई यांच्यातील सहंसबंध नात्याचे विकृत चित्रण लेखकाने केले आहे.

संभाजी राजेंचे चांगले वर्तन घडविले ते समर्थ रामदासांनी पाठविलेल्या पत्रातील उपदेशामुळे झाल्याचे लेखकाने दर्शविले आहे. कवी कलशा जेव्हा समर्थ रामदासानी दिलेली उपदेश पत्रिका वाचतो. त्यावेळेस संभाजी राजे आपल्या कार्याचे सिंहावलोकन करतात 'शिवराया आठवावे' हे चरण वाचतात. तेव्हा संभाजी महाराजासमोर शिवारायांची मूर्ती उभी रहाते. त्यामूर्तीसमोर गुडघ्यावर बसून हात जोडून संभाजी म्हणतात, "आबासाहेब-महाराज क्षमा करा हा शंभू आपला अनंत अपराधी आहे ! महाराज, माझ्या हातून अनेक दुष्कृत्ये झाली. ती मी कबूल करतो मला क्षमा करा."[२६] अशा पश्चाताप केल्यानंतर, मूर्तीस वंदन केल्यानंतर ती मूर्ती महालामध्ये जाते. संभाजी पुन्हा ती पत्रिका न्याहाळतात. महालामध्ये येसूबाई आल्यानंतर संभाजी ह्याच विचारात मग्न असतो. गहन विचाराबद्दल विचारता संभाजी म्हणतो, "समर्थांनी ह्या पत्रिकेत जो बहुमोल उपदेश केला आहे, त्याच्या अगदी विरूद्ध वर्तन मजकडून घडत आहे. हे विचार मनात येऊन माझं मन खिन्न झालं आहे."[२७] जंजिऱ्याच्या मोहीमेवर जातो. कलशाकडून छत्रपतीचे शिक्का घेऊन येसूबाईंकडे सुपुर्त करतो. असा चत्मकारिक बदल लेखकाने दाखविला आहे. कादंबरीच्या उत्तरार्धात मोगलाच्या कैदेमध्ये संभाजी कैद झाल्यानंतर पश्चाताप करत असलेला दर्शविलेला आहे. "शुल्लक दारुच्या व्यसनामुळे माझा सर्वनाश झाला. त्यामुळेच मी नाच तमाशे केले ! हलकट वेश्या

[२५] *पितळे द्वारकानाथ माधव (नाथमाधव) : स्वराज्यावरील संकट, वरदा प्रकाशन प्रा. लि ३९७/१ सेनापती बापट मार्ग, पुणे. १९२३ (पहिली आवृत्ती) पृ.क्र.६९*

[२६] *पितळे द्वारकानाथ माधव (नाथमाधव) : उपरोक्त पृ. क्र. १८०*

[२७] *पितळे द्वारकानाथ माधव (नाथमाधव) : उपरोक्त पृ. क्र. १८.*

मी छत्रपतीच्या तक्तापुढे आणून नाचविल्या ! ...गेली पाच वर्षे मी शत्रुच्या छातींवर तलवारीचा नंगा नाच केला, पण अखेर आज हया नशेत माझा तोल गेला आणि माझी अखेर झाली . लेखकाने संभाजीराजाचे विकृत चित्रण करण्यासाठी अशा प्रकारचे खटाटोप केल्याचे दिसून येतात.

### ३.३.५ 'संभवामि युगे युगे' - मनमोहन नातु (१९६५)

लोककवी मनमोहन नातु यांनी १९६५ मध्ये संभाजी राजांच्या जीवनावर आधारित 'संभवामि युगे युगे' या नावाची ऐतिहासिक कादंबरी लिहिली. ही कादंबरी ऐतिहासिक सत्यापेक्षा काल्पनिकतेनेच भरलेली आहे. या कादंबरीमध्ये संभाजीराजांचे चित्रण नादान, उताविळ लहरी, स्त्रीलंपट, कामांध, व्यसनी, कवी कलशाच्या आहारी गेलेला, बेजबाबदार असे केलेले आहे. संभाजी राजांना स्त्रीशौकिन व कामांध दाखवण्यासाठी कादंबरीकारांनी जुगल, तुळशी, शेवंता, रोशण यांसारख्या काल्पनिक स्त्री पात्रांचा आधार घेतला आहे.

कादंबरीची सुरुवात लेखकाने अशी केली आहे, की उताविळ हट्टी संभाजीराजे शिकारीच्या निमित्ताने जंगलामध्ये जातात. विश्रांती घेत असताना संभाजी राजांची भेट एका गारुडयाची पोर जुगल यांच्याशी होते. जुगलचे सौंदर्य पाहून राजाचे भान हरपते. ते जुगलला पाहून कामांध वासनेने भिजून निघाल्याचे वर्णन कादंबरीकारानी केले आहे. संभाजी जुगलला म्हणतो, "खरं आहे ते जंगली श्वापदांना ऊभे फाडतो. आम्ही पण सुंदर स्त्रीच्या डोळ्यातल्या निखाऱ्यात राख होऊन जाते. आमची इथं आमची शक्तीही लुळी पडते आणि युक्ती कोणती योजायची त्यानंतरची सारासार बुद्धी नष्ट होऊन जाते आमची."[२८] अशा प्रकारे जुगलवर आसक्त झालेले संभाजीराजे कादंबरीमध्ये रेखाटले आहे.

तुळशी आणि संभाजीराजे यांच्या प्रणयाचे वर्णन कादंबरीमध्ये अतिशय भडकपणाने चित्रित केलेले आहे. तुळशी स्वतः होऊन संभाजीची प्रेयसी बनते. तुळशी आणि संभाजीराजाच्या प्रणयाचे चित्रण कादंबरीमध्ये केले आहे. तुळशी कलशा कवीमुळे

---

[२८] *नातु मनमोहनः संभवामि युगे युगे, सरस प्रकाशन सोलापूर १९८४ (द्वितीयावृत्ती) पृ.क्र. ९*

संभाजीराजांच्या सहवासात येते. संभाजीराजावर तिचे खरे प्रेम जडते. कवी कलशाचा हेतू चांगला नसल्यामुळे त्यांच्यापासून संभाजीराजाचा बचाव करण्याचा प्रयत्न करते. आपल्या सौंदर्याच्या मोहजालात गुंतवून ठेवते. संभाजीराजे तुळशीच्या सहवासात मदमस्त होतात. तिला राणीसाहेब म्हणून हाक मारतात तिच्या बोटात राजमुद्रा घालतात आणि म्हणतात, "आम्ही राजे ? छे ! छे ऐने महालात तरी राजे नव्हेत ! तुझ्या मेंदीने मंतरलेल्या लाल नखाखालच्या मऊमऊ मुठीतले आम्ही नऊ कोटीचे नृपती नऊ खाऊचे सागरगोटे झालो आहोत... समजले तुळसा."[२९] तुळशी कवी कलशाच्या संभाजीराजांविरुद्धच्या काळात सामील न झाल्यामुळे कलशा शेवंताच्या नादाने संभाजीराजांना वश करण्याचा प्रयत्न करतो; परंतु शेवंताला संभाजीराजांचा सूड घ्यायचा असतो. कारण संभाजीने तिच्या वडिलाला ठार केलेले असते. राजांच्या वाढदिवसाच्या रोजी कवी कलश आपल्या खाजगी महालात राजाच्या महफीलीची व्यवस्था करतात. शेवंता सुरुवातीला संभाजी राजांना यथेच्छ मदिरा पाजवते. आपल्या नृत्याने राजांना खुष करते. संभाजी राजे जेव्हा तिला आलिंगन देतात तेव्हा ती त्यांच्यावर कट्यारीने वार करताना खंडोजी आपल्या तलवारीने तिचा हातच कलम करतात. त्यानंतर शेवंताला कैदखान्यात टाकतात.

कादंबरीकाराने संभाजीराजांना कामांध दाखवण्यासाठी रोशण या स्त्री पात्राचा आधार घेऊन त्यांच्या प्रणयाचे अतिशय भडक चित्रण रंगवले आहे. रोशण ही मुकर्रबखानाची नर्तिका असून त्याच्याच सांगण्यावरुन संभाजीला आपल्या सौंदर्याने आकर्षित करून आपल्या मोहजालात गुंतवून ठेवून संभाजीला कैद करण्याचा डाव आखतो; परंतु जेव्हा संभाजी व रोशण यांची भेट होते तेव्हा रोशण संभाजीच्या प्रेमात पडते. संभाजीराजेही तिचे मादक सौंदर्यपाहून मद्यधुंद होतात. तिच्या सोबत प्रणय करतात व म्हणतात, "ह्या मध्यरात्रीपर्यंत तू मदनाची मंजिरी चंद्राच्या भिंगरीसारखी आमच्या हातावर गरगरलीस... मनाला वाटले की कापराची नाजूक वडी दणकट स्पर्शाने चुरा होऊन जायची पण तू अशी लोभस की त्याक्षणी तू आम्हाला आपल्यासारखे मुलायम केलेस आणि शृंगाराच्या

[२९] *नातु मनमोहनः संभवामि युगे युगे, सरस प्रकाशन सोलापूर १९८४ (द्वितीयावृत्ती) पृ.क्र.७६*

दरबारात स्वत: ही  रंगलीस  आणि आम्हालाही रंगवलेस अशी जवानीची उधळण, शरीर सुखाची बरसात, प्रीतीची लयलूट, श्वासनिश्वासाची परतफेड, सुखाच्या चबुतऱ्यावर नेऊन केलीस  की आम्ही प्रत्यक्ष धुंदीला धुंद करून एकसारखे तुझ्याचजवळ बसून  राहिलो रोशण!"[३०]

रोशणच्या सहवासाने धुंद होतात तिला उदेद्दशून रोशण! तू काल नव्हतीस, उद्या असशील का मला माहिती नाही? पण आजची रात्र तू अशी रोशण करून टाकलीस की, कित्येक वर्षेच काय पण जन्मोजन्म तुझ्या सहवासातील आजची रंगलेली रात्र मला साततत्याने स्मृतीच देत राहील."[३१]

मुकर्रबखानाला रोशणची दगाबाजीची माहिती झाल्यानंतर तिला ठार करून तिचे शव एका पेटाऱ्यात घालून संभाजीकडे रायगडावर रवाना करतो. संभाजी राजांनी तिचे दफन शाहीथाटामध्ये करून तुळशीला तिच्या थडग्यावर फुले वाहण्यास सांगतात. केव्हा केव्हा स्वत: तिच्या समाधीपाशी जाऊन बसत होते. असे काल्पनिक रंजक चित्रण रेखाटले आहे.

मनमोहन नातू यांनी संपूर्ण कादंबरीमध्ये संभाजीचे व्यसनी, दारुबाज असे चित्र रेखाटले आहे. कवी कलशाने देवीचा प्रसाद प्रथम तीर्थ म्हणून संभाजी राजांना मदिरेची सवय लावली . संभाजीराजा तुळशी, शेवंता व रोशण यांच्या सहवासात मद्यधूंद झाल्याचे चित्रण रेखाटले आहे. याशिवाय शेवटी चंडीमातेची पुजा करून प्रचंड शक्तीचे अमीष दाखवून कवी कलश संभाजीराजांना चंडीका देवीचा प्रसाद म्हणून अमाप मदिरा पाजवतात निशस्त्र करून अशाच अवस्थेत कैद करतात.

संभाजीराजे व कवीकलष यांच्या संबंधावर संपूर्ण कादंबरी आधरलेली आहे. कवी कलष हा मोगलांना फितूर झालेला असतो. संभाजीराजांना आपल्या तंत्र विद्येच्या जाळ्यामध्ये पूर्ण आडकवतो आणि संपूर्ण राज्याची सत्ता स्वतःच्या हातामध्ये घेतो.

---

[३०] *नातू  मनमोहनः संभवामि युगे युगे, सरस प्रकाशन  सोलापूर १९८४ (द्वितीयावृत्ती) पृ.क्र. १००*
[३१] *नातु  मनमोहनः उपरोक्त पृ.क्र. ९५, ९६*

संभाजीराजांना मदिरा आणि मदिराक्षीच्या नादास लावण्याचे कार्य या कवी कलशाने केले. मुकर्रबखान, सूर्याजी पिसाळ, गणोजी शिर्के कवी कलष हे सर्वजण मिळून संभाजीराजाचा कवी कलषावर अंधळा विश्वास असल्यामुळे ते पकडले जातात.

तुळशीदास शाहीर हे काल्पनिक पात्र कादंबरीमध्ये वावरताना दिसते. संभाजी आणि तुळशी दोघाच्या प्रेमावर तुळशीदास शाहीदास शाहीतरी करण्यासाठी बोलावतात; परंतु तुळशीदास त्यास नकार दिल्यामुळे त्यास कैद करतात. त्याचा हेतू चांगला असल्यामुळे त्याची मुक्तता करतात. तुळशीदास स्वामी समर्थाचे दर्शन घेऊन त्यांच्या आदेशाने स्वराज्याचे रक्षण करण्यासाठी स्वतःला वाहतो. तो रायगडावरच संभाजीच्या सहवासात राहतो. शेवटी औरंगजेबाच्या कैदेतून मुक्तता करण्यासाठी प्रयत्न करतो; पण त्यात यश येत नाही.

कांदबरीच्या शेवटी धर्मवीर संभाजीचे चित्रण लेखकाने रेखाटले आहे. संभाजीराजांना कैद केल्यानंतर औरंगजेब बादशाह म्हणतो तू मुसलमान झालास तर तुझे प्राण वाचवून महाराष्ट्राची मनसबदारी देण्याची अमिष दाखवतो. संभाजी म्हणतो, "अलमगीर, मी माझ्या कवडीमूल्याच्या प्राणासाठी धर्म सोडणार नाही... प्राण गेला तरी बेहतर पण मी माझ्या प्राणाहून प्रिय असलेल्या हिंदू धर्माचा त्याग करणार नाही. संभाजी धर्मासाठी जगला आहे आणि धर्मासाठीच मरणार आहे... धर्मरक्षणासाठी एकदाच काय पण लाख वेळा मी मरायला तयार होईल."[३२]

### ३.३.६ 'श्रीमानयोगी' - रणजित देसाई (१९६८)

रणजित देसाई यांनी छत्रपती शिवाजी महाराजांच्या जीवनावर आधारित 'श्रीमानयोगी' ही ऐतिहासिक कादंबरी १९६८ मध्ये प्रकाशित केली. या कादंबरीमध्ये लेखकाने छत्रपती शिवाजी महाराजांच्या व्यक्तिमत्वाच्या विविधांगी पैलूंवर प्रकाश टाकलेला आहे. शिवाजी महाराजांच्या अनुशंगानेच युवराज संभाजी यांच्या जीवनावरही लेखकाने प्रकाश टाकला

[३२] *नातु मनमोहन : संभवामि युगे युगे, सरस प्रकाशन, सोलापूर १९८४ (द्वितीयावृत्ती) पृ.क्र. १४७,१४८*

आहे. या कादंबरीमध्ये संभाजीराजाची हट्टी उतावीळ, संतापी, चंचल, व्यसनी, बदफैली, दुर्वर्तनी अशी प्रतिमा रंगवलेली आहे.

शिवाजी महाराजांचे मूल्यमापन करताना आपल्या राजकीय जीवनात अनेकवीध कर्तृत्वाची उत्तुंग शिखरे पार करणारे शिवाजी महाराज स्वतःच्या कौटुंबिक जीवनात अपयशी ठरले. हे दाखविण्यासाठी लेखकाने संभाजीराजास जबाबदार धरले आहे. संभाजीराजांच्या दुर्वर्तनामुळे व्याकुळ झालेले शिवाजी महाराज खेद (खंत) व्यक्त करतानाचे चित्रण लेखकाने रेखाटले आहे. या संदर्भात लेखकाने शिवाजी महाराजांच्या तोंडी "ज्या चारित्र्यसंपन्न छत्राखाली आम्ही वाढलो त्याच छत्राखाली शंभू मोठा झाला, हे तरी खर ? शिवाजीला दुसरा शिवाजी घडवता आला नाही, असं म्हणण्यापेक्षा मासाहेबांना दुसरा शिवाजी घडवता आला नाही, हेच अधिक खरं नाही का ?"[३३] एवढेच नव्हेतर "साध्या भोळ्या जीवना आम्ही मृत्यूंजय बनवळ... पण संभाजी ! आमचे युवराज आमच्या सहवासात राहुनही कोरडेच राहिले."[३४] अशा प्रकारे, आपली आंतरिक वेदना व्यक्त करतांना दिसून येतात. जिजामाता मृत्यू शय्येवर, असताना शिवाजी म्हणतो "राजाराम संभाजी... दोघेही लहान आहेत. संभाजीला अजून समज यायची आहे. त्याला खूप जपायला हव."[३५]

संभाजीराजांला हट्टी, उताविळ, बेजबाबदार दर्शविण्यासाठी लेखकाने अनेक कल्पित प्रसंगाची उभारणी केली आहे. बाल संभाजी लहानपणापासून घोड्यावर बसण्याचा हट्ट करतात, तसेच लहान राजारामाला घोड्यावर घेऊन बेजबाबदारपणे वागतात. टकमक टोकापर्यंत घोडा गेला तरी त्याची पर्वा करीत नाहीत. शिकारीच्या वेळी संभाजीराजे अतिशय उताविळ होऊन वाघावर चालून जातात, इत्यादी अनेक प्रसंग कादंबरीकाराने कादंबरीमध्ये रेखाटले आहेत.

संभाजी गोदावरी प्रकरण, बखर व इतर साहित्यिकांनी रंगविल्याप्रमाणे याही कादंबरीकारांनी रंगविले आहे. संभाजीराजे जिजाऊ मासाहेबांच्या दर्शनासाठी रायगडाच्या

---

[३३] *देसाई रणजित : श्रीमानयोगी, मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे २०१४ पृ. क्र. १६२९*
[३४] *देसाई रणजित : उपरोक्त, पृ. क्र. १६३०*
[३५] *देसाई रणजित : उपरोक्त, पृ. क्र. ११६०*

पायथ्याशी पाचाडगावाजवळ पाणी पाजवण्याच्या निमित्ताने जातात. तेथे 'गोदावरी' नावाच्या सुंदर ब्राह्मण कन्येकडे संभाजी राजे आकर्षित होतात. घोडा पाणी पित असतानाच तिच्याकडे कामुक नजरेने बघतात. तिला म्हणतात, "जनावराची तहान भागवलीत, पण आम्ही मात्र तहानलेलेच राहिलो."[३६] त्यानंतर गोदावरी संभाजी राजांना विहीरीतले पाणी काढून पाजवते तेव्हा पाणी किती गोड आहे म्हणतात त्यानंतर पुन्हा भेटण्याचे संकेत देऊन जातात. पुन्हा गोदावरीची भेट होण्यासाठी त्या विहिरीवर येतात. गोदावरीस मनवण्याचा प्रयत्न करतात, "गोदावरी तुझ्यासाठी काही तरी करावं असं मनात आहे... ज्याची आठवण तुला आयुष्यभर राहावी. सांग तुला मी काय देऊ ? बोलना !.. आमची तहान भागवलीत आमची आठवण म्हणून हा कंठा जतन करा."[३७] गोदावरी कशाचा ही स्वीकार न करता शिवाजी महाराजांचं जवळून दर्शन व्हावे एवढीच इच्छा व्यक्त करते. त्यामुळे गोदावरीची इच्छा पूर्ण करण्यासाठी संभाजी राजे एकदा पाचाडावरुन रायगडावर जाताना शिवाजी महाराजस त्या विहिरीचे पाणी अतिशय गोड आहे असे म्हणून त्यांना त्या ठिकाणी घेऊन येतात आणि गोदावरीस शिवाजी महाराजांचे दर्शन घडवतात. पुढे याच तरुणीस जबरदस्तीने घोड्यावर बसून तिला लिगाण्या किल्ल्यावर ठेवतात. जेव्हा शिवाजी महाराजांच्या कानावरे ही बातमी गेल्यानंतर गुन्ह्याची चौकशी करण्याचे आदेश देतात. त्यावेळी संभाजी राजे तिला पळवून अणल्याचे मान्य करतात; परंतु तिच्यावर कोणतीही जबरदस्ती केली नसल्याचे सांगतात. या घटनेची सत्यता पडताळण्यापूर्वी गोदावरी किल्ल्याच्या कडयावरुन उडी घेऊन आत्महत्या करते. गोदावरी प्रकरणामध्ये संभाजी राजांना दोषी ठेवून कुळाचे भुषण असणारी कवडयाची माळ व कंबरचेती तलवार उतरविण्याची शिक्षा मिळते. अशा प्रकारचे काल्पनिक चित्रण कादंबरीकाराने रंगवलेले आहे.

प्रस्तुत कादंबरीमध्ये जिजाऊ मासाहेबांच्या मृत्युनंतर संभाजी राजांच्या वर्तनात विलक्षण बदल झाल्याचे चित्रण रेखाटले आहे. संभाजीराजे रात्री-बेरात्री रायगडावरुन खाली

---

[३७] *देसाई रणजित : श्रीमानयोगी, मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे २०१४ पृ.क्र.१२२४-२४*
[३८] *देसाई रणजित : उपरोक्त पृ क्र. १२२४-२५*

उतरतात, नाच गाण्याच्या महफलीमध्ये रमतात, कलावंतीणींना पळवून आणतात, दरबारातील थोर मंडळीचा अपमान करतात, आपल्या कर्तव्यापासून परावर्त होतात. श्रृंगारपुराला गेल्यानंतर शाक्त पंथाची दीक्षा घेतात, मध्यपान करतात, शिवाजीराजे जिवंत असताना स्वतःचा कलशाभिषेक करून घेतात आपली जबाबदारी सोडून ऐष आरामाचे जीवन व्यतीत करतात. अशा प्रकारचे चित्रण संभाजीराजांच्या संदर्भात कादंबरीकारणे चित्रित केले आहे.

### ३.३.७ 'छत्रपती संभाजी' - लोककवी मनमोहन नातु (१९७०)

लोककवी मनमोहन नातु यांनी शिवचरित्र मालेतील प्रस्तुत कादंबरी पाचवी असून ती छत्रपती संभाजी महाराजांच्या जीवनावर आधारित आहे. या कादंबरीच्या सुरुवातीलाच लेखकाने १८ पानाची प्रदीर्घ प्रस्तावना लिहून कादंबरीची प्रेरणा व उद्देश मांडला; परंतु प्रत्यक्ष कादंबरीतील चित्रणात बरीच तफावत दिसून येते.

संपूर्ण कादंबरीमध्ये संभाजी राजांची व्यसनी, स्त्रीलंपट, रंगेल, संतापी, स्वच्छंदी अविचारी अशी प्रतिमा लेखकाने रंगवलेली आहे. संभाजी राजाची बदफैली स्त्रीलंपट प्रतिमा निर्माण करण्यासाठी लेखकाने तुळशी, कमळा आणि झेबुनिस्सा या सारख्या काल्पनिक स्त्रीपात्राशी संबंध जुळवला आहे. कादंबरीच्या सुरुवातीलाच तुळशीच्या भेटीसाठी आतूर असलेले संभाजीराजे चंदेरीच्या खाडी पलीकडे वाट पहात असलेल्या तुळशीला भेटण्यासाठी खाडीतूनच घोडयाला जाण्याचा निर्धार करतात. भरलेल्या खाडीतून तुळशीला भेटण्यासाठी जातात असे काल्पनिक, चित्रण लेखकाने रेखाटले आहे. त्याचबरोबर जसे राधेने कृष्णाला व मेनकेने जसे विश्वामित्राला वेडे केले तसे संभाजी राजांना तुळशीने वेडे केल्याचे लेखकाने चित्रण रेखाटले आहे. तुळशीच्या प्रणयामध्ये स्वतःला हरवून गेलेला संभाजी म्हणतो, "तुळशी अनेक काटे असणाऱ्या गुलाबाच्या कळीसारखं तू आहेस तू नजरेत नजर मिसळू लागलीस की, इराणी सुरई आमच्या काळजावर ऐतिहासिक दारुचा शिडकावा करू लागते आहे असे आम्हाला वाटू लागते. वाघाचा जबडा फाडणाऱ्या आमच्या धाडशी पंज्याची हालचाल तुझ्या खांद्यावर घरंगळणाऱ्या काळ्याभोर कचपाशाची उकल करणारी हालचाल

करू लागली की, गाईच्या वासरासारखी असहाय्य स्थिती त्यांची होते राजकारण अधिक रंगेल आणि रगेल असते तर तुझ्या रंगमहालात अवती-भोवतीच्या आरशात पडलेली तुझी हजारो सुंदर प्रतिबिंबे न्याहळत पेल्यावर पेले रिते करीत आम्ही कधीच थांबलो नसतो."[३८]अशा प्रकारचे प्रणयवर्णन कादंबरीकारांनी रेखाटले आहे. असेच काल्पनिक प्रसंग संभाजी कमळा, सुरमा यांच्या संदर्भात रेखाटले आहेत. शेवटी संभाजी राजे तुळशी व कमळाला शेवटपर्यंत जवळ ठेवण्याचा निर्धार करून म्हणतात सूर्य आपल्या ऊषेला दूर सारीत नाही आणि चंद्र आपल्या तारकांना दूर लोटीत नाही. लुकलुकणाऱ्या तारकाचे उगवणे मावळणे त्या चंद्राबरोबरच करते."[३९]अशा प्रकारे संभाजीची रंगेल आणि रगेल प्रतिमा लेखकाने कादंबरीमध्ये रेखाटले आहे.

संभाजीराजांची व्यसनी प्रतिमा रेखाटली आहे. शिवाजी महाराज व अष्टप्रधान मंडळातील व्यक्तींनी राजारामाला तख्तावर बसवण्याचा निर्णय घेतल्याने संभाजी व्यसनाकडे वळतात असा युक्तिवाद लेखकाने केला आहे. तसेच शौक पुरा करण्यासाठी पनवेल, लोणावळा, कामशेत, पुणे, सासवड, संगमेश्वर रत्नागिरी इत्यादी ठिकाणी मैफीलीसाठी ठाणे तयार केल्याचेही लेखकाने रेखाटले आहे. संभाजीराजांनी स्वतःला नशेबाज, व्यसनासक्त बदफैली असल्याचे सोंग औरंगजेबाला फसवण्यासाठी केल्याचे लेखकाने सांगण्याचा प्रयत्न केला आहे.

कादंबरीच्या सुरवातीपासून लहरी, अविचारी, दुर्वर्तनी, रेखाटन्याचा प्रयत्न लेखकाने केला आहे. भरसमुद्रात घोडा घुसवण्यासाठी वारंवार घोड्याला टाच मरणारा संभाजी चित्रित केला आहे. अनेकांशी आकस बुद्धीने वागणारा संभाजी, सोयराबाईंना भिंतीत चिणून मारणे, शिवाजीराजांशी अनेकवेळा भांडणे केली, कितीतरी निरपराध्यांना कडेलोट केले. असे अनेक अरोप लेखकाने कादंबरीमध्ये केले आहेत. संभाजीराजांच्या वर्तनांमुळे समर्थ रामदासही

---

[३८] *नातु मनमोहन : छत्रपती संभाजी, सुरस ग्रंथमाला सोलापूर १९७०, (प्रथमावृत्ती) पृ. क्र. २०, २१*
[३९] *नातु मनमोहन : उपरोक्त पृ. क्र. २३९*

त्यांचा द्वेष करत असल्याचे लेखकाने चित्रित केले आहे. तसेच संभाजीला दुरवरचा विचार करण्याची सवय लहानपणी त्याची आई सोडून गेल्यामुळेच नाहीशी झाली. असा युक्तीवादही लेखकाने मांडला आहे.

मनमोहन नातु यांनी कादंबरीमध्ये संभाजी राजाचे व्यक्तिगत चित्र रेखाटताना अनैतिहासिक कल्पना विलासाचा मोठ्या प्रमाणात वापर केल्याचे या कादंबरीत दिसून येते जसे की, संभाजीला पकडून गणोजी व चंद्रोजी शिर्के सिद्दीच्या बेटावर ठेवतात तेथून कमळा त्यांची सुटका करते. याशिवाय संभाजीला औरंगजेबने दक्षिणेत लवकर येणार नाही. त्याबरोबर त्याची सेना निरुपयोगी आहे. अशी संभाजीची धारणा असते अशा कितीतरी विपर्यस्त घटना कादंबरीमध्ये रेखाटल्या आहेत. संभाजीला मोगलाचा इतिहासाविषयी काहीच माहिती राहत नाही. ती अकबराकडून दिलेले पुस्तक वाचून समजते. दोघेही औरंगजेबांशी लढा देण्याचा निर्धार करतात. एकमेकापासून दूर-दूर राहतात. कारण एकाचा पराभव झाला तर दुसऱ्याला लढता यावे अशा निराधार घडामोडी लेखकाने रेखाटले आहे.

कादंबरीच्या उत्तरार्धामध्ये मनमोहन नातूनी इतिहासाचा विर्पयास केला आहे. संभाजीराजांनी आपला जीव वाचवण्यासाठी शिदबा भडाळे या एका मुक्या व्यक्तीला आपले रुप धारण करावयास लावतात. आणि संगमेश्वरी मोगलांशी झालेल्या चकमकीत पकडल्या गेलेल्या शिदबा भडोळेलाच मोगल संभाजीराजे समजून ठार मारतात असे चित्र रेखाटले आहे. एवढ्यावर तो थांबत नाही तर कादंबरीच्या शेवटी अकबरला, औरंगजेबाच्या सैन्याने पकडून नेल्यानंतर संभजीराजे निराश होतात. त्यांना जगण्यात रस वाटत नाही. यातूनच ते अखेरीस समुद्रात आत्मसमर्पन करतात, अशा प्रकारे काल्पनिक कथानक रचून अतिश्योक्त कल्पिताचा उच्चांकच केला आहे. एकंदरीत ही कादंबरी म्हणजे, इतिहास, काव्य, प्रेमकथा, धर्म याची साद्यंत चर्चाच वाटते त्यामधून संभाजीराजाचे राजकीय व्यक्तिमत्व बाजूलाच राहते.

### ३.३.८ 'आम्ही यातनांचे स्वामी' - वा. ना. देशपांडे (१९७३)

आम्ही यातनांचे स्वामी ही वा. ना. देशपांडे यांची लहान कादंबरी आहे. जी संभाजी राजे संगमेश्वरावर कैद झाल्यानंतर पूर्वी झालेल्या घटनांचा घटनाक्रम सांगत कादंबरी पुढे जाते. ज्यामध्ये लेखकाने संभाजी महाराजाच्या व्यक्तिमत्वाचा मनोविश्लेषणात्मक वेध घेण्याचा प्रयत्न केला आहे. लेखकाने या कादंबरीत Flash back पद्धतीचा चातुर्याने अवलंब केल्याचे दिसून येते.

लेखकाने छत्रपती संभाजी महाराजांवर जरी या कादंबरीमध्ये स्वराजद्रोही, व्यसनी, व्यभिचारी, स्वराज्यलोभी, कवी कलशाच्या आहारी, गेलेला इत्यादी आरोप केले नसले तरी कैदेनंतर संभाजी राजेंचे जे मनोविश्लेषन केले आहे ते पश्चातापाच्या अग्नीमध्ये जळत असलेला, आपल्या नशिबाला कोसनारा शिवाजी राजांच्या आयुष्याशी तुलना करणारा संभाजी संपूर्ण कादंबरीमध्ये दाखवला आहे.

कादंबरीची सुरुवात संभाजीराजे संगमेश्वरावर कैद झाल्यापासून होते. त्यांना साखळ दंडानी बांधून उंटावर बसवून औरंगजेबाच्या छावणीकडे घेऊन जात असताना हातातील बेड्या पाहून अष्टप्रधान मंडळातील मुत्सद्दयांना बेडया ठोकल्याचे स्मरण होते. "मोरोपंतांना आम्ही बेड्या ठोकल्या अण्णाजी दत्तोना बेडयाठोकल्या त्याची मनगटं पिचली असतील ज्या समर्थ मनगटांनी सारे स्वराज्य घडवण्यात आबासाहेबांना जीव ओतून मदत केली. त्यांच्या हातात आम्ही मणाच्या ओझ्यांचे लोखंडाचे कंकन बांधले आमचं चुकले का ?"[४०] ज्यांना आबासाहेबांनी आपल्या हातानी सोन्याची सलकडी घातली, प्रत्येक यशानंतर, प्रत्येक मोहिमेनंतर त्यांचा दरबारात गौरव केला ते हे आण्णाजी आणि मोरोपंत.[४१] संभाजी राजांना साखळ दंडाने बांधून उंटावरुन घेऊन जात असताना मुकर्रबखानच्या हत्तीच्या पायाखाली अण्णाजी दत्तो, बाळाजी आवजी आणि हिरोजी फर्जदच्या किंकाळया ऐकू येतात "ह्या किंकाळ्या कोणाच्या अण्णाजी दत्तोच्या, हिरोजी फर्जदाच्या, बाळाजी आवजीच्या, आम्ही

---

[४०] *देशपांडे वा. नं. : आम्ही यातनांचे स्वामी, साहित्य, प्रसार केंद्र, गिरगाव मुंबई २६ जानेवारी १९७३ (प्रथमावृती) पृ. क्र. ८*

[४१] *देशपांडे वा. नं. : उपरोक्त, पृ. क्र. ११*

तुम्हाला हत्तीच्या पायाखाली मारले म्हणून आमची ही विटंबना चाललीय की, आम्हाला तुमचे शाप भोवताहेत."[४२] यासारख्या आत्मसंवादावरुन लेखकाने आत्मक्लेशात्मक यातनांचा प्रत्यय कादंबरीमध्ये रंगवलेला आहे.

संभाजीराजांच्या यातनांचा प्रवास जन्मल्यापासून सुरू झाल्याचे चित्रण लेखकाने मनोविश्लेषणाच्या साहयाने केले आहे. संभाजी, "आम्ही जन्माला येताना दैव पाठीमागे ठेवून आलो आम्ही जन्माला आलो नि काही महिन्यांनी आम्ही मातृसुखाला आचंबलो."[४३] संभाजीराजांची पोरकेपणाची व्यथा जिजाऊ मासाहेब, छत्रपती शिवाजी राजे आणि पुतळाबाई साहेबाच्या मृत्युनंतर तर अधिकच वाढत जाते त्यासंबंधी संभाजी म्हणतो. पुतळा बाईसाहेब सती गेल्या आणि "मायेचा शेवटाचा पंख तुटला आमची भरारी संपली."[४४] संभाजीराजे कलेचे चाहते असल्याने त्यांनी केलेली कदर म्हणून कलावंताला किंवा कलावतीनीला प्रसंगी गळ्यातील कंठेही बक्षीस म्हणून दिले आहेत; पण यापाठीमागचा त्यांचा हेतू हा पवित्र असल्याचे लेखकाने कादंबरीमध्ये मांडण्याचा प्रयत्न केला आहे या संदर्भात संभाजी म्हणतो, "आम्ही कवचित प्रसंगी गाण्याबजावण्याचे कार्यक्रमाला जायचो, म्हणून ? हो! आम्ही दिला असेल गळ्यातला कंठा तो आमचा मुजरा काही त्या गाणारणीच्या सौंदर्याला नव्हता. तो तो अमचा कंठा त्या मुक्त स्वरविलासाला होता."[४५]

मोगलाच्या कैदेत असलेला संभाजी स्वतःला नशीबाला कोसत असतो. आम्ही कमी भाग्याचे म्हणून तर या कैदेतून सोडवायला कोणताही मराठी सरदार आला नाही. याची खंत स्वतः व्यक्त करतो, "आमची स्वराज्याची चाहूल फक्त काही मैलाच्या अंतरावर आहे. मग त्यांना कोणालाही ही उंटाची यात्रा दिसत नाही ? स्वराज्याच्या सिंहाची ही कैद एकाही आमच्या सरदाराला कळत नाही. आबासाहेब। तुमच्या सारखं भाग्य आम्हाला नाही... तुम्हाला नेताजी पराभुत का होईना, पण दिसला होता आम्हाला दिसतील ती फक्त पराभूत

---

[४२] *देशपांडे वा. नं. : आम्ही यातनांचे स्वामी, साहित्य, प्रसार केंद्र, गिरगाव मुंबई २६ जानेवारी १९७३ (प्रथमावृत्ती) पृ. क्र. ४३*
[४३] *देशपांडे वा. नं. :आम्ही यातनांचे स्वामी, उपरोक्त पृ. क्र. १२*
[४४] *देशपांडे वा. नं. :आम्ही यातनांचे स्वाम, उपरोक्त पृ. क्र. २०*
[४५] *देशपांडे वा. नं. :आम्ही यातनांचे स्वाम, उपरोक्त पृ. क्र. ९*

मनोवृत्तीची माणसं."[४६]संभाजी राजांना ज्या प्रदेशातून मोगल घेऊन जात होते त्या प्रदेशाशी संबंधित आठवणी येत होत्या. श्रृंगारपूर जवळ येताच महाराणी येसूबाईची आठवण येते. याच ठिकाणी 'बुधभूषण' ग्रंथ लिहिल्याचा आठवतो. पुढे सज्जनगड दिसतो येथूनच दिलेरखानच्या गोटात गेल्याचे आठवते. त्या गेलेला पश्चाताप ही होतो. संभाजी म्हणतो, "आम्ही जर मोठी चूक दिलेरखानाकडे जाण्यात केली. समर्थ तेव्हा सज्जनगडावर भेटते तर काही निराळेच घडते."[४७] संभाजीराजांना दिलेरखानाच्या गोटातून परत आणण्यासाठी, शिवाजी महाराज स्वत: तिथे जाऊन त्यांना सोडवून आणल्याचे चित्रण लेखकाने रेखाटन करण्याचा प्रयत्न केला आहे.

कादंबरीमध्ये संभाजीराजाकडून समर्थ स्वामीप्रति भक्ती दाखवण्याचा प्रयत्न ही लेखकाने केल्याचा दिसून येतो. स्वामी समर्थाचे सानिध्य संभाजी राजाना मिळाले नसल्याचे दु:ख ही दाखवले शिवाजी महाराजांना समर्था सारखा गुरु लाभाल्यामुळेच स्वराज्य उभारता आले असाही समर्थ महिमा कादंबरीतून मांडला गेला. संभाजी समर्था संदर्भात म्हणतात "आम्ही कमनशिबी तर नाही ना ठरलो ? समर्थाचे सानिध्य मिळावे तेवढे मिळालेच नाही. फक्त आमच्या भाग्यांत समर्थ नव्हते; पण आम्हाला भाग्य कधी भेटलेच नाही. आमचे दु:ख हेच आमचे भोग ठरले. सदासर्वकाळ आम्ही भोगाचे प्याले रीते केले लोक म्हणतात आम्ही शराबचे प्याले रिते केले आमचे भोग हेच आमचे शराब झाले त्याला आम्ही काय करणार."[४८] समर्थासारखा गुरू, जर संभाजीच्या पाठीखाली असते तर औरंगजेबचे दक्षिणेत येण्याचे सामर्थ झाले नसते. स्वराज्याच्या सीमा हिमालयापर्यंत गेल्या असत्या असे चित्रण लेखकाने कांदबरीत रंगवले आहे.

कादंबरीमध्ये महाराणी येसूबाई साहेबांचे उदात्तीकरण करण्याचा प्रयत्न केला आहे. येसूबाईनी संभाजीला मार्गदर्शन केल्याचे वर्णन कादंबरीत केले आहे. ज्यावेळी येसूबाईची संभाजीना साथ नव्हती तेव्हा त्यांना दु:ख यातना भोगव्या लागल्याचा अन्वर्थ लेखकाने

---

[४६] *देशपांडे वा. नं. :आम्ही यातनांचे स्वामी, साहित्य, प्रसार केंद्र, गिरगाव मुंबई २६ जानेवारी १९७३ (प्रथमावृती) पृ. क्र. १५*

*४७ देशपांडे वा. नं. :आम्ही यातनांचे स्वामी, उपरोक्त, पृ. क्र. १८*

[४८]*देशपांडे वा. नं. :आम्ही यातनांचे स्वामी, उपरोक्त पृ. क्र. २८*

कादंबरीत लावला आहे. या संदर्भात संभाजी म्हणतो, "येसू तू आम्हाला जीवनाचे मार्ग दाखवलेस तू आम्हाला आनंदाचे श्वास दिलेस आयुष्यातील सुगंधी वारे तुझ्या सानिध्यात आम्हाला मिळाले जेव्हा जेव्हा तू जवळ नव्हतीस तेव्हा तेव्हा कष्टाचे डोंगर आम्हाला पालथे घालावे लागले. भोग भोगायाला लागले येसू तू जवळ नव्हतीस आम्ही दिलेरखानाला मिळालो येसू, तू जवळ नव्हतीस आम्ही गोव्याची लढाई अर्धवट सोडली येसू, तू जवळ नव्हतीस आम्ही संगमेश्वरी पकडलो गेलो."[४९]

कादंबरीमध्ये लेखकाने शिवाजी महाराजाचे भाग्य व संभाजी राजांच्या दुर्दैवाची तुलना संभाजीराजांच्या मनोविश्लेषणातून अतिशय बेमालूमपणे चितारली आहे. ती अशी, "आबासाहेब । आम्ही तुमचे पुत्र तुमच्यापासून शौर्य घेतले, लीनता घेतली पण एक मिळाले नाही. आम्हाला तुमच्यासारखे दैव मिळाले नाही. आमचे खरे खरे गुणगौरव करणारे निष्ठावंत मिळाले नाहीत. तुमच्यावेळी ज्यांनी आपला प्राण ओलीस ठेवला ती मंडळी आमची शत्रू झाली."[५०] कादंबरीमध्ये कवी कलश हा संभाजीराजांचा विश्वासू, मित्र, प्रेमळ सखा म्हणून वावरताना दिसतो कादंबरीच्या उत्तरार्धात संभाजीराजांना कैद केल्यानंतर औरंगजेबाच्या अमानवी यातनांना सामोरे जावे लागले संभाजीराजेंच्या डोळ्यांत तापत्या सळ्या फिरविल्या जात असताना, पेटत्या पलित्याने अंगाला चटके बसत असताना, चाबकाचे फटकारे पडत असताना, हातपाय तोडले जात असताना, यासारखी क्रूर शिक्षा सहन करताना किंचितही विचलित होत नसल्याचे चित्र लेखकाने दाखवले आहे. शेवटी वीरमरण पत्करणारा संभाजी चित्रित केला आहे.

### ३.३.९ 'अर्घ्य' - नयनतारा देसाई (१९७३)

नयनतारा देसाई यांनी 'अर्घ्य' ही संभाजी राजांच्या जीवनावर आधारित लिहिलेली ऐतिहासिक कादंबरी आहे. या कादंबरीमध्ये संभाजी राजाची वास्तविक प्रतिमा रेखाटण्याचा लेखिकेने प्रयत्न केला असला तरी त्यामध्ये ती पूर्ण यशस्वी झालेली दिसून येत नाही. कारण

---

[४९] *देशपांडे वा. नं.: आम्ही यातनांचे स्वामी, साहित्य, प्रसार केंद्र, गिरगाव मुंबई २६ जानेवारी १९७३ (प्रथमावृत्ती) पृ. क्र. ३४*

[५०] *देशपांडे वा. नं.: आम्ही यातनांचे स्वामी, उपरोक्त, पृ. क्र. ३८*

कादंबरीतून संभाजी राजाची पराक्रमी, स्वाभिमानी, सहनशील तेजस्वी, दानशूर प्रतिमेसोबतच हट्टी दुराग्रही, भोळे, भावनिक, हळवे, संतापी, व्यसनी, कलासक्त अशी प्रतिमा रेखाटली आहे.

कादंबरीच्या सुरुवातीलाच मातृप्रेमासाठी भुकेलेल्या संभाजी राजांचे चित्रण लेखिकेने रेखाटले आहे. बालपणात सईबाईचे निधन झाल्यामुळे संभाजी पुन्हा पोरका झाला. मातृप्रेमासाठी सतत असुसलेला दाखवला गेला. पुतळाबाई साहेबांनी संभाजीला मातेचे प्रेम देण्याचा सतत प्रयत्न केला; परंतु त्यांच्यापासून त्यांना दूर जावे लागल्याचे कादंबरीमध्ये दर्शविले आहे. जगदीश्वराच्या दर्शनासाठी संभाजीराजे पुतळाबाई सोबत गेल्यानंतर त्या संभाजीस शंभुबाळ म्हणून हाक मारतात तेव्हा संभाजी म्हणतो, "मासाहेब ! पुन्हा म्हणा या शब्दाची आम्हाला फार भुक आहे या प्रेमानं ओथंबलेल्या शब्दासाठी आम्ही जिवाची कुरतंडी करु, वेळ पडली तर प्राणसुद्धा खर्ची घालु पण ते शब्द पुन्हा आमच्या कानात पडू दे थोरल्या मासाहेब गेल्या आणि आम्ही या शब्दांना पारखे झालो."[५१]

लेखिकेने मातृप्रेमासाठी संभाजी राजाची अतृप्तता अनेक प्रसंगातून कादंबरीमध्ये दाखविली आहे. एका शिकारीच्या प्रसंगातही वाघिणीला मारल्यानंतर तिच्या पिलांकडे पाहुन म्हणतात, "बच्चांनो ती तुमची आई होती हे आम्हाला माहित नव्हत रे ! तुम्ही तिच्याबरोबर दिसता तर आम्ही तिला मारलं नसतं, आईविना बच्याला किती यातना भोगाव्या लागतात याची आम्हाला कल्पना आहे अरेरे ! बच्चानों, आमच्या हातून फार मोठी आगळीक झाली."[५२] त्यानंतर ते पिल्लांना आपल्या सोबत घेऊन पन्हाळगडावर जातात. त्यांचा सांभाळ करतात असे कादंबरीमध्ये दाखवले आहे.

संभाजी राजावरील बदफैलीपणाचा आरोप सोडविण्यासाठी लेखिकेने कादंबरीमध्ये गोदावरीच्या कथेचा आधार घेऊन गोदावरीच संभाजी राजावर प्रेम करत असते व संभाजी राजांना भेटण्याचा प्रयत्न करते आणि संभाजीराजाच्या महालात शिरते; परंतु संभाजीवरील

---

[५१] *देसाई नयनतारा : अर्घ्य, कुलकर्णी ग्रंथागार, पुणे १९७८ पृ. क्र. ५*
[५२] *देसाई नयनतारा : अर्घ्य, पृ. क्र. २८१*

गोदावरीच्या प्रेमामुळेच अण्णाजी दत्तो तिला आसुडीने मारतात. शेवटी ती बेइज्जत व माराला कंटाळून आत्महत्या करते असे चित्रण कादंबरीमध्ये रेखाटले असले तरी संभाजी राजांना गोदावरीची आठवण येत असल्याचे दाखवले आहे. दिलेरखानाच्यासोबत हुस्नबानूच्या मैफीलीत त्यांना प्रियकराच्या दर्शनासाठी तडफडत असलेली गोदावरीची मूर्ती दिसल्याचा भास होतो. रायगडावरील कस्तुरीबाईच्या बैठकीतसुद्धा गोदावरीस स्पर्श करण्यासाठी गेल्यानंतर तिने लाडिकपणानं पाहून गेलाचा भास होताना दाखवला गेला आहे. श्रृंगारपुरात राहण्यासाठी गेल्यानंतर संभाजी राजांनी शाक्यपंथाची दीक्षा घेतल्यामुळे व तेथील जनतेला महसुलामध्ये सुट दिल्यामुळे सोयराबाई साहेब आबासाहेबाकडून कानउघडणीची खलीते पाठवल्यामुळे संभाजी राजे बेचैन झाले. ती बेचैनी घालवण्यासाठी दुधया रंगाची भांग पिवू लागले. नृत्याच्या महाकिलीत मशगुल होऊ लागल्याचे चित्रण कांदबरीकारांनी केले आहे. तसेच दिलेरखानाकडे गेल्यानंतर ही संभाजी मदीरा पानामध्ये मशगुल झाल्याचे वर्णन कांदबरी मध्ये लेखिकेने रेखाटले आहे.

संभाजीराजाची उन्मुक्त, स्वच्छही, उग्र प्रकृती हट्टी स्वभाव असल्याचा कांदबरीमधून दाखवण्याचा प्रयत्न केला आहे. संभाजीच्या अशा स्वभावामुळे शिवाजी महाराज चिंतीत असल्याचे दाखवले आहे. संभाजी व येसूबाई श्रृंगारपुरावलाखाना करताना येसूबाईस शिवाजी राजे सांगातात, "पोरी तु सुक्ष ओहस आमच्या उन्मुक्त धावणाऱ्या वेड्या कोणराला आम्ही तुझ्या हवाले करित आहोत."[५३] अबाजीस म्हणतात, "शंभुराजे बुद्धिमान आहेत पण स्वतंत्र बुद्धीचे आहेत त्यांना समजुन घेण्यात मंत्रीमंडळाची आणि राज्याची भलाई आहे त्याची प्रकृती उग्र आहे हे आम्ही जाणतो."[५४]

लेखिकेने कादंबरीमध्ये काल्पनिक प्रसंगातून संभाजी राजांनी शिवाजी राजे हयात असताना स्वतःचा कलशाभिषेक केल्याचे वर्णीलेले आहे. कलाशाभिषेक करून स्वतंत्र राज्य मिळविण्याचा मनसुबा आखतात. कलशाभिषेका प्रसंगीच येसूबाईला 'श्री सखी राजी

[५३] *देसाई नयनतारा : अर्घ्य , कुलकर्णी ग्रंथागार, पुणे १९७८ पृ. क्र. १६*
[५४] *देसाई नयनतारा : अर्घ्य, उपरोक्त पृ. क्र. २६*

जयते' ही उपाधी देतात असे कादंबरीमध्ये दर्शविले आहे. शिवाजी राजाबद्दल किंतु न ठेवता मंत्रिमंडळाला आणि मासाहेबांना देण्यासाठी त्याची आज्ञा स्वीकारण्याच्या प्रसंगातून मुक्त होण्यासाठी कलशाभिषेक करून घेतात ? राज्याभिषेक प्रसंगी पुत्र नसल्यामुळे दु:खी होतात. गादीला वारस देण्यासाठी बेचैन असल्याचे कादंबरीमध्ये चित्रण रेखाटले आहे. त्यासाठी संभाजी राजे पुत्रकासमोर यज्ञ करतात. अशा प्रकारचे अनैतिहासिक लेखन कादंबरीमध्ये दर्शविले आहे.

### ३.३.१० 'शापित राजहंस' - अनंत तिबिले (१९७८)

संभाजी राजांच्या जीवनावर लिहिलेली एक महत्त्वपूर्ण ऐतिहासिक कादंबरी आहे. या कादंबरीमध्ये अनंत तिबिले यांनी नवीन संशोधनावर आधारित संभाजी मांडण्याचा प्रयत्न केला; पण त्यामध्ये संपूर्णपणे खरा संभाजी त्यांनी मांडला नाही. कादंबरीच्या शीर्षकावरुन आपणास त्याचा संभाजीकडे पाहण्याचा पूर्वगृह दुषित दृष्टिकोन स्पष्ट होतो. अनंत तिबिले यांनी आपल्या कादंबरीमध्यें साहसी, बुद्धिवान मुत्सद्दी, निस्वार्थी, सुज्ञ विनयशील संभाजी बरोबरच उतावळा, भावनावश, उग्रप्रकृति, भोळा, तापट रेखाटला आहे.

कादंबरीच्या सुरवातीपासूनच मातृसुखासाठी पारखे झालेला, मातृसुखासाठी आतूर असा संभाजी लेखकाने रेखाटला आहे. जन्मापासूनच मातृसुखाला पारखे झालेले कमनिशिबी समजत असत. सईबाईना बाळंतरोग असल्यामुळे जिजाऊ साहेबांनी संभाजीची दूध आई म्हणून धारकाईची नेमणूक करते. संभाजीना तेव्हा समजायला लागते तेव्हा एकच धाराई त्याच्या भेटीसाठी गडावर येते. त्यावेळी त्यांना ओळखत नाहीत; परंतु जेव्हा जिजाऊकडून कळते धाराका होती तिच्या भेटीसाठी अतूर संभाजीचे चित्रण केले आहे. संभाजी म्हणतो, "गेली ? धाराई गेली ? आम्हाला आपल्या मातृस्पर्शाचा लाभ न देता गेली ? आम्हाला आपल्या छातीशी न कवटाळता गेली ? आणी थोरल्या मॉ साहेब, आपण तिला जाऊ दिलंत ? नाही ... नाही.. आम्ही तिला जाऊ देणार नाही खरचं जाऊ देणार नाही."[५५] मातृप्रेमासाठी असुसलेला संभाजी आपले लहान बंधु राजारामाचा हेवा करतात जिजाऊस

---

[५५] *तिबिले अनंत: शापित राजहंस, रिया पब्लिकेशन्स, कोल्हापूर (द्वितीयावृती) २०१२ पृ. क्र. १०३*

म्हणतात, "रामराजे नाहीतरी आमच्यापेक्षा खरचं भाग्यवान माँसाहेब म्हणूनच तर मातेच्या कुशीतली ऊनल चाखण्याचं तिन्ही लोकीचं भगीत आहेत ते."[५६] अशा प्रकारे मातृसुखासाठी पारखां राहिलेला संभाजी लेखकांनी चित्रित केला आहे.

छत्रपती गेल्यानंतरचे महाराजासोबत आग्रा भेटीस गेल्यानंतरचे चित्रण अतिशय काल्पनिक रंगवण्याचे कादंबरीमध्ये दिसून येते. शिवाजी राजांना आगऱ्यास कैद केल्यानंतर संभाजी रामसिंहाबरोबर हरनारात मुक्त संचार करत असतो. संभाजी राजे दरबारात असताना, औरंगजेब त्यांच्यासमोर आपल्या मुलासोबत कुस्ती खेळण्याचा प्रस्ताव ठेवतो; परंतु संभाजीराजे तो प्रस्ताव नाकारल्याचे चित्रण लेखकाने केले आहे. तसेच ऐके दिवशी संभाजीराजे आग्रा दरबारातून परत येताना एका मधुर आवाजाने मंत्रमुग्ध होतात. त्या मंत्रमुग्ध करणाऱ्या कलावंतीची स्तुती करून तिला आपल्या गळ्यातील शिवाजीरांजानी दिलेली मोत्याची कंठा बहाल करतात.

संपूर्ण कांदबरीमध्ये जिजाऊ मासाहेब, शिवाजी महाराज, सोयराबाई, येसूबाई व मंत्रीमंळतील प्रमुख सदस्य यांच्या तोंडातून संभाजी राजांच्या स्वभाव उतावळा, भावना, वश, टुड, उग्रप्रकृती, स्वैर, स्वच्छंदी असल्याचा कांदबरीमध्ये दर्शविले आहे. शिवाजीराजे म्हणतात, "आमचे थोरले चिरंजीव काहीसे हुड आहेत उग्र प्रकृतीचेही आहेत."[५७] सोयराबाईसाहेब म्हणतात, "स्वारीनी शंभूराजांच्या सारख्या स्वैरस्वतंत्र आणि उग्रप्रकृतीच्या व्यक्तीकडे राज्यकारभार सोपविणे म्हणजे दौलतीला आपल्या हातांनी कडयावरुन लोटून देण्यासारखं आहे."[५८]

लेखकाने कलासक्त व सौंदर्यासक्त संभाजीचे चित्रण करत असताना, व्यसनी मदिरापान करणारा संभाजी रंगवलेला आहे. लहान वयातच रामसिंगाच्यासोबत मदिरा आणि नृत्यकलाचा अस्वाद चाखल्याचे दाखविले आहे. तसेच तो मोगलाचा मनसबदार त्यांच

[५६] *तिबिले अनंतः शापित राजहंस, रिया पब्लिकेशन्स, कोल्हापूर (द्वितीयावृती) २०१२, पृ. क्र. १८०*
[५७] *तिबिले अनंतः शापित राजहंस, उपरोक्त पृ. क्र. १८६*
[५८] *तिबिले अनंतः शापित राजहंस, उपरोक्त पृ. क्र. १८७*

वैभव, ऐश्वर्य, शौक यांचा त्यांच्या मनावर प्रभाव निर्माण होऊन सौंदर्यसक्त बनण्याचं चित्रण रेखाटले आहे. संभाजी राजे स्वतःची व्यथा, चिंता क्लेष दूर करण्यासाठी कलावंतीनीच्या मैफीलीला जात होते. तेथे मदिरापान करत असल्याचे चित्रण लेखकाने कादंबरीमध्ये केले आहे.

शिवाजी महाराज यांनी कर्नाटक मोहीम वाढत्या गृहकलहामुळे एक राज्य लहान मुलास दुसरे राज्य थोरल्या मुलास संभाजीला संपादन करण्यासाठी हाती घेतल्याचे लेखकाने दाखविले आहे. कर्नाटक मोहीमेवर जाताना तो संभाजीला शृंगारपुरास ठेवून जातो. तेथे संभाजी कवी कलशाच्या सानिध्यात शाक्तपंथ स्वीकारतो. तसेच शिवाजी राजे हयात असताना स्वतःचा कलशाभिषेक करून घेतो. श्रृंगारपुरातील प्रजेला अभय देतो, सुग्याचा कारभार पाहताना रायगडचा सल्ला विचारात घेत नाही. या सर्व पार्श्वभूमीवर शिवाजी राजे संभाजीस सज्जनगडावर जाण्याचे पत्र पाठवतात. त्यानुसार संभाजी सज्जनगडावर जातात; परंतु तिथे समर्थ नसल्यामुळे निराश होतात व दिलेरखानाकडे जाण्याचा निर्णय घेतात असे चित्रित केले आहे.

नविन राज्य मिळवण्याच्या हेतूने संभाजीराजे दिलेरखानाकडे गेल्याचे लेखक सांगतो. शहाआलमच्या सल्ल्यानुसार औरंगजेबास संशय येऊ नये म्हणून एक-दोन लढायात मोगलांना मदत करतानाचा संभाजी लेखकाने चित्रित केला आहे. दिलेरखनाच्या गोटात असताना महिष्मतीचे कच्छवाह रजपुत तापीकांत याची मुलगी चंपा ऊर्फ दुर्गेसोबत दुसरा विवाह केल्याचे चित्रण लेखकाने निर्माण केले. अथणीच्या अत्याच्यारावेळी दिलेरखाना-समवेत बेबनाव झाल्याचे संभाजी स्वराज्यात परत येतात. दोन्ही पिता-पुत्राची भेट पन्हाळगडावर आल्याचे चित्रण लेखकाने रंगविले आहे. त्यासाठी त्यांनी चिटणीस बखरीतील उतारे जसेच्या तसे घेतल्याचे दिसून येतात. त्यामध्ये शिवाजी संभाजीस म्हणतात, "स्वराज्यात तू परत आलास असे झाले स्वराज्याचे दोन भाग करून तुला कर्नाटकचे राज्य देतो व राजाराम लहान असल्यामुळे त्यास हे राज्य देतो." पुढे त्यांना परस्त्रीगमन न करण्याचाही सल्ला देतात. "तुम्ही सव्हश, तुम्हासाठी राज्य किती संपादिले ? याचे अधिकार

तुम्ही शतावधी स्त्रियांशी लग्न केले असता अथवा शक्तीनुसार शतावधी उपस्त्रियां नाटकशाळा ठेवून वतने केले असता युक्त आहे; परंतु अविचार, अगम्यागमन करणे वा परस्त्रीवर बलात्कार, हे दोन्ही यश यशक्षयास कारण पूर्वी मोठे मोठे राजे व रावणहीक राज्यकर्ते या देषीकरून राज्यक्षयास व कुलक्षयास गेले. राज्यक्षयाचे हे कारण योग्य होय. तेव्हा असा अगम्यागमन राज्यक्षय व कुलक्षयास निमित्त होणारा दुश्मन समजुन द्या रिषव्यास उचित समजा."[५९]

## ३.४ नाटकातून निर्माण झालेली छत्रपती 'संभाजी राजाची प्रतिमा'

नाटक हा एक ललित वाङ्मयाचा प्रकार आहे. साऱ्या ललित वाङ्मयाचा प्रमुख उद्देश म्हणजे जीवनातील काही सत्य हे अनेक कल्पित प्रसंगांनी कलात्मक रीतीने समाजापुढे मांडणे व मनोरंजन करणे नाटक हेही त्याला अपवाद नाही. सर्वसाधारणपणे आपणास नाटक म्हणजे असे सांगता येईल "रंगभूमीवर दृश्यात्मक रुपाने प्रायोगिक होईल अशी वाङ्मयीन रचना म्हणजे नाटक" नाटककार आपली कलाकृती निर्माण करताना सत्याचा 'वास्तव'तेचा किंवा प्रत्यक्षतेचा प्रत्येय घेत असतो. काही नाटकार यासाठी ऐतिहासिक घटनांचा आधार घेऊन नाटके रचतात. मराठी नाटकामध्ये ऐतिहासिक नाटके मोठ्या प्रमाणात लिहिलेली आपणास दिसून येतील.

संभाजीराजाच्या जीवनावर मराठी साहित्यामध्ये साठपेक्षा अधिक नाटके लिहिली गेली आहेत. त्या सर्व नाटकांपैकी ज्या नाटकामध्ये संभाजी राजाची अनैतिहासिक व काल्पनिक प्रतिमा रंगवणाऱ्या नाटकांचा परामर्ष आपल्याला येथे घेणे आवश्यक आहे. इ.स. १८८५ ते १९७० या कालखंडामध्ये लिहिली गेलेली नाटके यामध्ये येतात. वासुदेवशास्त्री खरे या इतिहास अभ्यासकाच्या नाटकापासून ते मराठीतील प्रसिद्ध नाटककार वसंत कानेटकर या नाटकारांची नाटके यात येतात. प्रामुख्याने ही नाटके सुरुवातीच्या काळातील संभाजी राजांचे बखरीतील व प्रारंभीच्या इतिहास लेखनावर अधारलेली आहेत.

---

[५९] *तिनिले अनंत, शापित राजहंस, रिया पब्लिकेशन्स, कोल्हापूर, ( द्वितीय आवृती ) २०१२ पृ. क्र. ३१८*

### ३.४.१ वासुदेवशास्त्री खरे यांचे 'गुणोत्कर्ष' नाटक :

संभाजीराजांच्या जीवनावर लिहिलेले पहिले ऐतिहासिक नाटक वासुदेवशास्त्री खरे या इतिहास अभ्यासकाचे इ.स. १८८५ मध्ये लिहिलेले 'गुणोत्कर्ष' होय. या नाटकाचा प्रमुख नायक हा वडगावचा जिवाजीपंत देशपांडे एक देशभक्त आहे. त्याच्यावर अनेक संकटे येतात व त्याचे तो परिहार करतो. यासंबधीचे नाटकाचे कथानक आहे. या नाटकामध्ये पन्हाळगडचा किल्लेदार गणपतराव याच्या नादाने संभाजीराजे अत्यंत नादान व दुष्ट बनल्याचे दर्शविले आहे.

संभाजी राजाच्या दुष्ट वागण्याने व मोगलास जाऊन मिळण्याच्या मनसुब्यामुळे दुःखी झालेले शिवाजी महाराजांचे चित्रण या नाटकामध्ये केले आहे. शिवाजी, संभाजीबद्दल प्रल्हाद निराजीस सांगतात, "ज्या महाराष्ट्र देशाच्या राज्यरुपी वृक्षाचे बीजारोपण करून त्यास आज चाळीस वर्ष सतत मेहनत घेऊन मी पाणी घातले तो राज्यवृक्ष अकस्मात तुटून पडण्याचा समय आला आहे आणि त्यास तोडणारा तरी कोण तर प्रत्यक्ष माझा मुलगा."[६०] पुढे संभाजीला उद्देशून असे म्हणतात, "शंभु शंभु अस कसारे तू कूलागार कार्टा निपजलास ! माझ्याच उदरात जन्मालास त्या तुला दूसरी कोठे जागा नव्हती तू जन्मलास तेव्हाच का मेला नाहीस? म्हणजे हे खेळ पहाने तरी माझ्या नशिबी आले नसते."[६१] संभाजी राजाच्या भविष्याबद्दल शिवाजी महाराज निरजीस असे ही सांगतात, "तो पुढेमागे केव्हा तरी मराठी राज्य बडवून तुमच्या माना मुसलमानाच्या हाती देणार हे खचीत."[६२] गुणोत्कर्ष नाटकामध्ये पन्हाळ्याचा किल्लेदार दुष्ट गणपतरावाने जिवाजीपंताची सून राधाबाई व मुलगा कृष्णाराव याला मोगलाचा जासुस म्हणून कैद केले आहे. त्याच राधाबाईवर संभाजी आसक्त असल्याचे या नाटकात दाखविले आहे. आसक्त व कामांध संभाजीचे मनोविश्लेषण नाटकात अशा प्रकारे केले आहे. राधाबाईविषयी स्वगत असा विचार "ही देशपांड्याची बायको राधा येथे येऊन अडीच महिने झाले. इतक्या काळांत तिला वश करण्याकरिता मी

---

[६०] *खरे वासुदवे शास्त्री : गुणोत्कर्ष , मुंबई १८८५, पृ.क्र २४*
[६१] *खरे वासुदवे शास्त्री : गुणोत्कर्ष , उपरोक्त पृ.क्र २४*
[६२] *खरे वासुदवे शास्त्री : गुणोत्कर्ष ,उपरोक्त पृ.क्र २५*

नानाप्रकारचे यत्न करून थकला; पण तिचा एक निश्चय आहे तो आहेच, तिची भेट घेऊ नका म्हणून गणपतराव मला सांगतो, पण माझ्याने आता दम निघत नाही माझ्या हृदयांत मदनाग्नि जो एकदा प्रज्वलित झाला आहे. तो दिवसेंदिवस वृद्धिंगत होऊन माझ्या अंगाची होळी करीत आहे... आज तिच्या पोवळ्यासारख्या लाल व रसरशीत ओठाचे चुंबन घेतल्याशिवाय जर मी परत येईन तर मला धिक्कार असो."[६३] प्रत्यक्ष राधाबाईस आसक्त संभाजी म्हणतो, "प्रियकरणी आता उपहास करून काय उपयोग ? तुला पहिल्या दिवसापासून अंगात भूत संचारल्याप्रमाणे तुजविषयी माझ्या मनात जो अवर्णनीय अभिलाष उत्पन्न झाला आहे. तो कधीही शांत व्हायाचा नाही. या करिता लावण्यलतिके. मी तुजवर अत्यंत लुब्ध होत्साता तुझा दासानुदास होऊन. तुझ्या चरणी लागलो आहे."[६४] याच नाटकामध्ये संभाजी राधाबाईशी बदकर्म करण्याचा प्रसंगाचे वर्णन केले आहे. त्याचबरोबर राधाबाईला मिळवण्यासाठी तिचा पती कृष्णरावांशी युद्ध करतो असे चित्रण या नाटकामध्ये दाखविलेले आहे.

### ३.४.२ आत्माराम मोरेश्वर पाठारे यांचे 'संगीत श्री छत्रपती संभाजी' नाटक :

संभाजी राजांच्या जीवनावरचे महत्त्वाचे ऐतिहासिक नाटक म्हणजे १८९१ साली प्रकाशित केलेले आत्माराम मोरेश्वर पाठारे यांचे 'सं. श्री छत्रपती संभाजी' हे नाटक होय. या नाटकात संभाजी राजाच्या दुर्वर्तनाचे चित्रण केले आहे. या नाटाकांचे एकूण सात अंक आहेत. पहिल्या दोन अकांमध्ये शिवाजीचा एकनिष्ठ व पराक्रमी सेवक हिरोजी फर्जद याला संभाजीने कुस्तीमध्ये कपटाने ठार मारल्यामुळे त्याचा मुलगा येसाजी व मुलगी तुळशी संभाजीवर सूड उगवण्यासाठी आसूसलेली दाखवले आहेत. दोघेही बहीणभाऊ वरकरणी संभाजीशी गोड बोलून एकनिष्ठ असल्याचे दर्शविले आहे. तुळशी संभाजीस खोटया प्रेमाच्या जाळ्यात आडकवते. तुळशी विषयी आसक्त वासनांच्या आहारी गेलेल्या संभाजी राजाचे मनोविश्लेषण या नाटकाच्या पदातून दाखविले आहे. संभाजी हे पद म्हणतो.

---

[६३] *खरे वासुदवे शास्त्री, गुणोत्कर्ष , मुंबई १८८५, पृ.क्र ६२, ६३*

[६४] *खरे वासुदवे शास्त्री : गुणोत्कर्ष , उपरोक्त पृ.क्र ६६*

"मनि भरलि तुळशि सुंदरा ।। सुचेना जरा ।।

प्रति मजवरी ।। किती करी मदन मंजरी ।।धृ।।

तन्नयनबाण मज भान ।। देहि या त्राण ।।

तेवि नुरवीती ।। व्याकुल प्राण हे करिती ।।१।।

अति शक्ति असुनिया देहिं ।। निर्बलचि पाहि ।।

बनुन हा जाई ।। मुळि सौख्य कसे ते नाही ।।२।।"[६५]

नाटकाच्या तिसऱ्या अंकामध्ये संभाजीच्या दुवर्तनामुळे राज्याचे कसे होणार याची हाय खाऊन शिवाजी महाराज आजारी पडतात. चिंतातूर शिवाजी हे पद म्हणतात.

"विपत्तितुनि या पार कशाचा पडतो मी आता ।।

समजा तुमचे राज्य लागले यवनांच्या हाता ।।धृ।।

वडिल माझा पुत्र परी तो लीन सदा व्यसनी ।।

ज्यांच्याशी मम हाडवैर त्या प्रीति तया यवनी ।।

माझ्या पश्चात् या राज्याची होईल धुळधाणी ।।

काळजिने या गेली माता तीच गतिताता ।।धृ।।"[६६]

आजारी पडलेले छत्रपती शिवाजी महाराज व संभाजी राजे या दोघा पिता-पुत्रांची भेट सुद्धा नाटकामध्ये अतिशय निष्ठूर दाखवलेली आहे. भेटीसाठी आलेल्या संभाजीला उद्देशून शिवाजी म्हणतो, "नको नको त्या भ्रष्ट झालेल्या नरपशुचा माझ्या वस्त्रांना देखील स्पर्श नको. काय वाटेल ते दुरुनच मी त्याच्याशी बोलतो."[६७]भेटी दरम्यान शिवाजी महाराज संभाजीला सुधारण्याचा सल्ला देतात आणि म्हणतात "तुझ्यासारख्या मदांध पोराच्या हाती

---

[६५] *पाठारे आत्माराम मोरेश्वरः संगीत श्री छत्रपती संभाजी, प्रसिध्द करणार बाळकृष्ण लक्ष्मण पाठक, मुंबई १८९१ पृ.क्र ४९*

[६६] *पाठारे आत्माराम मोरेश्वरः संगीत श्री छत्रपती संभाजी, उपरोक्त पृ.क्र ७०*

[६७] *पाठारे आत्माराम मोरेश्वरः संगीत श्री छत्रपती संभाजी, उपरोक्त पृ.क्र ७२*

राज्य देऊन दोन दिवसांत त्याची विल्हेवाट लावून घेण्यापेक्षा, ते एखाद्या शहाण्या राजकार्यदक्ष, नीतिमान, पुरुषाच्या हवाली मोठ्या आनंदान करील असे सांगतात."[६८]

याच नाटकामध्ये औरंगजेबाची मुलगी रोशणार व संभाजी राजे यांच्या प्रेमप्रसंगाचे वर्णन नाटकामध्ये दाखविले आहे. औरंगजेबाची मुलगी रोशणार हिला पन्हाळाच्या रस्त्याने जात असताना पकडून संभाजीची मानसे पन्हाळगडावर आणतात. त्या कैदेतील रोशणारवर संभाजी मोहीत होतो. रोशणारला संभाजी रखेल म्हणून ठेवू इच्छतो; परंतु ती त्यास साफ नकार देते. विवाह करण्याचा सल्ला देते. दोघेही एकमेकांस अलिंगन देतात. संभाजीला रोशणार स्पर्श झाल्यास हे पद म्हणतो.

"झालि आहा रोमांचीत काया ही ।।
मज स्पर्शतांची वपु हे सुकुमार ।।
सुदीन खरोखर आज उदेला ।।
सौख्य होत मज तें अनिवार ।।धृ।।
कवण आस मम याविण आंता ।।
आखिल जगति राहियली ।।
स्वकरयुगुली मी या समयी ही ।।
आलिगिलि प्रिय रोशणार ।।धृ।।"[६९]

नाटकाच्या उत्तरार्धात कवी कलष व येसाजी संभाजीराजांना विश्रांतीसाठी संगमेश्वरी येथे घेऊन जातात. रात्री झोपेमध्ये बेसावध असताना तुळशी संभाजीवर कटारीने वार करते. संभाजी बेहोश होतो. तेवढ्यात मोगलाचे सैनिक त्याला पकडून कैद करतात. शेवटी मोगलाच्या कैदेत पश्चाताप करतो हुतात्म पत्कारतो. अशा प्रकारे गाफील, कवी कलशाच्या आहारी गेलेला संभाजी या नाटकामध्ये दाखवला आहे.

---

[६८] *पाठारे आत्माराम मोरेश्वर, संगीत श्री छत्रपती संभाजी, प्रसिध्द करणार बाळकृष्ण लक्ष्मण पाठक, मुंबई १८९१ पृ.क्र ७४*

[६९] *पाठारे आत्माराम मोरेश्वरः संगीत श्री छत्रपती संभाजी, उपरोक्त पृ.क्र ९६*

### ३.४.३ सोनाबाई केरकर यांचे 'संगीत छत्रपती संभाजी नाटक' (१८९६) :

मराठीतील पहिली स्त्री नाटककार म्हणून सोनाबाई केरकर यांना ओळखले जाते. तिने वयाच्या अवघ्या १४-१५ व्या वर्षी 'संगीत छत्रपती संभाजी नाटक' लिहिले आणि तिच्या मृत्युनंतर एका वर्षाने म्हणजे १८९४ साली प्रसिद्ध झाले. साहित्यिकदृष्ट्या तत्कालीन ऐतिहासिक नाटकामध्ये केरकर यांची ही कृती उजवी ठरते. या नाटकाची उभारणी बखर वाङ्मयावर आधारलेली आहे. संपूर्ण नाटकाच्या माध्यामातून संभाजीराजाच्या व्यक्तिमत्वाचा वेध घेण्याचा प्रयत्न लेखिकेने केलेला आहे. ते करत असताना संभाजी राजांची तुलना शिवाजी महाराजांशी करण्याचा प्रयत्न लेखिकेने केला आहे. या नाटकाच्या पहिल्या अंकातील सुत्रधाराच्या उद्‌गारावरुन कथाशयाची कल्पना येते. सुत्रधार म्हणतो, "भूपतीचे दूष्कर्म भूपतीलाही भोगावे लागते. आणि त्याच्या समागमे प्रजाजनासही भोगावे लागते ! या विषयावर मराठ्यांच्या इतिहासातील कथाभाग घेऊन लोकरंजनास योग्य असे संगीत संभाजी नाटक तयार केले आहे. त्याचा प्रयोग करून दाखविणार आहे !"[७०]

संभाजीराजाची नादान, सुडाने पेटलेला, उताविळ, बेजबदार, व्यसनी, कामांध, स्त्रीलंपट अशी प्रतिमा लेखिकेने या नाटकात निर्माण केली आहे. नाटकाच्या सुरुवातीलाच शिकारीसाठी आतूर असलेला संभाजी आपल्या मित्रासोबत शिकारीला जाण्यासाठी मित्रासाठी घोड्याची व्यवस्था करण्यासाठी स्वतःच्या जामदारखाण्यातील द्रव्य चोरतो. याची माहिती पोतनीस हिरोजी फर्जद मार्फत शिवाजी महाराजांस समजते. तेव्हा दुःख होते चिंतातुर शिवाजी परमेश्वराजवळ गाऱ्हाणं घालतात.

"हाहा देवा जगन्नाथा ।। करुणासिंघो लक्ष्मीकांता ।।
अविचारि सुत झाला आता ।। काय करुं स्वामी ।।१।।
तुजविण कवणा जाऊ शरण ।। करी देवा माझे रक्षण ।।
नाहीतरि मज येवो मरण ।। वाटचि मी पाहतो ।।२।।

[७०] *केरकर सोनाबाई चिमाजी : संगीत छत्रपती संभाजी नाटक, जगदिश्वर छापखाना, मुंबई १८९६ पृ.क्र ११*

दास तुझा हा चिंतन करितो ।। तव पदकमलांहृदयी धरितो ।।

सग्दुरुचरणी भाषाचे वरितो ।। सप्रेमे देवा ।।३।।"[७१]

यानंतर संभाजी राजास बोलावून दहा चाबुकाचे फटके व खोलीत कोंडून ठेवण्याची शिक्षा देतात. या घटनेचा संभाजी राजांना पश्चात्ताप होण्याऐवजी ज्या पोतनीसाकडून जामदारखाण्याच्या प्रकरणाची माहिती झाली. त्या हिरोजी फर्जदाचा सूड घेण्याची प्रतिज्ञा करतो. हिरोजी फर्जद हा मल्लयुद्धामध्ये पटाईत असतो. त्यास मल्लयुद्धासाठी (कुस्तीसाठी) पाचारण करून मल्लयुद्धामध्ये त्यास ठार मारून आपला सुडही पूर्ण करतो.

लेखिकेने नाटकामध्ये विषयासक्त, कामांध संभाजीची प्रतिमा रंगवण्यासाठी हिरोजी फर्जदाची मुलगी तुळशी, गोदावरी सती, औरंगजेबाची मुलगी रोशणार या काल्पनिक पात्रा सोबत संभाजीचे प्रणय वर्णन नाटकामध्ये चित्रित केलेले आहे. तुळशी व तिचा भाऊ येसाजी फर्जद वडिलांच्या सूड घेण्यासाठी संभाजीची जवळीक साधून काटा काढण्याच्या प्रयत्नात असतात. संभाजी राजे तारुण्याच्या ऐनउमेदित असल्यामुळे स्त्री सहवास गरजेचा वाटत असतो. तुळशी ऐन तारुण्याच्या भरात आलेली असते तिच्या विषयी आसक्त संभाजी होतात. स्वगतात तिच्या रूपाचे वर्णन करतात.

"नवयौवन सुरसभरे तुळशि शोभली ।।

श्यामवर्ण पुतळि भली आजि भासली ।।

सरळ नासिकांत कसा मुक्त पुजतो ।।

गाठुनि नथ केलि बरी सुखद ढाळतो ।।

मंदास्मित वदन कमलचंद्र मानितो ।।

गाल प्रफुल्लित असुनि बहूत विनट ।।

---

[७१] *केरकर सोनाबाई चिमाजीः संगीत छत्रपती संभाजी नाटक, जगदिश्वर छापखाना, मुंबई १८९६ पृ.क्र १७*

श्यामवर्ण पुतळि भली आजी भासली ।।१।।

सरळहस्त कर्दळिपरी बहूत साजिरे ।।

उरस्थळी पीन पयोधरहि गोजिरे ।।

सालंकृत रम्य वपु बघुनी मन हरे ।।

शेषाकृती वेणि शिरी स्वकरि गोविली ।।

श्यामवर्ण पुतळि भली आजी भासली ।।२।।

हाव भाव दाखवि मज चित्त वेधले ।।

आलिंगन करिल कधी हेचि जाहले ।।

प्राणसखी पुरविल कधी हेतु चांगले ।।

ध्यान धारणेसि मूर्ती हीच रोखिली ।।

श्यामवर्ण पुतळि भली आजि भासली ।।

श्यामवर्ण सुरसभरे तुळशि शोभली ।।३।।"[७२]

कामांधतेने व्यथित झालेला संभाजी तुळशीशिवाय बैचेन असतो. आपल्याशीच म्हणतो, "वश होईल कशि तुळशी चपळीशी अतुरचि बहू जाहलो ।। अधरामृत मी पान कराया या जगती सजलो ।। जन्मांतरिचे असेल संग्रही सुकृत ते काही ।। त्या योगाने कार्य होऊनी लाभे लवलाही ।।१।। रामा श्यामा कमल लोचना पीनस्तनि पाहे।। मंदस्मित करि गल्लप्रफुल्लित चंचळ बहु राहे ।।२।। सालंकृत वपू गजगति चाले आमरणे हालती ।। वक्रभ्रुकुटिया भाल विशाली कुंकुम टिकली ती ।।३।। तनमन धन हे अर्पण करितो मागे जरि प्राण ।। तरी घेवया सिद्ध शंभु हा न करी अनमान ।। "[७३] अशाप्रकारे तुळशीवर आसक्त झालेल्या संभाजीचे चित्रण नाटकामध्ये केले आहे.

---

[७२] *केरकर सोनाबाई चिमाजी, संगीत छत्रपती संभाजी नाटक, जगदिश्वर छापखाना, मुंबई १८९६ पृ.क्र ३३*

[७३] *केरकर सोनाबाई चिमाजी, संगीत छत्रपती संभाजी नाटक, उपरोक्त, पृ.क्र ३५*

स्वराज्याच्या कोकण किनारपट्टीवर जंजिऱ्याचा सिद्दी व पोर्तुगीज यांचा उपद्रव वाढल्यामुळे त्यांचा बंदोबस्त करण्यासाठी शिवाजी महाराज संभाजीराजांना पाठवतात. या युद्ध मोहीमेमध्ये संभाजीराजे मोठा पराक्रम गाजवतात. या युद्ध मोहीमेच्या दरम्यान त्याना गोदावरी नावाची एक ब्राह्मण लावण्यकन्या सापडते. तिला बरोबर घेऊन पुण्यात कनोज ब्राह्मणाच्या घरी डांबून ठेवतात. तिला वश करण्यासाठी हर एक प्रयत्न करतात. आपल्याशी म्हणतो,

"काय भुरळ पडलि मला जहाले कसे ।।

विधुमुखिंच्या दर्शनिं मज लागलें पिसें ।।धृ।।

सुरुप तरुण मनमोहनि कामिनी खरी ।।

गजगामिनि रमणि रम्य दृ्ष्टि नावरी ।।

निरखुनिही वृत्ती कशी झालि बावरी ।।

गाल प्रफूल्लित पहा उमटले ठसे ।।

उन्नत किती कुचयुग हे चक्रवाकसे ।।

कांचनमय कुंभघट्ट शोभती जसे ।।

केसरिकाटे सरळ तनु हास्य करितसे ।।

लवि चिरी कुंकुमयुत कमि कुठे नसे ।।

काय भुरळ पडलि मला जाहलें कसे ।।२।।"[७४]

मी इतका वेळ या सुंदर मोहिनीची उपासना करितो; परंतु ही चारुगात्री अद्याप प्रसन्न होत नाही, याला करावे तरी काय ? आता प्रत्यक्ष भाषण करावे कारण आपण इतके परिश्रम करून पाखरु धरुन आणुन पिंजऱ्यात ठेविले, मग लटपटपंची शिकवुन आपली मनकामना पूर्ण करून घेण्यास काय हरकत आहे. (असे म्हणुन उघडपणे बोलतो) हे सुंदरी आता आपल्या सुंदर देहास कांबरे परिश्रम देतेस पुढे म्हणतो, "हे माझे जिवप्रियकरणी सुख दे मज

[७४] *केरकर सोनाबाई चिमाजी, संगीत छत्रपती संभाजी नाटक, जगदिश्वर छापखाना, मुंबई १८९६ पृ.क्र ६६*

आलिंगोनी ।। अंकावर मग बैसोनी शमवी तव तनु साजणी ।। प्रेमासी पात्र होवोनी मज सवें नाद दिन रजनी ।। नच श्रमवुं तनु तू रडुनी दे वेडिबुद्धी सोडवी रंगेन सदा तव संगे नच कधी वचन हें भंगे ।। आलिंगन दे आणि उगे ।। विनवितो ग मत्तनु रमणी ।।"[७५]

अशाप्रकारे गोदावरीस वश करण्यासाठी संभाजी विनवनी करतानाचे चित्रण नाटाकमध्ये चित्रित केले आहे. पुढे शिवाजी महाराज गोदावरीची संभाजीच्या कैदेतून मुक्तता करतात.

नाटकाच्या लेखिकेने रोशणार या स्त्री पात्राच्या माध्यमातूनसुद्धा स्त्रीलंपट संभाजीची प्रतिमा रंगवली आहे. रोशणार ही औरंगजेबाची मुलगी पन्हाळ्याच्या परिसरातून जात असताना तिला धरुन पन्हाळगडावर ठेऊन तिच्या रुपावर मोहित होऊन संभाजी म्हणतो, "खुप सुरत गुलजार रोशणार तिजविण वैभव वाटे कमतर केविमिळे मज तिजसिं अलिंगन चिंतन करी हा मानसि हितकर।। अधरामृत हा सेविल मधुकर।। तो दिन खचितचि अद्‌भुत सुखकर।। रमणि रम्य किति चरकेअंतर।। प्राप्त होई तंह सार्थक भुवर।। बघुनी तुला मी तुष्ट जाहलों।। सुखविनं बहुतापरी।। प्रेमळ भावा राखिन तुजवरी सुखकर तुज सुंदरी।। वस्त्रभुंषणे देवुनि तुजला रमविन नानापरी।। काय कमी मग येथ तुला गे सांग सुगुणमंजरी।। सेवा करतिल दासदासि तव वर्णुनियां थोरी।। मत्सन्निध तूं रमशिल सखये दुःख तुझे मी हरी।। किती भाग्यवान तरी तुं असशी सखे लाभलिस सहज चि मजशी।। प्राणासमगे तु मज आवडशी।। प्रीती करुनिंया सन्हावनि प्राणसखे मजवरी।। आनंदाने कालक्रमी तू हो माझ्या पदरी।।"[७६]

अशाप्रकारे संभाजी रोशणारला वश करण्याचा प्रयत्न करतो तेव्हा रोषणार संभाजीस माझ्याशी लग्न कर. मी तुझी रखेल म्हणून राहणे मान्य नाही. त्याचसुमारास मोगल सैन्य तेथे येवून संभाजी व रोशणारला पकडून घेऊन जातात. रोशणार संभाजीच्या प्रेमा खातर ती

---

[७५] *केरकर सोनाबाई चिमाजी, संगीत छत्रपती संभाजी नाटक, जगदिश्वर छापखाना, मुंबई १८९६ पृ.क्र ६७*
[७६] *केरकर सोनाबाई चिमाजी, संगीत छत्रपती संभाजी नाटक, उपरोक्त पृ.क्र ८१*

त्यांची एका फकीरा मार्फत कैदेतून सुटका करते. पुन्हा भेटण्याचे अश्वासन देऊन रोशणार निघून जाते.

संभाजी राजे रायगडावर येतात. राजकारभाराकडे दुर्लक्ष करतात. पुन्हा स्त्रियांच्या मोहपाशांत सर्वकाळ वेळ घालवितात त्यामुळे येसुबाई दुःखी होते. तुळशीचा द्वेष करते. असे चित्रण नाटकातून दाखविले आहे. नाटकाच्या उत्तरार्धात तुळशी व येसाजी फर्जद संभाजीचा सूड घेण्यासाठी त्यांना शिकारीच्या निमित्ताने संगमेश्वरी घेऊन जातात. संभाजीला मद्य पाजवून मारेकऱ्यामार्फत मारण्याचा कट करतात; परंतु जोत्याजी तो त्याचा कट उधळुन लावतो. नंतर जोत्याजीस खोटे पत्र पाठवून त्याच्या गावाकडे रवाना करतात. तकरीबखानामार्फत संभाजी राजे पकडले जातात. जोत्याजी संभाजीस सोडवण्यासाठी स्वतःचे प्राण देतो. नंतर संभाजी राजास औरंगजेबासमोर उभे केले जाते. औरंगजेब संभाजीस म्हणतो, 'तु जर मुस्लीम धर्म स्वीकारला तर तुला तुझे राज्य परत मिळून आणखी काही प्रांत सुद्धा देऊ व तुझा मानमरातबही पुष्कळ वाढवू.' असे हे शब्द ऐकूण संभाजी चवताळुन म्हणतो, "स्वधर्माकरिता मी काय पण माझी प्रजा देखील प्राणाला भेवुन स्वधर्म सोडणार नाही." शेवटी वीर मरण पत्करलेले नाटकात दाखविले आहे.

## ३.४.४ राम गणेश गडकरी यांचे 'राजसंन्यास' नाटक :

राम गणेश गडकरी यांनी संभाजी राजांच्या जीवनावर १९२२ मध्ये 'राजसंन्यास' हे नाटक लिहिले. एक तत्वगर्भ नाटक म्हणून गडकऱ्यांनी रासंन्यासाची आखणी केली आहे. शोकनाट्याच्या नाटकाप्रमाणे विनाशाच्या काठावर उभा असलेला संभाजी आपल्या दोषांच्या अभिज्ञानाने आत्मपरीक्षण करतो." [७७] हे नाटकाच्या शेवटी दाखवलेले आहे. संपूर्ण नाटकामध्ये संभाजीराजांची स्वच्छंदी, बेजबाबदार आणि रंगेल अशी प्रतिमा चित्रित केलेली आहे.

---

[७७] *कुलकर्णी भिमराव, (संपा): संपूर्ण गडकरी खंड पहिला, सरीता प्रकाशन पुणे, (नववी आवृत्ती) १९८४ पृ.क्र १९*

राजसंन्यास या नाटकाच्या पहिल्या प्रवेशातच संभाजी आणि तुळशी एकमेकांवर कसे आकर्षित होतात. याचे विलक्षण अद्‌भुतरम्य असे दृश्य गडकऱ्यांनी रंगवले आहे. मालवणच्या सिंधदुर्गाच्या बुरुजावर संभाजीराजे, दर्यासारंग, दौलतराव आणि इतर अधिकारी असतात. समुद्र खवळलेला असतो. तशीच दर्यातून आपले जहाज हाकारण्याची राजांना इच्छा असते. अशातच बुरुजाच्या खाली घाटावर दौलतरावाची बायको तुळशी होडीत बसून समुद्रात जाते. होडी उलटते. ती दिसेनाशी होते तेव्हा मंजुळा धावा धावा म्हणून ओरडू लागते. बायकोला वाचविण्यास समुद्रात उडी घ्यायला संभाजीराजे दौलतखानाला सांगतात. तो त्यांची बेपर्वा करतो. तेव्हा संभाजी राजेच तुळशीला वाचवण्यासाठी समुद्रात उडी घेतात. बुडत असलेल्या तुळशीला संभाजीराजे वाचवितात आणि मग दोघेही एकमेकांवर आकर्षित होऊन प्रेमसागराच्या लाटावर हेलकावे खात-खात बोलू लागतात. तुळशी संभाजीस म्हणते, "आपल्याकडे पाहताना नजरेची ज्योत पापनीने मालवली उरीची लाज पदराने पालवली आज जवानमर्दीच्या बादशहाने माझ्या जीवनवंतीला काटेरी भुषने बहाल केली. सहयाद्रीच्या राजसिंहा सिंधुदुर्गाच्या वाघिणीची आज गाय झाली."[७८] तेव्हा संभाजी तुळशीस म्हणतो, "प्यारी मानवलोकीची लग्न रद्द करून रायगडचा राजा आज पुन्हा तुझ्याशी लग्न करत आहे. मस्तकावरुन सुटणाऱ्या हया थेंबाची सौंदर्याच्या या मोत्यांची बिनसराची मुंडावळ तुझ्या कपाळी शोभते आहे. समोर संध्याकाळचा होम पेटला आहे. तुफान दरियात मरणाचा नेम नसल्यामुळे काळाचा एकच पाश आपल्या दोघांच्या कंठात आहे. त्याचीच लगीनमाळ करून डोगरलोटच्या बोहल्यावर मावळत्या देवाच्या साक्षीने मरणाचा मुहुर्त साधुन रायगडचा राजा मनाच्या मुक्या मंत्राने तुळशी तुझ्याशी लग्न लावीत आहे."[७९] अशा प्रकारे तुळशी व संभाजीच्या प्रेमप्रसंगाचे वर्णन नाटकामध्ये चित्रित केले आहे.

त्यानंतर संभाजीराजे तुळशीला घेऊन तिच्याबरोबर रायगडावर उघडपणे राहू लागतात. एके दिवशी येसुबाई संभाजीराजांना शुद्धीवर आणतात तेव्हा तुळशीला हाकलून देतात. दुसरीकडे आपल्या बायकोला रखेली बनवुन आपल्या संसाराची राखरांगोळी

[७८] *कुलकर्णी भिमराव, (संपा): संपूर्ण गडकरी खंड पहिला, सरीता प्रकाशन पुणे, नववी आवृत्ती १९८४ पृ.क्र २१४*
[७९] *कुलकर्णी भिमराव, (संपा): संपूर्ण गडकरी उपरोक्त पृ.क्र २१४*

केल्याबद्दल दौलतराव चिडतो. संभाजीचा सूड उगवण्यासाठी मोगलाकडे जात असताना त्याचे वडील साबाजी त्याला भेटतो. आपल्या स्वतःच्या हातानी पुत्रावर वार करतो. एवढ्यात संभाजीराजांनी हाकलून दिलेली तुळशी राणी येसूबाईवर कसा सूड घ्यावा याच विचारात असताना नवरा दौलतराव शेवटची घटका मोजीत असताना भेटते तेव्हा तुळशीचे पतिप्रेम पुन्हा जागृत होते. मराठेशाही मातीला मिळवून मराठ्यांच्या महाराणीला गाय करीन तुमची प्रतिज्ञा पूर्ण करीन असे वचन मरत असलेल्या दौलतरावास देते. पुढे संभाजीराजांना मोगल कैद करतात. मोऱ्याची सेना येसूबाईंना गिरफ्तार करते, तुळशीची प्रतिज्ञा पूर्ण होते. हर्षोन्मादाने बेफाम होऊन ती राणी येसुबाईच्या पायातल्या सोन्याच्या साखळ्या आपल्या पायात घालू लागते. तोच तिचे वडील हिरोजी फर्जद तलवार उपसून तिला एका घावातच ठार करतात. मराठेशाही बेईमान झालेल्या आपल्या पुत्राला व कन्येला स्वतःच्या हातानी कंठस्नान घालणारे साबाजी शिर्के व हिरोजी फर्जेद हे ऐंशी वर्ष वयाचे म्हातारे म्हणजे मराठ्यांचा इमानाचे आणि त्यागाचे जणू दोन प्रतिके गडकऱ्याने या नाटकात दर्शविले आहे. राजसंन्यास हे संभाजीचे नाटक असले तरी त्यातील इतर पात्राच्या संहारामागे संभाजीची कर्तव्यभ्रष्टता कशी कारणभूत आहे. हे गडकऱ्यांनी या नाटकात दाखविले आहे.

नाटकाच्याशेवटच्या अंकामध्ये पश्चातापग्नित जळत असलेला संभाजी चित्रित केला आहे. तुळापूरच्या मोगल छावणीच्या तुरुंगात संभाजीराजे अगदी मरणोन्मुख मनःस्थितीत बसले असताना संभाजी राजांना सोडविण्यासाठी आलेल्या साबाजी शिर्केना उद्देशुन संभाजी म्हणतो, "गोब्राह्मणप्रतिपालक हिंदुपदपादशहा श्रीमंत छत्रपती संभाजी महाराज ! नाही साबाजी ही माझी किताबत नाही ! संभाजी हा म्हणजे केवळ रंडीबाज छाकटा ! काशीची गंगा आणि रामेश्वराचा सागर एकवटुन छत्रपतीनी बांधिलेल्या राष्ट्रतीर्थाची श्रीगंगासागराची ज्याने व्यभिचाराच्या दिवाणखान्यातली मोरी बनवली तो हा संभाजी ! वैराग्याच्या वेगाने फडफडणाऱ्या भगव्या झेंडयाला दारुबाजाचे तोंड पुसण्याचा हस्तरुमाल केला ! महाराष्ट्रलक्ष्मीच्या वैभवाचा जरीपतका फाढून त्यांची रांडेसाठी काचोळी केली ! साबाजी माझ्‍ या नऊ वर्षाच्या नावलौकीकाची इमारत नीटपणे पहा ! चिटणीसाला हत्तीच्या पायाखाली

तुडवून तिचा पाया घातला. मातोश्री सोयराबाई साहेबांना जितेपणी भिंतीत चिणुन तिच्या भिंती उभारल्या, ती पातकी इमारत उंचावता उंचावता कळसाला पोचण्यापूर्वी कोसळून तिच्या खाली संभाजीचा चुराडा होऊन गेला. साबाजी, मी बाहेर पडून लोकांना काय तोंड दाखवू ? आपला राजा सुटला असे पहाताच, माझी प्रजा आपखुषीने देश सोडून हद्दपार होईल. साबाजी या काळोखांत सुद्धा मला तोंड लपवावेसे वाटते. खाली पाहीन तर हत्तीच्या पायानी पाताळापर्यंत गाडलेला बाळाजी पुन्हा जमिनीतून वर येईल अशी भिती वाटते भोवताली पाहिले तर कोपऱ्याकोपऱ्यातुन आईसाहेबाचे डोळे माझ्याकडे टवकारुन पाहतील वर पहिले तर शिर्क्यांची उडविलेली शिरे आकाशातुन जयद्रशाच्या मस्तकाप्रमाणे येऊन माझ्या मस्तकावर आदळतील ! साबाजी मी आता कोणीकडे पाहू ? सह्याद्रीचा सिंह आता अगदी भयभीत झाला आहे."[८०] अशाप्रकारचे वर्णन गडकऱ्यांने करून संभाजीराजांना आरोपाच्या पिंजऱ्यात उभे केले आहे. हे पूर्णपणे काल्पनिक व इतिहासाचा विपर्यास करणारे आहे.

### ३.४.५ वा. ना. शहा याचे 'प्रणयी युवराज' (१९१७) :

संभाजी राजांच्या जीवनावरील एक महत्त्वाचे नाटक म्हणजे वा.ना.शहा यांचे 'प्रणयी युवराज' होय. या नाटकामध्ये संभाजीराजे व औरंगजेबाची कन्या झेबुन्निसा यांच्या प्रणय कथेवर नाटक आधारलेले आहे. या नाटकात लेखकाने नादान, उताविळ, उद्धट, प्रेमवीर अशी संभाजी राजाची प्रतिमा रंगवलेली आहे. संभाजी राजे आपल्या वडिलांसोबत औरंगजेब बादशहास भेटावयासाठी जातात. तेव्हा बाल संभाजी व झेबुन्निसाची भेट जयसिंगाच्या उद्यानात होते. पाहता क्षणी दोघेही एकमेकांच्या प्रेमात पडतात; परंतु यावेळी झेबुन्निसा ही रजपूत वेशामध्ये असते. दुसरीकडे झेबुन्निसा शिवाजी महाराजास देऊन त्यास मुस्लीम करण्याचा बेत औरंगजेबाचा असतो. तो त्याचा मुलगा अकबरास मान्य नसतो. त्याच्या मनात संभाजीस दयावे असे असते. त्यामुळे संभाजीवर झेबुन्निसाचे प्रेम जडावे. म्हणून तिला शिवाजी महाराज संभाजीचा फोटो देतो. त्यास प्रेम करण्याचे सांगतो.

---

[८०] *कुलकर्णी भिमराव, (संपा): संपूर्ण गडकरी खंड पहिला, सरीता प्रकाशन पुणे, (नववी आवृत्ती) १९८४ पृ.क्र ३४३, ३४४*

आग्रा दरबारी शिवाजीराजांचा औरंगजेबाने अपमान केल्यानंतर छत्रपती शिवाजीराजांऐवजी संभाजीराजेच क्रोधीत झाल्याचे चित्र या नाटकात निर्माण केले आहे. त्यानंतर संभाजीराजांनी भरदरबारात औरंगजेबाचा अपमान केल्याने औरंगजेब त्याना आपल्या राजवाडयातच कैदी म्हणून ठेवतो. त्यावेळी विरहाने व्याकुळ असलेली झेबुन्निसा संभाजीस भेटण्यासाठी कैदखान्यात जाते. संभाजी म्हणतो, "तुला पाहिल्यापासून बंदीवासाचे दुःख मी पार विसरुन गेलो. केवळ दुष्टपणाने मला तुरुंगात लोटणाऱ्या औरंगजेबास मी उपकारकर्ताच मानू लागलो आहे. सुंदरी केवळ तुझ्या काल्पनिक प्रतिमेचे चिंतन करण्यात मी बंदिवासाचे दुःख विसरुन जात असे. आता तर तुझी ही मनोरम मुर्ती माझ्याजवळ प्रत्यक्ष उभी आहे आणि आपले वचनामृत पाजून मला स्वर्गसुखाचा अनुभव आणुन देत आहे. मग याला कैद कसे म्हणता येईल ? त्या दिवसाप्रमाणे मूक कृतीने का होईना तुझे दर्शन जर मला येथे नित्य होऊ लागले, तर मी आपणास धन्य मानीन."[८१] अशा प्रकारे संभाजी व झेबुन्निसाचे प्रेम कैदखान्यात असताना सुद्धा वाढत जाते.

छत्रपती शिवाजीराजे-संभाजीराजे आग्राच्या कैदेत अडकले असतानाच अकबर त्यांच्याकडून भावी काळात मदत मिळविण्यासाठी त्यांना कैदेतून सोडून देण्याचे रामसिंहास सांगतो; परंतु संभाजी राजांना मात्र झेबुन्निसाच्या प्रेमापोटी दिल्ली सोडाविशी वाटत नाही. संभाजी स्वगत विचार करत म्हणतो "त्या सुंदरीशी बेइमानपणाचे वर्तन माझ्याकडून नाही का होत ? आणि तिच्या प्रेमाने विव्हल झालेले माझे अंतःकरण राष्ट्रकार्य तरी काय करणार आहे ? शरीर बाबाबरोबर दक्षिणेत जाईल, पण मन या येथे या तुरुगांत त्या रजपूत युवती भोवती घिरट्या घालीत राहील... बंदीवासातुन मुक्त होणे म्हणजे लोकांस केवढे भाग्य वाटते, पण माझी स्थिती कशी चमत्कारीक झाली आहे! सुगंधाने वेडा झालेला भ्रमर ज्याप्रमाणे कमलांगणरुपी कारागृहांत राहण्यातच सौख्य मानतो. त्याप्रमाणे त्या तरुणीच्या सौदर्याने वेडा

---

[८१] *शहा वालचंद्र नानचंद्र : प्रणयी युवराज, प्रकाशन वालचंद्र रामचंद्र कोठारी बी.ए कसबापेठ, पुणे (आवृत्ती पहिली ) १९१७ पृ.क्र ३३, ३४*

झालेला मी हा बंदीवासच प्रिय मानीत आहे."[८२] अशा प्रकारे प्रेमासाठी उताविळ झालेल्या संभाजी राजाचे चित्रण नाटकात केले आहे.

संभाजीराजे स्वराज्यात परत आल्यानंतर झेबुन्निसा विरहामुळे त्याचे कोठेच मन लागत नाही. मनाचा विरंगुळा करण्यासाठी वाघाच्या शिकारीला जातात. तेव्हा झेबुन्निसा विजापुरच्या मावशीला भेटण्याच्या निमित्ताने अकबरासमवेत महाराष्ट्रात येते. पुनःश्च संभाजीराजास झेबुन्निसा दिसते; परंतु यावेळी ती मुस्लीम वेशात दिसल्यामुळे तिच्याविषयी संभाजीच्या मनात संशय निर्माण होतो. तो दुरकरण्यासाठी संभाजी अकबराच्या छावणीत जाण्याचा निर्णय घेतो आणि जास्त काळ राहता यावे म्हणून दिलेरखानास जाऊन मिळतात. त्यावेळी संभाजीला झेबुन्निसा खरे रुप समजते त्यानंतर ते पुन्हा स्वराज्यात परत येतात. झालेल्या गोष्टीचा पश्चाताप करतात. असे चित्र नाटकात चित्रित केले आहे.

संभाजीराजे दिलेरखानाच्याकडून आल्यानंतर शिवाजी महाराज त्याना पन्हाळगडावर नजर कैदेत ठेवतात. त्यावेळी शिवाजी महाराजाचा मृत्यू होतो व राजारामाला गादीवर बसवण्याचा कट रचला जातो. तेव्हा झेबुन्निसा ही पुरुष वेश धारण करून संभाजी राजांची नजरकैदेतुन सुटका करते. त्याच्या विरुद्ध केलेल्या कटाची माहिती देते. पुढे झेबुन्निसा वेशांतर करून संभाजी राजांना अनेक प्रसंगामध्ये मदत करते. आपल्या राज्याभिषेकासाठी तिला कवी कलशाने न बोलावल्याने संभाजीराजे कलशाला फटकारतात व तिची भेट घेण्यासाठी राज्याभिषेक अर्ध्यावर सोडुन पालीस जातात. तेव्हा तेथे विजयत्सव साजरा करताना पहातात त्यानंतर झेबुन्निसाच्या एकूणच योगदानामुळे तिचे आपल्यावर विशुद्ध व निर्ण्याज प्रेम असल्याचे संभाजीराजास पटते. तेव्हा तिच्या या विशुद्ध प्रेमापोटीच जातीयतेचे बंधने झुगारुन संभाजीराजे तिच्या प्रेमाचा स्वीकार करतात. असे चित्रण नाटकातून रंगविले आहे.

---

[८२] *शहा वालचंद्र नानचंद्र, प्रणयी युवराज, प्रकाशन वालचंद्र रामचंद्र कोठारी बी.ए कसबापेठ, पुणे (आवृत्ती पहिली ) १९१७ पृ.क्र ४१*

### ३.४.६ वि. ह. औंधकरांचे 'बेबंदशाही' नाटक (१९२४) :

संभाजीच्या व्यक्तिचित्रणाची गडकऱ्यांचीच बैठक औंधकरांनी स्वीकारून १९२४ मध्ये 'बेबंदशाही' हे नाटक लिहिले. या नाटकामध्ये औंधकरानी गडकऱ्याच्या कल्पना विलासांचा मागोवा घेऊन निराळे प्रसंग आणि कथानक योजले आहे. वि.ह औंधकरांनी 'बेबंदशाही' नाटक लिहिताना चिटणीस बखरीचा जास्त आधार घेतल्याचे निदर्शनास येते. या नाटकामध्येही संभाजीराजाचे चित्रण विलासी, कामांध, मद्यधुंद, बेजबाबदार असेच दाखविले आहे.

या नाटकाच्या पहिल्या अंकामध्ये रायगडावर बंदीवासात असलेल्या ताराबाई व राजाराम यांना संभाजी गणोजी शिर्के मिळाल्याचा आरोप होतो. या नाटकामध्ये संभाजीराजे कलशाकबजीच्या नादाला लागून त्याच्या पूर्ण आहारी गेल्याचे दर्शविले आहे. नाटकाच्या पहिल्या अंकातच रायगडावर बंदिवासात असलेल्या ताराबाई व राजाराम यांच्यावर कबजीच्या सांगण्यावरुन गणोजी शिर्केला मिळल्याचा आरोप करतात. संभाजी राजे स्वत:ची ओळख अशी करून देतात. "राजाराम महाराज! शराबीच्या धुंदीचे आणि प्रीतीच्या रंगेल्या बंदीचे आम्ही विसाव्याचे कैदी ! छेड काढल्याविना आम्हाला आमच्या रंगातुन जागहि येणे मुष्कील ! बुद्धीबळाने आम्हाला खेळता येत नाही आणि दुसऱ्यांनी आम्हांशी खेळलेले आम्हांला खपत नाही."[८३]

संभाजी राजांनी शिर्क्यांचे शिरकान केल्यामुळे गणोजी शिर्के हा सुडाने पेटून भोसल्याचा नरवध करण्यासाठी मोगलाला मिळालेला असून कलशाकबजीला हातांशी धरुन संभाजी महाराजांना पकडण्याचा बेत आखतो. यांची माहिती खंडोजी चिटणीसासारख्या राज्यनिष्ठ सेवकाला शाहीरामार्फत लागते. ते येसूबाईसाहेबांना सांगतात. संभाजी राजांना रायगडाच्या बाहेर जाण्यापासून रोखण्याची विनंती येसुबाईस करतात. तेव्हा येसूबाई संभाजीला रोखण्यासाठी जाते. तेव्हा मद्यधुंद संभाजी कलशा कबजीला दिलेल्या वचनासाठी

---

[८३] *औधंकर वि.ह. : बेबंदशाही, परचुरे प्रकाशन मंदिर , मुंबई (अकरावी आवृत्ती ) १९७५ पृ.क्र १४*

येसुबाईस लाथाडल्याचे या नाटकात दर्शविले आहे. मद्यधुंद संभाजीचे चित्रण केले आहे. "राणीसाहेब, बाका वखत आणलात आपण! आम्ही शरांबीने धुंद झालो आहो, अशा वेळी आमच्या मुलाखतीला का येणे केले ? कबजी हाळू नका हं ! राणीसाहेब, मगापासुन आमच्या मनाला आम्ही बजावतो आहों की मना, ही राजलक्ष्मी तुझ्यासमोर आली आहे. ही साध्वी तुझ्याकडे पाहते आहे. कैफात काही वेडवाकडं बडबडू नको; पण आमच्या मनावरचा ताबा आता उडत चालला आहे. कैफातही आमच्याकडून आपला अपमान व्हावा असे आम्हांला वाटत नाही. आल्या पावली आपण बाळेराजांना घेऊन राजवाडयाकडे परता! आम्ही कबजीबरोबर चालते होणार ! चला कबजी ."[८४] संभाजीला कबजी रायगडावरुन संगमेश्वर येथील एका जुनाट वाड्यात घेऊन जातात. त्याच्यासोबत तुळशी जी हिरोजी फर्जदाची लेक असून पित्याच्या वधाचा सूड घेण्यासाठी राजांना आपल्या रुपाच्या बळावर मोहजालात अडकवीण्याचे नाटकात दाखविले आहे. पुढे संभाजी राजे पकडले जातात. त्यांना तुळापुराजवळील मोगलाच्या कैदेतून सोडविण्यासाठी त्याचा राज्यानिष्ठ सेवक खंडोजी मौलविच्या वेशात जातो. पश्चातापग्नित जळत असलेल्या संभाजीचे चित्रण दाखविले आहे. "खंडोजी, सूर्यापोटीशनि निपजलेल्या संभाजीसाठी देवापोटी दैत्य अवतरलेल्या ह्या काठोरासाठी असे धाडस करून काय लाभ ? ...... 'गनिमी हल्ल्याने आमच्या सुटकेचा यत्न करणार तू ? धर्मासाठी मरण पत्करायची वैऱ्यानी अनायसि संधि दिली असता शरमिंध्यागत आम्हांला रायगडीनेणार तू ? नको खंडोजी, नालायकीच्या लांच्छनाने काळवंडलेल्या शभुराजांची स्वकीयासमोर आता धिंड काढू नकोस. अष्टप्रधानांची मर्जी मोडून दिमाखाने दौलतीवर आलेल्या ह्या संभाजीवर मावळ मराठ्यांना काळे तोंड दाखवण्याचा वखत आणू नकोस. आता आमच्या मानी तब्बेतीला शोभिसा आमचा शेवट कशाने होणार असेल. अवघी उमर दुलौकिकांत गमावेल्या तुझ्या ह्या धाडशी धन्याला मरता मरता जरासा

[८४] *औधंकर वि.ह. : बेबंदशाही, परचुरे प्रकाशन मंदिर , मुंबई (अकरावी आवृत्ती ) १९७५ पृ.क्र ६४*

चांगुलपणा जर कोणत्या दिव्याने लाभणार असेल तर तो आता एका मरणातेचे !"[८५] अशा प्रकारे औंधकराच्या बेबंदशहीत संभाजीचे चित्रण केले आहे."

### ३.४.७ द. स. सुळे याचे 'संगीत राजसंन्यास नाटकाची पुरवणी' नाटक (१९३०) :

'संगीत राजसंन्यास नाटकाची पुरवणी' हे नाटक दत्तात्रय सदाशिव सुळे यांनी १९३० मध्ये लिहिले. या नाटकाचा मुख्य नायक संभाजीच असून गडकऱ्यांच्या धरतीवर याही नाटकाचे कथानक आहे. या नाटकामध्ये गडकऱ्यांच्या 'राजसंन्यास' नाटकातील पात्र आहेत. तुळशीसाठी आसक्त असलेला संभाजी तिच्यासोबत गंगासागरात जलक्रिडा करताना या नाटकामध्ये दाखवलेला आहे. त्यावेळी येसूबाईसाहेब पंचआरती घेऊन संभाजीस ओवळणी करायला येते. तेव्हा संभाजी राजे शुद्धीवर येऊन तुळशीचा आपमान करून हकलून देतात. दुसरीकडे तुळशीचा नवरा दौलतराव आपल्या संसाराची राखरांगोळी केलेल्या संभाजीचा सूड घेण्यासाठी मोगलाची मदत मिळवण्यासाठी निघतात. साबाजी शिर्के त्यांचे वडील त्याला ठार करतात. तेवढ्यात तुळशी तेथे येते. संभाजीचा सूड घेऊन महाराणीला गाय करून दावनीला बांधण्याची प्रतिज्ञा घेते. सूडाने पेटलेली तुळशी संभाजी राजाला आपल्या रूप सौंदर्याने भाळवते आणि सोबत दारुही पाजवते तेव्हा संभाजी म्हणतो, "ह्या रसरसणाऱ्या हृदयांतील ही जातिवंत गुलाबी शराब मिळाल्यावर ह्या मेलेल्या प्याल्यांतली मातीमोल शराब काय करायची आहे."[८६] तुळशीच संभाजीला सगंमेश्वरी एकांतात रहाण्यासाठी घेऊन जाते. मोऱ्याकडून संभाजीला पकडून मोगलांना देते. याच नाटकामध्ये औरंगजेबाची मुलगी रोशणार व संभाजी राजे यांचे प्रेमप्रसंगाचे चित्रण दाखवले आहे. रोशणारला पाहून स्वतःच्या मनामध्ये चित्या सौदर्याचे वर्णन करतो. संभाजी स्वतः म्हणतो, -

"वय नूतन कशि। मधूर डोलते ।।
चपळ जशी । नागिण गव्हळी ।।

---

[८५] *औंधकर वि.ह. : बेबंदशाही परचुरे प्रकाशन मंदिर , मुंबई (अकरावी आवृत्ती ) १९७५ पृ.क्र १०९, १११*

[८६] *सुळे दत्तात्रय सदाशिवः संगीत राजसंन्यास नाटकाची पुरवणी, प्रकाशन प्रो.प्रायटर विदर्भ वैभव ग्रंथमाला, अमरावती १९३० पृ.क्र ७६*

अधरिं कशा चमकती हिरकण्या ।।

एक ओळिते । विराजती ।।

ओठि शुद्ध । पोवळीं शोभती ।।

चाफेकळी । नाकीं वसते ।।

कुच संगिन । पाहूनी तयाला ।।

चक्रवाक । पक्षी थिजती ।।

मंजुळ स्वर । ऐकूनी कोकिळा।

खचित । मनी लाजती ।।

जानुसंघ सुकुमार । पोहऱ्या ।।

कर्दीळे । सजल्या जशा ।।

करिती मम । मानस भृंगा पिशा ।।"[८७]

जो की संभाजी रोशणाराला आपली रखेली म्हणून ठेवायचा विचार करतो तेव्हा रोशणार त्यास स्पष्ट नकार देते असे दाखविले आहे.

कलशाकबजीच्या नादाने दुर्वर्तनी झालेला संभाजी या नाटकामध्ये दाखवला आहे. जो संपूर्ण कारभार कबजीच्या सल्ल्याने करतो. व्यसनामध्ये गुंग असतो. आसा या नाटकामध्ये चित्रित केला आहे. खंडोजी आणि हुजुऱ्या संभाजीचे सेवक संभाजीची शेवटपर्यंत रक्षण करताना दाखवले आहेत.

### ३.४.८ विठ्ठल वामन हडप यांचे 'रायगडची राणी' नाटक (१९३१) :

'रायगडची राणी' या नाटकाची रचना १९३१ मध्ये विठ्ठल वामन हडप यांनी केली. छत्रपती संभाजी महाराजांच्या कारकीर्दीचा व आयुष्याचा शोक संतापजनक अंत या नाटकाचे कथानक असून यामध्ये रायगडची राणी म्हणजे राणी येसूबाई भोवतीच संपूर्ण नाटक फिरते.

---

[८७] *सुळे दत्तात्रय सदाशिवः संगीत राजसंन्यास नाटकाची पुरवणी, प्रकाशन प्रो.प्रायटर विदर्भ वैभव ग्रंथमाला, अमरावती १९३० पृ.क्र ४८*

या नाटकाची चार अंकामध्ये विभागणी केलेली आहे. त्यामध्ये कलशाकबजीच्या नादाने संभाजी महाराज व्यसनी व दुर्गुणाची मूर्ती दाखविले आहे. संभाजी राजे कबजीच्या हातातली कटपुतळी बनल्याचे दाखविलेले आहे.

संभाजीराजांची स्वच्छंदी आणि रंगेल कृती दाखविण्याकरिता नाटकात 'कमळजा या काल्पनिक व्यक्तिरेखेचा आधार घेतला आहे. कमळजा ही फर्जदाची लेक असून तानाजी मालसुरेची बहीण दाखवलेली आहे. संभाजी राजांची लहानपणापासुनची मैत्रीण असून संभाजीवर तिचे प्रेम आहे. या दोघांच्या प्रणयप्रसंगाचे वर्णन नाटकामध्ये केलेले आहे. संभाजीवर रूसलेल्या कमळजाला म्हणतो "कमळजे, हे काय ओ सुद्धा द्यायची नाही ! इतका रूसवा! बाकी हा रुसवाही तुला शोभतो! काटयावाचुन गुलाब नाही रुसण्यावाचून रंग नाही."[८८]

कमळजा संभाजीराजांना पूर्णपणे वशीभूत करून येसुबाईचा सतत व्देष करून पदोपदी अपमान करते. कलशाकबजीच्या सांगण्यावरुन संभाजीराजे कमळेजाला राणीचे वस्त्रपरिधान करून दोघे जोडीने शिवाजी महाराजांच्या समाधी दर्शनाला घेऊन जातात. तानाजी कमळजाने केलेल्या दुष्कृत्याबद्दल तिला ठार मारण्यासाठी जातो. तेव्हा त्यालाही तुरूंगामध्ये टाकले जाते. असे या नाटकात चित्रित केलेले आहे. संभाजी महाराजांनी शिर्क्याचे शिरकान केले. त्यांचा सूड घेण्यासाठी राणोजी शिर्के हे काल्पनिक पात्र या नाटकामध्ये घातलेले आहे. राणोजी शिर्के हा शिरकाणाचा सूड घेण्यासाठी मोगलांना मिळालेला. असून कबजीला आपल्या बाजुला वळवून संगमेश्वरी संभाजी महाराजांना कैद करतो. इलायचीबेग मोगलांचा सरदार संभाजीला पकडून तुळापुरला घेऊन जातो. मोगलांच्या कैदेत संभाजी केलेल्या गुन्हाबद्दल शोक करून हुतात्त स्वीकारतो असे या नाटकामध्ये दाखविलेले आहे.

---

[८८] *हडप विठ्ठल वामन : रायगडची राणी प्रकाशक, परचुरे पुराणिक मंडळी माधवबाग , मुंबई १९३१ पृ.क्र २५*

**३.४.९ मालती माधव तेंडुलकर यांचे 'मराठ्यांचा राजा' नाटक (१९३३) :**

मालती माधव तेंडुलकर यांनी १९३३ मध्ये संभाजी राज्याच्या जीवनावर 'मराठ्यांचा राजा' हे नाटक लिहिले. संभाजी महाराजांची गोव्यावरील स्वारी हा नाटकाचा मुख्य विषय आहे. या नाटकामध्ये संभाजीची व्यसनी, कामांध प्रतिमा पुसून काडण्याचा प्रयत्न नाटककारानी केला आहे. संभाजीराजे जेव्हा गोव्यावर स्वारी करतात. त्यावेळेस पोर्तुगीज वकील फर्नांडिझ संभाजीला खुश करण्यासाठी जडजवाहीरात व त्यांच्यासोबत विदेशी मद्य देतो. तेव्हा संभाजी राजे मद्य स्वीकारत नाहीत. त्यानंतर नजराना म्हणून सेराला फिरंगी सौदर्य म्हणून महाराजा समोर आणतात. तेव्हा संभाजी राजे तिला आपली लहान बहीण मानून तिची खनानारळाने ओटी भरुन तिच्या घरी नेऊन सोडतात.

मराठ्यांचा राजा नाटकामध्ये संभाजीराजे कलशाकबजीच्या पूर्णपणे आहारी गेलेले. बेजबाबदार, भोळे असे या नाटकामध्ये दाखविले आहे. कुलुषावर विश्वास असणारा त्याच्या मंत्रतंत्रावर विसंबून असणारे संभाजीराजे दाखविले आहे. कबुजी कालीमातेचा प्रसाद म्हणून मदीरा देतात. तेव्हा संभाजी म्हणतो, "काय मदिरा SSSS पण्डिजी, आमच्या इंदिराच्या नावाने आणलेले तीर्थ प्रत्यक्ष विष असले तरी त्यांचे अमृत होईल मग मदिरेची कथा काय ? आणा-आणा तो कटोरा इकडे म्हणून पितो."[८९] असे व्यसनी संभाजीचे चित्रण केले आहे.

**३.४.१० यशवंत नारायण टिपणीस यांचे 'शिवाजीला शह' नाटक (१९३३):**

'शिवाजीला शह' हे नाटक १९३३ मध्ये यशवंत नारायण टिपणीस यांनी लिहिले. शिवाजी-संभाजी ह्या पिता-पुत्र संबंधावर हे नाटक आधारलेले आहे. तत्कालीन कोणत्याही नाटकाचे अणुकरण न करता हे नाटक टिपणीसांनी रचले आहे. या नाटकाच्या कथानकावरुन लेखकांने चिटणीस बखरीचा आधार घेतल्याचे निर्दशनास येते. सुवासिनीवर बलात्कार करणारा संभाजी आणि त्यामुळे व्यथित झालेला शिवाजी यांच्याबाबत संघर्षामुळे संभाजी

---

[८९] *तेंडुलकर मालती माधवः मराठ्यांचा राजा, प्रकाशन गणेश महोदय आणि कंपनी. पुणे १९३३. पृ.क्र. ९९*

आततायीपणाने मोगलांना जाऊन मिळतो. शिवाजी मोगलांवर छापा घालून संभाजीला हस्तगत करतो. अशा स्वरुपाचे कथानक आहे.

शिवाजीला शह या नाटकात संभाजीराजे स्वच्छंदी, व्यसनी, बेजबाबदार आणि स्त्रीशौकीन असल्याचे दर्शविले आहे. सुवासिनिवर बलात्कार करणाऱ्या संभाजीवर व्यथित झालेला शिवाजी संभाजीस उद्देशून येसूबाईस म्हणतो, "या कार्ट्यांने माझ्या साऱ्या श्रमाच मातेर केले! शंभु सद्गुणी व्हावा, शभूचं मन सुसंस्कृत व्हांव, शभूंन शिवाजीपेक्षाही सवाई कर्तबगार व्हाव, म्हणून देशोदेशीच्या विद्वान माणसांकडून मी त्याला शिक्षण देवाविल त्याच चीज या मूर्खानं अस करावं? हृदयाशी बाळगलेल्या माझ्या महत्त्वकांक्षेला यानं मूठमाती द्यावी? महाराष्ट्राच्या उज्जवल भवितव्येतेवर यांन काजळ फासावं? अरेरे..."[१०]

टिपणीसाच्या या नाटकात संभाजीराजे स्त्रीशौकीन असून त्याचे राधा व हिरकणी या दोन स्त्रीयांशी सबंध असल्याचे दर्शविले आहे. त्यातील राधा विवाहीत असून तिचे संभाजीबरोबर प्रेम होते. हळदीकुंकवाच्या निमित्ताने ती रायगडावर आल्यावर संभाजीच्या महालात जाते. त्यावेळेस संभाजी तिच्यावर बलात्कार करतो असे नाटकात दाखविले आहे. हिरकणी ही दिलेरखानाच्या जनानखाण्यातील नर्तीका असून मोगलाईत आलेल्या संभाजीला आपल्या राज्याची व बायाकापोराची आठवण येऊ नये म्हणून हिरकणी संभाजीला आपल्या जाळ्यात ओढते. हिरकणीवर आकस झालेला संभाजी तिला उद्देशुन म्हणतो

"हृदयी पाही या देहि जव प्रेम ते भरले ।।

दशदिशा बंध रंगल्या । प्रणया न कां खुल्या ।।धृ।।

कमल फुलले । मधुंप भुलले । नयन रमले । अधर हाले ।।१।।"[११]

अशा प्रकारे हिरकणी व संभाजीच्या प्रणयाचे चित्रण नाटकामध्ये केलेले आहे.

---

[१०] *टिपणीस यशवंत नारायणः शिवजीला शह , प्रकाशक अनंत मोरेश्वर पौराणिक परचुरे पौराणिक मंडळी माधव बाग मंबई १९३३ पृ.क्र ४, ५*

[११] *टिपणीस यशवंत नारायणः शिवजीला शह , उपरोक्त, पृ.क्र ४७*

### ३.४.११ ना. के. सोनसुरकर यांचे 'थोरातांची कमळा' नाटक (१९५१) :

संभाजी महाराजांच्या जीवनावर 'थोरातांची कमळा' हे ऐतिहासिक नाटक ना.के सोनसुरकर यांनी १९८१ मध्ये लिहिले. या नाटकामध्ये मराठ्यांचा पराक्रमी सरदार थोरात यांची रुपसुंदर कन्या कमळा आणि संभाजी राजे यांच्या प्रणयकथेवर हे नाटक आधारलेले आहे. या नाटकामध्ये पराक्रमी, शुर, दिलदार; परंतु विषयासक्त संभाजी रंगवला गेला आहे. शिकारीच्या निमित्ताने सर्वप्रथम जंगलामध्ये कमळा व संभाजीची भेट होते. दोघेही एकमेकांवर पाहताक्षणीच भाळतात. त्यानंतर काही दिवसाने पुन्हा वाघाची शिकार करतात. संभाजीचा सोबती राणोजी आरोळी देतो तेव्हा थोरातांचा सेवक तो त्यांना बेहोश आणि जखमी संभाजीला घेऊन थोरातांच्या वाड्यात आणतात. कमळा अतिशय प्रेमाने संभाजीची सेवा करते. दोघेही एकमेकांच्या अतिशय जवळ येतात. याविषयी संभाजी म्हणतो, "जितक्या चमत्कारीक परिस्थितीत अकल्पित प्रथम भेट झाली. तितक्याच चमत्कारानं आणि अकल्पितेने आपण एकमेकांच्या अधिक जवळ येण्यासाठी आमचं अंतःकरण तळमळतं आहे. योगायोगात जमून आलेला सहवास जन्माचा व्हावा असं वाटू लागलं आहे. आपुलकीच्या ओलाव्यानं प्रतिनीज अधिक फोफावत असावं. अंगावरील वाघनंखाच्या जखमा बऱ्या होताहेत तर जीवाच्या जखमा जास्त जडावत आहेत. आपल्या मुखावरील उषेची आरक्तता आणि रजनीची रमणीयता या भावांनी आम्हांला मंत्रमुग्ध केले आहे."[९२]

थोरातांच्या वाड्यात संभाजी असताना विसाजी घाटगे विजापुरच्या आदिलशाहीचा सरदार संभाजीला पकडून नेण्यासाठी येतो तेव्हा कमळा व थोरात दोघेही त्याचा विरोध करतात. घडलेल्या घटनेबद्दल संभाजीची माफी मागतात. संभाजी कमळेला आपल्या घोडयावर बसवून रायगडावर घेऊन जातो. या घटनेची माहिती जेव्हा शिवाजी महाराजांना लागते. संभाजीला उद्देशून म्हणतात, "किती महत्त्वाकांक्षा बाळगल्या होत्या आम्ही आपल्याविषयी केवढे मनोरे मनात बांधले होते आम्ही आपल्या कर्तबगारीचे ? पण त्या आमच्या महत्त्वाकांक्षी मनोऱ्यांचा चक्काचुर झाला.... शंभु म्हणजे अबलांना आपल्या

---

[९२] *सोनसुरकर ना. के. : थोरातांची कमळा अनंत प्रकाशन मुंबई न.२ (१९५१) प्रथमावृत्ती, पृ.क्र. २८*

शिलांच रक्षण करणारा पाठचा भाऊ वाटावा; पण-पण या तुमच्या कृत्यानं त्या आमच्या आशा धुळीला मिळाल्या. आपल्या, शीलाचं रक्षणकर्ता म्हणून ज्याच्याकडे आयाबहिणी आशेनं आणि आदराने पुण्यात्मा म्हणून पहात होत्या, तोच त्यांना शीलभ्रष्ट करून पापात्मा ठरला."[९३] प्रायश्चित्त अग्नित जळत असलेला संभाजी म्हणतो "बस ! आबासाहेब नाही ऐकवत! आमच्यात आता ते कर्णकडु शब्द! भर सभेत द्रोपदीचं वस्त्रहरण क रु पाहणारा, दुष्ट दुश्यासन आणि द्रोपदिच्याच देहलतेच्या कोमलतेने कामांध होऊन त्यामुळे सर्वस्वाला मुकलेला कीचक, हे दोन दुरात्मे आपल्या पंक्तीला आणखी एक तिसरा मिळाला म्हणून ते पहा अंतराळातुन आमच्याकडे पाहुन खदखदा हसत आहेत. आबासाहेब आपणासारख्या पुण्यावान पवित्र पुरुषांचा पुत्र म्हणून घेण्याची आमची पात्रता नाही."[९४]

नाटकामध्ये पुढे कमळेला पळवून आणल्याबद्दल संभाजी राजांना पन्हाळयावर नजर कैदेची शिक्षा होते. कमळा शेवटी संभाजीने केलेल्या गुन्ह्यात स्वतः सुद्धा जबाबदार आहे म्हणून आत्महत्या करते.

### ३.४.१२ मा.आ कामत यांचे 'शककर्त्याचा न्याय' नाटक (१९५१) :

शककर्त्याचा न्याय हे ऐतिहासिक नाटक १९३१ मध्ये मा. आ. कामत यांनी लिहिले. हे मराठी ऐतिहासिक नाटक हे संभाजी महाराजांच्या जीवनावर आधारित असून संभाजी व कमळा यांच्या प्रेमप्रकारणावर आधारलेले आहे. या नाटकामध्ये संभाजीची प्रतिमा प्रेमवीर उताविळ व पराक्रमी अशी रंगवली गेली आहे. शिकारीच्या निमित्ताने कमळा व संभाजीची भेट होते. दोघेही ऐकमेकांच्या प्रेमात पडतात. यावेळी संभाजी कमळेला आपले दूसरे नाव सांगतो. प्रतापराव पवार सरदार असल्याच सांगतो. दोघांची भेट थोरातांच्या वाडयाच्या मागील बगीचामध्ये अनेक वेळेस होते. संभाजी कमळाला लग्नाची मागणी घालतो. कमळाही लग्नाला होकार देते. याबाबत संभाजी म्हणतो, "मग आम्ही भाग्यवंत म्हणायचे

---

[९३] *सोनसुरकर ना. के. : थोरातांची कमळा, अनंत प्रकाशन मुंबई न.२ (१९५१) प्रथमावृत्ती, पृ. क्र.४६*
[९४] *सोनसुरकर ना. के. : थोरातांची कमळा, उपरोक्त ४६*

मनाच्या आवडीप्रमाणे दोन जीव एकजीव व्हायला थोर नशीब लागतं."[९५] नागोजी माने यांची नजर कमळावर असते. तो थोरातांना कमळाच्या वर्तनाबद्दल सांगतो. थोरात कमळाला भेटणाऱ्या व्यक्तीचे नाव विचारतात. अशा नावाचा कोणी सरदार माझा ओळखीचा नाही म्हणून सांगतात. जो कोणी असेल त्याने सरदार असल्याची खात्री करून घ्यावी व पंचमीच्या आत तुला मागणी घालावी. नाहीतर तुझे लग्न नागोजी माने सोबत लावून देतो. अशा दोन अटी घालतात.

संभाजी महाराज मोगलांचा पराभव करण्यासाठी स्वारीवर गेलेले असतात. मानोजी मार्फत संभाजीला कमळा बाबतची माहिती मिळते. तेव्हा संभाजी स्वारी अर्ध्यावरती सोडून कमळेला भेटायला व थोरातांकडे मागणी घालण्यासाठी येतात; परंतु थोरात यावेळी कमळाच्या लग्नाचा बेत आखून लग्न समारंभ चालू करतात. तेवढ्यात संभाजी येतो. कमळेचं लग्न रोखण्याचा प्रयत्न करतो. थोरात व संभाजीमध्ये युद्ध होते. त्यामध्ये संभाजीच्या वाराने थोरात ठार होतात. संभाजी कमळाला घोड्यावर बसवून पळवून घेऊन जातात. रायगडावर ती बदनामीला कंटाळून आत्मसमर्पण करते. या घडलेल्या घटनेबद्दल शिवाजी महाराज संभाजीला दोषी माणून निशस्त्र करून पन्हाळगडावर नजरकैदेत राहण्याची शिक्षा देतात. हे शककर्त्याचा न्याय या नाटकामध्ये चित्रित केला आहे.

### ३.४.१३ मा.हा. कोचरेकर यांचे 'संगीत मानी मराठा' नाटक (१९५२) :-

'संगीत मानी मराठा' हे ऐतिहासिक नाटक मा. हा. कोचरेकर यांनी १९५२ मध्ये लिहिले. हे नाटक संभाजी महाराजांच्या छत्रपती बनल्यानंतरच्या आयुष्यावर आधारलेले आहे. कवी कलष यांनी संभाजीला पूर्णपणे वशीभुत करून स्वराज्याचा संपूर्ण कारभार आपल्या हातामध्ये घेतलेला आहे. त्याच्याच सांगण्यावरुन संभाजी राजांनी अष्टप्रधान मंडळातील सर्वच मुत्सद्दयांची, विरोधी मंडळीची हत्या केल्यामुळे गणोजी शिर्के हा संभाजीने शिर्क्यांच्या शिरकारणाचा बदला घेण्यासाठी मोगलास मिळून कलशा मार्फत संभाजीला पकडण्याचा बेत आखतो. हे नाटकामध्ये संभाजीची प्रतिमा ही ऐतिहासिक

[९५] *कामत माधव आप्पाजी : शककर्त्याचा न्याय , ग.पा परचुरे प्रकाशन मंदिर मुंबई १९५२ पृ.क्र १९*

म्हणजेच व्यसनी, व्यभिचारी किंवा स्त्रीलंपट, उताविळ कवी कलषांच्या मंत्रतंत्रावर विश्वास ठेवणारा अशी रंगवलेली आहे. कवी कलष चंडीकादेवीचा प्रसाद म्हणून संभाजीला मदीरेचे व्यसन लावतो. मंदीरेमध्ये धुंद असलेला संभाजी म्हणतो, "जगात माझी काळजी वहाणारं कुणी असेल, तर हे तीर्थ ! आणि दुसरे तुम्ही"[९६] असे कलशाला म्हणतात. अनेक स्त्रीयांना संभाजीच्या सहवासात अणण्याचे कार्य कबीजीच करत असतात.

तुळशी व संभाजीचे प्रेम संबंध नाटकामध्ये दाखविले आहेत. मद्यधुंद संभाजी तुळशीसोबत शिवा-शिवीचा खेळ खेळताना म्हणतो, "अग तू काय पकडतेस मला ? मी चिक्कार होऊन आलो म्हणून काय तुला सापडणार होय ! ये, ये ! माझ्या प्राणा ! हृदयेश्वरी ! ये ! ये ना अगं, माझ्यात आता राजेपणा नाही, आता हा तुझा गुलाम झाला आहे."[९७]

नाटकाच्या दुसऱ्या अंकामध्ये कलशा संभाजी महाराजांना राजाराम फितूर असल्याचे सांगून त्यांचा कसा बंदोबस्त करायाचा हा विचार करण्यासाठी दूर एकांतात संगमेश्वरी घेऊन येतो. संभाजीला मदिरा पाजवुन त्यांची तलवार काढून घेतो. तुळशीला वशीभूत करायला लावतो. गणोजी व मुकर्रबखानामार्फत संभाजीला पकडून देतो. पुढे संभाजीस पकडल्यानंतर साखळदंडाने बांधुन कैदखान्यात ठेवतात. तेथे पश्चात्तापाने जळत असलेला संभाजी दाखवलेला आहे. पश्चातापाच्या अग्नित होरपळत असलेला संभाजी म्हणतो, "जिवाचे रान करून प्राणापलीकडे तयार असलेल्या मराठेशाहीला जपणाऱ्या चिटणीच्या घराण्याचा मी नायनाट केला ज्या रणबहाद्दर शिर्क्यांनी मराठेशाहीचा मेरुपर्वत उभारायला आबासाहेबांना मदत केली, त्या शिर्क्यांच्या घरादारावरुन कुलांगाराते नांगर फिरविले .... आईला भिंतीत चिरडुन ठार केले.... परमपुज्य आबासाहेबांनी - महाराष्ट्र विरांनी रक्तांच पाणी करून नुकत्याच जन्माला घातलेल्या मराठेशाहीच्या गेंदेबाज कळीचा या दुष्टानं पायदळी तुडवुन चक्काचुर केला.... कल्याणच्या सुभेदारांची सुन आई म्हणून परत पाठविणारा माहात्मा कुणीकडे नि त्याच्याच पोटी जन्माला येऊन थोरातांच्या कमळेला, फर्जदाच्या पोरीला भ्रष्ट

---

[९६] *कोचरेकर मा.हा. : संगीत मानी मराठा, ग.पा. परचुरे प्रकाशन मंदिर ,मुंबई १९५२ पृ.क्र २३*

[९७] *कोचरेकर मा.हा.:, संगीत मानी मराठा, उपरोक्त, पृ.क्र ५१*

करणारा नराधम कुणीकडे या सगळ्या पातकामुळे माझ्यासाठी प्रत्यक्ष ब्रह्मदेवाला रौखादून घाणीनं तुडुंब भरलेले दालनंच उघडावं लागेल."[९८]

पुढे नाटकामध्ये औरंगजेबसमोर उभे करून संभाजीला मुस्लीम धर्म स्वीकार केलातर जीवहान दिले जाईल असे औरंगजेब म्हणतो. संभाजी स्वीकारण्यास तयार होत नाही. शेवटी हालहाल करून मारले जाते.

### ३.४.१४ आबासाहेब आचरेकर यांचे 'अमर जहाले छत्रपती संभाजी' नाटक (१९५७):

आबासाहेब आचरेकर यांनी १९५७ मध्ये 'अमर जहाले राजे छत्रपती संभाजी ' हे नाटक लिहिले. या नाटकामध्ये संभाजी राजे छत्रपती झाल्यानंतरच्या घटना चित्रित केलेल्या आहेत. आचरेकरांनी या नाटकामध्ये छत्रपती संभाजी महाराजांची प्रतिमा उताविळ, व्यसनी, व्यभिचारी तसेच कवी कलषाच्या बुवाबाजीवर विश्वास ठेवणारा पूर्णपणे कवी कलषाच्या हताचे बाहुले बनलेला असा रंगवलेला आहे.

या नाटकामध्ये संभाजीराजेंना कवी कलषाच्या सांगण्यावरून अष्टप्रधान मंडळातील सर्वच मुत्सद्दयांची हत्या केली. संपूर्ण कारभार आपल्या हातामध्ये घेतो. त्यामुळे राणी येसूबाई संभाजी राजाची समजुत काढण्याचा प्रयत्न करते. आज औरंगजेब आदिलशाही व कुतुबशाही नष्ट करून मराठा संपवण्यासाठी प्रयत्न करत आहे. ज्याठिकाणी सर्व जनता आनंदाने नांदत होती. ती आज दु:खी आहे. भुकेने मरत आहे. ज्या प्रजेने महाराष्ट्रासाठी रक्त सांडले आहे. त्या प्रजेच्या सुखासाठी कलशासारख्याचा नाद सोडा म्हणून सांगते तेव्हा संभाजी म्हणतो "राणीसरकार, आमच्या पंडित कलशाची बदनामी करू नका. पंडित कलशा आमच्या विरुद्ध नाहीत. महाराष्ट्र द्रोही नाहीत.... महाराष्ट्रापेक्षा पंडित कलशा आम्हाला मोठे वाटतात."[९९]

[९८] *कोचरेकर मा.हा. : संगीत मानी मराठा, ग.पा. परचुरे प्रकाशन मंदिर ,मुंबई १९५२, पृ.क्र ५३*
[९९] *आचरेकर आबासाहेब : अमर जहाले राजे छत्रपती शिवजी, त्रिदल प्रकाशन, मुंबई १९५७ पृ.क्र १३*

गणोजी शिर्के संभाजीने केलेल्या शिर्क्यांच्या शिरकारणाचा बदला घेण्यासाठी मोगलांशी संगनमत करून संभाजीचा सूड घेऊ इच्छितो. त्यासाठी रायगडचा किल्लेदार सूर्याजी पिसाळ व कवी कलष यांना जहागीरीचे आमिष दाखवितो. फितुरीसाठी प्रवृत्त करतो; परंतु अगोदर जहागीरीं द्यावी मगच संभाजीला तुमच्या स्वाधीन करतो अशी कलशा अट घालतो. त्यामुळे मोगलाचा सरदार शेखनिजाम औरंगजबाकडून जहागीरी बाबतचा एक खलिता कवी कलषाला पाठवता; परंतु तो येसुबाईचा विश्वासू सेवक इब्राहीमच्या हाती लागतो. इब्राहीम तो खलिता येसूबाईंना दाखवतात. संभाजीराजे राज्यामध्ये चाललेल्या फंदफीतुरीचा सुगवा लावण्यासाठी कलशांनाच सांगतात. कबजी फंदफीतुरीचा आळ राजारामावर घालतो. पुरावाही देईन म्हणतो. येसुबाई कलशाच्या फितुरीचा पुरवा संभाजी राजांना दाखवते. तेव्हा कलशा देवीची शपथ घेऊन सांगतो. मी फितुरी केली नाही. फितुरी केल्यामुळे संभाजी पंडितजीला चाबकाने फटके मारतात तेव्हा चंडिका देवी संचारल्याचं ढोंग करतो. म्हणतो गुन्हा या लेकरानं केलेला नाही. गुन्हेगार दुसरेंच आहेत. तेव्हा संभाजी चाबुक टाकुन कलशाच्या पायावर लोटांगन घेत म्हणतात "देवी आम्हांला क्षमा करा"[१००] अशा प्रकारे कबिजीच्या संपूर्णपणे आहारी केलेला संभाजी या नाटकामध्ये चित्रित केला आहे.

संभाजीराजांना कबिजीच चंडीकादेविचा प्रसाद म्हणून दारुचे व्यसन लावतात. मद्यधुंद व रंगेल अशी प्रतिमा या नाटकामध्ये रंगवलेली आहे. गजरा अरन कोल्हाटयाची मुलगी नाचगाने करत असते. ती कबिजीच्या दृष्टीस पडते. संभाजीला वश करण्यासाठी पाठवतो. संभाजी गजरेवर पूर्णपणे मोहीत होतात. तिच्या सहवासात मदिरापान करतात. संभाजी गजरेला म्हणतात. "गजरे तू आमच्या श्रृंगारांची लावणी आहेस. चमचमणाऱ्या चांदण्याच्या शामियानतल्या चंद्राच्या झुंबराखाली, छुमछुमणाऱ्या पैंजणाच्या तलावार ढंगदार लावणी छेडणारी तू यावनी कंचनी आहेस. चंदेरी चटक चांदण्याच्या रसेल रंगेल्या रसरशीत रंगावली रात्रीतली तू रुपसुंदर गोरीपान जुल्मी जळती जवानी आहेस. श्वासावर हसता हसता.... जवानीवर मदिरा सोडीत गतायुष्याची पान विस्कटणाऱ्या संभाजी राजांच सर्वांग

[१००] *आचरेकर आबासाहेब: अमर जहाले राजे छत्रपती शिवजी, त्रिदल प्रकाशन, मुंबई १९५७ पृ.क्र ४७*

तुझ्या श्रृंगारानं शहारुन गेले आहे. सुंदरी"[१०१] अशा प्रकारे गजरा व संभाजी प्रेमश्रृंगार या नाटकामध्ये दाखवला आहे.

या नाटकाच्या उत्तरार्धात कवी कलष संभाजी राजांना धार्मिक अनुषंगाच्या निमित्ताने रायगडावरुन संगमेश्वरीच्या वाडयात नेतो. यांचा सुगावा सूर्योजी मार्फत शेखनिजाम व गणोजी शिर्केनां लागतो. संगमेश्वरी गजरा संभाजीना कलशापासून सावधकरण्याचा प्रयत्न करते; परंतु संभाजी कलशावर पूर्ण विश्वास ठेवून भरपुर मद्य पितात तलवार काढून देतात. इब्राहीम संभाजीराजांना घेऊन जाण्यासाठी येतो. तेव्हा संभाजी म्हणतो "ह्या दारुड्या संभाजीसाठी..... आपण हे साध्य का केलंत ? आता माझ्या पळण्यात काही अर्थ नाही. इब्राहीम" [१०२] पश्चातापाने जळत असलेला संभाजी दाखवेला आहे. संभाजी म्हणतो "आमच्या महाराष्ट्रासाठी हिंदुपद पादशाहीसाठी आम्हांला काहीतरी करून मरुदे भगव्या झेंड्यावर आमच्या रक्ताचा आम्हाला तिलक लावुदे.... अवघ्या हयातीत आम्ही अविचारपणानंच वागलो. आमचं सारं आयुष्य दुराचारानं बटबटलं आहे. आमच्या प्रजेच्या आत्म्याला आम्ही क्लेश दिले. दुष्टपणानं वागुन मानवतेला काळीमा लावला माणुसकीला विसरुन जनतेच्या भावना आम्ही पायतळी तुडवल्या नादानकीच्या वर्तनानं नालायक बनलेल्या संभाजीला केलेल्या कृत्याबद्दल आता पश्चाताप होत आहे."[१०३]

शेखनिजाम संभाजीला पकडतो. औरंगजेबासमोर उभे केले जाते. संभाजी समोर मुस्लीम धर्म स्वीकारलात तर जीवदान देण्यात येईल. असा प्रस्ताव ठेवला जातो. संभाजी त्यास नकार देतो. संभाजीला हालहाल करून मारले जाते. असे नाटकामध्ये दाखविले आहे.

### ३.४.१५ लक्ष्मण विठोबा सांडप याचे 'छत्रपती संभजी' नाटक (१९६४) :

छत्रपती संभाजी हे नाटक लक्ष्मण विठोबा सांडप यांनी १९६४ मध्ये प्रकाशित केले. या नाटकामध्ये सांडपानी संभाजी महाराजांच्या राज्यरोहणापासून ते मृत्युपर्यंतच्या घटनेवर हे नाटक आधारित आहे.

---

[१०१] *आचरेकर आबासाहेबः अमर जहाले राजे छत्रपती शिवजी, त्रिदल प्रकाशन, मुंबई १९५७ पृ.क्र ६०*

[१०२] *आचरेकर आबासाहेबः अमर जहाले राजे छत्रपती शिवजी, उपरोक्त पृ.क्र ९८*

[१०३] *आचरेकर आबासाहेबः अमर जहाले राजे छत्रपती शिवजी, उपरोक्त पृ.क्र ९८, ९९*

पन्हाळगडावर छत्रपती संभाजी राजे नजरकैदेत असतानाच शिवाजी महाराजांना अष्टप्रधान मडंळीतील व्यक्ती व सोयराबाई विष देऊन मारतात. याची खबर संभाजीला न लागू देता राजारामाला रायगडाच्या गादीवर बसवतात. संभाजीचा कैदेमध्येच कडक बंदोबस्त करण्याच्या जबाबदारीसाठी मालसावंताची नेमणूक करतात. मल्हारी या सेवकाकडून संभाजीला झालेल्या कटाची माहिती होते. संभाजीराजे हंबीररावांच्या मदतीने रायगडची गादी मिळवतात. कवी कलषांच्या सांगण्यावरुन अष्टप्रधान मंडळातील मुत्सद्दयांना ठार मारतात. गणोजी शिर्के यांनी सोयराबाई सामील असल्यामुळे शिर्क्यांचे शिरकाण करतात. त्यामुळे गणोजी शिर्के शिरकाणाचा सूड घेण्यासाठी मोगलांना जाऊन मिळतो. शेवटी संगमेश्वरी गणोजी व शेखनिजामाकडुन संभाजी पकडले जातात. त्यांना हालहाल करून ठार केले जाते. असे नाटकाचे कथानक आहे.

लक्ष्मण विठोबा सांडपानी इतर नाटकाप्रमाणे संभाजीचे अनैतिहासिक चित्र या नाटकामध्ये रंगविलेले आहे. संभाजीला प्रथम गुन्हेगाराप्रमाणे पन्हाळयाच्या कैदेतच दाखविले आहे. कैदेबद्दल संभाजी येसूबाईस म्हणतो. "नाही नाही येसू आता मात्र आमच्या सहनशक्तीचा कडेलोट झाला आहे. मोकळया वातावरणात स्वच्छंदाने विहार करणाऱ्या शुकला पिजऱ्यांत कोंडून ठेवल्यानंतर तो झुरुन झुरुन कां मरतो याचा आम्हाला आता अनुभव आला..... कमरेला समशेर नाही. सामर्थ्याला स्वारी शिकार नाही. की कर्तृत्वाला कामगीरी नाही."[१०४]

कवी कलषाच्या संपूर्णपणे आहारी गेलेले संभाजी या नाटकामध्ये दाखवले आहेत. कलषाच्या सांगण्यावरुन अष्टप्रधान मंडळीतील सर्वच मुत्सद्दयांना ठार करतात. शिर्क्यांचे शिरकाण करतात. कबिजीच्या मंत्रतंत्रावर विश्वास ठेऊन संगमेश्वरी जातात. हवन करत असलेल्या कवीला म्हणतात. "आमच्याच्यानं आता धिर धरवत नाही. पन कवीराज हे तुमचे हवन पुरे झाले. की चारी बाजुनं उठलेल्या शत्रुची वावटळ बंद होईल.बोला छंदोगामाल्य

---

[१०४] *सांडव लक्ष्मण विठोबा: छत्रपती संभाजी, महानंद प्रकाशन तुळशी पाईप रोड, मुंबई (प्रथमावृत्ती) १९६४ पृ.क्र ९, ११*

अजुन आटोपलं की नाही तुमच होम हवन ? आम्हांला तिर्थप्रसाद केव्हा देणार "[१०५] असा गाफील मदीरेसाठी आतुर असलेला संभाजी दाखवला आहे.

मोगलाच्या कैदेत असताना संभाजी राजांवर एका गुढ आवाजामार्फत त्यांच्यावर अनेक आरोप केलेले या नाटकामध्ये दाखविले आहे. तुझ्याकरिता कुणीही अश्रु ढाळणार नाही किंवा दु:खाचा साधा सुस्कारही सोडणार नाही. कारण तुझी कारकिर्दच तशा दुष्कृत्यांनी भरलेली आहे. अत्याचारांनी ओथंबलेली आहे. तुझे हात रक्ताने माखलेले आहेत. तुझ्या रागाला हकनाक बळी पडलेल्या जिवांचे आत्मे तुला शिव्याशाप देत असतील. त्यांची बायकामुले तुझ्या नावाने बोटे मोडीत असतील आणि जे कोणी देशोधडीला लागले असतील ते तुझ्या मरणाची वाट पहात असतील."[१०६]

या नाटकाच्या शेवटी संभाजीराजांना औरंगजेबासमोर उभे केले जाते. औरंगजेब संभाजीला इस्लाम धर्म स्वीकारल्यास राज्य व इनाम देऊन मुक्त करतो असे म्हणतो. तेव्हा संभाजी म्हणतात, "मग बादशहांनी युवराज्ञीला पवित्र मराठा धर्माची दीक्षा देऊन माझी राणी करावी."[१०७] म्हणजे संभाजीना औरंगजेबाने मुलगी दिली तर इस्लाम स्विकार होईल अशा प्रकारचाही अरोप नाटकामध्ये केला आहे."

### ३.४.१६ ह. ग. गोंडसे यांचे 'राजयाचा पुत्र अपराधी देखा' नाटक (१९६४) :

ह. ग. गोंडसे यांनी सती गोदावरीच्या लोककथेवर आधारित छत्रपती संभाजी महाराजाच्या जीवनावर १९६४ मध्ये "राजयाचा पुत्र अपराधी देखा" हे ऐतिहासिक नाटक लिहिले. या नाटकामध्ये गोदावरीची लोककथाच नाटक स्वरुपामध्ये मांडलेली आहे. रायगडजवळील वाल्या गावचे गंगाधरपंतांची ब्राह्मणाची विवाहित मुलगी गोदावरी हिला संभाजी राजे शिकारीवरुन येत असताना पानवट्यावरुन पळवून नेऊन लिंगाण्याच्या किल्ल्यावर ठेवतात. गंगाधरपंत गोदावरीचे वडील न्याय मिळवण्यासाठी रायगडावर

[१०५] *सांडव लक्ष्मण विठोबः छत्रपती संभाजी, महानंद प्रकाशन तुळशी पाईप रोड, मुंबई (प्रथमावृत्ती) १९६४ पृ.क्र ८१*
[१०६] *सांडव लक्ष्मण विठोबः छत्रपती संभाजी, उपरोक्त पृ.क्र ४*
[१०७] *सांडव लक्ष्मण विठोबः छत्रपती संभाजी, उपरोक्त पृ.क्र ८७*

जिजाऊकडे येऊन घडलेली हाकिकत सांगतात. ही घटना ऐकल्यानंतर जिजाबाई अस्वस्थ व्याकुळ, अस्वस्थपणे विचार करताना दाखविले आहे. "त्या ब्राह्मणाची लग्न झालेली मुलगी शंभुराजांनी.... छे ! त्या कल्पनेचा पुनरुच्चार सुद्धा करवत नाही. तापलेल्या सांडसानं लासावं त्याप्रमाणे दर शब्दागणिक अंगावर डागण्याचे दाहक वळ उठताहेत शब्दांचे जहरी जळते. बाण शरीराला चौगीर्द विद्ध करून सारं शरीर अंगारनिखारानं आतुन बाहेरुन होरपळुन काढीत आहेत.. स्मरणाच्या गाभाऱ्यात त्या दुष्ट शब्दाचे सादपडसाद एकच कर्कश कोलाहल माजवीत आहेत. आई भवानी काय ऐकल मी हे ! ऐकु येत नाही त्या वयात ऐकु नये ते नेमक ऐकलं ! हे ऐकण्याकरिता का या जिजाऊला तू एवढं आयुष्य दिलंस ? हे ऐकण्याकरिता का आजीच्या उतारवयापर्यंत जिजाऊ जगली ? या कानानी आजपर्यंत उदंड ऐकलं ! परंतु एवढया भयंकर अर्थाचे शब्द उभ्या आयुष्यात कधी ऐकले नव्हते.... निर्धारात दगड बनलेल्या मनाला तडे पाडणाऱ्या शेकडो भल्याबुऱ्या बातम्या ऐकूनही स्वस्थ न होणारी जिजाऊ आज त्या म्हात्याऱ्यांच्या तोंडच्या चारदोन शब्दांनी बैचेन झाली वाकली-म्हातारी झाली."[१०८]

जिजाऊ मोरोपंतामार्फत संभाजीला रायगडावर येऊन भेटण्याचा लाखोटा पाठवतात. शिवाजी महाराजांनाही गोदावरीच्या प्रकरणाची माहिती लागते. ते ताबडतोब प्रतापगडावरून रायगडावर येतात. मोरोपंत शिवाजी महाराजांच्या आज्ञेवरुन गोदावरीची सुटका करून रायगडावर घेऊन येतात. जिजाऊ गोदावरीचे सांत्वन करते. राजांना तिच्या पायावर डोई ठेवून तिची क्षमा मागण्यास सांगितले. जिजाऊ व शिवाजी महाराज गोदावरीला तिच्या घरी पाठविण्याची तयारी करतात. त्यासाठी मोठ्या प्रमाणात दाग-दागिने शाही पालखिची सोय करतात; परंतु गोदावरी आपण माहेरी अथवा सासरी कोठेही जाणार नसून अग्निप्रवेशाचा निर्धार जाहीर करते. सती जाण्यापूर्वी अवघ्या चितेला शंभुराजांनी अग्नि द्यावा अशी गोदावरी विनंती करते पावडाच्या परीसरात फुल वेचताना संभाजी राजांची गोदावरीशी भेट होते तेव्हा संभाजीराजे घडलेल्या घटने बद्दल क्षमा मागतात व गोदावरीला अग्निप्रवेशापासून रोखण्याचा

---

[१०८] *गोडसे द.ग. : राजांचा पुत्र अपराधी देखा , प्रकाशक पॉप्युलर बुक डेपो लॅमिंग्टन रोड, मुंबई १९६४ पृ.क्र १२*

प्रयत्न करतात; परंतु गोदावरी अग्निप्रवेशाचा निश्चय सोडत नाही. शेवटी अग्निप्रवेशासाठी तयारी केली जाते. गोदावरी सतीमध्ये प्रवेश करण्याअगोदर सर्वजन तिचे आशीर्वाद घेतात. ती प्रत्येकांना आपल्या गळयातले अलंकार देत असते. शेवटी सर्व अलंकार संपतात संभाजीला मरण धैर्याने जगण्याचा आशीर्वाद देऊन सती जाते.

### ३.४.१७ अर्जुनराव झेंडे यांचे 'अश्रू ढळले रायगडाचे' नाटक (१९६७) :

अर्जुनराव झेंडे यांनी 'अश्रु ढळले रायगडाचे' या नावाचे छत्रपती संभाजी महाराजाच्या जीवनावर आधारित नाटक १९६७ मध्ये प्रकाशित केले. अर्जुनराव झेंडे यांनी या नाटकामध्ये छत्रपती संभाजी राजांची रंगेल अशी प्रतिमा दाखविली आहे. तुळशी व मदिरेच्या आहारी गेलेला, रंगेलबाज आणि स्त्रीलंपट असा संभाजी दाखविला आहे. मदिरेसाठी तुळशीच्या सहवासासाठी आतुर झालेला संभाजी तुळशीला म्हणतो. "तुळशी, मनाचा मनस्ताप घालविण्यासाठी मी या मदिरेला जवळ केली; पण त्यानेही मला कधी समाधान मिळालं नाही. पण तुझ्या सहवासातील ते क्षण प्रत्यक्ष विश्वासारखे वाटतात. अहाहा सारी दुःख मनस्ताप पार बारा कोस लांब पळाला ! तुळशी रमणीय रमणीयाच्या हातुन मद्याचा प्याला ओठाला लावणं यापरत आमृत ते कोणतं ? वाटतं जगाच्या अंतापर्यंत तुझ्या हातचे सुरेचे प्याले सारखे पित रहावे."[१०९]

तुळशीच्या विरहाने व्याकुळ झालेल्या संभाजी तुळशीस म्हणतो, "तुझ्या अधराच पान करण्यासाठी माझे अधर कसे उत्सुक होत असतात. तुला अलिंगन देण्यासाठी, ह्दयाशी कवटाळण्यासाठी बाहु कसे स्फुरत असतात. ह्दयांत सारखी धडपड होत असते. तुझ्या दर्शनासाठी डोळे आतूर असतात. मन-मन मिळविण्यासाठी उताविळ होत असत.... वाटतं कर्तव्याची सारी बंधने तोडून राज्याच्या दगदगीतून दूर दूर कुठेतरी तू आणि मी दोघे मिळून निसर्गाच्या सानिध्यात प्रेमाचे खेळ मनसोक्त खेळत राहवं !"[११०] तुळशी संभाजीला म्हणते, 'आपल्या विषयी सारी मराठेशाही कुजबुजते आहे.' तेव्हा संभाजी म्हणतो, "अस असेल तर

[१०९] *झेंडे अर्जुनरावः सं. अश्रु ढळले रायगडचे , त्रिदल प्रकाशन, मुंबई (प्रथमावृत्ती)१९६७ पृ.क्र १०, ११*
[११०] *झेंडे अर्जुनरावः सं. अश्रु ढळले रायगडचे, उपरोक्त पृ.क्र ३३, ३४*

साऱ्या मराठेशाहीच्या दौलतीवर लाथ मारुन स्वहस्ताने राजसंन्यास घ्यायला आम्ही मागं पुढं पाहणार नाही. साऱ्या व्यापातुन मुक्त झालेला आणि फक्त तुझ्याच सहवासात खऱ्या प्रेमाचा स्वाद घेण्यासाठी आतुर झालेल्या या संभाजीला कडाडुन अलिंगन दे." अशाप्रकारे मदिरा व मदिराक्षींच्या मोहजाळयात अडकलेला संभाजी या नाटकामध्ये चित्रित केलेला आहे.

कवी कलषांनी पूर्णपणे वशीभूत केलेला संभाजी या नाटकामध्ये दाखविलेला आहे. फितुर कवी कलष आणि शिर्क्यांच्या शिरकाणांचा सूड घेण्यासाठी आतूर असलेल्या गणोजी शिर्केमार्फत संभाजीराजे संगमेश्वरी तकरीबखानाकडून पकडले जातात. मोगलाच्या कैदेत पश्चातापाच्या अग्नित जळत असलेला संभाजी दाखवला आहे. संभाजी म्हणतो "आबासाहेबांनी मिळवलेली ही दख्खनची दौलत दारुच्या धुंदीत आणि बायकांच्या बाहुपाशात स्वतःला गुरफटुन उधळुन टाकली. कीर्तीच्या राशीवर मदिरेच्या चुळा टाकुन अपकीर्तीच्या राशीचे डोंगर बनवीले ! आबासाहेबांच्या वेळच्या नेकजात इमानी सरदारांना हत्तीच्या पायी तुडवुन आम्ही आमच्या कर्तबगारीचा पाया घातला. आई-साहेबांना भिंतीत चिणुन यशाच्या भिंती उभारल्या मग त्या पापाच्या इमारतीचा कळस कोसळुन त्याखाली या संभाजीचा कपाळ मोक्ष झाला तर त्यात नवल ते कोणते ;"[१११]

संभाजी मोगलाच्या कैदेत असताना खंडोजी हा राष्ट्रभक्त सेवक राजांना सोडविण्यासाठी येतो. त्यास संभाजी म्हणतो. "नाही खंडोजी, महाराष्ट्रात या नालायक संभाजीची गरज नाही. तुझ्यासारख्या नेकजात सेवकाचीच जरुरी आहे. म्हणून सांगतो हा लाख मोलाचा प्राण का खर्ची घालतोस ? .... खंडोजी या संभाजीनं आत्मस्वकीयांसाठी काय केलं आहे ? जन्मल्यापासुन मी जीवंत राहीलो तो फक्त साऱ्यांचा बोझा बनुनच ! मग सांग असं मी जिवंत असलो काय, नसलो काय ? महाराष्ट्राला त्याची मुळीच गरज नाही."[११२]

मोगलाच्या कैदेतून सोडवायला आलेल्या खंडोजी समोर केलेल्या हृदयकृत्यांचा पाया ऐकवताना संभाजी म्हणतो, "खंडोजी; तुझ्या पवित्र चरणानी माझे हे पापी मस्तक ठेचुन काढ

[१११] *झेंडे अर्जुनरावः सं. अश्रु ढळले रायगडचे, त्रिदल प्रकाशन, मुंबई (प्रथमावृत्ती)१९६७ पृ.क्र ६६,६७*
[११२] *झेंडे अर्जुनरावः सं. अश्रु ढळले रायगडचे, उपरोक्त पृ.क्र ६८*

म्हणजे ते पवित्र होईल. ऐक खंडोजी; तुझ्या पापी राजाच्या पापाचा पाया ऐक. अरे मी जातीनं क्षत्रीय पण कृतीनं मांग निघालो. ज्या क्षत्रीयाचं कर्तव्य असहाय्य आणि दुर्बलाचं संरक्षण करणं त्या हया माझ्या हातांनी मी फक्त बायकांचे पदर ओढले. लढाईच्या मैदानावर, वाऱ्याप्रमाणे तलवार फिरवुन क्षत्रुची मस्तके धडापासून वेगळी करायची त्या ह्या हातांनी मी फक्त बायकांच्या काचोळ्याच सोडल्या दारुसारख्या भ्रष्ट आणि निंद्य वस्तुला पवित्र उदरात स्थान देऊन मी माझं पवित्र उदर विटाळला सितेसारख्या पवित्र पत्नीला जन्मभर त्रास देऊन. तिला तिच्या सर्व सुखांपासून वंचित केलं. भोसल्याच्या पवित्र कुळाला माझ्या काळया करणीनं काजळ फासलं"[११३] अशा प्रकारे या नाटकामध्ये संभाजीची अनैतिहासिक प्रतिमा रंगवलेली आहे.

### ३.४.१८ शंकर बळवंत चव्हाण यांचे 'सती गोदावरी' नाटक १९६७ :

'सती गोदावरी' हे मराठी नाटक शंकर बळवंत चव्हाण यांनी १९६७ मध्ये लिहिले. जे की संभाजी महाराजांनी पळवून नेलेल्या एका ब्राह्मण विवाहित तरुणीच्या लोककथेवर आधारलेले आहे. शंकर बळवंत चव्हाणांनी हे नाटक तीन अंकांमध्ये लिहिले असून पहिल्या अंकामध्ये मासाहेब जिजाऊ हयात असतानाच संभाजी महाराज शिकारीच्या निमित्ताने रायगडावरुन बाहेर जातात आणि रायगडाच्या परिसरातील वाल्हे गावच्या एका रामचंद्र नावाच्या ब्राह्मणाच्या रूपसुंदर विवाहित मुलीला पळवून नेतात. या अपराधाचा त्यांना तिळमात्रही पश्चाताप नाही. असे नाटकामध्ये दर्शविले आहे.

या नाटकामध्ये संभाजी राजांची प्रतिमा स्वच्छंदी, उताविळ, तापट, व्यभिचारी रंगवलेली आहे. संभाजीराजे गोदावरीला पळवून आणून किल्ले लिंगाण्यावरील एका वाड्यात ठेवतात. गोदावरीची मनधरणी करण्याचा प्रयत्न करतात. "काहीही बोल पण आमच्याशी बोल गोदा! तुझ्या एका एका शब्दासाठी, तुझ्याकडे धाव घेतोय गोदावरी."[११४] परंतु गोदावरी संभाजी राजांना आपण शिवाजी महाराजाचे पुत्र आहात. आपणास असे वागणे

---

[११३] *झेंडे अर्जुनराव: सं. अश्रु ढळले रायगडचे, त्रिदल प्रकाशन, मुंबई (प्रथमावृत्ती)१९६७ पृ.क्र ६९*
[११४] *चव्हाण शंकर बळवंत: सती गोदावरी, चद्रंकात शेटये प्रकाशन मंदिर, कोल्हापुर १९६७ पृ.क्र १८*

शोभत नाही. आपण मर्यादा ओलांडू नका सांगते तेव्हा संभाजी म्हणतो, "गोदावरी ! गोदावरी आम्ही काय केलं म्हणजे तुझ्या रागाचं अनुरागात रुपांतर होईल ते तरी सांग गोदावरी"[११५] अविचार करतो. पण गोदावरी संभाजी राजांना केलेल्या कृत्याबद्दल शिवशाहीमध्ये कोणते दंड दिले जातात यांची भीती घालत. संभाजी राजे म्हणतात, "भय घालतेय आम्हाला, महाराजांच्या सजेचे करून करून महाराज अधिक काय करतील? हात-पाय तोडतील डोळे काढतील गर्दन मारतील एवढंच ना?" पण गोदावरी तुझ्या सहवासातील क्षणाच्या सुखापुढं अनंत दुःखानी भरलेलं मरणसुद्धा आम्हाला तुच्छ आहे गं."[११६] अशा प्रकारे स्त्रीलंपट, व्यभिचारी अशी प्रतिमा या नाटकामध्ये दर्शवलेली आहे.

या नाटकात पुढे हंबीरराव संभाजीस पकडून शिवाजी महाराजांसमोर ऊभे करतात. दुःखी व संतापग्रस्त शिवाजी, संभाजी राजांना केलेल्या अघोरी कृत्याची जाणीव करून देण्याचा प्रयत्न करतात. यांवर संभाजी म्हणतात. एका गाफील क्षणी अलौकिक लावण्याच्या दर्शनात बेहोषी आली संयम सुटला."[११७] याला आपलीच करडी शिस्तच जबाबदार आहे. ज्याच्यामुळे आजवर आम्ही मन मारुन भावना कोंडून ठेवून; आशा आंकाक्षा दडपुन टाकुनच सारा कोंडमारा केला. त्याचा हा उद्रेक आहे असे म्हणतात. सद्हेतुने मोठे करण्यासाठी एका चांगला शासक निर्माण करण्यासाठीच करडी शिस्त निर्माण केली. त्याचाही संभाजीने असा उलट अर्थ घेतल्यामुळे शिवाजी महाराजांना वाईट वाटते.

नाटकाच्या दुसऱ्या अंकामध्ये संभाजीला हात तोडण्याची व डोळे काढण्याची सजा होऊन त्याला बंदीखान्यात पाठविले जाते. तेथे धाराऊ संभाजीला भेटते आणि सांगते खरी अपराधी मी आहे. माझे दुध तुम्हांला पाजल्यामुळे तुमची बुद्धी चवळली. माझं दूध खोट निघालं असे म्हणते. आबासाहेब व मासाहेब म्हणजे शिवाजी महाराज व जिजाऊ तुम्हाला शिक्षा सुनावल्यापासुन किती दुःखी आहेत. हे सांगते तेव्हा संभाजीला मासाहेब व शिवाजी

---

[११५] *चव्हाण शंकर बळवंतः सती गोदावरी, चद्रंकात शेटये प्रकाशन मंदिर, कोल्हापुर १९६७ पृ.क्र २*
[११६] *चव्हाण शंकर बळवंत, सती गोदावरी , उपरोक्त, पृ.क्र २१*
[११७] *चव्हाण शंकर बळवंतः सती गोदावरी, उपरोक्त पृ.क्र २७*

महाराजांना दोष दिल्याचा पश्चाताप होतो. गोदावरी सती जाण्याचा निश्चय करते. पुढे राजांना आपले पिताजी आणि जिजाऊ यांच्या प्रेमळ हृदयाचा साक्षात्कार होतो. अखेर गोदावरी संभाजी राजांच्या हस्ते चुड लागावी अशी इच्छा व्यक्त करते. ती शंभुराजांची बहीण नव्हे तर आई होते. मरणाला हसतमुखानं सामोरे जाण्याचं सामर्थ्य लाभो. मृत्युचं मोल व्हावं. आत्मसामर्थ्य लाभो, असा गोदावरी सती जाताना शंभुराजांना आशिर्वाद देते.

### ३.४.१९ आबासाहेब आचरेकर यांचे 'सह्याद्री सांगे कथा शंभुची' नाटक (१९६८):

'सह्याद्री सांगे कथा शंभुची' हे नाटक आबासाहेब आचरेकर यांनी १९६८ मध्ये प्रकाशीत केले. हे नाटक संभाजी राजांच्या जीवनावर आधारित असून शिवाजी महाराज हयात असताना संभाजी दिलेरखानाकडे कशामुळे गेले. या कथानकाचा उवापिट यामध्ये केला आहे. आचरेकरांच्या या नाटकात संभाजी राजे हे व्यसनी, स्त्री शौकीन बेजबाबदार असे दाखविले आहे. गजरा आणि संभाजी यांच्या प्रणय प्रसंगाचे चित्रण या नाटकामध्ये दाखविले आहे. गजरा नाचणारी तमासगीर असून तिचं संभाजी राजांवर प्रेम आहे. संभाजी राजे जेव्हा मदिरेची सुरई उचलून पितात तेव्हा गजरा त्यांना रोखण्याचा प्रयत्न करते. तेव्हा संभाजी तिला म्हणतो, "श्रृंगाराची लावणी आहेस तू ! रसभरीत लावणी छेडुन रसरशीत रात रंगवायची एवढीच तुझी जबाबदारी. तुला या गोष्टी हव्यात कशाला?"[११८] संभाजीच्या दुर्वर्तनामुळे व्यथीत शिवाजी महाराज म्हणतात, "शौक तुम्ही आता बंद करा ! रात्री-अपरात्री तुम्ही मैफिलीला जाता हे तुमच्या प्रतिष्ठेला साजेसं नाही... सहस्त्र हत्तींच्या बळानं चालत जाऊन गनिमीच्या छातीत तलवार खुपसण्याची ताकद तुमच्या मनगटात असल्याचे आम्ही जाणुन आहोत, पण शराबीच्या धुंदीत तुम्हीच जर असे राहु लागतात. तर तुमच्या अंगातलं ते शौर्य वाया नाही का जाणार ?"[११९] अशा प्रकारे संभाजी राजांना समजावण्याचा प्रयत्न शिवाजीराजे करताना नाटकामध्ये दाखविले आहे. नाटकाच्या शेवटी संभाजीराजे शिवाजी महाराजांशी भेटून केलेल्या कृत्याबद्दल माफी मागतात. स्वराज्यात परत येतात हे दाखविले आहे.

---

[११८] *आचरेकर आबासाहेब: सहयाद्री सांगे कथा शंभुची, त्रिदले प्रकाशन, मुंबई १९६८ पृ.क्र १०*
[११९] *आचरेकर आबासाहेब: सहयाद्री सांगे कथा शंभुची, उपरोक्त पृ.क्र १२-१३*

### ३.४.२० वसंत कानेटकर यांचे 'इथे ओशाळला मृत्यु' नाटक (१९६८) :

वसंत कानेटकर यांनी 'इथे ओशाळला मृत्यु' हे नाटक १९६८ मध्ये लिहिले. संभाजी राजेंच्या आयुष्यावर आधारित आहे. औरंगजेबाच्या मुलगा अकबराला संभाजी आश्रय देऊन मोगलाच्या सत्तेला आव्हान देतात. त्यामुळे औरंगजेब प्रचंड सैन्य घेऊन दिक्षणेत उतरतो. त्याला संभाजी राजे निकराची झुंज देऊन त्यांची आक्रमणे परतून लावतात. त्याच सुमारास स्वराज्यातील अष्टप्रधान मंडळातील मंत्री संभाजीच्या विरोधात कटकारस्थान करतात. ते कारस्थान संभाजीराजे हाणून पाडतात. फितुरी लोकांना कडक शिक्षा करतात. महाराणी येसुबाई सुद्धा या नाटकामध्ये अतिशय कणखर धाडसी संभाजीला सतत प्रोत्साहन देणारी सल्ला देणारी दाखविले आहे.

वसंत कानेटकरांनी या नाटकामध्ये साहसी, पराक्रमी, मोगलाच्या आक्रमणाला न जुमानणारा संभाजी जरी दाखवलेला असला तरी संभाजीच्या चारित्र्यावर अनेक आरोप त्याने नाटकामध्ये केलेले आहेत. व्यसनी नाटकशाला बाळगणारा कबीजीच्या आहरी गेलेला, व्यभिचारी असा संभाजी ही दाखवलेला आहे. गणोजी शिर्के जेव्हा येसुबाईंना संभाजीच्या वर्तनाबद्दल चर्चा करतो. संभाजीमध्येच प्रवेशकरून म्हणतात, "हां हां ऽऽ जरूर बाळगल्या आहेत. शिर्के ज्याचं लावण्य पाहुन तुमचा दिल बैचेन होईल अशा एकापेक्षा एक खुबसुरत अप्सरा आहेत. आमच्या जनानखाण्यात बोला तुम्हाला हवी आहे. का त्यांतली एखादी ?"[१२०]

गणोजी शिर्के संभाजीच्या विरोधामध्ये राहून मोगलांना मिळतो. मोगलांचे चौफेर होत असलेले हल्ले, हताश होऊन केलेल्या कृत्याबद्दल पश्चाताप या नाटकामध्ये दाखविलेले आहे. मातेचा आमच्यावर कोप तर झाला नाही ? ... बाळाजी आवाजी अण्णाजी दत्तो, हिरोजी फर्जद यांचे तळतळाट तर आम्हांला भोवत नाहीत ? आबासाहेब .... नाही राणीसाहेब जशी साधना करावी तशी फळ पावतात आणि तशाच वृत्ती बळावतात... गोदावरी सतीचा शाप ... गोदावरी सती ... मला क्षमाकर "[१२१]

---

[१२०] *कानेटकर वसंतः इथे ओशाळला मृत्यु , पॉप्युलर प्रकाशन , मुंबई १९६८ पृ.क्र १६*
[१२१] *कानेटकर वसंत : इथे ओशाळला मृत्यु , उपरोक्त, पृ.क्र ४३*

नाटकाच्या उत्तरार्धामध्ये संभाजीराजे कवी कलषासोबत विश्रांतीसाठी संगमेश्वराला जातात. गणोजी मार्फत ही बातमी मोगलांना कळते. शेखनिजाम संभाजीराजांना कैद करतात आणि औरंगजेबासमोर हाजीर केले जाते. त्यावेळी त्याचे वर्तन अतिशय बाणीदारपणे होते. त्यांनी औरंगजेबासमोर मान वाकवली नाही. त्यांनी दयेची याचना केली नाही. शेवटी निर्भयपणे मृत्युला कवटाळतात. असे या नाटकामध्ये दाखविले आहे.

## प्रकरण चौथे

# वास्तविक छत्रपती संभाजी राजे

४.१ प्रस्तावना

४.२ बखरकारांनी निर्माण केलेल्या संभाजीराजांच्या अनैतिहासिक प्रतिमेची चिकित्सा

४.३ मराठी साहित्यात निर्माण केलेली संभाजीराजांची अनैतिहासिक प्रतिमेची चिकित्सा

## प्रकरण चौथे

# वास्तविक छत्रपती संभाजी राजे

### ४.१ प्रस्तावना

मराठ्यांच्या इतिहासात स्वराज्य संस्थापक छत्रपती शिवाजीमहाराजांच्या नंतर सर्वाधिक लोकप्रिय व्यक्तिमत्व म्हणून छत्रपती संभाजीराजेंचे नाव नावारूपास आलेले आहे. छत्रपती शिवाजी महाराजांच्या मृत्युनंतर स्वराज्याचे रक्षण करण्याची महत्त्वपूर्ण जबाबदारी छत्रपती संभाजीराजांनी पार पाडली. त्यांच्या पराक्रमामुळेच प्रचंड शक्तीनिशी स्वराज्यावर चालून आलेला औरंगजेब, सिद्दी, पोर्तुगीज, इंग्रज इत्यादी अनेकांचे मनसुबे धुळीस मिळाले. छत्रपती संभाजी राजाच्या अंगी एक राजा म्हणून असणारे सर्व गुण त्यांच्यात होते. त्यामुळेच स्वराज्यावर चालून आलेल्या शत्रुवर चहुफेर मुकाबला करणे शक्य झाले. संभाजीराजाचे व्यक्तिमत्व ऐवढे स्वच्छ असतानाही बखरकार व साहित्यिकांनी मात्र बंदफैली, व्यसनी, अविचारी, देशद्रोही, उताविळ, उग्रप्रकृतीचा असे अनेक अवगुण त्यांच्या व्यक्तिमत्वांशी जोडले आहेत.

बखर साहित्य नाटक, कथा, कादंबऱ्या इत्यादी ऐतिहासिक मराठी साहित्यामध्ये संभाजी राजांची काल्पनिक आणि अनैतिहासिक प्रतिमा रंगवली गेली. ती संपूर्णपणे आधारहीन खोटी आहे. तत्कालीन ऐतिहासिक कागदपत्रे व साधने यांचे संशोधन केले तर संभाजीराजांचे वास्तविक चरित्र आपल्या समोर येते. संभाजीराजांच्या अंगी आपल्या वडिलांप्रमाणे धैर्य, धाडस, चिकाटी, सावधपणा, दूरदृष्टी, मुत्सद्दीपणा असे अनेक गुण होते. तसेच ते ज्ञानापेक्षा, प्रजाहितदक्ष, प्रेमळ, रणझुंजार व मुलकी कारभारात तज्ञ असल्याचे दिसून येते.

## ४.२ बखरकारांनी निर्माण केलेल्या संभाजीराजांच्या अनैतिहासिक प्रतिमेची चिकित्सा :

बखर वाङ्मय हे मराठ्यांच्या इतिहासाविषयी माहिती देणारे सर्वात पहिले साधन होते. त्यामुळे त्यास विशेष स्थान होते; परंतु बखर वाङ्मयातील लेखनाविषयीची जसजशी चिकित्सा होऊ लागली तसतसे त्यांचे ऐतिहासिक साधन म्हणून महत्त्व कमी होऊ लागले. म्हणून वि. का. राजवाडे म्हणतात, "एक अस्सल कागदाचे चिटोरे सर्व बखरीच्या बहमतास हाणून पाडण्यास पुरेसे आहे."[१] बहुतांश बखरी या पेशवाईच्या काळामध्ये लिहिलेल्या असल्यामुळे त्या ऐतिहासिक घटना घडून गेल्यानंतर ऐकीव माहितीच्या आधारे लिहिल्या गेलेल्या आहेत. सर्वात जास्त बखरी या स्वराज संस्थापक छत्रपती शिवाजी महाराजांच्या जीवनावर लिहिण्यात आलेल्या आहेत. इतर मराठी सत्तेच्या राजावर एखाद-दुसरी बखर लिहिलेली दिसून येते. छत्रपती शिवाजी महाराजांवर लिहिलेल्या बखरींमध्ये संभाजी राजांची माहिती मिळते. मल्हारराव चिटणीसांनी मात्र संभाजी राजांवर स्वतंत्र एक बखर लिहिली. सुरुवातीच्या काळामध्ये ते संभाजीची माहिती असलेले एकमेव साधन होते. तसेच बखरकारांनी अनेक बखरींमध्ये संभाजीराजांची अनैतिहासिक अशीच प्रतिमा निर्माण केलेली आहे. जी वास्तविक इतिहासाला धरून नाही. बखरीतील लिखाणास तत्कालीन कागदपत्राचा कोणताही आधार सापडत नाही.

### ४.२.१ सभासद बखर :

कृष्णाजी अनंत सभासदाने छ. राजाराम महाराजांच्या सांगण्यावरून ही बखर लिहिली गेली. छत्रपती शिवाजी महाराजांच्या जीवनावरील पहिली बखर असल्यामुळे ही अतिशय महत्त्वाची आहे. शिवाजी महाराजांच्या चरित्राच्या अनुषंगाने छत्रपती संभाजी महाराजांची माहिती बखरकाराने दिलेली आहे. संपूर्ण बखरीमध्ये संभाजीराजांच्या दुर्वर्तनाचा उल्लेख सभासदकाराने केला नाही.

---

[१] *गाठाळ,एस. एस.: मराठ्यांचा इतिहास , कैलाश पब्लिकेशन्स, औरंगाबाद, (प्रथमावृत्ती) २०१०. पृ.क्र. ११*

संभाजीराजे दिलेरखानास जाऊन मिळाल्याविषयी तो म्हणतो, 'शिवाजीराजांवर रुसुन जेष्ठ पुत्र दिलेरखानाकडे गेले स्वराज्यात संभाजी परत आल्यानंतर त्यांची भेट पन्हाळ्यावर फार ममतेच्या वातावरणात झाल्याचे सभासदकार सांगतो.' परंतु बखरीच्या शेवटी शिवाजीराजांच्या मृत्यू समयी त्यांच्या तोंडून संभाजीराजे हे राज्य राखणार नाहीत. क्रूर कृत्ये करतील असे भविष्य वर्तविले आहे. एकीकडे सभासदकार संभाजीराजे शिवाजीराजांवर रुसुन मोगलाईत गेले असे सांगून परत स्वराज्यात अल्यानंतर त्यांची भेट सुद्धा अतिशय ममतेच्या वातावरणात झाल्याचे सांगतो. पन्हाळ्यावरील संभाजी शिवाजी भेट ते शिवाजी महाराजांचा मृत्यू तीन-चार महिन्याचा कालावधी असेल. डॉ. अ. रा. कुलकर्णी आपल्या लेखात या मुद्याची चर्चा करताना म्हणतात, "आपल्या पुत्राविषयी बाप इतके कटू उदगार काढील असे वाटत नाही. कारण आपण कष्टाने मिळविलेले राज्य संभाजी राजा आपल्या दुर्गुणांनी बुडवेल ही महाराजांची खंत इतिहासाने पुसुन काढली होती."[२]

सभासदकाराने असे का लिहिले? याचे मुख्य कारण म्हणजे उगवत्या सुर्यास नमस्कार करण्याची राजकारणी प्रवृत्ती ही सभासदकाराच्या अंगी होती हे दिसून येते. तसेच सभासदकाराने आपली बखर छत्रपती राजाराम महाराजांच्या आश्रयाने लिहिल्यामुळे संभाजी महाराजांची नालस्ती करून राजाराम महाराजांची अवास्तव स्तुती केली आहे. सभासदकारांच्या बखरीतील संभाजी महाराजांच्या या अक्षेपाविषयी प्रसिद्ध इतिहासकार व बखर संपादक श. न. जोशी यांनी म्हटले की, "सभासद बखरीतीलच काही भाग म्हणून शि. च. सा. पृ.क्र. १०८-१०९ मध्ये दिला आहे; पण तो प्रमाण नाही. पुढल्या काळातील नकलाकार आपल्याला हवी असलेली गोष्ट ही तेव्हा रूढ ही असेल."[३] म्हणजेच सभासदकाराने आपल्या बखरीच्या शेवटी छत्रपती शिवाजी महाराजांच्या तोंडून संभाजी राजा हा राज्य राखणार नाही. क्रूर कृत्ये करील आदी असत्य वदवले आहे. ते नंतरच्या कालावधीतील नकलाकारांचे कारस्थान आहे. हे कारस्थान अतिशय बेमालूमपणे कोणीही

---

[२] *पवार जयसिंगराव भाऊसाहेब: छत्रपती संभाजी स्मारक ग्रंथ, रिया पब्लिकेशन, कोल्हापूर (द्वितीयावृत्ती) २००९. पृ.क्र.१७*

[३] *जोशी श. न. (संपा) : कृष्णाजी अनंत सभासद विरचित छत्रपती श्री शिवाजीराजे यांची बखर चित्रशाळा प्रकाशन पुणे. १९६० पृ.क्र. ०४*

आक्षेप घेऊ नये म्हणून संभाजीराजांवर करावयाचे सर्व आरोप त्यांनी शिवाजी महाराजांच्या तोंडून वदवले आहेत.

### ४.२.२ एक्यान्नव कलमी बखर :

अण्णाजी रंगनाथ मालकरे यांचा मुलगा खंडो अण्णाजी याने इ.स. १७८० मध्ये ही बखर लिहिली. म्हणजे शिवशाही कालखंडानंतर शंभर वर्षानंतर या बखरीचे लेखन झाले. त्यामुळे ऐकीव माहितीच्या आधारेच ती लिहिली गेली असावी. या बखरीमध्ये समर्थ रामदास यांच्याकडे बाल संभाजीच्या अंगी चांगले गुण यावेत म्हणून शिवाजी महाराजांनी सज्जनगडावर ठेवल्याचे बखरकार सांगतो. सभासद बखरीमध्ये कोठेही समर्थ रामदास स्वामींचा उल्लेख नाही. या बखरीमध्ये रामदास-शिवाजी महाराज यांचे संबंध दर्शवण्यासाठी बाल संभाजी हा अवगुणी होता. हे दर्शवण्याचा प्रयत्न बखरकाराने केला आहे. जो असत्यावर अधारित असून पूर्णपणे काल्पनिक आहे. संभाजी राजांना बदनाम करून समर्थ रामदासाचे महत्त्व वाढवण्यासाठी त्यांच्या अनुयायांनी केलेले हे कारस्थान असावे असे वाटते.

### ४.२.३ शिवदिग्विजय बखर :

बडोदे येथील चिटणीस घराण्यातील कोणी तरी ही बखर १८१८ साली लिहिलेली असावी. शिवकाळानंतर जवळपास एकशे आडोतीस वर्षानंतर ही बखर लिहिली असून ती समर्थ रामदास स्वामींच्या स्तुतीसाठी लिहिलेली आहे. त्यामुळे तिच्या सत्यांविषयी संशय निर्माण होतो. ही बखर जरी शिवचरित्रावर असली तरी त्यात संभाजी महाराजाबद्दलची बरीच माहिती मिळते; परंतु ती सर्व अनैतिहासिकच आहे. संभाजीच्या जन्माविषयी शिवदिग्विजयकार लिहितो, "प्रथम जेष्ठ पुत्र संभाजी महाराज सईबाई साहेबास धाकटे स्त्रीस झाले."[४] म्हणजे शिवदिग्विजयकाराला सईबाई या शिवाजी महाराजांच्या थोरल्या पत्नी आहेत

---

[४] *नंदुरबार पा. रा. दांडेकर ल. का (संपा) : श्री शिवदिग्विजय श्री शिवाजी महाराजांची बखर, श्री पुरातनतिहास प्रकाशन मंडळाची ग्रंथमाला, बडोदे येथे फत्तेसिंह छ. ११९५, पृ.क्र. २२४*

की धाकट्या हे माहित नाही. त्याच्याकडून इतर माहितीच्या सत्यते संदर्भात काही अपेक्षाच करता येत नाही.

शिवदिग्विजयकार लिहितो युवराज संभाजी राजांची वर्तणूक चांगली नसल्यामुळे समर्थ रामदास स्वामींकडे पाठविले; परंतु समर्थांच्या शिक्षणाचा व उपदेशाचा संभाजीवर कोणताही परिणाम झाल नाही. शिवदिग्विजयकाराचा या मागचा मूळ उद्देश संभाजी राजांची बदनामी करणे आणि समर्थ रामदासाचे महत्त्व वाढविणे हा असल्याचे दिसून येते.

शिवदिग्विजयकार सांगतो संभाजीराजांच्या अंगी अनेक अवगुण असल्यामुळे अष्टप्रधान मंडळातील व्यक्तीची निष्ठा ही राजारामाकडे राहिली; परंतु वास्तव याच्या उलट आहे. संभाजी राजे हे कारभाराची कसून चौकशी करत असल्यामुळे अष्टप्रधान मंडळातील अनेक मंत्र्यांचे भ्रष्टाचार व गैरकारभार उघडकीस येत असल्यामुळे ते युवराज संभाजी राजांचा द्वेष करत व राजाराम लहान आहे त्यास तेवढी समज नाही म्हणून त्यांच्याशी निष्ठा बाळगत.

सभासद बखरीमध्ये ज्याप्रमाणे शिवाजी राजांच्या अंतकाळात त्यांच्या तोंडून संभाजीबद्दल भविष्य वदवून अनेक अरोप केले आहेत. तशाच प्रकारे शिवदिग्विजयकाराने सईबाईंच्या अंतकाळामध्ये त्यांच्या तोंडून संभाजीराजांबद्दल चिंता व खंत वदवून संभाजी राजांमध्ये अनेक अवगुण असल्याचे सांगीतले आहे. संभाजीराजांमध्ये सुधारणा घडून येण्यासाठीच शिवाजी महाराजांनी त्यांना पन्हाळगडावर ठेवल्याचाही तर्क बखरकाराने लावला आहे. वास्तविक इतिहास असा आहे की, सईबाईंचा मृत्यू हा भाद्रपद वद्य १४ शके १५८१ म्हणजे दि. ५ सप्टेंबर १६५९ रोजी राजगडावर झाला."[५] संभाजीराजे अवघे दोन ते आडीच वर्षाचे असतानाच सईबाई बाळंतपणातच आजारी पडून मरण पावल्या सईबाईंच्या मृत्यूच्या वेळी संभाजी अतिशय लहान होते. येवढ्या लहान वयामध्ये त्यांच्यामध्ये किती

[५] *कुलकर्णी अ. रा. खरे ग.ह. (संपा): मराठयांचा इतिहास (खंड १ ला) कॉन्टिमेन्टल प्रकाशन, पुणे (प्रथमावृत्ती) १९८४ पृ.क्र. ३७७*

अवगुण असणार आणि या लहान मुलास शिवाजीराजे पन्हाळगडावर कसे कैदेत ठेवणार हा प्रश्न निर्माण होतो. यावरुन हे स्पष्ट होते की, बखरकारांनी रंगवलेले हे कथानक आहे.

### ४.२.४ श्रीमंत महाराज भोसले यांची बखर :

श्रीमंत महाराज भोसले यांची बखर साताऱ्याच्या श्रीमंत बापूसाहेब अनुजी भोसले शेंडगावकर यांच्या संग्रहित होती. इ.स. १९१७ मध्ये वि. ल. भावे यांनी मराठी दफ्तर ठाणे येथून संपादित करून प्रकाशित केली. या बखरीमध्ये संभाजी महाराजांबद्दल बरीच माहिती मिळते; परंतु ती सर्व माहिती इतर बखरींतून घेतलेली आहे. जसे की, संभाजीराजाचे भविष्य शिवाजी महाराजांच्या तोंडून वदवले आहे. हे जसेच्या तसे सभासद बखरीतून घेतले आहे. त्याचबरोबर इतर माहिती ही चिटणीसांच्या बखरीवर आधारित असल्याचे दिसून येते.

शेंडगावकर बखरकार सांगतो की, शिवाजी महाराजांच्या आज्ञेने राजारामास मराठ्यांच्या गादीवर बसवले होते. शेंडगावकराने चिटणीसांप्रमाणे अष्टप्रधानमंडळातील मंत्र्यांना संभाजी राजानी क्रुरतेने मराठ्यांना मारल्याचे व सोयराबाईंस भिंतीत चिणून मारल्याचे आरोप संभाजी राजांवर केले आहेत. संभाजीराजांनी स्वतःचा राज्यभिषेक केल्यानंतर सोयराबाईंच्या गटातील मंत्र्यांना काही दिवस कैद केले होते. त्यांना ठार मारले नव्हते. यातील अनेक मंत्र्यांना पूर्वीची पदेही बहाल केली होती; परंतु त्यानंतर या मंत्र्यांनी संभाजी राजांवर अन्नातून विष घालून ठार मारण्याचा प्रयत्न केल्यानंतर त्या कटामध्ये सामिल असलेल्या मंत्र्यांना त्यांनी ठार केले. तसेच संभाजीराजे सोयराबाई रायगडावर आल्यानंतर एक वर्षाहून अधिक काळ जिवंत होत्या. संभाजीराजांनी त्यांना कोणतीही शिक्षा केली नव्हती.

शेंडगावकरबखरकाराने संभाजीला औरंगजेबाने कैद केल्यानंतर संभाजीच्या व्यक्तिमत्वाला शोभणारा अनैतिहासिक व काल्पनिक प्रसंग रंगवलेला आहे. संभाजीराजांना कैद करून औरंगजेब बादशहापुढे हजर केले तेव्हा संभाजीराजे त्याच्यासमोर कधीही झुकले नाहीत. त्यामुळे बादशहाने संभाजीसाठी दरबाराचे दार लहान केले तेव्हाही संभाजी दारातून

पाय अगोदर टाकून प्रवेश केला असे बखरकार सांगतो. तसेच बादशहाने संभाजीस इस्लाम धर्म स्वीकारण्यास सांगीतले. त्याबदल्यात संभाजीने झुलपुकार बेगम जी औरंगजेबाच्या मुलीची होती तिची मागणी केली असे बखरकार सांगतो. अशा प्रकारे शेंडगावकराने कल्पित कथा रंगवली आहे. कारण संभाजीला कैद केल्यानंतर संभाजीच्या विवाह योग्य एक ही मुलगी नव्हती. त्यामुळे संभाजींकडून त्यांची मुलगी मागण्याचा प्रश्नच येत नाही.

### ४.२.५ सप्तप्रकरणात्मक बखर :

मल्हार रामराव चिटणीस यांनी दुसरा शाहू महाराज ऊर्फ आबासाहेब सातारकर यांच्या आज्ञेने लिहिल्याचे सांगतो; परंतु धाकटे शाहू महाराज दि. ४ मे १८०८ रोजी मरण पावले. चिटणीसाने प्रत्यक्ष लिखाणास सुरुवात १८११ मध्ये केली. यावरील विधानावरुन मल्हार रामराव चिटणीस सत्य सांगत नाही हे दिसून येते. मल्हारराव हे सातारकर छत्रपती धाकटे शाहू यांचे चिटणीस होते. सुप्रसिद्ध खंडो बल्लाळ चिटणीस यांचे ते पंतू होते. मल्हाररावांच्या वंशातील बाळाजी आवजी चिटणीसाला संभाजी राजांविरुद्धच्या कटात हात असल्यामुळे संभाजी राजांनी देहान्ताची शिक्षा दिलेली होती. या घटनेमुळे चिटणीसांचा संभाजी राजांवर राग असावा त्यामुळेच त्यांनी या बखरीमध्ये संभाजी महाराजांविषयी अनैतिहासिक लेखन केले आहे.

एका ब्राह्मण स्त्रीबरोबर बदकर्म केल्यामुळे आणि त्याची शिक्षा शिवाजी महाराज आपणास देतील म्हणून संभाजीराजे दिलेरखानाच्या गोटात गेल्याचे मल्हारराव सप्तप्रकरणात्मक बखरीमध्ये सांगतो. तर सभासदकार शिवाजी महाराजांवर रुसून गेल्याचे सांगतो. तसेच कारभारी निळोपंत मुजुमदार यांच्याशी अयोग्य तऱ्हेने वागल्याबद्दल महाराजांनी संभाजी राजांची निर्भत्सना केली. त्यामुळे उदासवृत्ती झालेले संभाजी दिलेरखानाकडे गेल्याचे शिवदिग्जयकार सांगतो स्वतःचे कर्तृत्व दाखविण्याकरिता, स्वबळावर राज्यनिर्मितीसाठी सावत्र आईच्या त्रासाला कंटाळून संभाजीराजे दिलेरखानाकडे गेल्याचे कमल गोखले सांगते तर संभाजीराजे दिलेरखानाकडे जाणे ही शिवाजी महाराजांचीच राजकीय खेळी होती, असे दारवटकर लिहितात. म्हणजे मल्हाररावांनी संभाजीराजे

दिलेरखानाकडे जाण्याचे जे कारण सांगीतले आहे ते पूर्णपणे काल्पनिक व पूर्वगृह दूषित होऊन संभाजी राजांना बदनाम करण्यासाठी लिहिले आहे.

मल्हाराव स्त्री ही कोण, कोठली, कोणाची सुन, कन्या होती हे सांगत नाही. पुराणातील कथेप्रमाणे मोघम त्याची सुरुवात करतो. तसेच या कथेचा संबंध संभाजी दिलेरखानाकडे जाण्याशी जुळवतो. प्रत्यक्षात संभाजी जेव्हा दिलेरखानाकडे गेले ते रायगडावर नव्हतेच दक्षिण कोकणात शृंगारपुरी होते तेथूनच ते दिलेरखानाकडे गेले.

संभाजीराजे दिलेरखानाच्या गोटातून परत आल्यानंतर पन्हाळगडावरील भेटी दरम्यान शिवाजीराजांनी संभाजीस योग्य वर्तन करण्याचे सांगून पन्हाळगडावरच नजरकैदेत ठेवून रायगडावर गेल्याचे मल्हारराव सांगतो. "इतिहास स्पष्ट सांगतो की, पन्हाळ्यावर युवराज स्वतंत्र होता. एवढेच नव्हे तर पन्हाळा सुभ्याचा कारभार त्यास महाराजांनी सांगितलेला होता."[६] मल्हाररावानेही बखरीच्या शेवटी शिवाजीराजे मृत्यू शैय्येवर असताना त्यांच्या तोंडून संभाजीराजे, हे राज्य राखणार नाहीत, कैफखातील, क्रूर कृत्ये करील असे भविष्य वदविले आहे. हे संपूर्ण पणे सभासदकाराची नक्कलच आहे.

### **४.२.६ छत्रपती संभाजी महाराजावरील बखर :**

मल्हार रामराव चिटणीसांनी ही बखर लिहिली असून छत्रपती संभाजी महाराजांच्या जीवनावर लिहिलेली एकमेव बखर आहे. मल्हाररावांनी ही बखर सप्तप्रकरणात्मक या शिवाजी महाराजांच्या बखरीनंतर लिहिली असावी. या बखरीत स्थळ व काळ यांचा उल्लेख नाहीत. संभाजीराजांवर लिहिलेली एकमेव बखर असल्यामुळे सुरुवातीच्या काळामध्ये यातील सर्वच लेखन प्रमाण मानले गेले; परंतु मल्हाररावाने या बखरीतील लेखन पूर्वगृह दूषित होऊन अनैतिहासिक लिहिल्यामुळे संभाजी राजांची मलिन प्रतिमा निर्माण करण्यास हीच बखर कारणीभूत आहे. शिवाजी महाराजांनीच संभाजीला राज्य आवरणार नाही तो

[६] *पवार जयसिंगराव भाऊसाहेब: छत्रपती संभाजी स्मारक ग्रंथ, रिया पब्लिकेशन, कोल्हापूर, (द्वितीयावृत्ती) २००९, पृ.क्र.२३*

सर्वांचा नाश करेल म्हणून राजारामास गादीवर बसवून संभाजीला पन्हाळ्यावर कैदेत ठेवण्यास सांगीतले होते. असे मल्हारराव या बखरीत सांगतो. तसेच सोयराबाईंच्या पुढारपणात राजारामाला गादीवर बसवण्यात सरसेनापती हंबीरराव मोहिते सामिल होते असे सांगतो. शिवाजी महाराजांचा मृत्यू झाल्यानंतर अष्टप्रधान मंडळातील मंत्र्यांनी सोयराबाईंना हाताशी धरुन राजारामाला सत्तेवर बसवून संभाजी राजाना पन्हाळगडावरच कैद करण्याचा कट रचला होता; परंतु हा कट तडीस जाण्याआगोदरच संभाजी राजांना याची माहिती लागली. या कटामध्ये हंबीरराव मोहिते सामिल नव्हते. छत्रपती शिवाजी महाराजांनंतर संभाजीराजेच हे राज्य व्यवस्थितपणे संभाळू शकतील असा विश्वास हा तत्कालीन मराठ्यांचा सेनापती हंबीरराव मोहिते यांना होता. त्यामुळे ते संभाजीच्या गटामध्ये सामिल होऊन अष्टप्रधान मंडळातील मंत्र्यांचा कट उधळून लावला.

मल्हाररावाने बाळाजी आवजीस राजारामाला गादीवर बसवून संभाजीस कैद करण्यात तसेच त्यांना ठार मारण्याच्या कटात सामिल नव्हते. ते पूर्णपणे दोषमुक्त होते. हे सांगण्याचा प्रयत्न केलेला आहे. त्यासाठी त्याने संभाजीच्या बंदोबस्तासाठी रायगडावरुन जी पत्रे गेली ती बाळाजी आवजीची नसून त्याच्या पुत्राच्या हातची होती असे असत्य सांगतो. दादाजी रघुनाथ प्रभू देशपांडे यांनी संभाजी महाराजाना बाळाजी आवजी मारण्याच्या कटात सामिल असल्याचे सांगून त्यांची दिशाभूल करून मारायला लावल्याचे मल्हारराव सांगतो. वास्तविकता अशी होती की, जून-जुलै १६८१ च्या सुमारास संभाजी महाराजांना मारण्यासाठी जे दोन कट झाले त्यामध्ये बाळाजीचे अगं होते. हे उघडच आहे. म्हणून संभाजी महाराजांनी त्यास हत्तीच्या पायी दिले; पण मल्हारराव हे सांगत नाही. त्याचा सर्व रोख संभाजी महाराजास बदनाम करण्याचा आणि बाळाजी आवजीची प्रतिमा उजळविण्याचा आहे.

मल्हारावाने संभाजीवर सोयराबाईंना भिंतीत चिणून मारल्याचे आरोप करतो. संभाजी राजे रायगडावर आल्यानंतर ही सोयराबाई एक वर्षाहून अधिक काळ जिवंत होत्या. संभाजी राजांच्या कारभारासंबंधी बेबंदशाहीचे चित्र रेखाटले आहे. ते वस्तुनिष्ठ नाही. तत्कालीन कागदपत्रातील पुराव्यावरून स्पष्ट होते. त्याचबरोबर शिरकाण म्हणजे संभाजी

महाराजांनी क्रुरपणे शिर्क्यांची केलेली कत्तल ही मल्हार रामराव चिटणीसांनी रंगवलेली कथा ही काल्पनिकच आहे शिर्क्यांची जहागिरीस शिरकाण असे म्हणत असत.

संगमेश्वर येथे संभाजी महाराज कवी कलषाच्या नादाने बेहोश होऊन कैद झाल्याचे मल्हारराव सांगतो. तेही अनैतिहासिकच आहे. संभाजीराजे रायगडावर असताना शृंगारपुरच्या शिर्क्यांनी त्यांच्या विरुद्ध बंड केल्याचे समजल्यानंतर त्यांचा बंदोबस्त करण्यासाठी ते शृंगारपुरला गेले. शिर्क्यांचा बंदोबस्त केला. त्यानंतर पन्हाळगडावर गेले. तेथेही गडाचा चांगला बंदोबस्त करून रायगडाकडे जाणे गरजेचे होते. कारण रायगडास मोगलाचा वेढा पडण्याची शक्यता होती. त्याचवेळी कोल्हापूर परिसरामध्ये मोगलांचे सैन्य उतरल्याची बातम्या आली होती. त्यामळे संगमेश्वर मार्गे रायगडास जाण्याचा बेत संभाजी राजांनी आखला होता. म्हणून ते संगमेश्वरला गेले होते. संभाजी राजांना कैद केल्यानंतर मुसलमान झाल्यास मुक्त करतो असे बादशहाने संभाजीस म्हटल्यानंतर संभाजीने त्यांच्या मुलीची मागणी केली असे मल्हारराव सांगतो. वास्तविकता औरंगजेब बादशहाने संभाजीस मुसलमान करण्याचा प्रयत्न केलाच नाही. तसेच संभाजी राजानेही औरंगजेबाला कोणत्याही मुलीची मागणी केली नाही. कारण संभाजी राजे जेव्हा कैद झाले त्यावेळेस विवाहाच्या योग्य अशी औरंगजेब बादशहाची एकही मुलगी नव्हती.

अशा प्रकारे मराठी बखरकारांनी संभाजी महाराजांची जी अनैतिहासिक व काल्पनिक प्रतिमा रेखाटली आहे. या विषयी प्रसिद्ध इतिहासकार वा. सी. बेद्रे यांनी बखरकारांना दोष देताना म्हटले आहे, "बखरकाराची ही कथाख्यानी भाटाची पौराणिक लेखन पद्धती व इतिहास शास्त्राचे तत्कालीन गाढ अज्ञान हीच मुख्यतः विपर्यस्त विचारसरणीस कारणीभुत झालेली आहेत. बखरीच्या लेखनकला समयीच्या वर्णाश्रमाधर्म पद्धतीतील विचार अचारातील वैगुण्यही बखरीच्या पूर्वगृह दूषित व विशिष्ट वळणास जबाबदार आहे."[७]

---

[७] *बेंद्रे वा. सी. : श्री. छत्रपती संभाजी महाराज यांचे विचिकित्सक चरित्र, मनोरमा प्रकाशन, मुंबई द्वितीयावृत्ती १९७१, पृ.क्र. १*

## ४.३ मराठी साहित्यात निर्माण केलेली संभाजीराजांची अनैतिहासिक प्रतिमेची चिकित्सा :

मराठी वाङ्मयावर मराठ्यांच्या इतिहासाचा मोठा प्रभाव दिसून येतो. त्यामुळे मराठी साहित्यातील अनेक ऐतिहासिक वाङ्मय मराठ्यांच्या इतिहासातील व्यक्तिरेखांवर आधारलेलेच दिसून येतात. त्यामध्ये स्वराज्य संस्थापक छत्रपती शिवाजी महाराज व स्वराज्याचे पहिले युवराज छत्रपती संभाजी अतिशय लोकप्रिय आहेत. त्यामुळे सर्वात जास्त ऐतिहासिक साहित्याची निर्मिती यांच्यावर झालेली आहे. छत्रपती संभाजी महाराजांवरील ऐतिहासिक कथा, कादंबरी, नाटक, पोवाडे मोठ्या प्रमाणात लिहिले गेलेत; परंतु ते साहित्य बखरीवर आधारित असल्यामुळे किंवा संभाजी रजेंच्या इतिहासाबद्दलचे अज्ञान यामुळे मराठी साहित्यामध्ये संभाजी राजांबद्दल मोठ्या प्रमाणात अनैतिहासिक किंवा साहित्यिक भाषेत इतिहासाचे विपर्यास करणारे लेखन झाले आहे. यामुळे संभाजी राजांची विकृत प्रतिमा जनमाणसात रुजवली गेली. अशा साहित्यात रंगवलेल्या अनैतिहासिक प्रतिमांची चिकित्सा ऐतिहासिक पुरावांच्या आधारे करणे इतिहासकाराचे आद्य कर्तव्य आहे. हे प्रस्तुत प्रकरणात करण्याचा प्रयत्न केला आहे.

### ४.३.१ कामांध, बदफैली व रंगेल संभाजी :

मराठी बखर, ऐतिहासिक कथा, कादंबरी व नाटकातून संभाजीराजांवर मोठ्या प्रमाणात बदफैलीपणाचे अरोप करून कामांध व रंगेल संभाजीची प्रतिमा रंगवलेली आहे. बखर वाङ्मयामध्ये मल्हारराव चिटणीसांच्या दोन्ही बखरी, शेंडगावकरांची बखर, तसेच कथा वाङ्मयांमध्ये गोदावरीची लोककथा, कादंबरीमध्ये ना. वि. बापट यांची छत्रपती संभाजी महाराज या कादंबरीपासून ते लोककवी मनमोहन नातु यांची 'छत्रपती संभाजी' या कादंबरीपर्यंत नाटकामध्ये वासुदेवशास्त्री खरे यांचे 'गुणात्कर्ष' नाटकापासून ते वसंत कानेटकरांच्या 'इथे ओशाळाला मृत्यू' या नाटकापर्यंत या सर्व ऐतिहासिक मराठी साहित्यामध्ये गोदावरी, झेबुन्निसा, रोशणार, तुळसा, कमळा, राधा, दुर्गा, शेवंता, इंदिरा,

गजरा, जमुना, रोशन, हंसा, जुगल इत्यादी अनेक काल्पनिक स्त्री पात्राशी संभाजी राजांचा संबंध जोडून त्यांची कामांध रंगेल प्रतिमा निर्माण केलेली आहे.

### ४.३.१.१ गोदावरी :

मराठी ऐतिहासिक साहित्यामध्ये गोदावरीची रणजित देसाईची नयनतारा देसाईंनी लोककथा या कथावाङ्मयात कादंबऱ्यामध्ये श्रीमानयोगी अर्घ्य नाटकामध्ये सोनाबाई केरकरांचेच 'संगीत छत्रपती संभाजी' ह. ग. गोडसेच्या 'राजयाचा पुत्र अपराधी देखा', श. ब. चव्हाण यांचे 'सती गोदावरी', वसंत कानेटकरांचे इथे 'ओशाळला मृत्यू' या नाटकामध्ये गोदावरीची कथा रंगवून संभाजीराजांची रंगेल प्रतिमा निर्माण केली आहे.

संभाजी राजे एका विवाहित सुंदर ब्राह्मण कन्येस पळवून आणून तिला वश करण्याचा प्रयत्न करतात; परंतु तिच्यावर कोणतीही बळजबरी करत नाहीत. या घटनेची माहिती जेव्हा शिवाजी महाराजांना होते तेव्हा त्या ब्राह्मण कन्येची मुक्तता करून तिला सन्मानाने घरी पाठवण्याची तयारी करतात; परंतु गोदावरी घरी न जाता सती जाण्याचा हट्ट धरून संभाजीनेच माझ्या चितेला अग्नी द्यावा अशी अट घालते. संभाजी तिच्या चितेस अग्नी दिल्यानंतर सती जाते. अशा प्रकारची गोदावरीची आणि संभाजी राजांची कथा वरील मराठी साहित्यामध्ये कवी अधिक फरकाने आली आहे. मुळची ही लोककथा गुजरातचा सुलतान बेगडा महंमद आणि चंद्रगुजरी यांची आहे. गुजरातेहून कोकणात उतरणारा उत्तर-दक्षिण व्यापारी मार्ग आहे. म्हणजे व्यापाऱ्यांमार्फत ही लोककथा रायगड परिसरात आली. त्यास नवे संदर्भ मिळताच 'गुजराती चंद्रगुजरीची मराठी गोदावरी झाली.'[८] त्यास दुसरे महत्त्वाचे कारण म्हणजे संभाजीराजांचे आकर्षक असणारे बहुआयामी व्यक्तिमत्व म्हणून संभाजीराजांशी तिचा संबंध जोडला गेला. याशिवाय रायगडाच्या पायथ्याशी किल्लेवाडीची येथील सती गोदावरीची म्हणून ओळखली जाणारी ही समाधी शिवकाळातील वास्तु नाही. कारण तिचे

---

[८] *पवार जयसिंगराव भाऊसाहेब: छत्रपती संभाजी स्मारक ग्रंथ, रिया पब्लिकेशन, कोल्हापूर, (द्वितीयावृत्ती) २००९, पृ.क्र.२८२*

बांधकाम शिवकाळातले नसून पेशवेकाळातील समाध्यांच्या धर्तीचे आहे. ती समाधी माधवरावांची पत्नी यशोदाबाई यांची आहे. ती समाधी सवाई माधवरावाच्यानंतर दुसऱ्या बाजीरावाने त्यांना कैदेत ठेवले होते. ज्यावेळी यशवंतराव होळकरांनी पुण्यावर आक्रमण केले. त्यासुमारास दुसरा बाजीराव आपला जीव वाचवण्यासाठी संपूर्ण कुटुंबासह रायगडावर आश्रयासाठी आला होता. त्याचवेळी यशोदाबाईचा रायगडावरच मृत्यू झाला होता. त्यामुळे तिची येथेच समाधी बांधण्यात आली होती. यशोदाबाईंना विशेष महत्त्व नसल्यामुळे त्यांच्या समाधीकडेही लोकांचे दुर्लक्ष झाले. कालांतराने ती अनामिक बनली आणि अनामिक झालेल्या समाधीवर गोदावरीची लोककथा अलगद येऊन बसली. तसेच ऐतिहासिक कागदपत्रांमध्ये गोदावरी प्रकरणाचा कोठेही पुरावा सापडत नाही. यावरुन संभाजी आणि गोदावरी हिचा काहीही संबंध नव्हता हे स्पष्ट होते. साहित्यामध्ये रंगवलेले कथानक हे काल्पनिक असल्याचे दिसून येते.

### ४.३.१.२ झेबुन्निसा किंवा रोशणार :

औरंगजेबाची कन्या झेबुन्निसा किंवा रोशणार आणि संभाजीराजे यांचे प्रेम संबंध जुळवून अनेक साहित्यिकांनी, बखरकारांनी संभाजीराजांची बदनामी केली आहे. बखर साहित्यामध्ये शेडगावकर बखर, मलहाररावांची छत्रपती संभाजी महाराजांवरील बखर, कादंबऱ्यामध्ये ना. वि. बापट यांची 'छत्रपती संभाजी महाराज' ह. ना. आपटे याची केवळ स्वराज्यासाठी, मनमोहन नातु यांच्या संभवामि युगे युगे, छत्रपती संभाजी नाटकामध्ये आ. मो. पाठारे यांचे सं. श्री. छत्रपती संभाजी, केरकर सोनाबाई चिमाजी हिचे संगीत छत्रपती संभाजी, लक्ष्मण विठोबा साडंव यांचे छत्रपती संभाजी, या वरील मराठी ऐतिहासिक साहित्यामध्ये झेबुन्निसा किंवा रोशणार आणि संभाजीराजे यांच्या प्रणयाचे वर्णन रंगवले आहे.

रोशणार ही औरंगजेबासोबत दक्षिण भारतामध्ये आल्यानंतर ती औरंगजेबाला भेटण्यासाठी म्हैसूर प्रांताकडे जाताना संभाजी तिला पकडून पन्हाळा किल्ल्यावर ठेवतात. त्यानंतर दोघामध्ये प्रेम संबंध जुळतात. रोशणार संभाजीस त्यांची रखेल म्हणून राहण्यास स्पष्ट नकार देते आणि पुन्हा औरंगजेबाकडे जाते. हे एक कथानक आहे. दुसरे

संभाजीराजांना मोगलांनी कैद केल्यानंतर कैदेतील संभाजीवर रोशणारचे प्रेम जडते. पुढे औरंगजेब संभाजीला मुसलमान झाला तर जिवंत सोडीन असे म्हणतो तेव्हा संभाजी त्यांच्याकडे त्यांच्या मुलीची मागणी करतो. त्यामुळे औरंगजेब क्रोधीत होऊन संभाजीला देहदंडाची शिक्षा फर्मावतात. आपल्यामुळे संभाजीला प्राण गमवावा लागला. म्हणून तिचे प्रेमभाव संभाजी प्रति अधिकच दृढ होतात. ती आजन्म अविवाहित राहण्याची प्रतिज्ञा करते व पुढे संभाजीचा मुलगा शाहू व पत्नी येसूबाई यांचा चांगल्या प्रकारे सांभाळ करते. अशा प्रकारचे काल्पनिक कथानक कमी अधिक फरकाने जुळवून संभाजी व झेबुन्निसा किंवा रोशणार यांचा सबंध जुळवण्याचा त्यांच्यातील प्रणयाचे वर्णन करण्याचा खटाटोप साहित्यिकांनी केला आहे.

वास्तविक इतिहास असा आहे एकंदरीत औरंगजेबाला एकूण पाच मुली होत्या. पहिली झेबुन्निसा, दुसरी झिअतुन्निसा, तिसरी बदरुन्निसा चौथी झुब्दतुन्निसा आणि पाचवी मेहिरुन्निसा यांपैकी तिसरी मुलगी बदरुन्निसा हिचा १९ एप्रिल १६७० रोजीच मृत्यू झाला होता. तसेच चौथी झुब्दतुन्निसा व पाचवी मेहरुनिसा यांची लग्न झाली होती. राहिलेल्या दोन मुली पैकी सर्वात मोठी आणि पहिली मुलगी झेबुन्निसा हिचा जन्म दि. १५-०२-१६३८ रोजी झाला होता ही लहानपणापासूनच हुषार होती. ती कुशाग्र बुद्धिमत्तेची आणि साहित्याची आवड असलेली होती. तिचे वैयक्तिक ग्रंथालय समृद्ध होते. आपल्या मर्जीप्रमाणे गंथोत्पत्ती करण्यासाठी अथवा हस्त लिखिते लिहून काढण्यासाठी तिने मोठया मानधनावर विद्वानांच्या नियुक्त्या केल्या होत्या. औरंगजेबाला काव्याचा तिटकारा होता. दरबाराच्या उपेक्षेची ही उणीव तिने बारंबार भरून काढली. तत्कालीन बहुतेक कवी तिच्या आश्रयाला होते. ती स्वतः ही अतिशय प्रतिभावंत आणि उत्कृष्ट कवयित्री होती.[१] औरंगजेबाविरुद्ध सुलतान अकबराने बंड केले. त्यात तिचा हात असल्याने औरंगजेबाने तिला सालिमगड येथे कैदेत ठेविले. अकबराशी झालेला तिचा पत्रव्यवहार उघडकीस येताच तिचा तनखाही बंद करण्यात आली आणि मालमत्ता जप्त करण्यात आली बंदिवासातच तिचे हाल होऊन ती दि. २०-५-१७०२

[१] *मोहोड शालिनी: शिवपुत्र छत्रपती संभाजी महाराज, कलादन प्रकाशन, पुणे २०१२ पृ.क्र. ३४६*

मध्ये मरण पावली यावरुन झेबुन्निसा ही दक्षिण भारतात आलीच नाही. हे उघड आहे. तसेच संभाजीच्या मृत्यू समयी झेबुन्निसा व संभाजीराजे यांच्यामध्ये वयाचे अंतर १९ वर्षाचे होते. यावरुन दोघामध्ये प्रणय संबंध जोडणे म्हणजे दुष्ट कल्पनाविलासच होय.

दुसरी मुलगी झिअतुन्निसा हिचा जन्म ५ ऑक्टोबर १६४३ चा ही औरंगजेब बादशहाबरोबर त्यांची व्यवस्था पाहण्यासाठी दक्षिण भारतात आली होती. संभाजीस मारले त्यावेळी ही ४६ वर्षाची म्हणजे संभाजीपेक्षा १३-१४ वर्षांनी मोठी होती. लग्नासंबंधीचे तिचे वय उलटुन गेले होते.[१०] संभाजी राजांना कैद केल्यानंतर औरंगजेबाची विवाह योग्य अशी एक ही कन्या नव्हती. हे यावरुन स्पष्ट होते. तसेच संभाजी राजेही क्रोधामध्ये असली बाष्कळ बडबड करतील इतके असंस्कृत व क्षुद्र बुद्धीचे नव्हते. हे त्यांच्या बत्तीस वर्षाच्या या वागणुकीवरुन दिसून येते. या बाबतच्या बखरी मधील उल्लेखा विषयी प्रसिद्ध इतिहासकार वा. सी. बेंद्रे म्हणतात, "ज्या बखरकारांना मृत्यू च्या जागेचा किंवा दिवसाचाही उल्लेख करता येत नाही, त्यांना औरंगजेबाच्या मुलीची जनानखान्यातील संवादासह गुप्त बातमी कल्पनेशिवाय किंवा कुंभाड रचण्यासाठी मनोगताशिवाय कळणेच शक्य नाही." [११] संभाजीराजे आणि औरंगजेब कन्या यांच्यामध्ये प्रेमसंबंध रंगवणे म्हणजे साहित्यिकांनी व बखरकारांनी केलेल्या कल्पनाविलासाचा कळस आहे. इतिहासाचा विर्पयास करणारे आहे हे सिद्ध होते.

### ४.३.१.३ तुळशी :

तुळशी संभाजी राजांची कामांध व बदफैली अशी प्रतिमा रंगवण्यासाठी साहित्यिकांनी अनेक कल्पित पत्रांची उभारणी केलेली आहे. त्यामध्ये सर्वात अधिक प्रसिद्ध पात्र म्हणजे 'तुळशी' हे आहे. तुळशी आणि संभाजीराजांच्या प्रेम काहाण्या अनेक साहित्यिकांनी आपल्या सहित्यातून रंगविलेल्या आहेत. कादंबऱ्यांमध्ये ना. वि बापट यांची

---

[१०] *बेंद्रे वा. सी. : श्री. छत्रपती संभाजी महाराज यांचे विचिकित्सक चरित्र, मनोरमा प्रकाशन, मुंबई द्वितीयावृत्ती १९७१, पृ.क्र.७०१*

[११] *बेंद्रे वा. सी. : श्री. छत्रपती संभाजी महाराज यांचे विचिकित्सक चरित्र, मनोरमा प्रकाशन, मुंबई द्वितीयावृत्ती १९७१, पृ.क्र.७०१*

'छत्रपती संभाजी महाराज', मनमोहन नातु यांच्या 'संभवामि युगे युगे' छत्रपती संभाजी, नाटकामध्ये आ. मो. पाठारे यांचे 'संगीत श्री छत्रपती संभाजी', सोनाबाई केरकरांचे', 'संगीत छत्रपती संभाजी' राम गणेश गडकऱ्यांचे 'राजसन्यास' वि. ह. औंधकरांचे बेबंदशाही, मा. हा. कोचरेकरांचे 'संगीत' मानी मराठा, अर्जुनराव झेंडेंचे 'अश्रु ढळले रायगडाचे', इत्यादी साहित्यिकांनी आपल्या साहित्यामध्ये तुळशी या कल्पित पत्राच्या आधारे संभाजीराजांवर बदफैलीपणाचे निराधार आरोप केले आहेत.

तुळशी ही हिरोजी फर्जद या शिवाजी महाराजांच्या विश्वासू सरदाराची कन्या असून संभाजी राजांनी हिरोजी फर्जदाला कुस्तीमध्ये कपटाने ठार मारल्यामुळे संभाजीचा सूड घेण्यासाठी त्यांना आपल्या सौंदर्याच्या मोहजाळात अडकवून संभाजीवर खोट्या प्रेमाची आव आणते. तुळशीच्या सहवासाठी आसक्त संभाजीचे वर्णन अनेक साहित्यिकांनी केले आहेत. तुळशी आपला सूड घेण्यासाठी संभाजीराजांना संगमेश्वरी घेऊन जाते. तेथे त्यांना भरपूर मद्य पाजवून कमर्बखानामार्फत मोगलांना पकडून देते. अशाप्रकारचे थोड्याफार फरकाने हे कथानक साहित्यिकांनी रंगवले आहे. प्रसिद्ध नाटककारांनी व तसेच राम गणेश गडरींनीही 'राजसंन्यास' या आपल्या नाटकात तुळशी हेच पात्र रंगवले आहे. या नाटकातील तुळशी दर्यासागर दौलतरावाची पत्नी असून सागरात उडी घेतलेल्या पत्नीला वाचवण्यासाठी कर्तव्य विन्मुख झालेल्या पतीचा त्याग करून ज्याने आपल्याला वाचवले अशा संभाजी राजांच्या प्रेमात पडते. गडकऱ्यांनी संभाजीच्या तुळशीबरोबरच्या शृंगारातील उत्तानता अतिशय भडकपणे रंगवलेली आहे. शेवटी येसूबाईंकडून निर्भत्सनेमुळे मराठे शाहीचा व येसूबाईंचा सूड घेण्याचा प्रयत्न करणारी तुळशी गडकऱ्याने दाखविली आहे. मराठी ऐतिहासिक साहित्यामध्ये संभजीची प्रेयसी म्हणून लोकप्रिय असलेली तुळशी तिचा ऐतिहासिक कागदपत्रात कोठेच उल्लेख सापडत नाही. कारण ती वास्तविक इतिहासामध्ये नाहीच; परंतु मराठीतील साहित्यकांनी ऐतिहासिक नाटक, कादंबऱ्याची निर्मिती करताना कल्पकतेने तुळशी हे पात्र रंगवले आहे. सर्वात पहिल्यांदा ना. वि. बापटांनी 'छत्रपती संभाजी महाराज' या

कादंबरीमध्ये तुळशी या काल्पनिक पत्राची निर्मिती केली. यानंतर अनेक कादंबरीकारांनी व नाटककारानी हे पात्र आपल्या कृतीमध्ये रंगवून संभाजी महाराजांची बदनामी केली.

### ४.३.१.४ कमळा :

तुळशीप्रमाणेच संभाजीराजे व कमळा, कमळजा या काल्पनिक पात्राच्या आधारे विषयासक्त संभाजीराजांची प्रतिमा साहित्यिकांनी निर्माण करण्याचा प्रयत्न आपल्या साहित्यामध्ये केला आहे. कादंबरीमध्ये मनमोहन नातुंची 'छत्रपती संभाजी' नाटकामध्ये विठ्ठल वामन हडप यांचे 'रायगडची राणी' ना. के. सोनसुरकर यांचे 'थोराताची कमळा', मा. आ. कामताचे 'शककर्त्याचा न्याय', याशिवाय प्रसिद्ध कवी बी यांची 'कमळा' हे १३४ पंक्तीचे काव्य इत्यादी साहित्यामध्ये संभाजी व कमळा यांच्यामध्ये प्रेमसंबंध रंगवून संभाजीराजांची रंगेल प्रतिमा केलेली आहे.

छत्रपती शिवाजी महाराजांच्या कारकीर्दीतील थोरात नावाच्या मराठी सरदाराची कमळा ही एक रूपसुंदर सर्वगुणसंपन्न अशी कन्या असते. संभाजीराजे शिकारीच्या निमित्ताने थोरातांच्या वाड्यात उतरतात. त्यावेळी कमळेच्या सौंदर्यावर संभाजी मोहीत होऊन तिच्या प्रेमात पडतो. कमळाही संभाजीवर जिवापाड प्रेम करते. त्याच्यावर विश्वास ठेवून संभाजी राजाबरोबर पळून येते. पळवून आनलेल्या कमळेला संभाजीराजे शिवनेरी किल्यावर ठेवतात. पुढे कमळेला संभाजीने आपली फसवून केल्याचे समजल्यानंतर ती किल्ल्यावरून उडी टाकून जीव देते. अशा प्रकारचे कथानक थोड्याफार फरकाने साहित्यकांनी रंगवले आहे.

याच कथानकाचा किंवा दंतकथेचा आधार घेऊन भालजी पेंढारकर आणि माधव शिंदे यांनी 'थोराताची कमळा' या नावाचा चित्रपट काढला होता. यामुळे कमळेची प्रतिमा लोकमानसात अधिक दृढ होण्यास मदत झाली; परंतु "छत्रपती संभाजी महाराज आणि थोरतांची कमळा यांचे काही प्रेम प्रकरण होते का ? याला ऐतिहासिक पुरावा नाही. किंबहुना

यत्किंचितही उल्लेख येत नाही."[१२] तसेच गोदावरी प्रमाणेच थोराताच्या कमळेची समाधी ही पन्हाळगडाच्या पायथ्याशी असलेल्या 'आपटी' या गावी असल्याचे सांगीतले जाते; परंतु ऐतिहासिक पुराव्यानुसार ही समाधी कमळेची नाही तर दुसरे संभाजीराजे राजारामपुत्र यांच्या काळातील करणवीर  दरबारचे सरदार यशवंतराव थोरात व त्यांच्या पत्नी गोडाबाई यांचे हे संयुक्त असे समाधी मंदिर आहे. या ऐतिहासिक वास्तुला 'थोराताचे थडे' असे म्हणतात. अशी कागदोपत्री नोंद आहे.[१३] 'बी' कवीची कमळा हे काव्य काव्यगुणानी कितीही मंडित असले तरी ते त्याचे आहे. कारण ते इतिहासाचे विर्पयास करणारे व एका ऐतिहासिक व्यक्तीचे चरित्र्यहन्न करणारे आहे.

### ४.३.१.५ संभाजी राजांचा इतर स्त्रीयांशी जोडेला संबंध :

संभाजीराजांची प्रेमप्रकरणे गोदावरी, झुबुन्निसा, तुळशी, कमळा या चार स्त्रियांशिवाय राधा, गजरा, हिरकणी, जमुना, हंसा, शेवंता, जुगल इत्यादी अनेक काल्पनिक स्त्री पात्रांशी रंगवून संभाजीराजांची विषयासक्त अशी प्रतिमा निर्माण केली. कादंबऱ्यामध्ये नाथमाधव यांनी 'स्वराज्याचा कारभार' व 'स्वराज्यावरील सकंट' या कादंबऱ्यामध्ये जमुना, राधा व यशोदा या काल्पनिक स्त्री  पात्रांची निर्मिती करून त्यांच्याशी संभाजी राजाचा  संबंध जळवून राजाची बदफैली प्रतिमा रंगवली. तसेच मनमोहन नातु यानी 'संभवमि युगे युगे' या कादंबरीत जुगल, शेवंता आणि रोशन या काल्पनिक स्त्री पात्रांचा आधार घेऊन कामांध संभाजी दाखवला आहे. नाटकामध्ये वासुदेवशास्त्री खरे यांनी 'गुणोत्कर्ष' या नाटकात राधाबाईवर असक्त संभाजी रंगवलेला आहे. यशवंत नारायण टिपणीस यांनी 'शिवाजीला शह' या नाटकात राधा व हिरकणी या दोन काल्पनिक स्त्री पात्रांशी संभाजीराजांचा संबंध जोडून स्त्री शौकीन संभाजीची प्रतिमा निर्माण केलेली आहे. आबासाहेब आचरेकारानी 'अमर जहाले राजे छत्रपती संभाजी' आणी 'सह्याद्री सांगे कथा शंभुची' या नाटकामध्ये 'गजरा' या काल्पनिक स्त्री पात्रांसोबत संभाजीराजाचे संबंध जोडून बदफैली अशी संभाजीराजाची प्रतिमा निर्माण करून संभाजी राजाना बदनाम करण्याचा  प्रयत्न केला आहे.

[१२] *मोहोड शालिनी:  शिवपुत्र छत्रपती संभाजी महाराज, कलादन प्रकाशन, पुणे २०१२ पृ.क्र. ३४०*
[१३] *मोहोड शालिनी : शिवपुत्र छत्रपती संभाजी महाराज, उपरोक्त पृ.क्र. ३४१*

वरील मराठी ऐतिहासिक साहित्यामध्ये जी स्त्री पात्रे रंगवलेली आहेत. त्यास ऐतिहासिक कागदोपत्री कोठेही पुरावा सापडत नाही. असे असताना सुद्धा अशा काल्पनिक पत्राच्या आधारे संभाजीराजाची बदफैली कामांध व रंगेल प्रतिमा रंगवणे हे इतिहासाचे विर्पयास करणारे आहे. त्यामुळे संभाजीराजाची प्रतिमा सर्वसामान्य जनमाणसात मलिन बनली.

## ४.३.२ व्यसनी, दारुबाज संभाजी :

मराठी बखरकारांनी व साहित्यिकांनी बदफैली संभाजीबरोबरच व्यसनी दारुबाज संभाजीची प्रतिमा निर्माण केलेली आहे. यामध्ये बखरकारापेक्षा साहित्यिकांनी आपल्या साहित्यामध्ये संभाजीराजाच्या व्यसनाधिनतचे चित्रण मोठ्या प्रमाणात रंगवलेले आहे.

कादंबरीकारामध्ये ना. वि बापट यांनी 'छत्रपती संभाजी महाराज', नाथमाधवानी 'स्वराज्याचा कारभार' व 'स्वराज्यावरील सकंट', मनमोहन नातु यांनी 'संभवमि युगे युगे' व 'छत्रपती संभाजी', रणजित देसाई यांनी 'श्रीमानयोगी', इत्यादी अनेक कादंबरीकारांनी आपल्या कादंबऱ्यामध्ये संभाजीराजांच्या व्यसनाधीनतेचे अतिरजित चित्रण आपल्या कल्पना विलासाच्या साहय्याने रेखाटले आहे. नाटककारामध्ये आ. मो. पठारे यांनी 'संगीत श्री छत्रपती संभाजी,' सोनाबाई केरकर यांनी 'संगीत छत्रपती संभाजी,' राम गणेश गडकऱ्यांनी 'राज्यसन्यास', वि. ह. औधकरांनी 'बेबंदशाही', मा. हा कोचरेकर यांनी 'संगीत मानी मराठा', आबासाहेब आचेरकरानी 'अमर जहाले छत्रपती संभाजी', व 'सह्याद्री सांगे कथा शंभुची,' अर्जुनराव झेंडे यांनी 'अश्रु ढळले रायगडाचे' इत्यादी नाटककारांनी आपल्या नाटकामध्ये व्यसनाधीनतेच्या आहारी गेलेल्या दारुबाज संभाजीचे चित्र रंगविलेले आहेत.

संभाजीराजांना कवी कलशांनी चंडिमातेचा प्रसाद म्हणून दारुचे व्यसन लावले. तसेच तुळशी, गसरा, राधा या त्यांच्या रखेलीसोबत किंवा प्रेमिकासोबत सतत मद्याच्या धुंदीत असल्याचे चित्रण आपल्या कलाकृतीमध्ये साहित्यिकांनी रेखाटले आहे. याशिवाय व्यसनाधीनतेच्या अवस्थेतच कारभार पाहतात, अष्टप्रधान मंडळातील मुत्सद्दी मंत्र्यांना शिक्षा

देतात. तसेच येसुबाईचा धिक्कार करतात आणि शेवटी मद्यधुंद अवस्थेतच मोगलाच्या कैदेत सापडतात. अशा प्रकारचे काल्पनिक व अनैतिहासिक वर्णन साहित्यिकांनी आपल्या साहित्यामध्ये केले आहे.

वास्तविकतः संभाजी राजाचे पालन पोषन हे राजमाता जिजाऊच्या छत्रछायेखाली झाले होते. त्यामुळे सुशिक्षित संस्कारक्षम संभाजी निर्माण झाले होते. या संदर्भात माहिती कवींद्र परमानदांनी आपल्या 'परमानंदकाव्यम' या ग्रंथात वर्णन केले आहे.

शिवसरपतिपुत्रच्चारुचचरित्रः प्रतिसरमरमजस्त्रं द्योतति स्मातिद्वातः।।९६।।
शिवाजी महाराजाचा पुत्र चरित्राने अत्यंत स्वच्छ होता; परंतु युद्धामध्ये अत्यंत अजस्त्र (दिसत) होता.[१४] शृंगारपुरास संभाजीचे वास्तव्य होते त्यावेळी ते कसे होते. यांचे वर्णन करताना कवींद्र परमानंद म्हणतात की, -

तेजसा भास्करःसाक्षादबुध्या जितशतक्रतुः। प्रतापतापिता रातिबृर्हद्भानुख स्वयम्।।६८।।

संभाजीराजे सूर्याप्रमाणे तेजस्वी बुद्धीचा साक्षात्कार असलेले होते. ते आजोबाप्रमाणे (शहाजीप्रमाणे) प्रतापी असून स्वतः बलवान होते आणि (शृंगारपुरास जाण्यापूर्वी पर्यंत) त्यांनी शंभर युद्धे (लढाया) जिंकलेली होती. अशा विद्वान संभाजीराजांनी मध्ययुगीन कालखंडामध्ये चार ग्रंथाची निर्मिती केली. 'बुधभुषणम्' हा राजनीतिपर ग्रंथ त्यांनी संस्कृतमध्ये लिहिला तर इतर 'नखशिखावर्णन', 'नायिकाभेद' व 'सातसतक' हे हिन्दी भाषेतील होते. त्यातील नखशिखावर्णन व नायिकाभेद हे शृंगारसप्रधान ग्रंथ असून शेवटचा सातसतक हा आधात्मिक होता. त्यामध्ये उपदेशात्मक विचार मांडले आहेत. अशा प्रकारे एक राजनीती निपुन व आध्यात्मिक व्यक्तिमत्वाचे संभाजीराजे व्यसन करतील असे वाटत नाही.

'बुधभुषणम्' या स्वयंरचित ग्रंथात स्वतः बद्दल अशी आत्मस्तुती करतात.

---

[१४] *सरदेसाई गो. स (संपा): परमानंदकाव्यम्, ओरिएटल इन्स्टिटुट , बडोदा १९५२ पृ.क्र. ७३ श्लोक ६८,९८*

तस्यात्मजःशभुरितीप्रसिद्धःसमस्तसामतंशिरोवसंतः।

यःकाव्यसाहित्यपुराणगीतकोदणविद्यार्णवपारगामी।।१५।।

त्यांना (छत्रपती श्री शिवाजी महाराजांना) शंभू नामक एक विरण्यातकीती पुत्र आहेत. ते सर्व सामन्त राजांच्या मस्तकांवरील अलंकार/ तुरा (समस्त सामन्त सामंताच्या मुर्धन्य) श्रेष्ठ आहेत; किंवा सर्वसामान्य सामंताच्या मस्तकांवर ते वसंत ऋतुच्या वैभवाप्रमाणे मुकुटमण जसे दिसत आहेत.) "काव्य, साहित्य, पुराणे , संगीत, धनुर्विद्या या विद्यासागरांना ते पार करून गेले आहेत. (अर्थात ते त्या सर्व विद्यामध्ये निपुण, विशारद, प्रवीण, कुशल, निष्णात, पारंगत ज्ञाते) आहेत."[१५] असे सर्वगुण संपन्न व्यक्तिमत्वाचे संभाजीराजे व्यसन न करणे शक्यच नाही हे स्पष्ट होते.

याऊलट ॲबे करे हा फ्रेंच प्रवाशी १६७२ च्या दरम्यान भारतात आला होता. तो युवराज संभाजीच्या युद्धकुशलते बद्दल असे लिहितो ...' शिवाजी राजांनी एक सर्वात शूर असा दहा हजार सैन्याचा विभाग आपल्या मुलाच्या ताब्यात दिला होता. हा युवराज लहान आहे तरी धैर्यशील व आपल्या बापाच्या कीर्तीस सजिल असाच शूर वीर आहे. शिवाजीराजासारख्या युद्धकुशल पित्याच्या बरोबर राहून तो युद्धकलेत तरबेज झालेला असून चांगल्या वयोवृद्ध सेनापतीची बरोबरी करील इतका तो तयार आहे. तो मजबूत बांध्याचा असून अति स्वरुपवान आहे... सैनिकाचे त्याच्यावर फार प्रेम आहे व ते त्याला शिवाजीसारखाच मान देतात. फरक इतकाच की, ह्या सैनिकास सभाजीच्या हाताखाली लढण्यात विशेष धन्यता वाटते. ते आपल्या कर्तबगारीचे सर्व श्रेय आपल्या छोट्या सेनापतीस देतात. संभाजीही कोणीही कर्तबगारी करून दाखविली तर त्यांचे कौतुक करतो व त्याचे समोर घडलेल्या शौर्याचे चीज संभाजीकडून बक्षिसरूपाने झाल्याशिवाय राहत नाही... संभाजीस खानदेश व गुजरात प्रांतीय राजांवर स्वारी करण्याचा हुकुम झाला होता... ज्यांच्यावर तो स्वारी करणार ते त्याच्या नावाच्याच दराऱ्याने पळून गेले. त्यामुळे त्याला यश व किर्ती मिळविणे सोपे गेले आणि अगदी थोडक्याच अवधित त्याने बराचसा प्रांत कब्जात

[१५] *कदम रामकृष्ण आनंदराव : छ. संभाजी महाराज-विरचित बुधभूषण-राजनीती, राजमयुर प्रकाशन, पुणे २०१२, पृ.क्र १३७*

आणला. या बालराजाची सर्वच इतकी वाहवा करितात की खास त्याच्या बापालाही, जर त्याचेत हेण्यादाव्याच्या तीव्र उर्मी वास करीत असतील तर, त्याचा हेवा वाटवा'.[१६]

शिवाजी महाराजांच्या निधनानंतर संभाजीराजे हे मराठी सत्तेचे सत्ताधिश झाले. याबाबत इंग्रजाचे पत्र अत्यंत बोलके आहे. दिनांक १० जानेवारी १६७७ रोजी सुरतकरांनी मुंबईस कळविले की, "त्याच्या (शिवाजी महाराजाच्या) मरणानंतरही काळजी करण्याचे कारण दिसत नाही. कारण त्याच्या मुलास (संभाजीराजास) मुकुट प्राप्त झालाच असून (His son alredy crowned) तो बराच समंजस दिसतो."[१७] संभाजीराजे व्यसनी आणि बदफैली असते तर त्यांचा उल्लेख असा इंग्रजानी केला असता का? याशिवाय संभाजीराजांच्या व्यसनी आणी बदफैलीपणाबद्दल इतिहासकार सेतू माधवराव पगडी म्हणतात. "औरंगजेबाच्या रुपाने मराठ्यांच्या लहानशा स्वराज्यावर प्रचंड सकंट येऊन कोसळले असता निराशेचा एक ही उद्दगार न काढता प्रत्येक आघाडीवर सतत नऊ वर्षे धीराने झुंजणारा संभाजी हा भयंकर व्यसनी आणि बदफैली असू शकेल अशी कल्पनाही करवत नाही"[१८] या सर्व ऐतिहासिक पुरावाच्या आधारे संभाजीराजे हे व्यसनी व बदफैली नव्हते हे सिद्ध होतो. साहित्यिकांनी बखरीतील व्यवसनाधितेच्या उल्लेखावरुन साहित्यिकानी काल्पनिक असे चित्रण त्यांनी आपल्या साहित्यामध्ये रंगवून संभाजी राजांची बदनामी केली आहे, हे यावरुन स्पष्ट होते.

### ४.३.३ सोयराबाईंना भिंतीत चिणून मारणारा संभाजी :

संभाजीराजांची विकृत किंवा मलीन प्रतिमा निर्माण करण्यासाठी बखरकारानी व साहित्यिकांनी त्याच्यावरती अनेक विविध अरोप केलेत त्यापैकी सर्वात महत्वाचा गंभीर स्वरुपाचा अरोप म्हणजे सोयराबाईंना भिंतीत चिणून मारल्याचा आहे. "तुम्ही राज्यलोभास्तव

---

[१६] *बेंद्रे वा. सी.: श्री. छत्रपती संभाजी महाराज यांचे विचिकित्सक चरित्र, मनोरमा प्रकाशन, मुंबई द्वितीयावृत्ती १९७१, पृ.क्र.७९-८०*

[१७] *दाखटकर अनंत: अद्वितीय छत्रपती श्री संभाजी महाराज, (खंड २ रा), श्रीशंभु प्रेरणा प्रकाशन, पुणे (प्रथमाकृती) २००९, पृ.क्र. ९७९*

[१८] *हेरवाडकर र.वि. (संपा): मल्हार रामराव चिटणीस विरचित श्रीमंत छत्रपती संभाजी महाराज आणि थोरले राजाराम महाराज यांची चरित्रे, व्हीनस प्रकाशन, पुणे १९७२, पृ.क्र. २०.*

महाराजास विषप्रयोग करून मारिले असे आरोप शब्द बोलून, कोनाडा भिंतीत करून, त्यास सोयराबाईसाहेबास चिणोन मारिले."[१९] असा अरोप मल्हार रामरावांनी केला आहे. मल्हार रामरावांचे या बखरीतील लिखाण प्रमाण मानून पुढे अनेक साहित्यिकांनी या प्रकरणाची अधिक शहानिशा न करता संभाजीराजांवर हा अरोप केला आहे. मराठीतील प्रारंभीच्या ऐतिहासिक नाटक व कांदबऱ्यातून हा आरोप अधिक स्वरुपामध्ये करण्यात आला आहे. कादंबऱ्यामध्ये ना. वि. बापट यांची 'छत्रपती संभाजी महाराज', हरिभाऊ आपटे यांची 'केवळ स्वराज्यासाठी', नाथमाधवांची, 'स्वराज्यावरील सकंट', मनमोहन नातुंची 'छत्रपती संभाजी' यासारख्या कादंबऱ्यामध्ये या प्रकरणाची काल्पनिक वर्णन लेखकाने केली आहेत. हरिभाऊ आपटे यांनी आपल्या 'केवळ स्वराज्यासाठी' या कादंबरीमध्ये संभाजी राजानी सोयराबाईचा क्रूर छळ करून ठार मारत असताना ती संभाजीस शाप देते व त्याचीच परिणती म्हणून संभाजीराजेना औरंगजेबाने क्रुरपणे हालहाल करून मारले असा अवास्तव युक्तीवाद ही केल्याचे दिसून येते. नाटकामध्ये आत्माराम पाठारेंचे 'संगीत श्री छत्रपती संभाजी', गडकऱ्याचे 'राज्यसंन्यास', औंधकराचे 'बेबंदशाही' या सारख्या ऐतिहासिक नाट्य कृतीतूनही सोयराबाईला संभाजीराजानी भिंतीत चिणून मारल्या बाबतचे अतिरंचित चित्र नाटककारांनी रेखाटले आहे.

संभाजी राजांच्या वास्तव इतिहासात मात्र सोयराबाईचा मृत्यू २७ ऑक्टोबर १६८१ म्हणजे शिवजी महाराजांच्या मृत्युनंतर एकोणीस-वीस महिन्यानी अणि संभाजी महाराज रायगडावर राज्याधिकारी म्हणून आल्यानंतर पंधरा-सोळा महिन्यांनी झाला. सोयराबाई रायगडावर मेली त्यावेळी संभाजी महाराज पन्हाळ्यास होते.[२०] इंग्रजाच्या बातमीनुसार सोयराबाई रक्तीत साराने मरण पावल्या.[२१]

छत्रपती संभाजीराजांनी २० जुलै १६८० रोजी स्वतःचा राज्यभिषेक करून घेतला यानंतर जून १६८१ च्या सुमारास पन्हाळ्यावर असताना त्यांना अन्नामध्ये विष देऊन

[१९] *बेंद्रे वा. सी.: श्री छत्रपती संभाजी महाराज यांचे विचिकित्सक चरित्र, मनोरमा प्रकाशन, मुंबई द्वितीयावृत्ती १९७१, पृ.क्र.१६१*

[२०] *जोशी द, प, उषा जोशी: समग्र सेतुमाधवराव पगडी (खंड २ रा) मराठी साहित्य परिषद, हैद्राबाद २०१० पृ.क्र. १०६९.*

[२१] *मोहोड शालिनी: शिवपुत्र छत्रपती संभाजी महाराज, कलादन प्रकाशन, पुणे २०१२ पृ.क्र. ३१५*

मारण्याचा कट केला. यामध्ये सोयराबाईचा हात आहे असे समजुनही संभाजी राजांनी इतर मंत्र्याप्रमाणे त्यांना ठार केले नाही. त्याचवेळी त्यांना मृत्यू आला; पण तो त्यांनी विष प्राशन करून आत्महत्या केली म्हणून या मृत्युला छत्रपती संभाजी महाराजांना जबाबदार धरता येणार नाही. याशिवाय छत्रपती संभाजी राजांनी आपल्याला राज्यपद मिळावे म्हणून नवस केला होता. अर्थात प्रत्यक्ष सत्ता मिळाल्यानंतर तो नवस पूर्ण झाला. त्यामुळे त्याप्रसंगी त्यांनी दि २४ ऑगस्ट १६८० रोजी बाकरे नावाच्या ब्राह्मणाला संस्कृतमध्ये दानपत्र करून दिले यामध्ये सोयराबाईचा उल्लेख करताना त्यांनी पुढील उद्‌गार काढले आहेत. "सुरु झालेल्या प्रबल वैरात प्रविष्ट झालेल्या दुष्ट मंत्र्यांचा, ज्येष्ठ पुत्राला राज्यदान करु नये या दुष्ट सल्ल्यामुळे जिचे ह्रदय कलुषित झाले आहे, वस्तुत, निळ्या पिवळ्या पार्श्वभूमीत असलेल्या स्पटिकाप्रमाणे जिचे ह्रदय स्वच्छ, सौजन्ययुक्त आहे अशा राणी विषयी पक्षपातामुळे शिवराजाचे मत आपल्या विरुद्ध असल्याचे समजून सुद्धा केवळ तेवढ्याच कारणाने पितृभक्तीत अंतर पडू न देणारे ... वगैरे वगैरे[२२] या ऐतिहासिक पुराव्यावरुन संभाजीराजांनी रागामध्ये येऊन सोयराबाईना भिंतीत चिणून ठार मारले हा अरोप तथ्यहीन व खोटा असल्याचे सिद्ध होते.

### ४.३.४ राजारामाला अंधारकोठडीत टाकणारा संभाजी :

संभाजीराजानी आपल्या विरुद्ध केलेल्या कारस्थानामध्ये राजराम ही सामिल होता म्हणून त्यांना शेवटपर्यंत अंधारकोठडीत टाकल्याचा आरोप बखरकाराप्रमाणेच मराठीतील ललित साहित्यिकांनी केलेला आहे. बखरीमध्ये मल्हार रामरावाची छत्रपती संभाजी महाराजावरील बखर, शेडगावकर, बखर, कादंबऱ्यामध्ये ना. वि. बापटाची 'छत्रपती संभाजी महाराज', हरीभाऊ आपटे यांची 'केवळ स्वराज्यासाठी', नाथमाधवाची स्वराज्यावरील सकंट, नाटकामध्ये आत्माराम पाठारेचे 'संगीत श्री छत्रपती संभाजी,' गडकऱ्याचे 'राजसन्यास', औंधकराचे 'बेबंदशाही' इत्यादी ललित साहित्यकृतीमध्ये संभाजीराजांनी आपल्या विरुद्धच्या

[२२] *मोहोड शालिनी : शिवपुत्र छत्रपती संभाजी महाराज, कलादन प्रकाशन, पुणे २०१२ पृ.क्र. ३१५*

कटामध्ये बंधु राजराम सामिल होता. म्हणून त्यांचा छळकरून शेवपर्यंत त्याला अंधारकोठडीत टाकल्याचे  चित्रण रंगविले आहे.

प्रत्यक्षात संभाजीराजानी राजरामाला अंधारकोठडीत ठेऊन त्याचा छळ केला असे बखर आणि साहित्यातील आरोप निराधार स्वरुपाचे असल्याचे संभाजीराजांच्या वास्तव इतिहासावरुन निदर्शनास येते. राजाराम महाराजाचा जन्म २४ फेब्रुवारी १६७० रोजी झाला होता. त्यामुळे छत्रपती शिवाजी महाराजांच्या मृत्युच्या वेळी राजाराम हे अवघा नऊ ते  दहा वर्षाचे होते. यामुळे संभाजीराजाच्या विरुद्ध जे कटकारस्थानी झालीत त्यांच्यामध्ये बालवयाचा राजाराम असणे शक्यच नव्हते आणि हे संभाजीमहाराजानाही माहित होते. त्यामुळे संभाजीराजांनी आपल्या वडिलांच्या मृत्युनंतर सत्तेची सर्व सुत्रे हाती घेतल्यानंतर आपला लहान भाऊ राजारामाला त्यांनी अतिशय प्रेमाणे वागविले. राजारामसाहेबास शिकवण्यास दाभाडयाची खास योजना संभाजीमहाराजांनीच केली होती.[२३] त्याचबरोबर राजराम महाराजांचे पहिले लग्न १५ मार्च १६६० रोजी प्रतापराव गुजरांची कन्या जानकीबाईशी झाले होते; परंतु शिवाजी महाराजाच्या मृत्युनंतर थोड्याच दिवसाने जानकी बाईचाही मृत्यू झाला होता. तेव्हा संभाजी महाराजांनी राजारामाची आणखी तीन लग्ने लावून दिली. पहिली हंबीरराव मोहिते यांची कन्या ताराबाई, दुसरी कागलकर घाटगे यांची कन्या राजसाबाई व तिसरी खानविलकर यांची कन्या अंबिकाबाई अशी तीन लग्ने संभाजी महाराजांनी साजरी केली.[२४] अशा प्रकारे संभाजीराजांनी राजारामाला कैद करून अंधारकोठडीत न टाकता त्यांच्या उत्तम शिक्षणाची व पालनपोषणाची जबाबदारी वडील बंधु या नात्यांनी संभाजरीराजांनी पूर्ण केल्याचे दिसून येते.

### ४.३.५ मुत्सद्दी व अनुभवी मंत्र्याना मारणारा संभाजी

बखर वाङ्मयामध्ये मल्हार राजाची संभाजी महाराजावरील बखर, मराठी साम्राज्याची छोटी बखर, शेडगावकर अदि  बखरीमध्ये संभाजीराजांनी राज्यातील  अनेक मुत्सुद्दी मंत्र्यांना

---

[२३] *बेंद्रे वा. सी. : श्री. छत्रपती संभाजी महाराज यांचे विचिकित्सक चरित्र, मनोरमा प्रकाशन, मुंबई द्वितीयावृत्ती १९७१, पृ.क्र.१६६*

[२४] *बेंद्रे वा. सी. श्री. छत्रपती संभाजी महाराज यांचे विचिकित्सक चरित्र, उपरोक्त, पृ.क्र.१६६*

ठार मारणाचा आरोप केला आहे. याचीच साहित्यिकांनी आपल्या साहित्यकृतीमध्ये ओढल्याचे दिसून येते. कादंबऱ्यामध्ये ना. वि. बापटाची 'छत्रपती संभाजी महाराज' ह. ना आपटेची 'केवळ स्वराज्यासाठी', नाथमाधवाची 'स्वराज्यावरील सकंट', मनमोहन नातुची 'छत्रपती संभाजी', इत्यादी कादंबऱ्यामध्ये संभाजीराजांनी यमाजी भास्कराचा दरबार चालवून अनेक मंत्र्यांना ठार केले. कित्येकांच्या कुळाचा क्षय केला असे चित्रण रंगविले आहे. नाटकारामध्ये आत्माराम पाठोरेचे 'संगीत श्री छत्रपती संभाजी', राम गणेश गडकऱ्याचे 'राजसंयास', वि. ह. औधकराचे 'बेबंदशाही' लक्ष्मण साडवांचे 'छत्रपती संभाजी', आदी नाटकामध्ये स्वराज्यनिष्ठकाचे नाहक मुडदे पाडले. आयुष्यभर रक्ताची रंगपचमीच केली असे अंतिरंजित वर्णन करून संभाजीराजांची मलिन प्रतिमा निर्माण केली.

छत्रपती शिवाजी महाजांच्या मृत्युनंतर स्वराज्याचे खरे वारस संभाजीराजे असताना अष्टप्रधान मंडळातील प्रमुख मंत्र्यांनी राजारामाला मराठी सतेच्या गादीवर बसवून संभाजीराजांना पन्हाळगडावरच कैद करण्याचा अतिशय कुटील असा कट आखला; परंतु तो पूर्णत्वास येण्यापूर्वीचे त्याची माहिती संभाजीराजांना मिळाली. तो त्यांनी हाणून पाडला. हा दुष्टमंत्र्यांचा संभाजीराजा विरुद्धचा पहिला कट होता. या कटामध्ये सामील असलेल्या मंत्र्यांना त्यांनी सेपानती हंबीरराव मोहितेकडून कैदे केले. यामध्ये पेशवे मोरोपंत पिंगळे, सचिव अण्णोजी दत्तो, न्यायाधीश प्रल्हादपंत रावजी अदि होते तर रघुनाथ पंत हणुमंत हे पळून गेले होते. यातील कोणत्याही मंत्र्याना ठार मारले नाही. यानंतर प्रधानमंडळातील मंत्र्याना फार काळ अटकेत ठेवणे योग्य नाही हे संभाजी राजांनी जानून आपला राज्यभिषेक करण्यापूर्वी सर्वांची सुटका करून त्यांना पुन्हा अष्टप्रधान मंडळातील पदावरती नियुक्त्या केल्या होत्या. त्यामध्ये ऑक्टोबर १६८८ च्या सुरुवातीलाच मोरोपंत पिगळे वारले त्यामुळे संभाजीराजांनी मोरोपंताचा मोठा मुलगा निळोपंत पिंगळे यांना पेशवाईची सुत्रे दिली होती. ती शेवटपर्यंत त्याच्याकडेच होती. अण्णाजी दत्तो यांना सचिवपद न देता आमत्य मुजुदार केले. प्रल्हादपंत रावजी यांना न्यायाधीश पदावर कायम ठेवले तसेच यावेळी संभाजीराजांनी मोरेश्वर रघुनाथ याच्याकडे पंडितराव हे पद पूर्वीपासून होते तेच कायम ठेवले. रामचंद्र

निलकंठ याला सचिव पद देण्यात आले कवी कलश  यांच्याकडे छंदोमाव्य व काकेनविसी पदे देण्यात  आली होती. तर हंबीररावकडे सेनापतीपद कायम करण्यात आले होते. यानंतर १६ जानेवारी १६८१ रोजी संभाजीराजांनी स्वतःचा राज्यभिषेक करून विधियुक्त राज्यकारभाराला सुरुवात केली होती; परंतु कटुल मंत्र्यांनी आपली कटकारस्थान करण्याचे सोडले नाहीत.

संभाजीराजांच्या विरुद्ध दुसरा कट जून १६८१ मध्ये संभाजीराजे पन्हाळ्यावर असताना त्यांना अन्नातून विषप्रयोग करून ठार मारण्याचा प्रयत्न केला होता; परंतु तोही फसला. यामुळे त्याच्या पाठोपाठ अकबराच्या मदतीने संभाजीस गादीवरून काढून टाकण्याचा तिसरा कट रचला. या कटात अण्णाजी दत्तो, बाळाजी आवजी, सोमाषी दत्तो हिरोजी फर्जद, सोयराबाई इत्यादी मंडळी होती. कटवाल्या मंडळींनी अकबराला पत्र पाडून त्याला या कारस्थानात ओढण्याचा प्रयत्न केला; पण दुर्गादास राठोड याचा सल्ला घेऊन अकबराने कटाची बातमी संभाजीला ताबडतोब कळविली. तेव्हा संभाजीराजांनी कटवाल्याना पकडून त्यांना कडक शिक्षा ठोठावल्या या संदर्भात मनुची लिहितो, "संभाजीच्या सरकारकुनांनी आपल्या राजविरद्ध द्रोहाचे पत्र अकबरास लिहून त्यास आपण तुम्हाला मिळतो आहोत." असे कळविले; परंतु अकबराने दुर्गादासाच्या सल्ल्याने ते पत्र राजांच्या हवाली केले यावरुन त्यांनी सर्वांना ठार मारण्याचा हुकुम केला."[२५] या विषयी जवे शकावलीतील नोदीमध्ये अशी माहिती मिळते. 'शके १६०३' दुर्मति संवत्सर भाद्रपद माझी (४ ऑगस्ट ते २ सप्टेंबर) संभाजी राजे यांनी कवी कलशाचे  बोले मागती अण्णाजी  दत्तो सचिव याजतरी इतराशी  करून मार दिल्हा त्या माराने राजश्री अण्णजीपंत व बाळप्रभू  व सोमालि दत्तो व हिरोजी फर्जंद परळीखाले  कैद करून  मारले. कर्नाटकात शामजी नाईक यास कैद करविले.[२६] म्हणजे संभाजीराजे सत्तेवर येईपर्यंत मे १६८० ते ऑगस्ट १६८१ पर्यंतच्या दीड वर्षाच्या काळात त्यांच्या विरुद्ध तीन कटकारस्थाने झाली होती. यामुळे

---

[२५] *मोहोड शालिनी : शिवपुत्र छत्रपती संभाजी महाराज, कलादन प्रकाशन, पुणे २०१२ पृ.क्र. ३१९*

[२६] *जोशी द. प., उषा जोशी: समग्र सेतुमाधवराव पगडी (खंड २ रा) मराठी साहित्य परिपद, हैद्राबाद २०१० पृ.क्र. १०४८.*

कटकारस्थानामध्ये सामिल असलेल्या मंत्र्यांना शिक्षा देणे हे रास्त होते. यामुळे त्यांनी अण्णाजी दत्तो, बाळाजी आवजी, सोमाजी दत्तो, हिरोजी फर्जंद आदींना ठार केले. याबाबत इतिहासकार सेतू माधवराव पगडी म्हणतात, "राष्ट्रदीयांना संभाजीने कडक शिक्षा ठोठावल्या हे योग्यच केले याबद्दल त्याला दोष देणे आणि तो खुनशी, क्रूर आणि सूडबुद्धीचा होता असे सुचविणे म्हणजे त्यांच्यावर मोठा अन्याय करणे होय."[२७]

शिवाजी महाराजाच्या वेळेसची चिटणीस व सचिवाशिवाय इतर सरकारकुनास संभाजी महाराजांनी मारले किंवा कोणाकडून मारविले नाही. मोरोपंत पिंगळे व हणुमते बंधू हे मेले मारले नव्हते. रामचद्रपंत शकंराजी नारायण, प्रल्हादपंत निराजी, धनाजी जाधव, सताजी घोरपडे आणि मुख्यप्रधान म्हणजे निळो मोरेश्वर, रुपाजी भोसले, मोरे वगैरे मंडळी संभाजीराजांच्याच पदरची व निवडीची होती. या संदर्भात प्रसिद्ध इतिहासकार वा. सी. बेंद्रे म्हणतात, "बखरकाराच्या 'कारभारी मारले, बालक माणसे जवळ केली' वगैरे लिहिण्याला काहीच आधार नसून ते सर्व काल्पनिक व पूर्वगृह दूषित आहेत यात शंका राहत नाही. " [२८]

### ४.३.६ शिर्क्याचे शिरकाण करणारा संभाजी :-

बखरकाराप्रमाणे मराठी ऐतिहासिक साहित्यिकांनी संभाजीराजांनी शिर्क्याचे शिरकाण करने म्हणजे शिर्क्याच्या कत्तली करणे हा अर्थ अभिप्रेत धरून तशाच प्रकारचे चित्रण कृतीमध्ये रंगविले आहे. कादंबऱ्यामध्ये ना. वि. बापटाची 'छत्रपती संभाजी महाराज', या कादंबरीपासून ते मनमोहन नातु यांच्या १९७० मध्ये लिहिलेल्या 'छत्रपती संभाजी' या कादंबरीपर्यंत सर्वच कादंबरीकारांनी आपल्या कादंबऱ्यामध्ये शिर्क्यांच्या शिरकाणाचे चित्रण रेखाटले आहे. सोयराबाईच्या आकसापोटी संभाजीने शिर्के कुळातील कच्च्या, बच्च्याना मारले, शिर्क्याच्या सर्व बायका कुकुंमरहित केल्या, शिर्के सापडीत पडली त्यांची डोकी मारली असे भडक व अतिरंजित चित्रण कादंबरी कारांनी केले आहे. नाटकामध्ये 'राजसन्यास',

---

[२७] *जोशी द. प., उषा जोशी : समग्र सेतुमाधवराव पगडी (खंड २ रा) मराठी साहित्य परिपद, हैद्राबाद २०१० पृ.क्र. १०४८.*

[२८] *बेंद्रे वा. सी. : श्री. छत्रपती संभाजी महाराज यांचे विचिकित्सक चरित्र, मनोरमा प्रकाशन, मुंबई द्वितीयावृत्ती १९७१, पृ.क्र.१६६*

'बेबंदशाही', मानी मराठा, छत्रपती संभाजी या नाटकातीतून शिर्क्याच्या शिरकाणाबाबतचे विकृत चित्र नाटककारांनी रेखाटले आहे.

शिरकाण म्हणजे शिरकापणे किंवा शिर्क्यांची कत्तल करणे अशा चुकीचा अर्थ घेतल्यामुळे सर्व घोटाळा झाला आहे. 'शिरकाण या शब्दाचा अर्थ शिर्क्याचा ताब्यातील प्रदेश असा आहे.' जसे फिरंग्याचा प्रदेश म्हणजे फिरंगाण, हनशाचा प्रदेश म्हणजे हबसान तसेच 'शिर्काण' म्हणजे रायरी सभोवलातचा शिर्क्याचा मुलख असा स्पष्ट निर्देश सर्वत्र कागदपत्रात पहावयास मिळातो.[२९] शिरकाण म्हणजे शिर्क्याची जहागीरी होतो. मूळ शब्दप्रयोग 'शिर्काण केले' असा नूसन शिर्काण घेतले असा आहे. आमचे शिर्काण आम्हास परत मिळावे अशी शिर्क्याची मागणी होती. शिर्के मंडळी ही जवळपास इ. स. १६८८ च्या शेवटपर्यंत संभाजीराजांशी ऐकनिष्ठ होती; परंतु शाहा अजमचे सैन्य मुकर्रबखा बरोबर शिर्क्यांचा धीर सुटून ते आपल्या वतनाच्या बचावार्थ मोगलाकडे गेले. त्याचा फायदा मुकरबखनाने घेऊन शिर्क्यांचा पन्हाळ्याच्या राजकारणात उपयोग करून घेतला. त्याचा परिणाम संभाजीराजे व शिर्के यांच्या भांडणात होऊन शिर्क्यांना सर्वस्वी मोगलाचे चाकर म्हणून राहण्याची पाळी आली.[३०] ऐतिहासिक पुराव्यानुसार शिर्क्यांमध्ये दौलतराव, गणोजी व देवजी यांचा समावेश होतो. छत्रपती संभाजीराजांनी या सर्वांची जहाँगीरी जप्त केले, त्यांना मारले नाही.

### ४.३.७ कवी कलशांच्या आहारी जाणारा संभाजी :

मल्हार रामराव चिटणीस लिखित छत्रती संभाजी महाराजावरील बखर "या बखरीला प्रमुख आधार मानून मराठीतील अनेक ऐतिहासिक साहित्यिकांनी कथा, नाटक, कादंबऱ्यांची निर्मिती केली. यामुळे त्यामध्ये कवी कलशाच्या आहारी जाणरा, त्याच्या तंत्राने चालणारा संभाजी अशा प्रकारचे चित्रण साहित्यिकांनी रेखाटले आहे. कादंबऱ्यामध्ये ना. वि बापटांची 'छत्रपती संभाजी महाराज', या संभाजी राजावरील पहिल्या ऐतिहासिक कादंबरीपासून ते वा. न. देशापांडे यांची १९७३ मधील 'आम्ही यातनाचे स्वामी', या

[२९] *बेंद्रे वा. सी.: श्री. छत्रपती संभाजी महाराज यांचे विचिकित्सक चरित्र, मनोरमा प्रकाशन, मुंबई द्वितीयावृत्ती १९७१, पृ.क्र.६८५*
[३०] *बेंद्रे वा. सी. श्री. छत्रपती संभाजी महाराज यांचे विचिकित्सक चरित्र, उपरोक्त, पृ.क्र.६८५*

कादंबरीपर्यंत सर्वच कादंबऱ्यामध्ये कादंबरीकरांनी संभाजीराजे कवी कलशाच्या हातचे बाहुले बनल्याचे चित्रण रंगवले आहे. नाटकामध्ये आत्माराम पाठारेचे 'संगीत श्री छत्रपती संभाजी,' सोनाबाई केरकरचे 'संगीत छत्रपती संभाजी', गडकऱ्याचा 'राजसंन्यास', ल. वि. सांडवाचे 'छत्रपती संभाजी', वि. ह. औंधकराचे 'बेबंदशाही', आबासाहेब आचेकरचे अमर जहाले छत्रपती संभाजी अर्जुनराव झेंडे यांचे 'अश्रु ढळले रायगडाचे', वसंत कानेटकर यांचे 'इथे औशाळला मृत्यू' यासारख्या नाटकामध्ये कवी कलशाच्या आहारी गेलेल्या संभाजीची प्रतिमा रंगवलेली आहे.

कवी कलश संभाजीराजांना दारुचे व्यसन चंडीमातेचे तीर्थ म्हणून पाजतात आणि व्यसन लावतात. संभाजीराजाला वशभुत करण्यासाठी अनेक स्त्रियांच्या मोहजाळात त्यांना आडकवून सर्व राज्याची सुत्रे आपल्या हातात घेतात कवी कलशाच्या सल्ल्याशिवाय संभाजीराजे एक ही पाऊल टाकत नाहीत. कवी कलशाच्या सांगण्यावरून संभाजीराजांनी स्वराज्यातील जनतेचा अनन्वित छळ केला, अष्टप्रधान मंडळातील मुत्सुद्दी मत्र्यांना ठार मारले. तसेच कवी कलश हा मोगलाशी फितूर असून जहाँगिरीच्या स्वार्थासाठी संभाजीरांजाना अनुष्ठानाच्या निमित्ताने संगमेश्वरी नेऊन त्यांना मोठ्या प्रमाणात मदिरा पाजवून मोगलांना पकडून देतो. अशा प्रकारचे ऐतिहासिक सत्येची अपलाप करणारे लेखन साहित्यिकांनी व बखरकारांनी केले आहे.

कवी कलश उत्तरभारतीय कंणोजी ब्राह्मण असून शाक्तपंथीय तांत्रिक होता. छत्रपती शिवाजी महाराजांच्या काळापासून त्याचा भोसले घराण्याशी संबंध असल्याचे दिसनू येतो. शिवाजी महाराज आगऱ्याहून सुटून आले तेव्हा त्यांनी कवी कलश नावाच्या भोसल्याचा कुलोपाध्यास, कवी पैसे व रत्ने देऊन संभाजीला बनारस येथे त्याच्या स्वाधीन केले. शिवाजी महाराजांनी त्यास सांगीतले की, मी सुखरूप पोहोचल्याने तुला पत्र लिहिले की, सांगीतलेल्या मार्गाने त्याला परत आणावे, असे खाफीखान म्हणतो खाफीखानाच माहिती

ग्रहाय धरली तर संभाजीचा बालपणापासूनच कवी कलशाशी संबंध झाला होता असे दिसत.[३१]

मराठी साधनामध्ये सर्व प्रथम कवी कलश याचा उल्लेख १६८१ च्या ऑगस्ट सप्टेंबर संभाजीराजानी स्वत: विरुद्धच्या कटात सामिल असलेल्या मंत्र्याना शिक्षा केल्या. त्याची माहिती जेथे शकावलीत मिळते. कवी कलशाच्या सांगण्यावरुन मत्र्यांना शिक्षा दिल्या. असा येतो त्यानंतर दि. ०३/०७/१६८३ पासून त्यांची राज्यकारभार विषयक अनेक पत्र मिळतात. संभाजीराजांनी कवी कलशाला छंदोगामाव्य हे पद देऊन अष्टप्रधान मंडळातील वाकनीस करून मानाचे स्थान दिले होते तरी ते राज्याचे मुख्य प्रधान कधीच नव्हते. मुलकी कारभाराचे कुलमुखत्यार पद महाराणी येसूबाईकडेच होते. कवी कलश जरी संभाजीराजाच्या मर्जीतले असले तरी त्यांना कोणताही निर्णय इतर मंत्र्याच्या सोबतच घ्यावा लागत असे. "महादजी जगदाळा व संताजी घाडगा यांच्या शेतातील अनेक वस्तु सितोजी व त्याचा भाऊ सटेवोजी भोसले यांनी चोरल्या होत्या. सितोजी भोसले यांनी चोरले किती याविषयी साक्षी गोळा केल्यानंतर मुख्य प्रधान निळकंठ मोरेश्वर, प्रल्हादपंत, न्यायाधीश, हंबीरराव सेनापती व कवी कलश यांनी एकत्र बसून निर्वाह केला होता की, जर खोट्या गोष्टी दिसून आल्या तर संभाजीराजे कोणाची गय करणार नाहीत. चोरीच्या निकाल पत्रावर प्रधान, न्यायाधीश व सेपापती यांचे शिक्के आहेत; पण त्यावर कलशाचा मात्र शिक्का नाही.[३२]

कवी कलश संभाजीराजाचे अतिशय विश्वासू व एकनिष्ठ सेवक होते. त्यांनी कोणतेही फितूरी केली नव्हती उलट संभाजीराजाबरोबर स्वराज्य रक्षणासाठी मोलाचे सहकार्य केले. "१६८३ मध्ये कानद खोऱ्यातील देशमुख हे काही कारणाने संभाजीराजावर नाराज होते. तेव्हा कवी कलशाने संभाजी राजांना विनंती करून त्यांना राजांच्या भेटीस बोलाविले होते. दि. ३/०८/१६८४ रोजी कलशाने देशमुखाला लिहिले की, त्यावरुन आम्ही छत्रपतीस्वामीस विनंती करून तुम्हास भेटीस यावयाची आज्ञा केली आहे. येणे मुदा मनास आणून तदनुसार पारपत्य देऊ या प्रसंगी अवघे वतनदार एकमते राहोन गनिमास सजा द्यावी.

[३१] *गोखले कलम श्रीकृष्णः शिवपुत्र संभाजी, ज्ञान-विज्ञान विकास मंडळ, पुणे (तृतीयावृत्ती) २००१ पृ.क्र. ३५३.*
[३२] *गोखले कलम श्रीकृष्ण : शिवपुत्र संभाजी, उपरोक्त, पृ.क्र. ३५७.*

आपली सर फराजी करून द्यावी." हे पत्र फार महत्वाचे आहे. राज्यात देशमुख नाराज व असंतुष्ट झाले तर त्याची प्रत्यक्ष संभाजीराजांशी गाठ घालून त्यांचे समाधान करण्याचा प्रयत्न कलशाने केलेला दिसतो.[३३] यावरुन कवी कलश हे मोगलाशी फितूर नसून मोगलाशी सर्वांनी एकत्रित लढा देण्यासाठी प्रयत्न करत असल्याने दिसून येते. संभाजीराजाच्या आश्रयास आलेला शहाजादा अकबर दि. १८ जानेवारी १६८५ रोजी महाराजांना कवी कलशाबद्दल लिहितो, "महमदखान व खिदमद परस्तखानाच्या पत्रावरून मोगलांनी घातेल्या छात्यांबदद्दल व त्यांचा निधरिने व धैर्याने कवी कलशाने केलेल्या प्रतिकाराबदद्दल सर्व मजकुर विदित झाला. कवी कलश हा तुमचा फार चांगला व विश्वासू असा नोकर आहे. दरबारी यांच्या (सरकारकुनांच्या) हेव्या दाव्याने त्याचा कोणाकडून नाश ईश्वर होऊ न देवो तुम्ही त्यांच्या संरक्षणाची खबरदारी घेतली पाहिजे. मोगल सरदार गाझिउदद्दीन खानकहादरने स्वराज्यातील लोकांना फितूर करून रायगडाजवळ जाळपोळ केली. त्यांचा प्रतिकार कवी कलशाने यशस्वीपणे केला. त्यावेळेचे हे शहाजादा अकबखराचे पत्र आहे."[३४] कवी कलशाने संभाजीराजाच्या कारर्कीदीत अनेक आघाड्यावर मोगल सैन्याचा प्रतिकार केल्याचे दिसून येते. संभाजी महाराजांच्या कारकीर्दीत कवी कलशाने फितूरी केली असता तर त्यानंतरच्या राजाराम महाराज, महाराणी ताराबाई व शाहु महाराज या राज्यकर्तपैकी कोणाचा तरी कोणत्या तरी कागदपत्रात स्पष्ट झाला असता. उलट राजराम महाराजानी आपल्या कारर्कीदीत कवी कलशांच्या मुलास वतनांच्या सनदा बहाल केल्या तसेच कवी कलशाने संभाजी महाराजांची शेवटपर्यंत साथ केली व आपल्या धन्याबरोबर देहदंड भोगला म्हणून वडू येथे संभाजीपुत्र शाहु महाराजानी आपल्या वडील संभाजीराजे यांच्या स्मारकाबरोबरच त्याचे एकनिष्ठ सहकारी कवी कलश यांचे वृदांवन बांधून त्यांची उत्तम व्यवस्था केल्याचे दिसून येते.

*[३३] गोखले कलम श्रीकृष्णः शिवपुत्र संभाजी, ज्ञान-विज्ञान विकास मंडळ, पुणे (तृतीयावृत्ती) २००१ पृ.क्र. ३५७*

*[३४] पवार जयसिंगराव (संपा) छत्रपती संभाजी स्मारक , ग्रंथ, रिया पब्लिकेशन, कोल्हापुर (द्वितीयावृत्ती) २००९ पृ.क्र. १८१.*

अशा प्रकारच्या अखेरपर्यंत संभाजीराजाशी एकनिष्ठ असणाऱ्या कवी कलशाची बदनामी करण्याचे कारण म्हणजे कवी कलश हा शाक्तपंथीय तांत्रिक ब्राह्मण होता. शाक्तपंथाचा उगम जरी मूळ बंगालमध्ये झालेला असला तरी त्या विधेचा प्रसार महाराष्ट्रातही विशेषतः दक्षिण कोकणात झालेला होता. शिवाजी महाराजांचा दुसरा तांत्रिक पद्धतीने राजाभिषेक करणारा निश्चलपुरी गोसावी याच पंथाचा होता. शृंगारपूर हे तांत्रिक उपासनेचे केंद्र बनले होते. यावेळी महाराष्ट्रात वैदिक ब्राह्मण विरुद्ध तांत्रिक ब्राह्मण असा संघर्ष सुरु झाला होता. संभाजीराजे शृंगारपुरला असताना तांत्रिक ब्राह्मणावरती आपली कृपादृष्टी दाखवली. त्यांनी स्वतः शाक्तपंथाची दीक्षा घेतली. यामुळे शिवाजीराजांच्या अष्टप्रधान मंडळातील वैदिक ब्राह्मणांनी संभाजीराजाचा विरोध केला. संभाजीराजांची बदनामी करून त्यांना मराठी सत्तेवर येऊ न देण्याचा कट रचला. त्याचबरोबर त्यांचा सहकारी कवी कलश हा तांत्रिक होता. त्यामुळे त्यांची बदनामी वैदिक ब्राह्मणानी केली. संभाजी उत्तरकालीन बखरकारानी आणि साहित्यिकांनी यामध्ये अधिकाधिक भर घालण्याचे कार्य केले.

### ४.३.८ मोगलाच्या कैदेत पश्चातापाग्नित जळत असलेला संभाजी :-

संभाजीराजांना मोगलांनी कैद केल्यानंतर आपल्या आयुष्यामध्ये केलेल्या कृत्याबद्दल पश्चाताप करत असलेल्या संभाजीचे चित्रण साहित्यिकारांनी रंगवलेले आहे. काही साहित्यिकांनी कैदेतील संभाजीराजे मनोविश्लेषण करण्याचा प्रयत्न केला आहे. कादंबरीकारामध्ये ह. ना आपटेची 'केवळ स्वराज्याठी', नाथमाधवाची 'स्वराज्यावरील सकंट', वा. ना. देशपांड्याची 'आम्ही यातनाचे स्वामी' या सारख्या कादंबरीकारानी आपल्या कादंबऱ्यामध्ये मोगलाच्या कैदेत पश्चात करत असलेल्या संभाजीचे अतिरंजित चित्रण रंगवलेले आहे. नाटकारामध्ये आत्माराम पाणरेचे 'संगीत श्री छत्रपती संभाजी', राम गणेश गडकऱ्याचे 'राजसंन्यास', वि. ह. औंधकराचे 'बेबंदशाही', मा. दा कोचरेकर यांचे 'संगीत मानी मराठा', आबासाहेब आरेकारचे 'अमर जहाले छत्रपती संभाजी', अर्जुनराव झेंडेचे 'अश्रु

ढळले रायगडाचे', यासारख्या नाटकामध्ये मोगलाच्या कैदेत पश्चातापाग्नित जळत असलेल्या संभाजीची प्रतिमा निर्माण केलेली आहे.

साहित्यिकांनी मोगलाच्या कैदेत सापडलेला संभाजी त्याच्या आयुष्यामध्ये केलेल्या कृत्यांचा पश्चाताप करत असलेला दाखवून त्यांनी न केलेल्या आपराधाची कबुली देत असल्याचे दाखवले आहे. नाथमाधवांनी स्वराज्य मलिकेतील 'स्वराज्यावरील सकंट' या कादंबरीच्या उत्तरार्धात मोगलाच्या कैदेत पश्चातापानी जळत असलेला संभाजी म्हणतो "शुल्क दारुच्या व्यसनामुळे माझा सर्वनाश झाला. त्यामुळेच मी नाच तमाशे केले ! हलकट वेश्या मी छत्रपतीच्या तक्त पुढे आणुन नाचविल्या ...! गेली पाच वर्षे मी शत्रुच्या छातीवर तलवारीचा नंगा नाच केला, पण अखेर आज ह्या नशेत माझा तोल गेला आणि माझी अखेर झाली."[३५] अशा प्रकारे स्वतःला कोसनारा संभाजी दाखवून संभाजीराजाची विकृत प्रतिमा रंगवलेली आहे. राम गणेश गडकऱ्यांच्या प्रतिभावंत आटकरांनी राजसंन्याससारख्या एक तत्वगर्भ नाटकाची आखणी करून शोकनाट्याप्रमाणे विनाशाच्या काठावर उभा असलेला संभाजी आपल्या दोषांची आत्मपरिक्षण करताना दाखविले आहे. मोगलाच्या तुळापूर येथील छावणीत कैद असलेल्या संभाजीला सोडवण्यासाठी आलेल्या साबाजी शिर्केना उदद्देशून संभाजी म्हणतो, "गोब्राह्मण प्रतिपालक हिंदूपदपादशहा श्रीमंत छत्रपती संभाजी महाराज ! नाही साबाजी ही माझी किताबत नाही. संभाजी हा म्हणजे केवळ रंडिबाज छाकटा काशीची गंगा आणि रामेश्वराचा सागर एकवटून छत्रपतीनी बांधलेल्या राष्ट्रतीर्थाची श्रीगंगा सागराची ज्योत व्यक्तीचराच्या दिवाणखान्यातली मोरी बनवली. तो हा संभाजी वैराग्याच्या वेगाने फडकणाऱ्या भगव्या झेंड्याला दारुबाजाचे तोंड पुसण्याचा हस्तरुमाल केला. महाराष्ट्र लक्ष्मीच्या वैभवाचा जरीपतका काढून त्यांची रांडेसाठी काचोळी केली. साबाजी माझ्या या नऊ वर्षाच्या नावलौकीकाची इमारत नीटपणे पहा चिटणीसाला हत्तीच्या पायाखाली तुडवुन तिचा पाया घातला. मातोश्री सोयराबाई साहेबांना जितेपणी भिंतीत चिणुन तिच्या भिंती उभारल्या, ती पातकी इमारत उंचावता उंचावता कळसाला पोचण्यापूर्वी कोसळून तिच्या

---

[३५] *पितळे द्वारकानाथ माधव (नाथमाधव) : स्वराज्यावरील सकंट, वरदा प्रकाशन, पुणे (पहिली आकृती) १९२३, पृ.क्र. ३३६.*

खाली संभाजीचा चुराडा होऊन गेला.[३६] अशाच प्रकारचे चित्रण इतर साहित्यिकांनी कमी अधिक फरकाचे आहे. संभाजीराजाना ३ ते ४ फेब्रुवारीला १६८९ रोजी संगमेश्वर येथून कैद करण्यात आले. यानंतर मुकरबखानेत अतिशय कटक बंदोबस्त व अतिशय जलद हाचालीने तो स्वराज्याच्या प्रदेशातून बाहेर पडून संभाजीला औरंगजेब बहादूरगड येथे छाणणी असताना त्याच्या लष्करात आणण्यात आले. वाटेत किंवा कैदेत असलेल्या संभाजीला सोडविण्यासाठी सरदाराने प्रयत्न केला नाही. कारण यावेळी संभाजीराजांना सोडवण्यासाठी प्रयत्न करणे म्हणजे स्वतः होऊन मोगलाच्या कैदेत जाण्यासारखी परिस्थिती होती.संभाजीला मोगलाच्या छावणीत आणल्यानंतर त्यांच्या अंगावरती विदुषकीवस्त्रे घालुन लष्करातून धिंड काढून फिरविण्यात आली. औरंगजेबासमोर उभे केलेल्या संभाजीचे वागणे वाखाणण्या जोगे होते. बादशहाने संभाजीला खजिना व फितूर मोगल सरदाराविषयी विचारते तेव्हा संभाजीने बादशहासबंधी घाणेरडे शब्द उच्चारले आणि त्यांची निंदालवस्ती केली. त्याच रात्री संभाजीचे डोळे काढण्यात आले (१५ फेब्रुवारी १६८७) यानंतरच्या संभाजीच्या शेवटचा तपशील ईश्वरदार नागर देतो. तो म्हणतो, "संभाजीचे डोळे काढण्यात आले, पण संभाजी गर्विष्ठ आणि स्वाभिमानी होता. त्याने त्या दिवसापासून जेवणखाणं सोडले. त्याच्या पहारेकऱ्यांनी त्याला अन्न सेवन करण्यास पुष्कळ सांगीतले; पण त्याचा काही उपयोग झाला नाही. त्याला काही उपवास घडले शेवटी ही बातमी बादशहाला कळविण्यात आली. संभाजीचे दिवस भरले होते. बादशहाच्या आज्ञेने त्याला वधस्थानाकडे नेण्यात आले तेथे त्याच्या शरीराचे तुकडे तुकडे करण्यात आले."[३७] या ऐतिहासिक पुरावावरुन कैदेत पकडल्या गेल्याला संभाजीने कोणताही पश्चाताप झाला नव्हता हे स्पष्ट होते.

मोगलाच्य कैदेत पश्चातापाग्नित जळत असलेला संभाजीची प्रतिमा म्हणजे साहित्यिकानी रंगवलेला कल्पनाविलास आहे. ज्यामध्ये संभाजीराजांनी त्याच्या आयुष्यामध्ये न केल्याच्या अपराधाची कुबुली देताना दाखविले. अतिशय, कल्पकतेने संभाजीराजावर

---

[३६] *कुलकर्णी भिमराव (संपा): संपुर्ण गडकरी खंड पहिला, सरिता प्रकाशन, पुणे (नववी आकृती) १९८४ पृ.क्र. ३४३, ३४४*

[३७] *जोशी ह. प., जोशी उषा (संपा): समग्र सेतुमाधवराव पगडी (खंड २ रा), मराठी साहित्य, परिषद , हैद्राबाद २०१० पृ.क्र. १०८३*

कामांधतेचा, व्यसनाधितेचा, सोयाबाईना भिंतीत चिणुन मारण्याचा, मंत्र्याची क्रूरपणे हत्या केल्याचा, शिर्क्यांच्या कृत्वाजीचा आरोप करण्याचा निर्मालुमपणे केलेले कारस्थान आहे. जेकी ऐतिहासिक समतेचा अपलाप करणारे निराधार असे वर्णन आहे.

### **४.३.९ धर्मवीर संभाजी** :

मराठी साहित्यिकांनी आणि बखरकारांनी जसी विकृत प्रतिमा आपल्या साहित्यामध्ये रंगवली आहे तसेच धर्मवीर संभाजी अशी प्रतिमा रंगवण्याचे कार्य केले. मराठी साम्राज्याची छोटी बखर, शेडगावकर बखर, मल्हारराव चिटणीसाची संभाजी राजावरील बखर या बखरीमध्ये धर्मवीर संभाजीचे चित्रण रेखाटले आहे. कादंबऱ्यामध्ये ह. ना. आपटे यांची केवळ, स्वराज्यासाठी, मनमोहन नातुची 'संभवमि युगे युगे', वा. ना. देशपांडे यांची 'आम्ही यातनाचे स्वामी', नाटकामध्ये सोनाबाई केरकराचे संगीत छत्रपती संभाजी, वि.ह. औंधकराचे बेबंदशाही, कोचरेकर मा. हा. 'संगीत मानी मराठा', आबासाहेब आचरेकर यांचे 'अमर झाले छत्रपती संभाजी', ल. वि. सांडवाचे 'छत्रपती संभाजी', वसंत कानेटकराचे 'इथे ओशाळला मृत्यू, यासारख्या नाटक व कादंबऱ्यामध्ये धर्मवीर संभाजीची प्रतिमा साहित्यकारांनी रंगवलेली आहे.

संभाजी महाराजाला औरंगजेब बादशहाने कैद केल्यानंतर मुस्लीम धर्म स्वीकारल्यास प्राण वाचवून दक्षिणेची मनसबदारीचे आमिष दाखवतो तेव्हा संभाजी म्हणतो, आलमगीर मी माझ्या कवडीमूल्याच्या प्राणसाठी धर्म सोडणार नाही... प्राण गेला तरी बेहतर पण मी माझ्या प्राणाहून प्रिय असलेल्या हिंदू धर्माचा त्याग करणार नाही. संभाजी धर्मासाठी जगला आहे आणि धर्मासाठीच मरणार आहे ... धर्म रक्षणसाठी एकदाच काय पण लाख वेळा मी मरायला तयार होईल"[३८] असे धर्मवीर संभाजीचे अतिरंजक वर्णन मनमोहन नातु यांनी 'संभवामि युगे युगे', या कादंबरीमध्ये केले आहे. मोगलाच्या कैदेत असलेल्या संभाजीस खंडोजी सांडवण्यासाठी जातो तेव्हा त्यास संभाजी म्हणतो धर्मासाठी मरण पत्काराची वैऱ्यानी अनायसि संधि दिली असता शरमिध्यांगत आम्हाला रायगडी नेणार तु ? नको खंडोजी नाला

[३८] *नातु मनमोहनः संभवमि युगे युगे, सरस प्रकाशन, सोलापूर (द्वितीयाआकृती) १९८४ पृ.क्र. १४७, १४८*

यकीच्या लांच्छनाने काळवडलेल्या शंभुराजाची स्वकीया समोर आता धिंड नकोस."[३९] अशा प्रकारचे रसभरित वर्णन वि. ह. औंधकरानी बेबंदशाहीमध्ये रंगवलेले आहे. याशिवाय औरंगजेबाने संभाजीच्या धर्मातरांची मागणी केली आणि संभाजीने औरंगजेबाच्या मुलीची मागणी केली. अशा प्रकारचे चित्रण साहित्यकारांनी रंगवलेले आहे.

वास्तविक औरंगजेब बादशहा आणि छत्रपती संभाजी राजे यांच्यातील संघर्ष हा हिंदू विरुद्ध मुस्लीम असा धार्मिक नव्हताच असे असते तर त्यांनी दक्षिण भारतातील अदिलशाही व कुतुबशाही या सिया पंथीया मुस्लीम सत्तेवर आक्रमण करून त्या नष्ट केल्याच नसत्या. सर्वात महत्वाचे म्हणजे औरंगजेबासारख्या महत्त्वकांक्षी बादशाला भारतात कश्मिर ते कन्याकुमारीपर्यंत मोगल सत्ता प्रस्तापित करायची होती. त्यामुळे मोगल-मराठा संघर्ष हा उत्तर भारतीय सत्तेविरुद्ध दक्षिण भारतीय सत्तेचा स्वतःचे स्वातंत्र्य आबादीत ठेवण्यासाठी होता. त्यातच संभाजीराजांनी औरंगजेबाचा मुलगा अकबराला आश्रय देऊन त्याच्या विरुद्ध अघोषित शत्रुत्व पत्कारले होते. त्यामुळे आपल्या कैदेत आलेल्या मराठी सत्तेच्या राजाला औरंगजेब मुस्लीम धर्म स्वीकारायला लावून सोडणे शक्यच नव्हते. संभाजीराजांना मुकर्रबखनाने पकडून जेव्हा औरंगजेबाच्या समोर ब्रह्मपुरीच्या छावणीत उभे केले तेव्हा त्याने प्रथम संभाजीला पाहुन ईश्वराचे अभार मानले. यावेळी संभाजीचे वर्तन हे अतिशय बाणेदारपणाचे होते. त्यांनी औरंगजेबासमोर मान वाकवीली नाही. दयेची याचना केली नाही. त्यानंतरची हकीकत ईश्वरदार नायर देतो. तो म्हणतो यानंतर दोन दिवसांनी बादशहाने रुदुल्लाखान यास खालील प्रमाणे आद्या केली. 'तुम्ही जाऊन संभाजीपाशी' चौकशी करावी की तुझे खजिने, जडजवाहीर आणि इतर संपत्ती कुठे आहे. तसेच बादशाही सरदारापैकी कोण कोण तुझ्याशी पत्रव्यवहार करून संबंध ठेवीत होते; पण माणसाची जिवीताची आशा सुटली की, तो मनात येईल ते बडबडत सुटतो. संभाजी हा गर्विष्ठ होता. त्याने बादशहा संबंधी घाणेरडे शब्द उच्चारले आणि त्याची निंदानालस्ती केली. (तेथे हजरत) जिल्ले सुभानी हे दोन्ही शब्द औरंगजेबाला उदद्देशून असता सर जदुनाथ यांनी हजरत म्हणजे महमंद पैंगबंर

[३९] *औंधकर वि.ह.: बेबंदशाही, परचुरे प्रकाशन मंदिर, मुंबई (अकरावी आकृती) १९७५ पृ.क्र. १०९,१११*

आणि जिल्लेसुभानी म्हणजे औरंगजेब असे चुकीचे भाषांतर करून संभाजीने औरंगजेब आणि पैंगबर या दोघाचीही निंदा केली असे सुचविले आहे त्याने जे काही म्हटले ते जसेच्या तसे रुहुल्लाखानाने बादशहास सांगीतले नाही; पण ते बोलणे अशा प्रकारचे होते याचा त्याने बादशहाला इशारा दिला. यावर बादशहाने आज्ञा केली की, " संभाजीच्या डोळयात सळई फिरवुन त्याला नवीन दृष्टी द्यावी.

साकी मुस्तैदखानाने लिहिले आहे की, त्यांची रात्री (१५ फेब्रुवारी १६८७) संभाजीचे डोळे काढण्यात आले. दुसऱ्या दिवशी कवी कलशाची दृष्ट, जीभ उपटण्यात आली. संभाजीला ठार करावे असेच औरंगजेबाने ठरविले होते. मुस्तैदखान म्हणतो की, संभाजीने मुसलमानाना मारले होते. त्यांना बंधनात टाकले होते आणि त्यांना विविध प्रकारे पीडित केले होते. त्याने इस्लामी राज्यातील नगरे गारद केली होती. त्याला जिवंत ठेवण्याऐवजी त्याला नाहीसा करणे बरे असे बादशहाने मत झाले धर्मशास्त्रज्ञानी संभाजीच्या वधाचा फतवा दिला. त्याचबरोबर अमीरउमराननेही हाच सल्ला दिला. त्यास अनुसरुन संभाजीचा वध करणे आवश्यक आहे, असे ठरविण्यात आले. बादशाही सैन्य (३ मार्च १६८९ रोजी) कोरेगांव फतेहाबा येथे आले तेथे (११ मार्च १६८९ रोजी) संभाजी आणि कवी कलश यांना तखारीच्या योगे ठार मारण्यात आले.[४०] म्हणजे मुस्तैदखानाच्या सांगण्यावरून औरंगजेबाने संभाजीस धर्मातराची मागणी केली नव्हती हे स्पष्ट होते. तसेच तत्कालीन कोणत्याच इतिहासकारानी औरंगजेबाने संभाजीस मुस्लमान करण्याचा प्रयत्न केला असे नमुद केले नाही.

संभाजीराजांनी आपल्या आयुष्यामध्ये केलेले आपकृत्य शेवटी धर्मासाठी मरण पत्करून पुसले अशी मांडणी बखरकारांनी व साहित्यिकांना करायची होती. यासाठी धर्मवीर संभाजीराजाची प्रतिमा त्यांनी रंगवली आहे. प्रसिद्ध मार्क्सवादी इतिहासकार शरद पाटील म्हणतात, "हा संघर्ष ब्राह्मणी आश्रय औरंगजेब व अ ब्राह्मणी शाक्त संभाजी याच्यातला होता

[४०] *जोशी द. प., जोशी उषा (संपा): समग्र सेतुमाधवराव पगडी (खंड २ रा), मराठी साहित्य परिषद, हैद्राबाद २०१० पृ.क्र. १०८३*

आणि त्याचा शेवट संभाजीच्या ंतनिच होऊ शकत होता. संभाजी हिंदू धर्मवीर नव्हते तर जात्यंद वादी शाक्त हुतात्मा होते"[४१].

याबाबत इतिहासकार सेतु माधवराव पगडी म्हणतात संभाजी राजे हे आकस्मिकपणे कैद झाले. औरंगजेबाने त्यांना ठार मारण्याचे ठरविलेच होते. शिवाजीच्या बाबतीत झालेली चुक त्याला पुन्हा करायची नव्हती. त्या प्रमाणे घडून आले. धर्मातराची मागणी किंवा परधर्माची निंदा किंवा तथाकथित प्रेमप्रकरण या गोष्टी खेटयाच नव्हते तर गर्हणीय आहेत."[४२]

### ४.३.१० साहित्यिकांनी रंगवलेल्या संभाजीराजांच्या इतर अनैतिहासिक प्रतिमा :

वरील नमुद केलेल्या अनैतिहासिक प्रतिमेशिवाय साहित्यकारांनी व बखरकारांनी इतर अनेक अनैतिहासिक प्रतिमा रंगवलेल्या आहेत. कादंबऱ्यामध्ये ह. ना. बापटाच्या 'छत्रपती संभाजी महाराज' या संभाजीवरील पहिल्या कादंबरीपासून ते अनंत तिबिलेल्या १९७८ मध्ये लिहिलेल्या 'शापित राजहंस' या कादंबरीपर्यंत अनेकविध अनैतिहासिक प्रतिमा कादंबरीकारांनी रंगवलेल्या आहेत. तर नाटकामध्ये वासुदेवशास्त्री खरे यांच्या 'गुणोत्कर्ष' या नाटकापासून ते वसंत कानेटकराच्या 'इथे ओशाळला मृत्यू', या नाटकापर्यंत सर्वच नाटकामध्ये संभाजी राजांच्या अनेक अनैतिहासिक प्रतिमाचे चित्रण रेखाटले आहे. खुनशी व तापट संभाजी, मातृसुखास पोरखा संभाजी, संभाजीची कारर्कीद ही बेबंदशाही होती. स्वामी समर्थानी संभाजीस उपदेश केला. इत्यादी अनेक आरोप किंवा प्रतिमा साहित्यिकांनी आपल्या साहित्यामध्ये रंगवलेल्या आहेत.

खुनशी व तापट संभाजीची प्रतिमा रंगवण्यासाठी शिकारीसाठी आतुर असलेला संभाजी आपल्या मित्रासोबत शिकारीला जाण्यासाठी घोडे विकत घेण्यासाठी स्वराज्याच्या जामदारखान्यात चोरी करतो. यांची माहिती शिवाजी महाराजांना देणाऱ्या जमादार हिरोजी

---

[४१] *पाटील शरदः नामांतर औरंगाबाद आणि पुण्याचे, मावळाई प्रकाशन, शिरुर (पहिली आकृती) २०११, पृ. क्र. २९.*

[४२] *जोशी द. प., जोशी उषा (संपा): समग्र सेतुमाधवराव पगडी (खंड २ रा), मराठी साहित्य परिषद, हैद्राबाद २०१० पृ.क्र. १०८३*

फर्जंद यावर खुनस ठेवून त्याला कुस्तीमध्ये कपटाने ठार करतो. असे चित्रण 'छत्रपती संभाजी महाराज' या बापटाच्या कादंबरीत तसेच 'संगीत छत्रपती संभाजी' या सोनाबाई केरकरायाच्या नाटकामध्ये रेखाटले आहे. मातृसुखासाठी पारखे असलेला संभाजी दाखवण्यासाठी 'अर्घ्य' कादंबरीमध्ये एका शिकारीच्या प्रसंग वर्णनलेला आहे. संभाजीराजे शिकार करताना एका वाघिणीला मारल्यानंतर तिच्या पिल्लाकडे पाहुन म्हणतात, "बच्चानो ती तुमची आई होती हे आम्हाला माहित नव्हे तर तुम्ही तिच्याबरोबर दिसता तर आम्ही तिला मारले नसते. आई विना बच्याला किती यातना भोगाव्या लागतात याची आम्हाला कल्पना आहे. अररे ! बच्चानो, आमच्या हातून फारच मोठी आगळीक झाली."[४३] 'शांपित राजहंस' या अनंत तिबिले यांनी संभाजी मातृसुख लाभलेल्या राजारामाचा हेवा करताना दाखवले आहे. याशिवाय अनेक साहित्यिकांनी आपल्या कृतीमध्ये संभाजीराजाच्या कारकिर्दीत सर्वत्र अनागोंदी, बेबंदशाही पसरवल्याचे चित्रण ही नाथमाधवा सारख्या कादंबरीकारांनी 'स्वराज्यावरील सकंट' या कादंबरीमध्ये रंगवले आहे. वि. ह. औंधकरानी आपल्या 'बेबंदशाही' नाटकामध्ये संभाजीच्या काळामध्ये बेबंदशाही माजली होती असे अनैतिहासिक चित्रण रंगवले आहे. अनेक साहित्यिकांनी संभाजीला सुधारण्यासाठी रामदास स्वामी यांनी प्रयत्न केल्याचे त्यांना उपदेश केल्याचे चित्रण रेखाटले आहे. स्वराज्यावरील सकंट, या कादंबरीमध्ये समर्थांनी पाठवलेल्या उपदेशाबदद्दल म्हणतात. "समर्थनी ह्या पत्रिकेत जो बहुमोल उपदेश केला आहे. त्याच्या अगदी विरुद्ध वर्तन मजकडून घडत आहे. हे विचार मनात येऊन माझ मन खिन्न झाल आहे."[४४]

संभाजीची खुनशी प्रतिमेसाठी हिरोजी फर्जदाचा प्रसंग रंगवलेला आहे. तो पूर्णपणे खोटा असून काल्पनिक आहे. वास्तवितः संभाजीराजे सत्तेवर येईपर्यंत १६८० ते ऑगस्ट १६८१ या दीड वर्षाच्या काळात त्याच्या विरुद्ध तीन कारस्थाने झाली. त्यातीन्ही कारस्थानामध्ये हिरोजी फर्जद होता. त्यामुळे देशद्रोही फर्जंदाला संभाजीराजांनी देहदंडाची

---

*[४३] देसाई नयनतारा : अर्घ्य, कुलकर्णी ग्रंथासार, पुणे. १९७८, पृ. क्र. २८१*

*[४४] कदम रामकृष्ण आनंदराव , (संपा), छत्रपती संभाजी महाराज विरचित बुधभुषण राजनिती, रामचुर प्रकाशन , पुणे पृ.क्र. १३६, १३७.*

शिक्षा दिली. त्यात वावगे नव्हते. मातृसुखासाठी पोरखा संभाजी साहित्यिकांचा कल्पनेतेच साकारलेली प्रतिमा आहे. कारण सईबाईच्या मृत्यूनंतर संभाजीचे पालन पोषण आजी जिजाऊने केले आहे. संभाजीराजाचा जन्म हा १६५७ चा आहे. राजाराम महाराजाचा जन्म १६७० चा आहे. म्हणजे १३ ते १४ वर्षापर्यंत संभाजीराजे भोसले कुटूंबातील एकमेव पुत्र होतो. त्यामुळे शिवाजी महाराजाच्या इतर पत्नींनी किंवा संभाजी राजांच्या सावत्र मातानी त्यांना मातृसुखापासून पारखे ठेवले नसावे. संभाजीराजांच्या अष्टपैली व्यक्तिमत्वावरुन ते स्पष्ट होते.

संभाजी महाराजांची कारर्कीद ही बेबंदशाहीची होती. हे दाखवण्यास कोणाताही ऐतिहासिक कागदोपत्री पुरावा सापडत नाही. उलट संभाजी महाराजांनी औरंगजेबाच्या मुलाला आश्रय देऊन मोगलांना फार मोठे आव्हान दिले. प्रचंड सैन्यासह औरंगजेब दक्षिणेत उतरला असता ते मुळीच डगमगले नाहीत. मोगलाशी निकराची झुंज देऊन प्रत्येक आघाड्यावर त्यांची आक्रमणे परतवून लावली. स्वराज्यातील कारस्थाने हाणून पाडली. फितूर लोकांना कडक शिक्षा केल्या. बंडे मोडून काढली. पोर्तुगीजांना तंबी दिली. विजापूर आणि गोवळाकोंडा या शाह्यांना यशाशक्ती मदत केली. हे सर्व त्यांनी नऊ वर्षाच्या अल्पावधित करून दाखविले. समर्थ रामदास व संभाजीराजाना सुधारण्यासाठी उपदेश केला. हा अरोपसुद्धा खोटा आहे. समर्थ रामदास व संभाजी यांचा संबंध प्रस्तापित करण्यासाठी तो साहित्यिकांनी रंगवलेला आहे.

## प्रकरण पाचवे

# स्वराज्यरक्षक छत्रपती संभाजी महाराज

५.१ प्रस्तावना

५.२ संभाजी महाराजांनी राज्यभिषेकानंतर मोगली प्रदेशावर केलेली चढाई

५.३ औरंगजेबाचे दक्षिण भारताकडे प्रयाण व मराठ्यांच्या हालचाली

५.४ औरंगजेब दख्खनमध्ये दाखल झाल्यानंतरचा मराठा-मोगल संघर्ष

५.५ संभाजी महाराजांची मोगल प्रदेशातील चढाई

५.६ औरंगजेबाची बदलती मानसिकता आणि नवीन व्यूहरचना

५.७ संभाजी राजाच्या कर्नाटकातील हालचाली

५.८ संभाजी महाराजाचा सागरी सत्तेशी झालेला संघर्ष

५.९ संभाजी राजांची कैद व मृत्यू

## प्रकरण पाचवे

# स्वराज्यरक्षक छत्रपती संभाजी महाराज

### ५.१ प्रस्तावना

संभाजी महाराजांची संपूर्ण कारकीर्द ही मोगलांच्या विरुद्ध झालेल्या संघर्षाने व्यापलेली आहे.मोगल-मराठा संघर्षाची सुरूवात छत्रपती शिवाजी महाराजांनी संभाजी राजांच्या जन्माच्या वर्षी म्हणजे १६५७ मध्ये जुन्नरवर हल्ला करून केली होती. हा सुरू झालेला संघर्ष औरंगजेबाच्या मृत्यूनंतर म्हणजे १७०७ मध्येच थांबला. हा जवळपास पन्नास वर्ष प्रदीर्घ चाललेल्या मोगल-मराठा संघर्षाला 'मराठ्यांचे स्वातंत्र्य युद्ध' म्हणून संबोधले जाते. या मराठ्यांच्या स्वातंत्र्य युद्धाची तीन टप्प्यांमध्ये विभागणी केली जाते.

१. इ.स. १६५७ ते १६८० छ. शिवाजी महाराजांचा कालखंड.

२. इ.स. १६८० ते १६८९ छ. संभाजी महाराजांचा कालखंड.

३. इ.स. १६८९ ते १७०७ छ. राजाराम महाराज व महाराणी ताराबाई साहेबांचा कालखंड.

मराठ्यांच्या स्वांतत्र्ययुद्धाच्या पहिल्या कालखंडामध्ये छत्रपती शिवाजी महाराजांनी दक्षिण भारतामध्ये 'हिंदवी स्वराज्याची स्थापना' करून स्वतंत्र अशा मराठी राज्यांची निर्मिती केली. त्यामुळे संपूर्ण हिंदूस्तानावर सत्ता प्रस्थापित करणाऱ्या मोगल बादशहा औरंगजेबासमोर एक नवा अडथळा निर्माण झाला. त्यातच ३० एप्रिल १६५७ रोजी शिवाजी महाराजांनी मोगलाचे दक्षिण भारतातील जुन्नर ठाणे लुटले. त्याचबरोबर ४ जून १६५७ रोजी अहमदनगर ठाण्यावर हल्ला करून मोगल सत्तेला आव्हान दिले. यावेळी औरंगजेब सत्ता मिळविण्यासाठी भावांच्या संघर्षात गुंतला होता. त्यानंतर आपल्या सर्व भावांना ठार मारून व वडिलांस कैदेत टाकून स्वतः दिल्लीचा तक्ताधिश बनला. औरंगजेब बादशाहा बनताच त्याने

मराठ्यांच्या विरुद्ध आक्रमक पवित्रा घेऊन खऱ्या अर्थाने मोगल मराठा संघर्षाला प्रारंभ केला. मराठ्यांच्या स्वातंत्र्य युद्धातील पहिला कालखंड सुरू झाला.

या काळात औरंगजेब बादशाहा स्वतः दक्षिण भारतात संघर्षासाठी आला नाही. "शिवाजी महाराजांच्या विरूद्ध लढण्यासाठी त्याने शाहिस्तेखान, मिर्झा राजा जयसिंग, शहजादा मुअज्जम, महाबत खान, बहादुर खान, दिलेरखान या मातबर सरदारांना पाठवून स्वराज्याच्या स्थापनेस वारंवार अडथळे निर्माण केले होते."[१] छत्रपती शिवाजी महाराजांनी मोगलांच्या आक्रमणास चोख प्रत्युत्तर देऊन ५ जून १६७४ रोजी स्वतःचा राज्याभिषेक करून एका स्वतंत्र मराठी राज्याची स्थापना केली. ही घटना औरंगजेबासारख्या बादशहास सहन होण्यासारखी नव्हती. त्यामुळे त्याने १६७६ मध्ये बहादुरखानास शिवाजी महाराजांशी युद्ध करण्याचा हुकूम दिला होता. शिवाजी महाराजांच्या मृत्युच्या वेळी मोगल-मराठा संघर्ष चालूच होता; परंतु शिवाजी महाराजांच्या मृत्यूने मराठ्यांच्या स्वातंत्र्ययुद्धाचे पहिले पर्व संपले. छत्रपती शिवाजी महाराजांच्या मृत्युनंतर छत्रपती संभाजी महाराजांच्या नेतृत्वाखाली मराठ्यांच्या स्वातंत्र्ययुद्धाचे दुसरे पर्व सुरु झाले. संभाजी राजांनी आपल्या वडिलांप्रमाणे अतिशय कार्यक्षमतेने मोगलांशी संघर्ष चालूच ठेवला; पण यावेळी स्वतः औरंगजेब बादशहा त्याची मुले शहजादा मुअज्जम, शहजादा कामबक्ष, शहजादा मुइजुद्दीन याशिवाय असदखान, जुल्फिकारखान, शहाबुद्दीन उर्फ गाजीउद्दीन फीरोजजंग, महंमद अमीन, बख्शी रूहुल्लाखान, हसनअलीखाँ, रणमस्तानखान पठानी, दाऊदखान, बहादूरखान, मातबरखान, महंमद मुरादखान, तरबियतखान, लुत्फुल्लाखान हे मातब्बर मोगल सरदार तसेच सवाई जयसिंग दलपत बुंदेला, किशोरसिंह हाडा हे कडवे राजपूत सेनानी त्याच बरोबर साडेचौदा हजार अमीर उमराव साठ हजार घोडदळ, एक लाख पायदळ, पन्नास हजार उंट तीन हजार हत्ती व प्रचंड तोफखाना ऐवढ्या प्रचंड शक्तीसह मराठ्यांचे राज्य नष्ट करण्यासाठी तो दक्षिण भारतात आला. औरंगजेबाने मराठ्यांच्या बागलाण, उत्तर कोकण, मध्य स्वराज्य अशा चौफेर मराठी प्रदेशावर आक्रमण केले. मराठ्यांनी छत्रपती संभाजी महाराजांच्या नेतृत्वाखाली

[१] *गोखले कमल श्रीकृष्ण : शिवपुत्र संभाजी , ज्ञान-विज्ञान विकास मंडळ, पुणे १९७१(पहिली अवृत्ती) पृ.क्र.२१३*

हे प्रचंड आक्रमण परतवून लावले. छ. संभाजी महाराजांनी सेनापती हंबीराव मोहीते, कवी कलश, रूपाजी भोसले, मानाजी मोरे, रंभाजी पवार, मोरोपंत, म्हालोजी घोरपडे या मराठी सरदारांच्या नेतृत्वाखाली अनेक अघाड्या तयार करून गनीमी युद्धतंत्रांचा अवलंब करून मोगलांना हैरान केले. त्यामुळे औरंगजेब बादशहाला इ.स. १६८२-१६८५ या चार पाच वर्षाच्या कालखंडात मराठ्यांच्या कोणताही प्रदेशात यश न आल्यामुळे तो निराश झाला. त्यानंतर त्यांनी आपला मोर्चा आदिलशाही व कुतुबशाही घेण्यासाठी वळवला. छत्रपती संभाजी महाराजांनी मोगलांशी संघर्ष चालू असतानाच स्वराज्याच्या पश्चिम किनारपट्टीवरील सिद्दी, पोर्तुगीज व इंग्रज या सागरी सत्तेपासून स्वराज्याचे रक्षण केले. तसेच पोर्तुगीजांचा पराभव करून त्यांचा प्रदेश स्वराज्यात आणला. याशिवाय कर्नाटकातील मराठी राज्याचे रक्षण व विस्तार करण्यासाठीही दोन युद्ध मोहिमा स्वतःच्या नेतृत्वाखाली होती घेऊन मराठ्यांच्या कर्नाटकातील राज्याचा विस्तार केला.

कर्नाटकातील मराठी राज्यावर कार्यक्षम असे स्वतःचे मेहुणे हरजीराजे महाडिक यांची नियुक्ती केली. यामुळे राजारामाच्या कारर्किदीमध्येही कर्नाटक राज्य टिकून होते. खऱ्या अर्थाने राजाराम महाराजांना मराठ्यांच्या स्वातंत्र्य युद्धामध्ये सर्वतोपरी मदत याच प्रदेशातून झाली. त्यामुळे मराठ्यांचे राज्य अबाधित राहीले. छत्रपती संभाजी महाराजांनी शेवटपर्यंत मराठी राज्याचे रक्षण केले. शेवटी मोगलांशी संघर्ष करतानाच ते पकडले गेले. त्यानंतर औरंगजेब बादशाहाने त्यांना हालहाल करून मारले. त्यांच्या मृत्यूमुळे खवळलेल्या मराठ्यांनी मराठ्यांच्या स्वतंत्र्ययुद्धामध्ये हिरेरीने सहभाग घेऊन मराठी राज्याचे रक्षण केले.

## ५.२ संभाजी महाराजांनी राज्यभिषेकानंतर मोगली प्रदेशावर केलेली चढाई

शिवाजी महाराजांच्यानंतर मराठी सत्तेचे दुसरे छत्रपती म्हणून संभाजीराजे यांनी १६ जानेवारी १६८१ रोजी स्वतःचा राज्याभिषेक करून घेऊन मराठी सत्तेचे विधीयुक्त राजे झाले. मराठी सत्तेची सर्वसुत्रे आपल्या हातामध्ये घेतली. मोगलांशी चालू असलेला लढा पुढे तसाच चालू ठेवला. "२० डिसेंबर १६८०च्या दरम्यान संभाजी महाराजांनी मोगलाच्या

सोलापूर परीसरात चढाई केली होती." [२] राज्याभिषेकानंतर मोगल प्रदेशावर चढाई करण्यासाठी जय्यत तयारी केली.

### ५.२.१ बऱ्हाणपूरची लुट :

३० जानेवारी १६८१ रोजी संभाजी महाराज व हंबीरराव मोहिते यांनी बुऱ्हाणपुरावर स्वारी केली होती.[३] यासबंधी जेधे शकावली आणि अखबारात बऱ्हाणपूरच्या लुटीचे उल्लेख आलेले आहेत. खाफीखानाने बऱ्हाणपूरच्या लुटीचे विस्तृत वर्णन दिलेले आहे. खाफीखान लिहितो, "हिजरी १०९१ वर्षे मुहरम महिन्याच्या वीस तारखेची हकीकत आहे. त्यावेळी बुऱ्हाणपूरचा सुभेदार खानजमान हा होता. त्याचा नायब काकरखान अफगाण हा जिजिया कराच्या वसुलीच्या कामावर होता. बुऱ्हाणपुरात या वेळी तोच हजर होता. त्याच्यापाशी दोन-तीनशेपेक्षा अधिक स्वार नव्हते. सुमारे  वीस हजार स्वारानिशी तो दुष्ट संभाजी वऱ्हाडात उच्छाद घालीत फिरत होता. बुऱ्हाणपूरापासुन वऱ्हाडचा मुलूख पस्तीस कोसावर आहे. तो मुलूख उदध्वस्त करून तो पस्तीस कोसाची मजल मारून एकाएकी बुऱ्हाणपूरावर चालून आला. काफरांची फौज कुठल्याही दिशेने बुऱ्हाणपूरावर येईल अशी मुळीच कल्पना नव्हती तशी बातमीही पसरली नव्हती. बुऱ्हाणपूरापासून दीड कोसावर बहादुरपुरा म्हणून एक पुरा आहे. तो अतिशय संपन्न होता. लक्षाधीश असे सराफ सावकार तेथे राहत.

देशोदेशीचे जिन्नस, जडजवाहीरात, सोने, नाणे, रत्ने असा लक्षावधी रूपयांचा माल तेथील दुकानातून साठविला होता.तो सर्व मराठ्यांने लुटला. मराठे आगदी अनपेक्षितपणे आले शहराच्या तटबंदिच्या बाहेर बहादुरपुरा आणि इतर सतरा पुरे होते. त्यांना मराठ्यांनी घेरले.विशेषतः बहादुरपुऱ्यावर ते इतक्या अनपेक्षितपणे तुटून पडले की, त्या पुऱ्यातून एक माणूस किंवा एक पैसा लोकांना हलविता आला नाही. पुऱ्यात आगी लागून त्याचा धुर आकाशापर्यंत पोहचला.

---

[२] *दारवटकर अनंत : अद्वितीय छत्रपती श्री संभाजी महाराज (खंड ३) श्रीशंभू प्रेरणा प्रकाशन, पुणे २०१० (प्रथमावृत्ती) पृ.क्र. १३६१.*

[३] *दारवटकर अनंत : अद्वितीय छत्रपती श्री संभाजी महाराज (खंड ३), उपरोक्त, पृ.क्र. १३६१.*

तेव्हा कुठे बुऱ्हाणपूरचा नायब आणि शहरातील इतर लोक यांना मराठे आल्याची खबर कळाली. काकरखानाला मराठ्यांचा प्रतिकार करण्याची शक्ती नव्हती. त्यांने शहराचे दरवाजे बंद केले आणि तट, बुरूज, वेशी इत्यादीचा बंदोबस्त करू लागला. हासनपुरा, शहागंज, शहाजहानपुरा, खुरूमपुरा, नबाबपुरा इत्यादी सतरापुरे शहाराच्या तटाला लागून होते. ती जणू काही शहराची केंद्रे होती. प्रत्येक पुऱ्यात लाखो रूपयांचा माल सराफ व्यापारी इत्यादीच्या पाशी होता. मराठ्यांनी ते सर्व पुरे ताब्यात घेतली. त्याची लूट करून त्यांना आगी लावून दिल्या. काही अब्रुदार माणसांनी आपल्या बायकांना ठार मारले आणि ते स्वतः लढत लढत मारले गेले. कित्येकजन परमेश्वरावर हवाला ठेवून बसले. शहराच्या तटाला लागून असलेले अनेक लोक आपल्या बायकापोरांना घेऊन त्या भयंकर संकटातून मोठया कष्टाने निघून शहराच्या आत पोहचले. तीन दिवसपर्यंत मराठे निःशंकपणे पुरे लुटीत होते. त्यांना मुबलक लूट मिळाली. अनेक वर्षाची जमिनीखाली पुरलेली संपत्ती त्यांच्या हाती पडली. या संपत्तीच्या घरमालकांनाही पत्ता नव्हता. ती मराठ्यांनी शोधून काढून हस्तगत केली.

मराठ्यांनी शिड्या लावून तटावर चढण्याचा प्रयत्न केला. शहरातील सर्व मन्सबदारांनी वेशी, तट, बुरूज, इत्यादी ठिकाणी मोर्चे बांधून निकराने मराठ्यांचा प्रतिकार केला. त्यामुळे ते शहरात दाखल होऊ शकले नाहीत. मराठ्यांनी सोने, चांदी, जडजवाहीर आणि मूल्यवान समान घेतले. इतर जिनसांची त्यांनी पर्वा केली नाही. त्यांनी भांडीकुंडी, काचेचे समान, धान्य, मसाले, वापरलेली वस्त्रे इत्यादी सर्व लुटले होती; पण ती सर्व वाहुन नेणे शक्य नाही म्हणून त्यांनी ते समान टाकून दिले व नंतर ते निघून गेले. ते गेल्यावर रस्त्यात जळलेल्या आणि इतर वस्तुंचा इतका सडा पडला होता की, वर्णन करणे अशक्य आहे.

मराठे बुऱ्हाणपुरच्या भागास पसरल्याची बातमी हेरांच्या द्वारे औरंगजेबास सुभेदार खानजहान बहादुर कोकल्ताश याला कळली. त्याने ताबडतोब कुच करून तीन-चार दिवसाचा रस्ता एका दिवसात अक्रमिला तो फर्दापूरच्या घाटापाशी पोहोचला. औरंगाबादेहून

हे ठिकाण ३२ कोसावर आहे. सैन्यकूच करून येत होते. त्याच्या हालचालीसाठी आणि जनावरांना विश्रांती देण्यासाठी म्हणून खानजहान तेथे तीन-चार प्रहर थांबला.

खानजहानच्या हितशत्रूंनी उठविले की, संभाजीचा वकिल खानजहान याला भेटला. त्यांने भक्कम पैसे चारले आणि चारपाच प्रहर आपण येथेच रेंगाळा म्हणून खानजहानला विनंती केली. मराठ्यांच्यापाशी लुटीचे ओझे बरेच होते. खानजहान आपल्या पाठलागावर आहे. याची बातमी त्याला लागली होती. त्यांचे किल्लेही दूर होते तिथपर्यंत पोहचणे त्यांना शक्य नव्हते; पण त्यातल्या त्यात जवळ असलेला त्यांचा किल्ला म्हणजे साल्हेरचा असून तो बागलाणांत होता. मराठे परगणे चोपडा ऊर्फ मुस्ताफाबाद याच्या वाटेने चालले होते.

अशा स्थितीत खानजहाने फर्दापूरहून डावीकडे वळून घरणगाव आणि चोपडा या गावाची वाट धरून काफराची वाट आडविण्यास हवी होती; पण गनिमाच्या वकिलाच्या विनंतीवरून तो सारासार विचाराच्या विरूद्ध वागून उजवीकडच्या वाटेत एदलाबादेकडे रवाना झाला.गनिमानी ही बातमी ऐकली बरे झाले असे त्यांला वाटले. बरोबर असलेले सोने-चांदी इत्यादींची लुट जितकी त्यांना नेता आली तितकी त्यांनी नेली. त्याने सगळे कैदी बरोबर घेतले. खानजहान बुऱ्हाणपुरला जाऊन पोहोंचेपर्यंत मराठे चोपड्याच्या वाटेने तडक निघून चार-पाच दिवसात साल्हेरला पोहोचले.

बुऱ्हाणपुरेचे प्रतिष्ठित नागरिक, मौलावी, विद्वान इत्यादीनी बादशाहाकडे एक अर्जी पाठवली काफरांचा जोर झाला. आमची अब्रु आणि संपत्ती नष्ट झाली यापुढे शुक्रवारची नमाज बंद पडेल असे अर्जीत लिहले होते. यावर बादशाहाने खानजहानाला चिडून पत्र लिहून कळविले की, दक्षिणच्या काफरांचा बीमोड करण्यासाठी मी स्वतः येत आहे. बादशहा खानजहानवर अतिशय चिडला त्याला मन्सबीची वाढ झाली होती, ती त्याने वहिवाटीविरूद्ध नामंजूर केली. दक्षिणेतील उच्छद आणि शहजादा अकबर यांचे पलायन या दोन्ही गोष्टीचा विचार करून बादशहाने आपले डेरे बुऱ्हाणपुराकडे पाठविण्याचा हुकूम केला."[४]

---

[४] *पगडी सेतू माधवराव(संपा.) : मराठयांचे स्वातत्र्ययुध्द-खाफिरखानाचा साधनग्रंथ,जोशी आणि लोखंडे प्रकाशन, पुणे १९६२ (प्रथमावृत्ती) पृ.क्र. २-४.*

खाफीखानाच्या या वर्णनाबरोबरच शहजादा अकबराने आपल्या वडिलांना जे पत्र लिहिले आहे ते बुऱ्हाणपुराच्या परिस्थितीबाबत अत्यंत बोलके आहे.या पत्रात अकबर म्हणतो की, "दक्षिण प्रातांची अशीच दुर्दशा झाली आहे. वास्तविक पाहता हा विस्तीर्ण दक्षिण प्रदेश म्हणजे भूवरील स्वर्गच होय आणि बुऱ्हाणपूर म्हणजे विश्वरूपी सुंदरीच्या गालावरील तीळ होय; पण ते शहर आज उद्धवस्त होऊन गेले आहे. या पत्रावरुन संभाजीराजांनी बुऱ्हाणपुरची काय अवस्था केली होती हे लक्षात येते."[५]

### ५.२.२ औरंगाबादवर हल्ला :

बुऱ्हाणपूरच्या लुटीनंतर फेब्रुवारी महिन्यामध्ये मराठ्यांनी औरंगाबादवर आक्रमण केले. मराठे अहमदनगर आणि मुंगीपैठण या मार्गाने औरंगाबादवर चाल करून गेले. त्यावेळी औरंगाबादमध्ये राजा अनुपसिंग होता; परंतु मराठ्यांचा प्रतिकार करण्याचे धाडस त्याचे झाले नाही. तो तयारी करून आपल्या पुऱ्यातच थांबला. बहादुरखान यावेळी औरंगाबादपासून सोळा कोसावर बाभुळगाव येथे छावणी करून होता. त्याला या हल्ल्याची बातमी कळताच तो औरंगाबादच्या संरक्षणासाठी तातडीने पोहचला तोपर्यंत मराठे बुऱ्हाणपुऱ्यापर्यंत चाल करून आले होते. त्यांनी तेथे मोठ्याप्रमाणात धामधुम माजवली होती. बहादुरखाननेही मराठ्यांचा प्रतिकार न करता त्याने आपला तळ जसवंतसिंगाच्या तलावाच्या काठावर देऊन थांबला होता. यावेळी मराठ्यांच्या सैन्याची कशी व किती दहशत होती याचे वर्णन करताना भीमसेन सक्सेना म्हणतो की, "माझ्याबरोबर बायका माणसे होती मी मध्यन्हाच्या वेळी औरंगाबादेत दाखल झालो. मला जे दृश्य दिसले ते विलक्षण होते. लोकांनी आपआपल्या घराचे दरवाजे बंद केले होते. ते आपआपल्या वाड्यात तयार होऊन उभे होते. बाजारात आणि गल्यातून एकही मणुष्य दिसत नव्हता.कोतवालीच्या ओटयावर मला फक्त तीन शिपाई बसलेले आढळले." [६]

---

[५] *दारवटकर अनंत : अद्वितीय छत्रपती श्री संभाजी महाराज (खंड ३) श्रीशंभू प्रेरणा प्रकाशन, पुणे २०१० (प्रथमावृत्ती) पृ.क्र. १३५७.*

[६] *पगडी सेतू माधवराव (संपा.) : मोगलआणि मराठे - तारीख दिल्कुशा, श्री लेखन वाचन भंडार, पुणे १९७० पृ.क्र. ७७.*

औरंगाबादच्या या स्वारीत मराठे अफलातून अशस्वी झालेले दिसतात. बहादुरखान किंवा अनुपसिंगास मराठ्याचा प्रतिकार करण्याचे धाडस झाले नाही. तरी सुद्धा खानजहान बहादुरने आपल्या आधिकाराचा वापर करून राव अनुपसिंगाच्या मनसदितून पाचशे जात व पाचशे स्वार कमी केले.[७] पावसाळा आला म्हणून बहादुरखान हा औरंगाबादेतील जुन्या राजवाड्यात राहू लागला. मराठ्यांची धामधुम पहाता औरंगाबाद शहरा भोवती तट बांधावा अशी बादशहाने आज्ञा केली. ते काम बहादुरखानाने हाती घेतले.[८] यावरून असे लक्षात येते की, मराठ्यांच्या वाढत्या कारवायांची मोगलांना किती दहशत बसली होती. "मराठ्यांनी औरंगाबाद शहरावर केलेल्या हल्ल्याचे वर्णन सुलतान अकबराने आपल्या वडिलांना-औरंगजेबला लिहिलेल्या पत्रात केले आहे. तो म्हणतो औरंगाबाद शहर हे आपल्या नावाने बसविण्यात आले आहे; पण शत्रूच्या सैनाच्या आघाताने ते पाऱ्यासारखे अस्थिर झाले आहे."[९] यावरून औरंगाबाद शहराची मराठ्यांनी काय आवस्था केली होती याची कल्पना येते.

### ५.२.३ नळदुर्गवर हल्ला :

१४ एप्रिल १६८१ च्या सुमारास मराठ्यांनी नळदुर्ग किल्यावर जोरदार हल्ला केल्याचे समजते. कारण यावेळी नळदुर्ग किल्ल्यात असलेल्या पाच हजार बान व दहा हजार मण दरूचा साठा मोगलाकडून खर्ची झाल्याचे दिसते. यावरून हा हल्ला किती भयंकर होता याची कल्पना येते. नळदुर्गाचा किल्लेदार कलंदरखान लढण्यासाठी किल्ल्याच्या बाहेर आला होता. "मोगलांची पडती बाजू पाहून खानजहान बहादुरने रणमस्तखानास त्यांच्या मदतीसाठी पाठविले होते. मराठ्यांनी त्याच्याशीही जोरदार समाना दिला.नळदुर्गाच्या पलीकडे तीन कोसावर त्यांच्या बरोबरीत लढाईस तोंड फुटले. यामध्ये मराठ्यांबरोबर मोगलांची बरीच माणसे ठार आणि जखमी झाल्याचे दिसते."[१०]

---

[७] *दारवटकर अनंत : अद्वितीय छत्रपती श्री संभाजी महाराज (खंड ३) श्रीशंभू प्रेरणा प्रकाशन, पुणे २०१० (प्रथमावृत्ती) पृ.क्र. १३६५.*
[८] *पगडी सेतू माधवराव(संपा.) : मोगलआणि मराठे - तारीख दिल्कुशा, श्री लेखन वाचन भंडार, पुणे १९७० पृ.क्र. ७७.*
[९] *गोखले कमल श्रीकृष्ण : शिवपुत्र संभाजी , ज्ञान-विज्ञान विकास मंडळ, पुणे १९७१(पहिली अवृत्ती) पृ.क्र.२४०*
[१०] *दारवटकर अनंत : अद्वितीय छत्रपती श्री संभाजी महाराज (खंड ३) उपरोक्त, पृ.क्र. १३६०.*

### ५.२.४ अंतुरवर स्वारी :

जून १६८१ च्या महिन्यामध्ये मराठ्यांने मोगलाच्या अंतुरवर जबदस्त स्वारी करून २० हजार बंदी व जनावरे ताब्यात घेतली. यावरून हा हल्ला कसा होता याची कल्पना येते. यावर खानजहान बहादुरने मराठ्यांचा पाठलाग करण्यासाठी त्याचा धाकटा मुलगा मुज्जफरखान यांची नेमणूक केली. शेवटी मोगल मराठ्यांची धर्मपुर पठारावर गाठभेट होऊन मोठी लढाई झाली. याबाबत अखबारामध्ये असे म्हटले आहे की, शत्रूचे (मराठ्यांचे) बरीच लोक २० हजार बंदी व जनावरे लुटून नेत असता बादशाही लोकांनी ती सोडून परत आणली. पण यात तथ्य किती असेल हे नक्की सांगता येत नाही .[११]

मोगलांचा दरबारी इतिहासकार खाकीखाने यांने मोगलाच्या प्रसिद्ध शहरावर हल्ले केले तर काय होईल याची भाष्यता केली होती. खाफीखान लिहितो "त्यांच्या (संभाजीच्या) बापाने प्रसिद्ध परगणे व सरकारी वाडे यावर छापे लुटण्याची कधी कमतरता केली नव्हती; परंतु बादशहाची वंशपरंपरागत दख्खनची राजधानी जे बऱ्हाणपूर व औरंगाबाद यावर कधीही घाला घातला नव्हता. उलट त्याला कोणी एखाद्या मत्र्यांनी या शहरावर हल्ला करण्याचा सल्ला दिला तर त्याना तो शहाणपणाने व दुरदर्शित्वाने तसे करू देत नसे. तो त्यास सांगे की, या शहरावर हल्ला चढवला तर औरंगजेब आपली मानहानी झाली म्हणून खासाच चालून येईल आणि मग त्या भांडणाचे काय परिणाम होतील ते देव जाने."[१२] परंतु संभाजी राजानी अतिशय धाडसाने मोगलांची दक्षिणेकडील राजधानी असलेली महत्त्वाची ठाणी बऱ्हाणपूर व औरंगाबादवर हल्ले चढवले एवढेच नव्हे तर संपूर्ण मोगलाच्या प्रदेशामध्ये धुमाकूळ घातला. त्याचाच परिणाम म्हणून औरंगजेब बादशहाला दक्षिण भारतात यावे लागले.

### ५.३ औरंगजेबाचे दक्षिण भारताकडे प्रयाण व मराठ्यांच्या हालचाली :

औरंगजेब बादशहा स्वतः दक्षिण भारतात मराठी राज्यावर चाल करून येण्यास अनेक कारणे होती. सर्वात महत्त्वाचे म्हणजे काबुलपासून कन्याकुमारीपर्यंत संपूर्ण

---

[११] *दारवटकर अनंत : अद्वितीय छत्रपती श्री संभाजी महाराज (खंड ३) श्रीशंभू प्रेरणा प्रकाशन, पुणे, पृ.क्र. १३६०.*
[१२] *घोरपडे आनंदः स्वराज्यरक्षक छत्रपती संभाजी,लोकशक्ती प्रकाशन,मुंबई २००९ (दुसरी अवृत्ती) पृ.क्र. १६ - १७.*

हिंदुस्तानावर मोगलाचा एकछत्री आमल असावा अशी प्रबळ इच्छा सर्वच तैमूर पादशाहाची म्हणजे अकबरा पासून ते औरंगजेबापर्यंत सर्वांची होती. यासाठी औरंगजेबाने वयाच्या सत्तर वर्षांपर्यंत भरपूर प्रयत्न केले होते. त्यासाठी त्याला दक्षिण भारतातील मराठी राज्य व आदिलशाही, कुतुबशाही या सत्ता नेस्तनाबूत करावयाच्या होत्या. शिवाजी महाराजासारखा कर्तबगार शत्रू मरण पावून त्याच्या जागी संभाजी सत्तेवर आला होता. त्यामुळे मराठी राज्य नष्ठ करण्याचा हेतू पूर्ण होईल असे औरंगजेबास वाटत होते. तसेच यावेळी आदिलशाही व कुतुबशाही या शाह्या राजकीय दृष्ट्या अस्थिर होत्या. त्यामुळे दख्खन जिंकण्याचा हेतू पूर्ण होईल असे औरंगजेबास वाटत होते. औरंगजेब दक्षिण भारतात येण्याचे सर्वात महत्त्वाचे कारण म्हणजे संभाजी महाराजांनी मोगली प्रदेशात घातलेला धुमाकूळ व शहजादा अकबराला संभाजीराजांनी दिलेला आश्रय होय. संभाजी व शहजादा अकबर दोघे एकत्र येऊ न काही हालचाली करण्यापूर्वी दक्षिणेकडे कुच करून त्यांचा नाश करणे हा मुख्य उद्देश औरंगजेब बादशहाचा होता.

औरंगजेब दक्षिणेत निघण्यापूर्वी उत्तरेत रजपुताविरूद्ध सुरूअसलेले युद्ध थांबविले आणि दक्षिणेत जाण्याची पूर्ण तयारी करून दिनांक ५ सप्टेंबर १६८१ रोजी तो अजमेरहून प्रयाण केले. औरंगजेबाने दख्खनच्या या स्वारीमध्ये आपल्याबरोबर संपूर्ण मुघलाईच घेतली होती.[१३] औरंगजेबाबरोबर त्यांची मुले शहजादा मुअज्जम, शहजादा कामबक्ष, शहजादा मुइजुद्‌दीन व शहजादा बेदाखस्त हे नातू याशिवाय असदखान, जुल्फीकारखान, शहाबुद्दीन ऊर्फगाजीउद्दीन फीरोजजंग, महंमद अमीन, बख्शी रूहुल्लाखान, हसनअलीखा, रणमस्तखान पन्नी, दाऊदखान, बहादुरखान, मातबरखान, महंमद मुरादखान, तरबियतखान, राव दलपत बुंदेला, लुत्फुल्लाखान इ. अनेक सरदार त्याच्या बरोबर होते.[१४] दि.१३ नोव्हेंबर १६८१ रोजी औरंगजेब बऱ्हाणपुरला पोहोचला.

[१३] *दारवटकर अनंत : अद्वितीय छत्रपती श्री संभाजी महाराज (खंड ३) श्रीशंभू प्रेरणा प्रकाशन, पुणे २०१० (प्रथमावृत्ती) पृ.क्र. १३८३.*

[१४] *गोखले कमल श्रीकृष्ण : शिवपुत्र संभाजी , ज्ञान-विज्ञान विकास मंडळ, पुणे १९७१(पहिली अवृत्ती) पृ.क्र.२१४*

औरंगजेब प्रचंड सैन्यासह दक्षिण भारतात चालून येत असताना सुद्धा संभाजी महाराज गप्प बसले नाहीत. संपूर्ण स्वराज्याचा परीपूर्ण असा बंदोबस्त करून औरंगजेब बुऱ्हाणपूरला पोहोचण्या पूर्वी आपल्या हालचाली अधिकच तीव्र केल्या. मोगलाच्या सरदारांना फोडण्याचा प्रयत्न चालवला "त्यासाठी त्यांनी आपली काही माणसे शाहआलमच्या सैन्यातील सरदार फोडण्यासाठी पाठविल्याचे दिसते. त्यापैकी एक अमानुल्लाह व इतर काही शाहआलमच्या चाकराकडे संभाजी महाराजांचा हेर पत्रे घेऊन गेला होता. त्याने शाहआलमच्या माणसाची भेट घेतली तेव्हा त्यांनी संभाजी महाराजांच्या माणसास तंबूत ठेवले व ती पत्रे शाह आलमला दाखवली. त्यावरून शाह आलमला सर्व गोष्टी समजल्या शाहआलमने या सर्व घटना बादशहास कळविल्या. तेव्हा संभाजी महाराजांच्या वकिलास कैद करून इहतमामखान कोतवाल याच्या स्वाधीन करावे असा औरंगजेबाने हूकूम केला.[१५]

**५.३.१ धरणगावाची लुट :**

औरंगजेब बुऱ्हाणपूरला येऊन पोहचल्यानंतर संभाजी महाराजांनी बुऱ्हाणपूरच्या जवळचे अतिशय संपन्न गाव धरणगाव लुटले. याविषयी सुरकर इंग्रजांनी आपल्या १४ नोव्हेंबरच्या पत्रात म्हटले की, "...(धरणगाव वखारीतील माल ).... काही चोरांनी लुटला... लकेरकोट जवळ ही लुटालुट झाली... नंदुरबादेहुन तुम्हास (काफिल्याने) कळविले होते व तेथे आलेल्या एका प्रवाशाने खबर दिली होती की, वाटेत चोर लुटारुदबा धरून बसले आहेत आणि तशा परस्थितीत बाहेर काफील्याने पडणे फार धोक्याचे आहे. तेथेच एक दोन दिवस मुक्काम करणे बरे."[१६] पत्रामध्ये जो लुटीचा उल्लेख आहे तो मराठ्यांनी केलेला असावा. तसेच यासंबंधी मनुची म्हणतो की, "औरंगजेब दक्षिणेकडे येण्यास निघाला आहे. ही बातमी मिळून सुद्धा संभाजीने चारी दिशेला लुटालुट करण्याचे सोडले नाही. त्या बलाढ्य मोगल सेनेला आपण किती क्षुद्र लेखतो हे दाखविण्याचा त्यांचा हेतू होता. आम्ही बऱ्हाणपूरला

---

[१५] *दारवटकर अनंत : अद्वितीय छत्रपती श्री संभाजी महाराज (खंड ३), श्रीशंभू प्रेरणा प्रकाशन, पुणे २०१० (प्रथमावृत्ती) पृ.क्र. १३९२.*

[१६] *दारवटकर अनंत : अद्वितीय छत्रपती श्री संभाजी महाराज (खंड ३), उपरोक्त पृ.क्र. १४०३.*

पोहचण्यापूर्वीचे बादशाहाच्या तळापासून ५-७ मैलावर असलेले एक संपन्न गाव त्यांनी (संभजीनी) उध्वस्त केले होते".[१७]

## ५.३.२ बऱ्हाणपुरचा बालेकिल्ला उडवून देण्याचा प्रयत्न :

धरणगावानंतरच्या लुटीनंतर मराठ्यांची अतिशय धाडसी कृती म्हणजे बऱ्हाणपूर बालेकिल्ला उडवून देण्याचा प्रयत्न होय. यामध्ये मराठ्यांनी मोगलाच्या किल्ल्यातील दारू गोळयास आग लावली. त्यामध्ये जवळपास २०० मण दारू जळून गेली. याबाबत मासिर-इ आलमगिरीमध्ये असा उल्लेख येतो. इ.स. १६८१ च्या २३ नोव्हेंबरच्या मध्यरात्री बुऱ्हाणपूरच्या बालेकिल्ल्याजवळ दारुच्या दोन कोठारांस आग लागली. यामध्ये पुष्कळ लोक मेले. त्याच रात्री लालबागजवळील लुत्फुल्लाह खान कोकाच्या डेऱ्यावर हल्ला होऊन दरोडा पडला. यामध्ये सहा माणसांची कत्तल झाली वीस जखमी झाले आणि सर्व मालमत्ता लुटली गेली.[१८] औरंगजेब येऊन थांबलेल्या ठाण्यावर मराठ्यांनी कशा छापा घातला यावरून समजते.

## ५.३.३ कल्याण - भिवंडीचा संघर्ष :

औरंगजेब बादशहा दखखनवर चाल करण्यासाठी निघाला तेव्हा हसन अली खान हा मोगल सरदार मथुरेवरून निघून त्याने औरंगजेबाची भेट घेतली. बादशहाने त्याचा यथोचित सत्कार करून १४ हजार सैन्य देऊन दि. ७ नोव्हेंबर १६८१ रोजी त्याला तळकोकणाच्या मोहिमेवर रवाना केले होते. तो आपली फौज घेऊन इ.स. १६८२ च्या जानेवारी महिन्याच्या अखेरीस तळकोकणात पोहोचला. मराठ्यांनी त्याचा कोणत्याही प्रकारे प्रतिकार न करता त्याला कोकणामध्ये घुसू दिले. ज्यावेळेस तो मैदानी प्रदेश सोडून दऱ्याखोऱ्यात व जंगलात शिरला त्यावेळी मराठ्यांनी संधी साधून त्याच्यावर गनिमी कावा पद्धतीने हल्ले केले. हसन अलीखान- मराठे यांच्यामध्ये आलमाले जवळ लढाई झाली. त्यामध्ये हसन अलीखानचा

[१७] *चौबळ ज.स.(अनु.) : असे होते मोगल - निकोलस मनुची, महाराष्ट्र राज्य साहित्य-संस्कृती मंडळ,मुंबई १९७४ (प्रथमावृत्ती) पृ.क्र. २०८.*

[१८] *दारवटकर अनंत : अद्वितीय छत्रपती श्री संभाजी महाराज (खंड ३) श्रीशंभू प्रेरणा प्रकाशन, पुणे २०१० (प्रथमावृत्ती) पृ.क्र. १४०४.*

पूर्णपणे पराभव झाला. "याबाबत बसातिन-उस-सलातीन मध्ये असा उल्लेख आला आहे की... आलमगीर पादशाहाचे लष्करात आलमालचे नजीक लढाई झाली. अलमगीर पादशहाकडील हसन अलीखान त्या लढाईत जखमी झाला. इतर बरेच लोक जखमी झाले आणि बहुत मनुष्ये ठार झाली संभाजी राजांकडील फत्ते झाली."[१९]

**५.३.४ अहमदनगरवर हल्ला :**

अहमदनगर हे मोगलांचे दक्षिणभारतातील स्वराज्याजवळचे एक महत्त्वाच ठाणे होते. अहमदनगर शहराच्या पूर्वेस खोल खंदक असलेला भूईकोट किल्ला होता. १६०० मध्ये हा किल्ला मोगलांच्या ताब्यात आला होता. संभाजी राजे यांनी औरंगजेब बादशहा उत्तरेकडून दक्षिण भारतात येताच आपल्या हालचाली तीव्र करून मोगलांच्या प्रदेशावर हल्ले करत होते. १६८१ च्या नोव्हेंबर महिन्याच्या पहिल्या आठवड्यात संभाजीराजांचे २५००० सैन्यासह अहमदनगरवर अचानक हल्ला केला. नगरच्या आजुबाजूच्या प्रदेशामध्ये मोठ्या प्रमाणात लुटालुट केली. यावेळी मराठ्यांनी अहमदनगर भुईकोट किल्ल्यात घुसण्याचा प्रयत्न केला. परंतु किल्लेदार मुकीमखानने तो यशस्वी होऊ दिला नाही. त्यामुळे बादशहाने त्यांच्या मनसबीत ५०० जात आणि १०० स्वाराची वाढ केली गेली. "मराठे तेथून पळाले तरी त्यांनी अहमदनगर आणि भोवतालच्या प्रदेशात लुटमार चालुच ठेवली ही बातमी औरंगजेबला कळताच त्याने मुकीमखान आणि त्याच्या मुलाला देऊकेलेली वाढ मनसब बंद केली आणि मराठ्यांना तंबी देण्याचा हुकूम केला."[२०]

अहमदनगरच्या लुटीनंतर मराठ्यांनी आपला मोर्चा विजापुरकडील बादशाही प्रदेश लुटण्यासाठी वळवला. "विजापुरच्या आलिकडे अकरा कोसावर पुरंदर येथे बहादुरखानने जाऊन त्यांच्याशी सामना दिला. दिवस मावळण्याच्या वेळेस लढाई झाली. या लढाईत बादशाही फत्ते झाल्याचे बहादुरखानाने बादशाहास कळविल्याचे दिसते. परंतु ते सत्य नसावे.

[१९] *दारवटकर अनंत : अद्वितीय छत्रपती श्री संभाजी महाराज (खंड ३) श्रीशंभू प्रेरणा प्रकाशन, पुणे २०१० (प्रथमावृत्ती) पृ.क्र. १४११.*

[२०] *आपटे द. वि, केळकर, I. चि (संपा) : शिवकालीा पत्रसार संग्रह , खंड २ रा, श्रीशिवचरित्र कार्यालय, पुणे, १९३० पृ.क्र.२८३पृ.क्र. १४११*

कारण अखबारानुसार बहुतेक बादशाही लोक कामास आले व जखमी झाले असे म्हटले आहे.[२१] अहमदनगरच्या भुईकोट किल्ल्यास खंदक होते. हे खंदक काही प्रमाणात अस्वच्छ झाले होते तेव्हा औरंगजेबाने तो स्वच्छ करण्यासाठीचा हुकूम नोव्हेंबरच्या शेवटच्या आठवड्यात दिला होता. यावरून मराठे या किल्ल्यांवर वारंवार हल्ले करत होते असे दिसते.

### ५.३.५ बागलाणातील मराठ्यांच्या हालचाली :

संभाजी महाराजांनी औरंगजेब बादशहा बुऱ्हाणपुरला आल्या नंतरसुध्दा त्यांच्या जवळच्या प्रदेशामध्ये धुमाकूळ घातला होता. बागलाण प्रदेशातील मुल्हेर परिसरात मराठ्यांनी चढाई करुन मुल्हेरच्या किल्ल्यास वेढा देण्याच्या बेतात मराठे होते; परंतु हेराकडून औरंगजेबास ही बातमी समजली त्यांने ताबडतोब २२ नोव्हेंबर १६८१ रोजी शिहाबुद्दीनखानास फर्मान पाठविले की, पूर्वी तुला त्वरेने हुजूर बोलाविले होते; परंतु आता तू फौजेसह तेथून किल्ले मुल्हेरकडे जावे व शत्रूला तंबी द्यावी.[२२] ऐवढेच नव्हेतर बादशहाने शहजादा अज्जमशहा व बहरोझखानासही शहाबुद्दीन खानाच्या मदतीला जाण्याची आज्ञा देण्यात आली होती. १६८१ च्या नोव्हेंबरच्या दुसऱ्या आठवड्यात शिहाबुद्दीनखान जालन्याहून बागलाण प्रदेशामध्ये आला. मराठे-शिहाबुद्दीन खान यांच्यात मोठी लढाई झाली. बादशाही सुदैवाने नऊशे लोकांना मारले, अनेकांना जखमी करून वीस लोकांना जिवंत पकडले आणि मराठ्यांचा पराजय होऊन बादशाही फत्ते झाली असे बादशहास कळविले गेले.[२३] परंतु यात तथ्य किती या विषयी शंका निर्माण होते. यावेळी मराठ्यांनी कोजख (कोहज) गाव लुटले होते.

### ५.३.६ सोलापूरवर आक्रमण :

संभाजी महाराजांनी १६८१च्या नोव्हेंबर महिन्याच्या शेवटच्या आठवड्यात सोलापूरवर आक्रमण करण्यासाठी ६ हजार स्वार पाठविले होते. सोलापूरच्या किल्ल्याच्या

---

[२१] *दारवटकर अनंत : अद्वितीय छत्रपती श्री संभाजी महाराज (खंड ३) श्रीशंभू प्रेरणा प्रकाशन, पुणे २०१० (प्रथमावृत्ती) पृ.क्र. १४१४.*

[२२] *दारवटकर अनंत : अद्वितीय छत्रपती श्री संभाजी महाराज (खंड ३) उपरोक्त, पृ.क्र. १४१७.*

[२३] *दारवटकर अनंत : अद्वितीय छत्रपती श्री संभाजी महाराज (खंड ३) उपरोक्त पृ.क्र. १४२१.*

किल्लेदार मनोहरदास गोड यांनी मराठ्यांच्या सैन्याचा प्रतिकार केला. सोलापूरवरील आक्रमणाची बातमी बहादुरखानास लागताच त्याने स्वता:चे सैन्य सोलापूरला पाठविले होते; परंतु मराठ्यांच्या आक्रमणासमोर त्याचाही निभाव लागला नाही. मोगलांचा पराभव झाला. त्यामुळे औरंगजेब बादशाहाने लगेचच मनोहरदास गोडाची सोलापूरच्या किल्लेदार पदावरून उच्चलबांगडी करून त्याच्या जागी सईद शेरखान याची नेमणूक केली.[२४]

अशा प्रकारे प्रचंड फौज घेऊन दक्षिण भारतात दाखल झालेल्या औरंगजेब बादशहास संभाजी राजांनी उत्कृष्ट व्यूहरचना आखून मोगलांच्या सैन्यास फोडून तुकड्यांमध्ये वेगवेगळ्या दिशेला पांगवले व स्वराजाचे रक्षण केले.

### ५.४ औरंगजेब दख्खनमध्ये दाखल झाल्यानंतरचा मराठा-मोगल संघर्ष :

औरंगजेब बादशहा १३ नोव्हेंबर १६८१ रोजी बुऱ्हाणपूरास आला तत्पूर्वीच त्याने आपल्या प्रमुख सरदारांना मराठ्यांच्या प्रदेशावर आक्रमण करण्याचे आदेश दिले होते. मोगल सरदारांना प्रत्येक आघाडीवर अपयश येत होते.बऱ्हाणपूरात बादशहा साडेतीन महिने राहिला. या कालावधित संभाजी राजांनी अतिशय जोरदार हालचाली करून मोगलांना जेरीस आणले होते. त्यामुळे औरंगजेब बादशहा आपला तळ औरंगाबादला हालवण्याचे ठरवून २२ मार्च १६८२ रोजी तो औरंगाबादला पोहचला. औरंगाबादला आल्यानंतर मराठ्यांचा मोगलांच्या प्रदेशात धुमाकूळ चालूच होता. त्यामुळे प्रथम त्यांने औरंगाबाद ते नगरच्या परिसरातील किल्ल्यांच्या मजबुतीकडे लक्ष दिले. "१६ ऑक्टोबर १६८२ रोजी बादशहाने अजमशहा, कुलीचखान, मुल्हेरचा किल्लेदार राजा मनोहरदास गौड, गुलशनाबादेचा ठाणेदार राजा महासिंग, अकोल्याचा ठाणेदार शाहा महम्मद यांना फर्माने सोडली व त्यांनी आपल्या प्रदेशाच्या बंदोबस्ताबद्दल सावध असावे अशा सूचना केल्या. ता. १८ ऑक्टोबर १६८२ रोजी काही ठाणेदारीबद्दल नेमणूका केल्या. लासुरात तिरंदाज वलद मरहुम शुजाऊतखान, चिखलठाण्यात शाहआलमी ५०० स्वाराची जमेत, फुलंब्रीत मुहम्मद आदिलवलद शरीफखान

[२४] *दारवटकर अनंत : अद्वितीय छत्रपती श्री संभाजी महाराज (खंड ३) श्रीशंभू प्रेरणा प्रकाशन, पुणे २०१० (प्रथमावृत्ती) पृ.क्र. १४२३.*

याची ५०० लोकांसह नेमणूक करून त्यांनी ठाण्यात राहून खबरदार राहण्याबद्दल हुकूम सोडले."[२५] मोगलांना मराठ्यांच्या प्रदेशावर चढाई करण्यास प्रोत्साहान देण्यासाठी बादशहाने अनेक महत्त्वाच्या सरदाराच्या मनबदारीमध्ये मोठ्या प्रमाणात वाढ केली. एवढेच नव्हे तर संभाजी महाराजांची माणसे फोडण्याचा प्रयत्न औरंगजेबाने चालवला. औरंगाबादला आल्यानंतर मराठ्याच्या स्वर्ग गडाचा जमीनदार चिमणाजी यास जहागिरीचे आमिष दाखवून मोगलाईमध्ये घेतले. तसेच भिकाजी दुर्जनसिंग वलद, हरीसिंग कच्छवा, रामराय, प्रतापसिंग राठोड, काजी जहान, काजी हैदर या सरदारांना बादशहाने जहागीरचे आमिष दाखवून आपल्या गोठामध्ये ओढले.

### ५.४.१ नाशिक - बागलाण प्रदेशातील मोगल - मराठा संघर्ष :

मराठ्यांचे सामर्थ्य किल्ल्यामध्ये आहे. हे जाणून औरंगजेब बादशहाने किल्ले हस्तगत करण्यासाठी हालचाली चालू केल्या. नाशिक-बागलाण प्रदेशातील किल्ले हास्तगत करण्यासाठी आपली संपूर्ण यत्रंणा लावली.

#### ५.४.१.१ दहकमाना किल्ला :

बागलाण प्रदेशातील दहकमा हा किल्ला मराठ्यांकडे होता. पारसाचा मोगल ठाणेदार मुहम्मद बदी बलखी यांने दहकमाना येथील जमीनदार लोकांशी संधान बाधण्याचा प्रयत्न केला. तो यशस्वी होऊन जमीनदार लोक त्याला येऊन भेटले आणि मार्च १६०३ मध्ये ठाणेदाराने जमीनदारांना खिलअत व ४ घोडे देऊ न तो किल्ला बादशाही अमलाखाली आणला. नंतर त्याने तेथे ठाणे कायम केले.[२६] अशा प्रकारे मोगलाना प्रचंड सैन्य सामर्थ्य असून सुद्धा दहकमाना किल्ला फितुरीने घेतला.

#### ५.४.१.२ साल्हेर किल्ला :

बागलाण प्रदेशातील अत्यंत महत्त्वाचा किल्ला होता स्वराजाच्या उत्तर भागातील मराठ्यांच्या हालचालीचा हा किल्ला प्रमुख केंद्रबिंदू होता. हा किल्ला नाशिक जिल्ह्यात

---

[२५] *दारवटकर अनंत : अद्वितीय छत्रपती श्री संभाजी महाराज (खंड ३) श्रीशंभू प्रेरणा प्रकाशन, पुणे २०१० (प्रथमावृत्ती) पृ.क्र. १४३३.*

[२६] *दारवटकर अनंत : अद्वितीय छत्रपती श्री संभाजी महाराज (खंड ३) उपरोक्त, पृ.क्र. १४५३.*

बागलाण तालुक्यात सटाणाच्या वायव्येस २० मैलावर असून या किल्ल्याच्या भोवती खोल दऱ्या असल्यामुळे सुरक्षिततेच दृष्टीने हा किल्ला महत्त्वपूर्ण होता. हा किल्ला मराठ्यांकडे आल्यापासून लूट ठेवण्याचे प्रमुख ठिकाण होते. ता. ३० जानेवारी १६८१ मध्ये संभाजी महाराज व सेनापती हंबीरराव मोहिते यांनी एकत्रित बुऱ्हाणपूरावर स्वारी करून मिळवलेली प्रचंड लुट याच किल्ल्यात आणलेली होती.[२७]

साल्हेर गडाच्या जवळच मुल्हेर गड होता. साल्हेर स्वराज्यात होता तर मुल्हेर मोगलाकडे होता. १६८१ च्या सप्टेबर महिन्यात मुल्हेरच्या किल्लेदाराला हुकूम देण्यात आला होता की, त्याने मुल्हेरची व्यवस्था करून मराठयाचा बंदोबस्त करण्यासाठी तयार राहावे. पुढे १६८१ च्या नोव्हेबंर महिन्याच्या अखेरीस शहाबुद्दीनखान मुल्हेरला आला साल्हेरच्या परिसरात असलेल्या काल्या (काळया) येथे मराठे सज्ज होते. हे कळताच मराठ्यांना तेथून हटविण्यासाठी डिसेंबरच्या पहिल्या आठवड्यात शहाबुद्दीनखान साल्हेरच्या मुलखात शिरला. तो काल्यापासून सात कोस लांब पोहचताच मराठे-मुहाल सैन्यात चकमक उडाली दोन्ही बाजुंची माणसे मेली अनेक जखमी झाली. शहाबुददीनखानने मराठ्यांचा दोन कोस पाठलाग करून साल्हेरपासून १०-१५ कोसावर छावणी घातली.[२८] बादशहा औरंगजेबाने मराठ्यांच्या विरूद्ध आक्रमण सुरू केल्यापासून प्रत्यक्ष युद्धाबरोबर फितुरीच्या मार्गाने गडकोट घेण्याचे प्रयत्न सुरुकेले होते. साल्हेरसारखा महत्त्वाचा किल्ला वेढा देऊन घेणे अशक्य होते. म्हणून फितुरीच्या प्रयत्न सुरुकेला. परशुराम जोशीचा यास कृष्णाजी हा साल्हेरचा किल्ला संभाजीच्या बाजूने लढवत होता. तेव्हा सहलन खानाने परशुराम जोशीची गाठभेट घेऊन गडासंबधी वाटाघाटी झाल्या असाव्या. १६८२ च्या आगस्ट महिन्यात जोशाने रहुल्लाखानास कळविले होते की जर बादशाही फौजा माझ्याबरोबर दिल्या तर साल्हेरचा किल्ला मी बादशाही आमलात आणून देईन. ता. २९ ऑगस्ट १६८२ रोजी बादशाहाने त्यास

---

*[२७] दारवटकर अनंत : अद्वितीय छत्रपती श्री संभाजी महाराज (खंड ३) श्रीशंभू प्रेरणा प्रकाशन, पुणे २०१० (प्रथमावृत्ती) पृ.क्र. १४७०.*

*[२८] आपटे द. वि, केळकर, न. चि (संपा) : शिवकालीी पत्रसार संग्रह , खंड २ रा, श्रीशिवचरित्र कार्यालय, पुणे, १९३० पृ.क्र. २१६*

रदुल्लाखानाकडे रुजू करण्याचा हूकूम दिला परंतु प्रत्यक्षात या जोशाकडून किल्ला मोगलाच्या हवाली करण्यात यश आले नाही.

साल्हेर घेण्यासाठी दुसरा फितुरीचा प्रयत्न दहकमाना किल्ल्याचे जमिनदारामार्फत करण्याचा प्रयत्न मोगलाने केले. याबद्दल पारसाचा ठाणेदार मोहमद बदी बलखी याने ता. ३१ मार्च १६८३ रोजी बादशाहाकडे अर्ज केला होता; परंतु यामध्ये त्यांना यश आले नाही. साल्हेरचा किल्ला १६८६ च्या सालाच्या आखेरीस फितुरीने मोगलाच्या ताब्यात गेला. यासंबधीची हकीकत ईश्वरदास नागरही देतात. ईश्वरदास म्हणतो, "साल्हेरचा किल्ला बागलाना प्रसिद्ध आहे पूर्वी खान जहान बहादुर दिलेरखान, इखलासखान, राजाजयसिंग, कुतूबोदिन, खव्वेशत्री आणि मोगल सरदारांनी हा किल्ला प्रचंड सैन्यानिशी जिंकूण घेण्याचे प्रयत्न केले होते पण तो फत्ते जहाला नाही आणि मोगल सरदाराना वेढा उठवून परत जावे लागले. मुल्हेरचा किल्लेदार नेकनाम खान हा मोठा शहाना आणि दूरदृष्टीचा मणूष होता. खटपट करून साल्हेरचा किल्ला ताब्यात येण्यासारखा आहे असे त्याला वाटले त्याने काही शहाणे माणसे साल्हेरचे कडकरी असोजी कृष्णाजी याजकडे पाठविले. नेकनामखानाने कृष्णाजीला गोडगोड बोलून आणि सोने, नाणे, घोडे ईत्यादी वस्तू भेटी दाखल देऊन त्याचे मण आपल्याकडे वोढून घेतले त्याने कृष्णाजीला सांगीतले की, किल्ला मोगलाच्या हावाली करावा म्हणजे बादशहाकडे मोठी मनसब मिळवून मान सन्माण वाढेल. अनेक मराठे बादशहाच्या पदरी लावून मोठमोठ्या जागेवर नेमले गेले होते. हे कृष्णाजीला दिसत होते त्यानी किल्ला मोगलाच्या हावाली केला. नेकनाम खानाच्या शिफारसी वरुन बादशहाने कृष्णाजीला तीन हजार जात आणि दोन हजार स्वार याची मनसब दिली. कृष्णाजीला त्याच प्रतांत जहागीर देण्यात आली नेकनाम खान यास पाचशे जात आणि पाचशे स्वार असी त्याच्या मनसबीत वाढ करण्यात आली त्याला झेंड्याचा मान देण्यात आला. मिरजा फरुकबेग हा पाचशेचा मनसबदार होता. साल्हेरचा किल्लेदार म्हणून त्याची नेमणूक करण्यात येऊन किल्ल्याचे नाव सुलतान गड ठेवण्यात आले."[२९]

---

[२९] *आपटे द. वि., केळकर,न. चि (संपा) : शिवकालीी पत्रसार संग्रह , खंड २ रा, श्रीशिवचरित्र कार्यालय, पुणे, १९३० पृ.क्र.३९७ पृ.क्र. १४११*

### ५.४.१.३ रामसेजचा किल्ला :

रामसेज किल्ला नाशिकच्या उत्तरेस पाच कोसावर आणि दिंडोरी तालुक्याच्या दक्षिणेस चार मैलावर आहे. नाशिक जिल्ह्यातील मराठ्यांचा एक महत्त्वपूर्ण किल्ला होता. किल्ल्याच्या समोरील भागात एक मोठा दरवाजा असून किल्ल्याकडे जाण्यासाठी असलेल्या वाटेस चोखाट म्हणतात. २२ मार्च १६८२ रोजी औरंगजेब औरंगाबादेस पोहोचल्यानंतर मराठ्यांच्या विरुद्धचे आक्रमण तीव्र करून अनेक किल्ल्यास वेढा देऊन हस्तगत करण्याचा प्रयत्न चालवला होता. त्यामुळे बादशहाने १६८२ च्या एप्रिल महिन्यात शहाबुद्दीन खानास रामसेजच्या किल्ल्यास वेढा देण्यासाठी पाठविले. या वेढ्या संदर्भात माहिती खाफीखान व भिमसेन सक्सेना या दोघांनी दिली आहे. प्रसिद्ध मोगलाचा इतिहासकार खाफीखान हा रामसेजच्या वेढ्याच्या वेळी हजर होता. खाफीखान लिहितो, "बादशहाने रामसेजचा किल्ला जिंकूण घेण्याच्या कामावर शहबुद्दीनखान याची नेमणूक केली. किल्ल्याला वेढा घालणे, सुरुंग लावणे, मोर्चे बांधणे, दमदमे तयार करून वर चढवणे इत्यादी सर्व गोष्टी शहाबुद्दीन खानाने केल्या; पण रामसेजचा किल्लेदार हा सर्व मराठ्यांत अत्यंत अनुभवी आणि कसलेला होता. त्याच्या प्रयत्नामुळे आणि सावधगीरीमुळे मोगल फैजेचे काही चालेना. किल्ल्यात लोखंडी तोफा नव्हत्या; पण कातडे बरीच होते किल्यातील लोकांनी लाकडाच्या तोफा बनविल्या त्यात ते कातडी भरुन तोफ उडवित अशी एक तोफ दहा तोफेचे काम करी."

नंतर बादशहाने शहाबुद्दीनखानाला परत बोलाविले आणि त्याच्या जागी खानजहान बहादुर कोकल्तास यास किल्ला घेण्यास पाठविले. त्यानी या वेढ्यात शिपाईगीरीची शर्थ केली. त्याचे तपशिलवार वर्णन मी केले तर अतिशयोक्ती वाटेल. एके दिवशी खानजहान कोकल्तास म्हणाला, 'किल्याच्या एका बाजूला आपण हल्ला करणार म्हणून पुकारा करावा. तिकडे तोफा आणाव्या दारुगोळा न्यावा. तोफखान्याची माणसे लष्करातील लोक आणि बाजार बुणगे यांनी तिकडे गडबड उठवुन द्यावी. म्हणजे किल्ल्यातील लोक तिकडे गोळा होऊन बंदोबस्त करू लागतील.'

त्याचवेळी किल्ल्याच्या दुसऱ्या बाजूस योग्य जागा शोधून काढून शे-दोनशे शूर शिपायांनी जावे किल्ले चढून जाण्यात ते पटाईत असावेत त्यांनी काही आवाज न करता गुपचूपपणे जावे. त्याच्या बरोबर हल्ला करण्याचे सामान किंवा मशाली वगैरे उजेड पाडणाऱ्या वस्तू असू नयेत. त्यांनी अगदी सापाप्रमाणे जावे आणि दोऱ्याच्या साह्याने आणि हर प्रयत्नाने किल्ल्यावर पोहोचावे.

किल्लेदाराला बहादुरखानाचा हा बेत समजला त्यानेही युक्ती केली. त्याने असे ठरवले कि, ज्या बाजुने मोगल बाजार बुनगे आणून हल्ला आरडा ओरडा करतील त्या बाजूने आपणही किल्ल्यातील शूरशिपायांना गोळा करावे आणि नगारे-नौबती- केर्णे इत्यादीचा घोष करावा. मोगलावर दगड लोटून द्यावे. तेलाने माखलेले कपडे पेटवून वरू टाकावे. त्याकामात कसूर करू नये आणि ज्या जागी खानजहानची माणसे गुपचिप चढून येणार होती त्याठिकाणी किल्लेदारांनी सूर निवडक आणि सर्व प्रकारच्या शस्त्रानीं युक्त असलेले सिपाई घेऊन दबा धरुन बसावे. त्यांनी कोणत्याही प्रकारचा आवाज करू नये अशा रितीने दबा धरुन मराठे त्या आगंतूक पाहुण्यांची म्हणजे मोगलाची वाट पाहात बसले.

ठरलेल्या वेळी मोगलांची दोन माणसे वर चढली. त्यांची डोकी दिसताच किल्ल्यातील सैनिकांनी आपल्या प्राणहरण करणाऱ्या शस्त्राने त्यांच्यावर इतक्या जोराने आघात केला की, त्यांचे डोळेच बाहेर आले ते मोठ्या कष्टाने वाट वर चडून आले होते तिकडेच ते फेकले गेले. इतर माणसे त्यांच्या मागे चढत होती; पण ती वरुन पडणाऱ्या माणसाबरोबरच खाली पडली.

एके दिवशी खानजहान बहादुराचा मोतदार (सईस) म्हणाला "भुते वश करण्याच्या कामात मी पटाईत आहे. शंभर तोळे वजनाचा एक सोन्याचा साप तयार करा. तो माझ्या हाती द्या आणि हल्ल्याच्या वेळी मला आघाडीवर ठेवा. मी भुताच्या मदतीने किल्ल्याच्या प्रवेशद्वारापर्यंत कोणतेही आडचण न येता जाऊ शकेन अशी मला अशा आहे. खानजहान बहादुराने त्याच्या म्हणण्याप्रमाणे व्यवस्था केली. तो मोतदार हल्ल्याच्या वेळी पुढे होता. अर्ध्या वाटेपर्यंत तो पोहचला होता. इतक्यात किल्यावरून गोफणाचा गोळा येऊन त्याच्या

छातीवर इतक्या जोरात लागला की, मोतदाराच्या हातून सोन्याचा नाग उडाला आणि मोतदार खाली कोसळून पडला.

सारांश, खानजहान बहादुरने खूप परीश्रम केले; पण काम काही निघू शकले नाही. शेवटी बादशहाच्या आज्ञेने तोही वेढा उठवून निघाला. मोर्चे आणि किल्ल्यावर चढण्याची साधणे तयार करण्यासाठी म्हणून मोगलांनी खूप लाकडे जमविली होती. त्यात त्यांना बराच खर्च आला होता. कूच करण्याच्या दिवशी खानजहानच्या आज्ञेने मोगलांनी लाकडांना आग लावून दिली. यावेळी किल्ल्यातील लोक तटावर जमले होते. ते नगारे चौघडे इत्यादी वाजवित होते. तोंडाने जे काही म्हणत होते ते उच्चार करण्यासारखे नाही. कासिमखान किरमानी हा शूर आणि तडफदार सरदार होता. त्याची या वेढ्याच्या कामावर नेमणूक झाली. त्यानेही खूप परिश्रम केले. पण काम काही पार पडले नाही शेवटी बादशहाने वेढ्याचे काम तहकूब केले. कासिमखानला दुसऱ्या कामगीरीवर रवाना करण्यात आले.[३०]"

भीमसेन सक्सेना हा बहादुरखानाचा अधिकारी म्हणून शमसेजला गेला होता. भीमसेन सक्सेना शमसेनच्या वेढ्याविषयी म्हणतो. "शहाबुद्दीन याने किल्ल्याला मोर्चे लावले. किल्ल्याच्या बुरूजासमोर शहाबुद्दीन याने लाकडाचा एक प्रचंड बुरूज उभा केला. त्यावर चढून पाचशे माणसे एका वेळी किल्ल्यावरील लोकांवर गोळयाचा मारा करू शकत. इतक्यात बातमी आली की, किल्ल्यातील लोकांच्या मदतीसाठी मराठ्यांचे सैन्य चाल करून येत आहे. बादशहाने बहादुरखानाला ताबडतोब मोगलांच्या कुमकेस जाण्याची आज्ञा केली. बहादुरखानाने आपले नाजारबुणगे आणि जड सामान बहादुरगडाला ठेवले आणि तो गुलशनाबादेस पोहोचला. बादशहाने त्याला तेथेच छावणी करण्याची आज्ञा दिली. त्याप्रमाणे बहादुरगडाचा तळ हलवून गुलशनबादेस नेण्यात आला. मी आणि सय्यद कबीर हे बुगण्याबरोबर गुलशनबादेस पोहोचलो. दलपतराय याची गाठ घेण्यासाठी मी रामसेज येथे गेलो. रामसेज येथे शहाबुद्दीन याने लाकडी बुरूज उभा केला होता. तो मी पाहिला खरोखरच तो प्रेक्षनीय होता. शहाबुद्दीनखान याने रामसेजच्या किल्यावर हल्ला चढविला पण त्याला यश

[३०] *पगडी सेतू माधवराव (संपा.) : मराठयांचे स्वातंत्र्ययुध्द-खाफिरखानाचा साधनग्रंथ,जोशी आणि लोखंडे प्रकाशन, पुणे १९६२ (प्रथमावृत्ती) पृ.क्र. ९-१०.*

आले नाही. मोगलाची अनेक माणसे मारली गेली. दलपतराय याला दगडाच्या मारामुळे जखमा झाल्या शहाबुद्दीन हा जुन्नरकडे रवाना झाला. त्याने किल्ल्यावर हल्ला करण्याचा प्रयत्न केला. पण त्याचा काही उपयोग झाला नाही. शेवटी बादशहाच्या आज्ञेने त्याने किल्ल्याचा वेढा उठविला. शहाबुद्दीन याने अफाट खर्च करून लाकडी बुरूज तयार केला होता. त्यात वेढा आणि दारूभरून बुरूजाला पेटविण्यात आले. प्रचंड जाळ झाला.[३१] खाफीखान व भिमसेन सक्सेनाच्या म्हणण्यानुसार मोगलांनी रामसेजचा किल्ला घेण्यासाठी प्रयत्नाची पराकाष्टा केली; परंतु त्यांना यश आले नाही.

संभाजी महाराजांनीही रामसेज किल्ल्याकडे विशेष लक्ष दिले. शहाबुद्दीनखानचा वेडा रामसेजला पडल्यानंतर तो उठवण्यासाठी त्यांनी रूपाजी भोसले व मानाजी मोरे यांच्या नेतृत्वाखाली सैन्याची तुकडी पाठवली. औरंगजेबाला ही बातमी समजताच त्याने ताबतोब कासीमखानला शहाबुद्दीनखानाच्या मदतीला जाण्याचा हुकूम दिला. रूपाजी भोसले व मानाजी मोरे हे नाशिकच्या परिसरात वावरत आहेत. हे कळताच शहाबुद्दीनखान रामसेजहून गणेशगावाजवळ गेला.[३२]

गणेशगाव हे नाशिकच्या पश्चिमेस दहा मैलावर आहे. तेथे एप्रिल-मे १६८२ च्या सुमारास रूपाजी भोसले व मानाजी मोरे यांनी शहाबुद्दीनखानशी लढाई दिली. झालेल्या चकमकीत मराठ्यांनी मुघलाच्या पाचशे घोड्यांचा पाडाव केला.[३३] रामसेजचा वेढा तोडण्याचा जसा प्रयत्न केला होता त्याचप्रमाणे रामसेजच्या किल्लेदाराच्या मदतीसाठी एक हजार अतीरिक्त सैन्य ही पाठवले होते. याचबरोबर त्रिंबकगडावरून केशव त्रिमल रामसेजला युद्धसाहित्य पुरवीत होते.[३४] तसेच संभाजी महाराजांनी रामसेजच्या शूर किल्लेदाराचा उचित सत्कार केल्याचे दिसते. त्यास खिलतीचा पोषाख, रत्नजडीत कडे आणि नगद रक्कम

[३१] *पगडी सेतू माधवराव(संपा.) :मोगलआणि मराठे- तारीख दिल्कुशा, श्री लेखन वाचन भंडार, पुणे १९७० पृ.क्र. ८०-८१*

[३२] *दारवटकर अनंत : अद्वितीय छत्रपती श्री संभाजी महाराज (खंड ३) श्रीशंभू प्रेरणा प्रकाशन, पुणे २०१० (प्रथमावृत्ती) पृ.क्र. १४५७.*

[३३] *गोखले कमल श्रीकृष्ण : शिवपुत्र संभाजी , ज्ञान-विज्ञान विकास मंडळ, पुणे १९७१ (पहिली अवृत्ती) पृ.क्र.२२५*

[३४] *गोखले कमल श्रीकृष्ण : शिवपुत्र संभाजी , उपरोक्त, पृ.क्र.२२५.*

पाठवून त्याचा गौरव केला. इतर किल्लेदाराच्या मानाने तो श्रेष्ठ म्हणून त्याचा मानसन्मान करून त्याची आपल्या एका प्रमुख किल्ल्यावर बदली केली. [३५]

रामसेजचा किल्ला जिंकून घेण्यासाठी औरंगजेब बादशहाने शहाबुद्दीनखान, पीरगुलाम, खानजहान बहादुर कोकल्ताश, काशीमखान, मुहंमद खलील, सुनकरण बुंदेल, रामसिंह इत्यादी मातब्बर सरदारांना पाठवले होते. रामसेजला मोगलांनी एप्रिल १६८२ मध्ये वेढा दिला होता. १६८७ मध्ये रामसेजचा किल्ला मोगलांना मिळाला. रामसेज घेण्यासाठी मोगलांना पाच-सहा वर्ष झटावे लागले. शेवटी फितुरीने हा किल्ला मोगलांना मिळाला. या संदर्भात खाफीखान म्हणतो, "संभाजीराजे यांनी किल्लेदाराला दुसऱ्या गडावर नेमले त्यानंतर सुमारे २-३ वर्षानी रामसेजभागात असलेल्या अब्दुल करीम नावाच्या एका जमीनदारामार्फत मुल्हेरचा किल्लेदार नेकनामखान याने रामसेजच्या नवीन किल्लेदाराला वश करून घेतले.[३६] रामसेज घेण्यासाठी मोगलाना प्रचंड किंमत मोजावी लागली. एकट्या खानजहान बहादुरला वेढ्याच्या वेळेस ३७६३० रु. एवढा खर्च आला होता.

### ५.४.१.४ त्रिंबक गड :

त्रिंबक गड हा नाशिकच्या नैऋत्य पश्चिम दिशेस २० मैलावर आहे. ज्यावेळी रामसेजला वेढा घातलेला होता त्याच सुमारास त्रिंबकगडही घेण्याचा प्रयत्न मोगल करीत होते; परंतु ज्या पद्धतीने ते रामसेजसाठी ठाण मांडून बसले होते तसा प्रयत्न मोगलांनी त्रिंबकगडासाठी केल्याचे दिसून येत नाही. त्यामुळे रामसेजच्या वेढ्याच्या वेळी त्रिंबकगडावरून केशव त्रिमल दारुगोळा व इतर युद्धसाहित्य पुरवीत होते.[३७] १६८२च्या डिसेंबर महिन्याच्या पहिल्या आठवड्यात मराठ्यांची फौज त्रिंबकगडाच्या बाजुला गेल्याने खानजहान बहादुरचा मुलगा मुज्जफरखान याला फौजेच्या जोरावर तंबी देण्यासाठी नेमण्यात आले. मुज्जफरखान आणि मराठ्यात चकमक झाली. त्यानंतर बहारामतखानाने

---

[३५] *दारवटकर अनंत : अद्वितीय छत्रपती श्री संभाजी महाराज (खंड ३) श्रीशंभू प्रेरणा प्रकाशन, पुणे २०१० (प्रथमावृत्ती) पृ.क्र. १४६७.*

[३६] *पगडी सेतू माधवराव(संपा.) : मराठयांचे स्वातत्र्ययुध्द-खाफिरखानाचा साधनग्रंथ,जोशी आणि लोखंडे प्रकाशन, पुणे १९६२ (प्रथमावृत्ती) पृ.क्र. ११.*

[३७] *दारवटकर अनंत : अद्वितीय छत्रपती श्री संभाजी महाराज (खंड ३) उपरोक्त, पृ.क्र. १४६८.*

त्रिंबकगडाच्या तीन वाड्या जाळल्या. या विजयाबद्दल त्याला १००० रु. किमतीचा हाती देण्यात आला.[३८] इतर गडाप्रमाणे मोगलांनी त्रिंबकगडसुद्धा फितुरीच्या मार्गाने घेण्याचा प्रयत्न केलेला दिसून येतो; परंतु त्यामध्ये ते पूर्णपणे अपयशी ठरले. मोगल त्र्यंबकगड घेण्याचा प्रयत्न सुरू करण्याच्या वेळेसच संभाजी महाराजांच्या बाजुने असणाऱ्या राघो खोरा याने मोगलाकडे चाकरी करण्याची इच्छा व्यक्त केली होती. बादशहाची काही कृपा झाली तर महाराजांकडील त्रिंबकगड मिळवून देईन, असे त्याने सांगितले होते. यावर त्यास ७०० जात व २०० स्वार असा नवीन मानकरी बनवून काही रोख रक्कमेची कृपा केली होती; परंतु त्रिबकगडाच्या स्वामीनिष्ठ किल्लेदाराने त्याचे म्हणणे मान्य केले नाही. अखेर त्यास स्वतःस वाचविण्यासाठी पळून जावे लागले. यावर त्याच्यामार्फत राघो खोराचा प्रयत्न चाललेला होता. त्या जमनाजीस इहतिमामखानाने कैद केले यावर मी बादशाही चाकर आहे. माझे त्याच्याशी कोणतेही नाते किंवा संबंध नाही असे त्याने सांगितले तेव्हा इ.स. १६८३ मध्ये फेब्रुवारीच्या सुरुवातीस त्याच्याकडून जामीन होऊन त्याची सुटका करण्यात आली.[३९] मोगलाच्या फितुरीने गड घेण्याचा प्रयत्न फसला.

१६८४ च्या सुमार ही मोगलांनी त्रिंबकगड घेण्याचा प्रयत्न केला पण अपयश आले. यापरीसरामध्ये मराठे-मोगल याच्या अनेक छोट्या-मोठ्या चकमकी होत राहील्या. ज्यामध्ये मराठ्यांनी मोगला फार त्रास दिला. पुढे १६८८ च्या ऑगस्ट महिन्यात मोगल सरदार मातबरखान याने त्रिंबकगडाला पुन्हा वेढा घातला. त्या यसंबंधी औरंगजेबाने मातबरखानास फर्मान सादर केले त्यात म्हटले होते की, "तुमची अर्जी मिळाली मजकूर आमच्या नजरेस आला तुमची कामगीरी पसंत केली जात आहे. तुम्हाला खिलतीची वस्त्रे, एक हत्ती वीस हजार रुपये रोखही देण्यात येत आहे. तुमच्या मन्सबीत पाचशेची वाढ करण्यात येत आहे. तुमची विनंती आम्ही मान्य करतो. त्याचा तपशील बख्शी उल्मुल्क बहरामखान याच्या पत्रावरून कळून येईल. मुहम्मद अफझलच्या मन्सबीत वाढ करण्यात आली आहे. बादशाही

[३८] *गोखले कमल श्रीकृष्ण : शिवपुत्र संभाजी , ज्ञान-विज्ञान विकास मंडळ, पुणे १९७१(पहिली अवृत्ती) पृ.क्र.२२७.*
[३९] *दारवटकर अनंत : अद्वितीय छत्रपती श्री संभाजी महाराज (खंड ३) श्रीशंभू प्रेरणा प्रकाशन, पुणे २०१० (प्रथमावृत्ती) पृ.क्र. १४७०.*

कृपेबद्दल तुम्ही आभारी राहावे आणि बादशाहाची आधिकाधिक सेवा करावी. त्र्यंबकचा किल्ला घेण्याचा हरप्रकारे प्रयत्न करावा त्याचे चीज होईल हे जाणावे."[४०] त्रिंबकगडाच्या वेढ्यासबंधात बादशहाला कळविताना मातबरखान लिहितो, "त्र्यंबकच्या किल्ल्याला मी सहा महिन्यापासून वेढा घातला होता. किल्ल्याभोवती मी चोक्या बसविल्या होत्या. सहा महिन्यापासून किल्ल्याच्या लोकांना ये जा करणे मुष्कील झाले होते. किल्ल्यात रसदेचा एक दाना पोहोचू नये अशी मी व्यवस्था केली होती. यामुळे किल्ल्यातील लोक हवालदिल झाले. त्यानी शरण येण्याची तयारी दाखविली जूलूस बत्तीस रबिलावल महिन्याच्या सवीस तारखेस (८ जानेवारी १६८९) त्र्यंबक किल्ल्याचे अधिकारी तेलंगराव आणि श्यामराज हे किल्ल्यावरून खाली उतरले आपल्या ताब्यात आला."[४१]

### ५.४.१.५ नाशिक जिल्हातील इतर किल्ले :

साल्हेर, मुल्हेर, रामसेज व त्रिंबकगड या गडावरील मोगली आक्रमणाला मराठे चांगला प्रतिकार करत होते. त्याचदरम्यान नाशिक जिल्ह्यातील औंढा-पट्टा कचंनगड, अंकाई-टकाई, हनवंतगड, आवळा-झबळा इत्यादी ठिकाणी मराठे-मोगल याच्यात चकमकी उडाल्या. औंढागड नाशिक जिल्ह्यातील सिन्नर तालुक्याच्या नैऋत्येस आणि देवळालीच्या दक्षिणेस १० मैल अंतरावर आहे. तर पट्टागड अहमदनगर जिल्ह्याच्या आकोला तालुक्यातील आकोल्याच्या वायव्येस १६ मैलावर आहे. हे दोन्ही किल्ले मराठ्यांच्या ताब्यात होते. मे १६८२ च्या आखेरीस तथा जून महिन्याच्या सुरूवातीस मोगलांनी या गडास वेढे दिले होते.[४२] या गडावर मराठे-मोगल यांच्यात संघर्ष झाला पण त्यात मोगलाना यश न आल्याने खानजहानबहादुरने मुजफकरखान, रणमरतखान व मोहरमसिंह यांना रवाना केले. मराठ्यांनी तेथून त्याच्या विशिष्ठ युद्धतंत्रानुसार पळाल्याचा आव आणला आणि संधी मिळाताच पुन्हा हल्ला केला. पुन्हा झालेल्या लढाईत दोन्हीकडील माणसे मेली मोगलाना दोन्ही किल्ले

---

[४०] *गोखले कमल श्रीकृष्ण : शिवपुत्र संभाजी , ज्ञान-विज्ञान विकास मंडळ, पुणे १९७१(पहिली अवृत्ती) पृ.क्र.२२९.*
[४१] *गोखले कमल श्रीकृष्ण : उपरोक्त पृ.क.२२९.*
[४२] *दारवटकर अनंत : अद्वितीय छत्रपती श्री संभाजी महाराज (खंड ३) श्रीशंभू प्रेरणा प्रकाशन, पुणे २०१० (प्रथमावृत्ती) पृ.क्र. १४७५.*

जिंकता आली नाहीत.[४३] पुढे मोगलांनी मातबरखानामार्फत १६८८च्या जानेवारी महिन्यात पट्टागड जिंकून घेलता. त्यानंतर इतर गड जिंकून घेण्याची तयारी सुरु केली. या संबंधात मातबरखान बादशहाला पाठवलेल्या अर्जात लिहितो, "यावेळी या सेवकांनी (स्वतः) किल्ले आउंधा, किल्ले कवनी, किल्ले इरीशगड, किल्ले त्रिगलवाडी, किल्ले मदनगड आणि किल्ले मोरदंत याना वेढे घातले आहेत. परमेश्वर करील तर आपल्या कृपेने हे किल्ले मी अल्पावधित जिंकून घेईन. त्यानंतर मी त्र्यंबकचा किल्ला जिंकून घेण्याचा प्रयत्न करीन. वरील किल्लेदानांना मी अश्वासने दिली आहेत ती मान्य व्हावीत. म्हणजे या सेवकावर त्यांचा विश्वास बसेल. जिंकून घेतलेल्या किल्ल्यावर किल्लेदांच्या नेमणूका व्हाव्या हशम आणि रसद ही पाठविण्यात यावी म्हणजे किल्ल्याची समाधानकरक व्यवस्था होईल आणि त्यांच्या सुरक्षिततेची खातरजमा होईल.[४४]

नाशिक जिल्ह्यातील मराठे व मुघल याच्या हालचाली १६८३-१६८५ पर्यंत थंडावलेल्या दिसतात. १६८५ च्या सुमारास मराठे या भागात चढाईसाठी पुन्हा गेले होते. १६८५ च्या फेब्रुवारी महिन्यात मराठ्यांची फौज हनवंतगडावर चालून गेली होती. चांदोरचा ठाणेदार तेथे पोचला आणि त्याने मराठ्याबरोबर सामना दिला.[४५] अशा प्रकारे नाशिक व बागलान प्रदेशातील मोगलाच्या आक्रमणाला संभाजी महाराजांनी सडेतोड प्रतित्तर दिले होते. मोगलांना या प्रदेशातील एक एक किल्ला हस्तगत करण्यासाठी ५-६ वर्ष झुंज द्यावी लागली. प्रचंड संपती खर्च करावी लागली.

### ५.४.२ तळकोकणातील मराठा-मोगल संघर्ष :

औरंगजेब बादशहा दक्षिणेत येण्या अगोदरच तळकोकणावर आक्रमण करण्यासाठी ७ नोव्हेंबर १६८१ मध्ये हसनअलीखान त्याचा मुलगा हुसेन अलीखान, लोदीखान त्याचा मुलगा मेहमूद सुबरकरण बुंदेला, राजा महासिंग, जाधवराव इत्यादीं सरदारांना तळकोकणात शिरू दिले. अलमालच्या जवळ मोगल-मराठे यांच्यामध्ये लढाई झाली. त्यामध्ये मोगलाचे

[४३] *गोखले कमल श्रीकृष्ण : शिवपुत्र संभाजी , ज्ञान-विज्ञान विकास मंडळ, पुणे १९७१(पहिली अवृत्ती) पृ.क्र. २३१.*
[४४] *गोखले कमल श्रीकृष्ण : उपरोक्त पृ.क. २३३.*
[४५] *गोखले कमल श्रीकृष्ण : उपरोक्त पृ.क. २३४.*

अनेक सरदार मारले गेले मोगलांनी सपाटून मार खाल्ला. त्यामुळे फेब्रुवारी १६८१ मध्ये हसनअलीखान तळकोकण सोडून नाशिकला गेला. मोगलाच्या तळकोकणातील हालचाली थांबल्या; पण पुन्हा आगस्ट १६८२ पासून तळ कोकणातील हालचालीस वेग आल्याचे दिसते. कारण यानंतर पुन्हा औरंगजेब बादशहाने आपले महत्त्वाचे मातबर सरदार तळकोकणात उतरवले.

संभाजीचा मुलूख उद्ध्वस्त करण्यासाठी आणि कब्जात आणण्यासाठी खानजहान बहादुरला त्याच्या साथीदारासह ऑगस्ट १६८२ च्या अखेरीस तळकोकणात पाठविलेले होते.[४६] त्याच्या पाठोपाठ ता. २८ सप्टेंबर १६८२ रोजी बहादुरखानास इनाम देऊन तळकोकणाच्या खोऱ्याकडे रवाना केले. खानास खिलअत, सोन्याच्या साजाचा घोडा, हत्ती व पंचहजारी केले त्याचबरोबर दाऊदखानास खिलअत व सोन्याचा साजासह घोडा व मुळा चार हजारी, तीन हजार स्वरात ५०० स्वाराची वाढ फर्मावली.[४७] यावरून बादशहा मोगल सरदारांना तळकोकणात उतरवण्यासाठी कशा प्रकारे प्रोत्साहित करत होता हे समजते.

औरंगजेबाने बादशहाने बहादुरखानास मोठ्या प्रमाणात इनाम देऊन तळकोकणात रवाना केले होते तरी कोकणाच्या जवळ येईपर्यंत त्याची परस्थिती अतिशय बिकट झाली होती. त्यामुळे त्याने खानजहान बहादुरकडून दहा हजार रूपये घेऊन तळकोकणाच्या वाटेला लागला. ४ नोव्हेंबर १६८२ रोजी तो तळकोकणाच्या घाटात दाखल झाला व त्याच दरम्यान खानजहान बहादुरने रामसेजच्या किल्ल्याहून कूच केले व तो तळकोकणच्या घाटाकडे रवाना झाला. पुढे तो चांदवड जवळ पोहोचला.[४८] बहादुरखान व खानजहान बहादुरखान याच्या पाठोपाठ बादशहाने शहाबुददीनखानासही तळकोकणात उतरविले; परंतु या सरदाराना पाठवून ही हवे तसे यश मोगलांना मिळात नव्हते. म्हणून नोव्होंबर १६८२ मध्ये बादशहाने रणमस्तखानास तळकोकणात पाठविले तो कल्याणला येऊन बसला.[४९]

---

[४६] *गोखले कमल श्रीकृष्ण : शिवपुत्र संभाजी , ज्ञान-विज्ञान विकास मंडळ, पुणे १९७१(पहिली अवृत्ती) पृ.क्र.२५१.*
[४७] *दारवटकर अनंत : अद्वितीय छत्रपती श्री संभाजी महाराज (खंड ३) श्रीशंभू प्रेरणा प्रकाशन, पुणे २०१० (प्रथमावृत्ती) पृ.क्र. १४७८.*
[४८] *दारवटकर अनंत : अद्वितीय छत्रपती श्री संभाजी महाराज (खंड ३) उपरोक्त पृ.क्र. १४७८.*
[४९] *दारवटकर अनंत : अद्वितीय छत्रपती श्री संभाजी महाराज (खंड ३) उपरोक्त, पृ.क्र. १४८७.*

संभाजी महाराज मोघलांच्या तळकोकणातील हालचालीवर नजर ठेवून होता. त्यामुळे त्याने अगोदर अंदाज घेऊन आपल्या सर्व अधिकाऱ्यांना तळकोकणात येणाऱ्या सर्व वाटा अडवल्याचे व मोगलाना माहित नसणाऱ्या वाटाचा उपयोग करण्याचे हुकूम दिले होते. या हुकूमाची अमलबजावणी ताबडतोब केल्याचे दिसून येते. औरंगजेबाने तळकोकणात पाठवलेल्या सर्वच अनुभवी सरदारांना संभाजीच्या सरदारांनी चोक प्रतिउत्तर दिले. कल्याण-भिवंडीपासून ९ मैलावर असलेल्या मेहेंदळी गावात मराठ्यांच्या दोन हजार स्वारांनी मुघल ठाण्याची लुटालुट केल्याची बातमी समजल्यावरून मुकर्रखान २० नोव्हेंबरला जादा समान व बुणग्यांना किल्ल्यात सोडून मराठ्यांना तबी देण्यासाठी थांबला. मुकरमेखान व मराठे यांच्यात मेंहेदळी गावाच्या अलीकडे ३० कोसावर असलेल्या उरण खेड्याजवळ लढाई झाली. दोन्हीकडील सैनिक मेले काही जखमी झाले त्यानंतर मुकर्रमखानाने मौजे मेंहेदळी येथे डेरा उभा केला.[५०]

दुसऱ्याबाजूस या दरम्यानच्या काळात बहादुरखान कोकणात उतरला त्यामुळे संभाजी राजांनी मराठ्यांची ७ हजार स्वारांची आणि ८ हजार व्याधांची तुकडी कल्याण-भिवंडीला पाठविली ही बातमी बहादुरखानला कळताच त्याने तेथे गढी तयार करून आपले ठाणे मजबुत केले. २८ नोव्हेंबर रोजी बहादुरखान व मराठे यांच्यात लढाई झाली. मराठ्यांनी पळून जाण्याचा आव आणला यानंतर रणमस्तखानाबरोबर मुकाबला करण्यासाठी संभाजीराजे यांनी नोव्हेंबर-डिसेंबरमध्ये रूपाजी भोसले केसोपंत व निळोपंत यांना रवाना केले.[५१] त्यांच्याबरोबर १० हजार स्वार व १२ हजार पायदळ पाठविण्यात आले. ता. ४ डिसेंबर १६८२ रोजी बहादुरखान व मराठ्यांच्यात लढाई झाली. यामध्ये मराठ्यांकडील काही सामान त्याच्या हाती लागले यानंतर बहादुरखान स्वार होऊन त्याने स्वराज्यातील बितिंगा गडाच्या वाडीस आग लावून ती जाळली.[५२] या युद्धातमध्ये मराठ्यांनी नेहमीप्रमाणे बहादुरखानावर हल्ला चढवून त्याचा पराभव केला व मराठे पसार झाले. तेव्हा बहादुरखान

---

[५०] *गोखले कमल श्रीकृष्ण : शिवपुत्र संभाजी , ज्ञान-विज्ञान विकास मंडळ, पुणे १९७१(पहिली अवृत्ती) पृ.क्र.२५४.*
[५१] *गोखले कमल श्रीकृष्ण : उपरोक्त पृ.क.२५४.*
[५२] *दारवटकर अनंत : अद्वितीय छत्रपती श्री संभाजी महाराज (खंड ३) श्रीशंभू प्रेरणा प्रकाशन, पुणे २०१० (प्रथमावृत्ती) पृ.क्र. १४४८.*

त्याचा पाठलाग करत बितिंगा गडाचा घाट माथ्यावर पोहचून शेवटी बितिंगा गडाच्या वाडीस आग लावल्यावरच समाधान मानले.

डिसेंबरच्या दुसऱ्या-तिसऱ्या आठवड्यात मराठ्यांनी पुन्हा रणमस्ताखानच्या सैन्यावर दोन-तीन वेळा हल्ले केले. बहादुरखानाने ते परतून लावले. मराठ्यांनी पुन्हा एकदा रात्रीचा हल्ला केला. हा हल्ला अचानक असल्यामुळे मोगलाचे अनेक सैनिक ठार व जखमी झाले असावेत; परंतु बहादुरखान आपले अपयश झाकण्यासाठी शत्रुंच्या अनेक लोकांना ठार मारले व जखमी केले असे बादशहास सांगितले. मराठ्यांच्याकडून सतत होत असलेल्या अकस्मित हल्ल्यापासून स्वतःचा बचाव करण्यासाठी बहादुरखानाने कल्याणचा किल्ला दुरूस्तीचे काम हाती घेतले. किल्ल्याच्या तट भिंतीचे काम अपुरे राहील्यामुळे त्यांच्या पहाऱ्यासाठी २००० माणसे नेमली होती. संभाजी राजांना वरील बातमी समजताच त्याने सरदार तुकोजी सोबत मोठे सैन्य धाडले. या सैन्याने कल्याणपासून आठ मैलावर असलेल्या गावी मुक्काम केला. तेथे त्याने मोर्चे लावले व खंदक खणले. ही बातमी कळताच बहादुरखानाने याकुतखान, रूमीखान, दऊदखान यांच्या तीन तुकड्या तयार करून मराठ्यांवर हल्ले केले. या चकमकीत बंदुका व धनुष्यबानाचा उपयोग करण्यात आला होता. याच एका चकमकीत तुकोजी व त्याचे साथीदार मारले गेले. मराठ्यांनी मुकाबला केल्यानंतर ते डोंगरात निघून गेले. मुघल सैन्याने त्यांचा १० मैल पाठलाग केला. मराठ्यांनी पुन्हा बाणाचा वर्षाव केला. हातघाईचा सामना झाला.[५३] या लढाईमध्ये जरी तुकाजी मारला गेला तरी मराठ्यानी गनिमी कावा तंत्राचा आवलंब करून मोगलाला जबदस्त तडाका दिल्याचा दिसून येतो. कारण बहादुरखानाने या लढाईची अर्जदास्त बादशहाकडे पाठविली नाही. मराठ्यांच्या वाढत्या आक्रमणास खानजहान बहादुरखान हा चक्रावून गेलेला होता त्यामुळे तो कोणत्याही हालचाली न करता एका जागेवर सुरक्षित राहने त्यास योग्य वाटत होते; परंतु या गोष्टीची माहिती शहजादा आज्जमच्यामार्फत बादशहास कळली. बादशहाचे शाही फर्माण पाठवून मामूरखान पोहोचेपर्यंत नुस्त्रतखानास गुलशनाबादेस (नाशिक) सोडावे व स्वतः

---

[५३] *गोखले कमल श्रीकृष्ण : शिवपुत्र संभाजी , ज्ञान-विज्ञान विकास मंडळ, पुणे १९७१(पहिली अवृत्ती) पृ.क्र.२५५.*

शहजादा मोइज्जुद्दीनाजवळ पोहोचावे, असे खानजहान बहादुरखानास ता. ७ जानेवारी १६८३ फर्माण पाठविले. यावरून मराठ्यांनी मोगल सरदारांना कसे दमछाक केले होते याची कल्पना येते.

बहादुरखान, खानजहान बहादुरखान, शहाबुददीनखान व रणमस्तानखान यांना तळकोकणात उतरविल्या नंतरही औरंगजेबास म्हणावे तसे यश येत नसल्याचे पाहुन कासिमखानास तळकोकणात उतरण्याचा हुकूम सोडला; परंतु त्यास तळकोकणाची अजिबात माहिती नसल्यामुळे ता. २३ फेब्रुवारी १६८३ रोजी बादशहाने रूहुल्लादखानाच्या नावाने हूकूम काढला की, त्याने त्यांची फौज व कासिमखान यासह बहादुरखानाच्या कुमकेसाठी तळकोकणच्या खोऱ्यातील वाटेच्या तोंडाशी जावे. बहादुरखान जे काम करीत आहे ते त्याने तुमच्याशी मिळून करावे.[५४] औरंगजेब बादशहा ज्याप्रमाणे अनुभवी शूर सरदार तळकोकणात उतरवत होता. त्याचप्रमाणे संभाजी राजेही आपल्या कडील लढावू शूर सरदाराची कुमक पाठवित होते. फेब्रुवारी महिन्यात संभाजीराजे किंवा त्यांच्या एखाद्या सरदाराने ४००० घोडदळ व पायदळ घेऊन मुघलांच्या वाटा अडविल्या होत्या. ही बातमी समजताच रूहुल्ल्लाखानाने पद्मसिंह यास धाडून त्याला डावी बाजू आणि दुसऱ्या अधिकाऱ्यानां उजवी बाजू संभाळण्यास सांगितले. दिनांक १९-२-८३ रोजी दोन्ही सैन्यात लढाई झाली. या चकमकीत मराठ्यांच्या कडील ४०० सैनिक मेले. काही जखमी झाले बहादुरखानाचे लष्कराने मराठ्यांचा सहा मैल पाठलाग केला. या चकमकीत पोर्तुगेज सैनिकही मुघलाना मदत करीत होते.[५५] वरील माहितीमध्ये सत्यता वाढत नाही त्यानंतर फेब्रुवारी महिन्याच्या तिसऱ्या आठवड्यात हंबीरराव व इतर तीन मोठे सरदार २०००० घोडदळ व १०००० पायदळ घेऊन कल्याण-भिवंडी येथे पोहोचले होते.[५६] ते पूर्ण तयारीत होते. त्यांच्या सैन्यात छत्र्या, भाले व लढाईची हत्यारे होती. कल्याण-भिवंडीच्या पुढे सात कोसावर ते जमा झाले. तेथील जंगलामध्ये शत्रुला दिसणार नाहीत. या पद्धतीने मराठे लपून

---

[५४] *दारवटकर अनंत : अद्वितीय छत्रपती श्री संभाजी महाराज (खंड ३) श्रीशंभू प्रेरणा प्रकाशन, पुणे २०१० (प्रथमावृत्ती) पृ.क्र. १४८०.*

[५५] *गोखले कमल श्रीकृष्ण : शिवपुत्र संभाजी , ज्ञान-विज्ञान विकास मंडळ, पुणे १९७१(पहिली अवृत्ती) पृ.क्र.२५७.*

[५६] *गोखले कमल श्रीकृष्ण : उपरोक्त पृ.क.२५७.*

बसले. ता. २७ फेब्रुवारी १६८३ रोजी मोगल फौजेची खोडी काढण्यासाठी काही मराठ्यांनी त्यांच्यावर हल्ला केला व त्यांना अंगावर घेत घेत ते डोंगराकडे पळाले आणि मग झाडांमध्ये लपलेले ताजा दमाचे संभाजी महाराजांचे सैन्य मोगलावर तुटून पडले. मराठ्यांच्या आवेशापुढे मोगल टिकले नाहीत. अनेक मोगलांची कत्तल झाली आणि सात कोस पुढे आलेले मोगल जीव वाचविण्यासाठी माघारी फिरेले आणि सैफुल्लाह वलद रुहुल्लाहखान याच्यासह कल्याण भिवंडीकडे धावत-पळत परत गेले.[५७]

माघारी फिरलेल्या मोगल सैन्यावर मराठ्यांनी जोरदार हल्ला चढवला त्यामुळे पिछाडीवर असलेला पद्मसिंग हा ३५ जखमा होऊन ठार झाला. त्यांचे वडील भगवंतसिंह मेले. रामसिंग वलद, हरिसिंग वदल व इतर अनेक मोगल सरदार ठार झाले. जखमीची संख्यातर शेकडोवर होती. या लढाईत हंबीररावांना बाण लागून जखम झाली होती. त्यामुळे त्यांनी माघार घेतली वरील लढाईमध्ये मराठ्यांकडील २०० लोक मारले गेलेल्याचे सांगीतले आहे. त्यामध्ये सत्याशं दिसत नाही. कारण मराठ्यापेक्षा मोगलाचे प्रचंड नुकसान या लढाईमध्ये झाले होते. अशा प्रकारे मोठी फौज पाठवून मोगलांना तळकोकणात काही साध्य होत नव्हते.

रूहुल्लाहखान दि. १५-०३-१६८३ रोजी बहादुरखानाच्या फौजेस मिळाला. तेव्हा बहादुरखानाने रूहुल्लाहखानास कल्याण-भिवंडी येथील किल्ल्यात उतरण्यात सांगितले. किल्ला लहान असून रूहुल्लाहखानाजवळ मोठा जमाव होता. म्हणून तो बाहेरच डेरा टाकून राहिला. दुसरे दिवशी त्याने बहादुरखानास निरोप दिला की, एके ठिकाणी बसून रहाणे ठीक नाही. गस्त घालण्यासाठी स्वारी केली पाहिजे. बादशाही फर्मान आल्यामुळे रूहुल्लाहखानाने मराठ्यांचे फौज दिसताच त्याच्यावर हल्ला केला. दोन्हीकडील सैनिक मेले. रूहुल्लाहखानाचा मराठ्यांविरूद्ध टिकाव लागणे कठीण होते. कारण त्याला दक्षिणी लोकांच्या लढाईची माहिती नव्हती.[५८] पुढे एप्रिलमध्ये रूहुल्लाहखानाचा मुलगा सैफुल्लाखान

---

[५७] *दारवटकर अनंत : अद्वितीय छत्रपती श्री संभाजी महाराज (खंड ३) श्रीशंभू प्रेरणा प्रकाशन, पुणे २०१० (प्रथमावृत्ती) पृ.क्र. १४९८.*

[५८] *गोखले कमल श्रीकृष्ण : शिवपुत्र संभाजी , ज्ञान-विज्ञान विकास मंडळ, पुणे १९७१(पहिली अवृत्ती) पृ.क्र.२५८.*

यालाही कल्याण-भिवंडीच्या आघाडीवर नेमले होते. संभाजी राजानेही मोगलाचा पुन्हा प्रतिकार करण्यासाठी रूपाजी भोसले व मानाजी मोरे यांची नियुक्ती केली. कल्याणपासून १४ मैल अंतरावर सैफुल्लाखान व मराठे यांच्यामध्ये लढाई झाली. मराठ्याने गनिमीकावा पद्धतीने युद्ध करून जंगलात जाऊन लपले. झालेल्या चकमकीत जखमी झालेले रूपाजी भोसले व मानाजी मोरे मेले अशी बातमी सैफुल्लाखानाने दिली होती. या बातमीत काहीही तथ्य नव्हते. यावरून मोगल सरदार बादशहाकडे कसे खोट्या बातम्या देत होते हे समजते. कारण रूपाली भोसले संभाजीच्या अखेरीपर्यंत जिवंत होता. तर मानाजी मोरेस २९-१०-८४ रोजी संभाजींनी त्यास कैद केले होते.

अशा प्रकारे औरंगजेब बादशहाने ऑगस्ट १६८२ पासून तळकोकणात आक्रमणास सुरूवात करून त्यासाठी खानजहान बहाद्दुर, बहादुरखान, शहाबुददीनखान, मुकर्रमखान, कासिमखान, रूहुल्लाहखान सैफुल्लाखान, पद्मसिंह व इतर अनेक मातब्बर सरदारांना पाठवूनही कोणत्याही प्रकारचे यश मिळण्याची चिन्ह दिसत नसल्यामुळे १६८३ च्या एप्रिल महिन्याच्या शेवटी तळकोकणातील सर्वच आघाड्यावरील सैन्य माघे घेण्याचे आदेश दिले. संभाजी राजेंनी स्वतः तळकोकणाच्या आघाडीवर हजर राहून तसेच त्यांनी हंबीरराव, रूपाजी भोसले, मानाजी मोरे, तुकोजी, विठोजी केसापंत, निळोपंत व इतर अनेक सरदारांच्या नेतृत्वाखाली सैन्य पाठवून मोघलांच्या आक्रमणाचा तीव्र प्रतिकार केला. १६८८ च्या अखेरीपर्यंत कल्याणचा प्रांत संभाजी राजे यांच्या ताब्यात होता.

तळकोकणातील मराठा-मोगल संघर्षाची माहिती सुरतकर इंग्रजानी पाठवलेल्या पत्रातून मिळते. ता. २६ जानेवारी १६८३ च्या पत्रात सुरतकर लिहितात, "जमिनीवरून बादशहा आपल्या मोठ्या सैन्यानिशी संभाजीराजावर फार जोराने चढाई करीत आहे आणि समुद्रमार्गेही या भागात कोणी कधी पाहीले नसेल इतके मोठे मुघल आरमारही त्याच्या मुलुखावर झडप घालीत आहे; परंतु संभाजी राजे मोगलाला फार जडच जाईल यात शंका नाही... तसेच पुढील ९ मार्च १६८३ च्या पत्रात म्हणतात की, मोगल सुलतान हा अकबर व संभाजीराजे यांच्याविरुद्ध शक्य ते उपाय योजण्याची सारखी खटपट करीत आहे; परंतु त्याला

अद्याप कोठेही यश मिळाले नाही... याउलट ता २६ मार्च १६८३ पत्रात म्हणतात की... बादशहा आपला मुलगा सुलतान अकबर व संभाजीराजे यांच्या विरुद्ध जोरदार असा लढा देत आहे, परंतु बादशहापेक्षा संभाजीराजांनाच अधिक यश येत आहे... शेवटी २३ एप्रिल १६८३ च्या पत्रात सुरतकर लिहितात की, मोगल(बादशहा) अद्यापही औरंगाबादेतच आहे... सुलतान अकबर व संभाजीराजे यांच्याविरुद्ध पाठविलेली सर्व सेनादले त्यानी काढून घेलती हा निर्णय आकस्मिपणे घेतल्यामुळे लोकांमध्ये अनेक तर्ककुतर्क वाढले आहेत...[५९]

## ५.४.२.१ तळकोकणातील संघर्षात संभाजीचा सहभाग :

संभाजीराजे स्वतः या तळकोकणातील संघर्षात हजर असल्याची माहिती बुसातिनउस-सलातीन तसेच चिटणीस बखर, मराठी साम्राज्याची छोटी बखर, इंग्रजी पत्रात, औरंगजेबाच्या दरबारी अखबार या साधनामध्ये सापडते. याबाबतचा चिटणीस बखरीत असा उल्लेख येतो, "रणमस्तखान कल्याणप्रांती येऊन उपद्रव केला. हे वर्तमान महाराजास (संभाजी) कळल्यावरी रायगडाहून निघोन फौजेसुद्धा कल्याणास गेले. रणमस्तखान यांशी युद्ध देऊन रसदबंदी व काही मारुन जेर केले असता याकुदखान जंजिऱ्याहून कुमकेस गेले. त्यानी जहाजातून उतरून मधी मोरचे देऊन रणमस्तखान यास रसद पोचविणे वगैरे पुरावा केला. तो घाटावर रोहीलखान होते त्यास कळालियावरी तेही कुमकिस येऊन रणमस्तखान यास निभावून घेऊन घाट चढून गेले. महाराज माघारे रायगडास आले."[६०] मराठी साम्राज्याची छोट्या बखरीत यासंदर्भातील उल्लेख असा येतो, "तो रणमस्तखान मनसबदार पातशहाकडील फौजेनिशी कल्याणास आला. त्याजवर संभाजीराजे फौज सरंजामानिशी गेले. मुकाबला लढाईचा झाला. मोगलाचे लष्करात दाणा न मिळे राजाचे फौजेत आरमारवरून भरती समान पुरविले युद्ध भारी झाले रणमस्तखान बहुत जेर केला. मोगलाचे काटकास घरुन

[५९] *दारवटकर अनंत : अद्वितीय छत्रपती श्री संभाजी महाराज (खंड ३) श्रीशंभू प्रेरणा प्रकाशन, पुणे २०१० (प्रथमावृत्ती) पृ.क्र. १५०७-०८.*

[६०] *हेरवाडकर र.वि.(संपा.)मल्हार रामराव चिटणिस- विरचित-श्रीमंत छत्रपती संभाजी महाराज आणि थोरले राजाराम महाराज यांची चरीत्रे व्हिनस प्रकाशन, पुणे १९७२ (पहिलीअवृत्ती) पृ.क्र. १७.*

मोरचे लाविले त्याजवर रूहुल्लाखान धावून येऊन रणमस्तखान याजला काढून घेऊन गेला. रणमस्तखानाने बहुत युद्ध केले. महाराज रायगडास आले."[६१]

औरंगजेबाच्या दरबारी अखबरात दि. १५-०३-८३ च्या नोंदीमध्ये भूजी असा जो उल्लेख आहे तो संभाजीराजे यांनाच उद्देशून असावा, कारण भूजी याचा अर्थ शिवी असा आहे अथवा सभुंजीमधील सं राहून गेला असेल याशिवाय इंग्रजाच्या पत्रात संभाजीराजे कल्याण-भिवंडीला गेले असावेत अशा एका प्रसंगाचे वर्णन मुंबईच्या वकील हेन्री स्मिथ याने केले आहे. तो लिहितो की... संभाजीराजे यांजकडून मी आपले बरोबर कागद कां आणले नाहीत. याचे कारण असे की, राजे त्याच रात्री रायरीला गेले आणि तेथून लगेच पाली जवळील पाच्छापुरावरुन कल्याण जवळील मढगडावर म्हणजे येथून माझ्या पाच-सहा दिवसांच्या डोंगरातील प्रवासाच्या टप्प्यावर जाणार होते. शिवाय मजजवळ खर्चास एक पैसाही शिल्लक नव्हता व तसे केले असते तर त्याच्या प्रत्यक्ष हुकूमाविरूद्ध तेथे राहिल्याने राजेही रागावले असते. [६२] यावरी सर्व साधनातील उल्लेखावरून संभाजीराजे हे तळकोकणाच्या रणसंग्रामात सहभागी होते हे स्पष्ट होते. एवढेच नव्हेतर मोगलांच्या विरुद्ध लढा देण्यासाठी मराठी सरदारांना प्रोत्साहान आणि प्रेरणा देण्यासाठी बक्षीसे व इनामे दिली होती. याचे प्रत्यक्ष उदाहरण म्हणजे प्रयागजी दिनकरराव हा कल्याण प्रांतातील हातनोली, वडगाव व असडोती या गावाचे मोगलापासून संरक्षण करीत होता. म्हणून त्यास दि. ०९-११-१६८८ रोजी वरील गावे संभाजीने त्यास वतन म्हणून दिले होते.

### ५.४.३ स्वराज्याच्या इतर प्रदेशातील मोगल-मराठा संघर्ष :

औरंगजेब बादशहाने मराठ्यांचे राज्य गीळंकृत करण्यासाठी ज्यापद्धतीने स्वराज्याच्या उत्तर भागातील बागलाण व तळकोकणात आक्रमणे केली होती तसीच स्वराज्याच्या चहू बाजूने आपले सैन्य घूसवले होते.

[६१] *गोखले कमल श्रीकृष्ण : शिवपुत्र संभाजी , ज्ञान-विज्ञान विकास मंडळ, पुणे १९७१(पहिली अवृत्ती) पृ.क्र. २५९.*

[६२] *दारवटकर अनंत : अद्वितीय छत्रपती श्री संभाजी महाराज (खंड ३) श्रीशंभू प्रेरणा प्रकाशन, पुणे २०१० (प्रथमावृत्ती) पृ.क्र. १५०१.*

### ५.४.३.१ स्वराज्याची दक्षिण बाजू :

तळकोकणातील आणि रामसेज येथे खानजहान बहादुराला अपयश आल्यामुळे इ.सन १६८२ च्या सूमारास त्याची नेमणूक सातारा परीसरात चढाई करण्यासाठी केली होती. इ.स. १६८२ च्या जानेवारी महिन्याच्या पहिल्या आठवड्यात तो सातारा परिसरात शिरला त्याने रहीमतपुर आणि इतर गावी लुटली. या लुटीत काही मराठे व त्यांची जनावरे मोगलांना सापडली. खानजहान बहादुराने सातारागड, आदल सुबदल, रहीमतपुर याभागातील जंगल ताब्यात घेतले आणि काही ठिकाणी आगी लावल्या सरदार भिमराव आणि त्याच्या मुलांना पकडले. त्याचबरोबर त्याच्या हातात पंचविस हजार कैदी सापडले. त्यातील दहा हजार मुसलमानच होते.[६३] यावरून स्वराज्याच्या रक्षणासाठी संभाजीस मुसलमानाचा सहभाग होता हे दिसून येते. पुढे इ.स. १६८२ च्या ऑक्टोबर नोव्हेंबर महिन्यात सातारा जिल्ह्यातील मान तालुक्यातल्या सेखापुर कार्यात नाजरे या गावी मराठे व मोगल यांच्यात चकमकी उडाल्या होत्या.

### ५.४.३.१.१ पन्हाळ्याजवळ हंबीररावांनी आज्जमशहाचा पराभव केला :

औरंगजेब बादशहा २२ मार्च १६८२ रोजी औरंगबादला पोहचताच १४ जून १६८२ च्या रोजी विजापुरच्या दिशेने म्हणजेच दक्षिणेकडे जाण्यास शहजादा अज्जम यास परवानगी दिली.[६४] १६८२ च्या डिसेंबर महिन्यामध्ये आज्जम हा पन्हाळ्याच्या परिसरामध्ये पोहचला. पन्हाळ्याच्या परीसरात चालून आलेल्या शहजादा आज्जमशहाचा मुकाबला करण्यासाठी संभजीराजांनी सरसेनापती हंबीरराव यांना पाठविले होते. इ.स. १६८२ च्या डिसेंबर महिन्याच्या तिसऱ्या आठवड्यात दोन्ही सैन्यामध्ये लढाईस प्रारंभ झाला. शहजादा आज्जम पन्हाळ्याच्या आलीकडे सहा कोसावर पोहचले असताना सेनापती हंबीररावांनी वीस हजार फौजेसह त्याच्यावर आक्रमण केले. हंबररावांनी आपल्या वीस हजार सैन्याचे दोन भागामध्ये म्हणजे एक पाच हजाराची व पंधरा हजाराची दुसरी तुकडी करून पहिल्या पाच हजाराच्या

[६३] *गोखले कमल श्रीकृष्ण : शिवपुत्र संभाजी , ज्ञान-विज्ञान विकास मंडळ, पुणे १९७१(पहिली अवृत्ती) पृ.क्र.२२९.*
[६४] *दारवटकर अनंत : अद्वितीय छत्रपती श्री संभाजी महाराज (खंड ३) श्रीशंभू प्रेरणा प्रकाशन, पुणे २०१० (प्रथमावृत्ती) पृ.क्र. १५०९.*

तुकडीने मोगलाच्या पिछाडीवर आणि १५ हजाराच्या दुसऱ्या तुकडीने पुढील बाजूस हल्ला करण्यासाठी नेमणूक केली आणि एकाच वेळी दोन्ही बाजूने आज्जमच्या सैन्यावर हल्ला केला. शहजादा आज्जमच्या सैन्याच्या पिछाडीवर फिरोजखान व राव अनुपसिंग होते तर कुलीचखान, हसनअलीखान व सरफराजखान वगैरे पुढे होते. या लढाईमध्ये शहजादा आज्जमचा दारुण पराभव झाला; परंतु बादशहाला लढाईचा वृत्तांत देताना आज्जमने बढाई मारल्याचे दिसते तरी या लढाईत आज्जमचे मोठे नुकसान झाले होते. या लढाईमधून शहजादा आज्जमने माघार घेतले तरी हंबीररावांनी त्याचा पाठलाग सोडला नाही. आज्जमला भवरेच्या पलिकडे लावले. या लढाईमध्ये मोगलाचे बरेच सामान युद्ध साहित्य नष्ट झालेले बादशहाच्या हुकूमावरुन दिसते. ता. ९ जानेवारी १६८३ रोजी बादशहाने पाचशे मण दारु, तीनशे मण शिसे, तीन हजार बान व दोनशे महताबी एवढे सामान परडयावरुन महमंद आज्जमशहाकडे पाठवावे असा हुकूम केला होता.[६५] या हुकूमावरुन पन्हाळ्याजवळ शहजादा आज्जमचा दारुन पराभव झाल्याचे निश्चित होते.

शहजादा आज्जमचा झालेला पराभवाचा वाचपा काढण्यासाठी व बादशहाची सहनभुती मिळवावी म्हणून रहीमतपुर परीसरामध्ये असलेले महादेवाचे मंदीर पाडण्याचा हुकूम मिळावा असा अर्ज औरंगजेबाकडे करून त्याची परवानगी मिळताच तेथील अंगापुर येथील श्री शिवनाथ मंदीर होते. त्याची तोडफोड करण्यासाठी गेल्यानंतर मराठ्यांनी पुन्हा त्यांचा प्रतिकार केल्याचे दिसून येते. मोगलांनी १६८२ सालापासून सातारा व पन्हाळा परीसरामध्ये आक्रमक हलचाली करून लुटमार केली असली तरी त्यांना गडकोटावर ताबा मिळवता आला नाही. १६८९ सालाच्या सप्टेंबरपर्यंत मराठ्यांच्या ताब्यात सातारा, परळी, निंब इत्यादी प्रदेश होता.[६६]

---

[६५] *दारवटकर अनंत : अद्वितीय छत्रपती श्री संभाजी महाराज (खंड ३) श्रीशंभू प्रेरणा प्रकाशन, पुणे २०१० (प्रथमावृत्ती) पृ.क्र. १५१२.*

[६६] *गोखले कमल श्रीकृष्ण : शिवपुत्र संभाजी , ज्ञान-विज्ञान विकास मंडळ, पुणे १९७१(पहिली अवृत्ती) पृ.क्र.२८१.*

### ५.४.३.१.२ दक्षिण कोकणाच्या स्वारीत शहाअलमचा दारुण पराभव :

मराठ्यांचे राज्य नष्ट करण्यासाठी औरंगजेबाने १६८२ पासून एकाच वेळी अनेक आघाड्या सुरु केल्या होत्या. त्यात पहिली आघाडी स्वराज्याच्या उत्तर भागत बागलाण व तळकोकणाचा प्रदेश दुसरी आघाडी स्वराज्याचा मध्यभाग ज्यात रायगड व पुण्याचा प्रदेश येतो. तिसरी आघाडी स्वराज्याच्या दक्षिण भागात ज्याची सुरुवात शहजादा आज्जमने १६८२च्या जानेवारीच्या दुसऱ्या आठवड्यात केली होती; परंतु पन्हाळ्याजवळ हंबीरराव मोहिते या मराठ्यांच्या सेनापतीनी त्याचा पराभव केला. म्हणून त्या प्रदेशातून त्यांनी काढता पाय घेतला. त्यानंतर (सुलतान मुअज्जम) शहाअलमच्या नेतृत्वाखाली दक्षिण कोकणात दुसरी स्वारी हाती घेतली. औरंगजेबाने दि. १३/०९/१९८३ रोजी शहाआलमची कोकण, रामदश आणि मराठ्यांच्या इतर प्रदेशातील पाळेमुळे खणून काढण्याच्या कामावर नेमणूक केली.[६७] शहाआलम बरोबर अनेक नामांकित सरदार होते. तोफखान्याचा दरोगा अतिशखान, लतीफ शहा, दखनी ऊर्फ सरफराजखान, बहलोल खानाचा भाऊ इखलासखान, नागोजी मराठा (हा नामांकित असून त्या प्रदेशाचा वाकबगार होता) ख्वाजा मकारम, हा शहाजाद्याचा एकनिष्ठ सेवक होता. त्याला नुकतीच नऊशेंची मन्सब येऊन जाननिसारखान ही पदवी देण्यात आली होती. वीस हजाराची फौज तयार करण्यात आली सादतखान ऊर्फ महंमद मुरादखान हा तमाम दक्षिणचा वाकेबिगार होता.त्याला शहजादयाच्या फौजेचीही वाकेबिगारी (वाकनिसी) सांगण्यात आली. सर्वांना खिलतीचे पोशाख, हत्ती, घोडे इत्यादी देण्यात येऊन त्यांच्यावर कृपा करण्यात आली.[६८] अशा प्रकारे शहाअलम सोबत नामांकित सरदार जवळपास वीस हजार सैन्य देऊन औरंगाबाद रवाना केले. तसेच वाटेत अनेक सरदार व त्यांचे सैन्य त्याला येऊन मिळाले असे त्याच्या सैन्याची संख्या पंचेचाळीस हजाराच्या जवळपास गेली होती. या संदर्भात पोर्तुगीज अहवालात त्यांची नोंद आहे. त्यामध्ये चाळीस

---

[६७] *गोखले कमल श्रीकृष्ण : शिवपुत्र संभाजी , ज्ञान-विज्ञान विकास मंडळ, पुणे १९७१(पहिली अवृत्ती) पृ.क्र.२९४.*

[६८] *पगडी सेतू माधवराव(संपा.) : मराठयांचे स्वातत्र्ययुध्द-खाफिरखानाचा साधनग्रंथ,जोशी आणि लोखंडे प्रकाशन, पुणे १९६२ (प्रथमावृत्ती) पृ.क्र.१३.*

हजार स्वार साठ हजार पायदळ एकोणवीसशे हत्ती आणि वीस हजार उंट ऐवढे सैन्य शहाअलमच्या नेतृत्वाखाली दक्षिण कोकणात उतरल्याचे नमुद केले आहे.[६९]

शहाअलमच्या दक्षिण कोकणाच्या स्वारीबद्दल इंग्रजांना काय वाटले हे त्यानी लंडनला पाठवलेल्या दि. ३०/१०/१९८३ च्या पत्रात लिहिले आहे. "मुघल बादशहाने आपला मोठा मुलगा फार मोठ्या सैन्यानिशी राजाच्या विरुद्ध धाडला आहे. त्यामुळे सर्वांचा असा समज झाला आहे की, युवराजाने (शहाअलम) जर का बापाचे सर्व हुकूम निष्ठेने पाळले तर संभाजी मोठ्या आपत्तीत सापडल्याशिवाय राहणार नाही. ही स्वारी टाळावयाची असेल तर राजाला शहाजादा व त्याचे अधिकारी यांना पैशाची लाच दाखवावी लागेल. आम्हाला या गोष्टीत अडचण दिसत नाही. कारण संभाजी जवळ उमरावांना द्यावयास पैसा आहे आणि हे उमराव पैशाच्या आशेने बादशाही हुकूम आणि हित विकावयास तयार होतील. सैन्य दलातील सर्वच सैनिक संभाजी राजांना मानतात. कारण तेच त्यांचे अन्नदाते आहेत. त्यामुळे ते सैनिक स्वार्थासाठी संभाजी राजांचा नाश करणार नाहीत. त्यांना माहित आहे की, संभाजी राजे आहेत म्हणून नोकरी व पैसा मिळू शकेल. असे बोलले जाते की राजे आणि शहजादा यांचा गुप्त पत्रव्यवहार चालू आहे."[७०]

शहाआलमच्या स्वारीची माहिती खाफीखान, मनुची, पोर्तुगीज, इंग्रज यांच्या कागदपत्रातून मिळते शहाआलम मजलदरमजल करत दक्षिण कोकणच्या दिशेने निघाला. वाटेत मराठ्यांच्या फौजेने प्रतिकार केला. वाटा अवघड आणि अरुंद होत्या. शहाजाद्याच्या आघाडीच्या फौजेशी शत्रूंची प्रखर युद्धे झाली. मोगलाचे अनेक लोक मारले गेले. मग शत्रू पराजित होऊन पळून गेला. मोगल फौज संपगावच्या किल्ल्यापाशी पोहोचली. किल्ल्याला वेढा देण्याचा हुकूम देण्यात आला. मोगल सरदारांनी उत्कृष्ट शौर्य दाखविले. जाननिसारखान आणि इतर दोन-तीन नामांकित सरदार यांना जखमा झाल्या. अल्पावधित किल्ला फत्ते

---

[६९] *बेंद्रे वा.सी. : श्री छत्रपती संभाजी महाराज यांचे विचिकित्सक चरित्र, मनोरमा प्रकाशन,मुंबई ,२००१ (तृतियावृती) पृ.क्र.४०५.*

[७०] *गोखले कमल श्रीकृष्ण : शिवपुत्र संभाजी , ज्ञान-विज्ञान विकास मंडळ, पुणे १९७१(पहिली अवृत्ती) पृ.क्र.२१४.*

झाला.[७१] शहजाद्याने संपगड (सपगावचा किल्ला) सुमारे १६८३ सालच्या डिसेंबरात बादशाही अंमलाखाली आणून अब्दुल फौयाजखानाला तेथील किल्लेदार नेमले हा गड जिंकल्यानंतर सोन्याची किल्ली आणि चांदीची ढाल यासह शहाअलमने बादशहाकडे अर्ज केला.[७२]

संभाजी राजाची शहाअलमच्या स्वारीवर बारीक नजर ठेवून होता. या वेळी तो गोव्यात लढत होते. मराठ्यांची फौज पोर्तुगीज आणि मुघल सैन्याच्या कैचीत सापडू नये म्हणून संभाजी राजे चपळाईने रायगडाला माघारी गेले. दि.२३/१२/१९८३ ला रायगडला जाताच त्यांनी कवी कलश याला कुलयेखत्यार केले.[७३] या संदर्भात इ.स. १६८९ च्या आपल्या प्रवासवर्णनात ॲलिन्स लिहितो, "गोवा अशा संकटापत्तीत असताना अकस्मात एक भले मोठे सैन्य चालून येत असताना दिसले... ते मोगली सैन्य असून संभाजीराजांच्या सैन्याशी भांडण देण्याच्या हिरीरीने पाठलाग करीत होते. संभाजी राजांनी आपणास एवढ्या सैन्यास तोंड देता येणे शक्य नाही. हे जाणून बचावार्थ युक्तीने माघार घेण्याचे ठरविले आणि त्याने मोगली सैन्य जवळ येऊन भिडण्यापूर्वीचे तो आपल्या सैन्यानिशी दाट जंगलातून निघून गेला.[७४] संभाजी राजे रायगडला गेले असले तरी त्यानी आपल्या सैन्याच्या लहान तुकड्या करून जंगलामध्ये दबाधरुन बसल्या होत्या. त्या मराठी सैन्यानी मोगलाच्या सर्व वाटा बंद केल्या त्यांच्यावर अचानक हल्लेकरून त्यांची रसद लुटली शहाअलमला हैराण केले. दक्षिण कोकणातील स्वारीमध्ये मोगल सैन्याचे झालेले हाल या विषयी खाफीखान लिहितो, "महमंद मुअज्जमला रामदरा-कोकणच्या मोहिमेवर नेमण्यात आले होते. तो काफरांनी आबाद केलेल्या मुलखात पोहोचला आणि तो मुलुख उदध्वस्त करून त्याने गगनचुंबी डोंगर आणि खोलदऱ्या असलेल्या मुलखात प्रवेश केला. तो प्रदेश काटेरी वृक्षांनी आणि घोर आरण्यांनी व्यापला होता. अनेक काफरांना ठार मारण्यात आले; पण त्या देशात कुळीथ इत्यादी निकृष्ट धान्ये पिकतात इतर भागांतील लोक आणि प्रवासी यांनी ते अन्न खाले तर त्यांच्यावर विषारी

[७१] *पगडी सेतू माधवराव(संपा.) : मराठयांचे स्वातत्र्ययुध्द-खाफिरखानाचा साधनग्रंथ,जोशी आणि लोखंडे प्रकाशन, पुणे १९६२ (प्रथमावृत्ती) पृ.क्र. १३*

[७२] *गोखले कमल श्रीकृष्ण : शिवपुत्र संभाजी , ज्ञान-विज्ञान विकास मंडळ, पुणे १९७१(पहिली अवृत्ती) पृ.क्र.२९४.*

[७३] *गोखले कमल श्रीकृष्ण : उपरोक्त पृ.क.२९६.*

[७४] *बेंद्रे वा.सी. : श्री छत्रपती संभाजी महाराज यांचे विचिकित्सक चरित्र, मनोरमा प्रकाशन,मुंबई ,२००१ (तृतियावृती) पृ.क्र.४०४.*

अन्न खाल्ल्यासारखा परिणाम दिसून येतो. वरील धान्ये आणि नारळ आणि पोफळी याशिवाय तेथे दुसरे काही मिळत नाही. घोडे आणि उंट यांना तेथील हवा मुळीच मानवत नाही. या मोहीमेत अनेक माणसे आणि जनावरे नाश पावली. सैन्यात घोडे शिल्लक राहीले नाहीत, काफरांनी चहुकडून वाटा अडविल्या त्यामुळे रसद मिळेनाशी झाली."[७५]

फौजेत धान्याचा दुष्काळ पडला महागाई इतकी वाढली की, कधी कधी तीन-तीन चार-चार रुपये देऊनही एक शेर गव्हाचे पीठ मिळेनासे झाले. फौजेतील माणसांपैकी जे मृत्यूच्या दाढेतून वाचले त्यांच्या शरीरात तर अर्धेच प्राण शिल्लक राहील्याप्रमाणे होते. ते रोड आणि हैराण झाले होते. प्रत्येक श्वासागणिक त्यांना वाटे की, तेवढेच आयुष्य लाभले हीच खैर झाली. मोगल सैन्याची झालेली ही दुर्दशा बादशहाला कळविण्यात आली. त्याने सुरतेच्या व्यवस्थापकाला आज्ञा केली की, शक्य तितके धान्य जहाजात भरुन समुद्रकाठावर ठिकठिकाणी मराठ्यांनी किल्ले बाधून ठेवले होते. सुरतेहून धान्याची जहाजे निघाली पण ते धान्य किती पुरणार ? लष्करातील प्रत्येक सरदारच्या बाजारात तीस-चाळीस पल्यापेक्षा अधिक धान्य पोहोचले नाही.[७६]

१६८३ च्या डिसेंबर महिन्यात शहाआलम रामघाटाने उतरुन कुडाळ आणि बांदे जाळतो जानेवारीच्या दुसऱ्या आठवड्यात डिचोलीस पोहोचला. डिचोली शहर बेचिराख करून मुघलाचे सैन्य भत्ग्रामातल्या नारवेच्या बाजूस नदीच्या तीरावर जाऊन राहिले. मुघलांनी डिचोळी जवळच्या पिळगाव येथील श्रीरामाचे देवालय आणि मूर्ती उदध्वस्त केली. श्री सप्तकोटीश्वरही भत्ग्रामातील देवालयेही मोडली.[७७] त्याआगोदर शहाआलम वेगुर्लास गेला होता. या शहाअलमच्या स्वारीमध्ये निजामपूर, रामघाट ते वेगुर्ला यामधील फक्त रस्त्यावरील मुलुखाची नासधूस केली होती. या प्रदेशाचा बंदोबस्त करण्याइतपत त्याच्याकडे वेळ नव्हता. तेथील लोकांच्या निष्ठेविना तो प्रदेश ताब्यात ठेवणे सोपे नव्हते. त्याचबरोबर मराठ्यांचे वाटेत होत असलले छुपे हल्ले, रसदीची कमतरता व पुढील पावसाळा येणार

---

[७५] *पगडी सेतू माधवराव(संपा.) : मराठयांचे स्वातत्र्ययुध्द-खाफिरखानाचा साधनग्रंथ,जोशी आणि लोखंडे प्रकाशन, पुणे १९६२ (प्रथमावृत्ती) पृ.क्र. ०८.*

[७६] *पगडी सेतू माधवराव (संपा.) : मराठयांचे स्वातत्र्ययुध्द-खाफिरखानाचा साधनग्रंथ,उपरोक्त, पृ.क्र. १४.*

[७७] *गोखले कमल श्रीकृष्ण : शिवपुत्र संभाजी , ज्ञान-विज्ञान विकास मंडळ, पुणे १९७१(पहिली अवृत्ती) पृ.क्र.२९९.*

आहे. यामुळे सर्वनाशाची भीती शहाअलम वाटू लागली. कोकण सोडण्याचे ठरविले. रामघाट चढत असताना रसदेच्या टंचाईमुळे मराठ्यांच्या हल्लांनी आणि रोगराईमुळे मोगल सैन्य कोकणातून परतत असताना अतोनात हाल झाले. कारण वेगुर्ल्याहुन रामघाटापर्यंत पोर्तुगीजांमुळे धान्यपुरवठा होऊ शकला. परंतु पुढे मराठ्यांनी छुपे हल्ले करून दाणागोटा मारुन नेला. वाटेतील पाण्यात विष कालवल्यामुळे त्याचप्रमाणे शहाआलमने येताना याच परिसराची जाळपोळ केल्यामुळे त्यात अधिकच भर पडली. या परतीच्या प्रवासात शहाअलम सोबत इटालियन प्रवासी मनुची होता म्हणतो, "आम्ही कुच करून रामघाट चढू लागलो. हा चढ सुमारे दीड लीग आहे. येथे आम्हा सर्वानाच संभाजीने सहज गारद करून टाकले असते करण एकतर चढ चढणे फार कठीण आहे व फार लहान वाट असून तीही निबिड जंगलातून व काटेरी जाळ्यातून होती; परंतु संभाजीने तसे काही केले नाही. तेथील लोक बोलत की, तो शहाअलमच्या संगनमताने वागतो. जे संभाजीने केले नाही ते ईश्वराने घडवून आणले. रोगाची (कॉलरा) साथ इतकी भयंकर वाढली की अवघ्या सात दिवसांत जे पछाडले ते सर्व मेले. निदान एक तृतीयांश लोक मेले.या रोगाने रोज पाचशेतरी लोक मरत. परंतु ही मृत्युची लाट माणसावरच कोसळली होती. असे नव्हे तर घोडे, हत्ती व उंटावरही कोसळली. त्यामुळे सर्वत्र हवा दुर्गंधी व रोगट झाली आणि मार्गही आडवाटेचा व लहान असल्यामुळे धान्य साठाही खुंटला. एका मोठ्याच शत्रूला तोंड देण्याइतकी भीषण परिस्थिती झाली; परंतु मागे लिहिल्याप्रमाणे छावणीत सुबत्ता होती. तरी आता काहीही नेण्या-आणण्यास जनावर राहिले नाही. त्यामुळे सैनिकावरच सर्व कामाचा फार भार पडला ज्याचे घोडे मेले होते त्यास नवीन विकत घेण्यास पैसा शिल्लक नव्हता; परंतु त्या छावणीत कोणीही विकण्यास तयारही नव्हता.त्यामुळे त्यांना पायी चालतच कुच करावे लागले आणि त्यामुळे आणखी बरीच माणसे तान्ह व तीव्र उष्णता यांनी मृत्यूमुखी पडली. खिंडीच्या टोकावर गेल्यानंतर आम्ही आदिशहीच्या मुलूखात शिरलो. आम्ही हा घाट चढत असता शत्रूंनी पाळत ठेवून कित्येक वेळा छापे घातले व आमचे सामान साहित्य लुटले आणि सर्व बाजुने हैराण केले."[७८]

---

[७८] *बेंद्रे वा.सी. : श्री छत्रपती संभाजी महाराज यांचे विचिकित्सक चरित्र, मनोरमा प्रकाशन,मुंबई ,२००१ (तृतियावृती) पृ.क्र. ४१३.*

१६८४ च्या जून महिन्यात शहाआलम भीमेच्या काडावर पोहचला तेव्हा त्याची मराठ्यांच्या ५००० स्वारांच्या तुकडीबरोबर लढाई झाली. या चकमकीत शहाआलम जखमी झाला. आणि त्याचे बुणगे व पेशखाना मागे राहिला २५००० मराठे सैनिक २५ कोस येऊन बुणग्यावर कोसळले आणि त्यांना लुटले शहाजाद्याने नगारे वाजवून त्यांना परत जाण्यास सांगितले.[७९] १६८९ च्या एप्रिल अखेर शहाआलम विजापूर जवळील शेकस येथे आपल्या उमरावासह येऊन बसला. त्याच्या सैन्याचे इतके नुकसान झाले होते की बादशहाकडूल प्रवासासाठी हत्ती, घोडे केव्हा येतात याची वाट पहात होता. २१ एप्रिल १६८४ ला औरंगजेबाने रुहुल्लाहखानाबरोबर खर्चास २० हजार अश्रफी आणि वहातुकीसाठी १०० घोडी, ५०० उंट व २५ खेचरे पाठविली तेव्हा २४ मे १६८४ ला शहाअलम कोठे प्रवास अहमदनगरला जाऊन बादशहास भेटला.[८०]

शहाअलमच्या या दक्षिण कोकणच्या स्वारीने मोगलाच्या हाती काहीही लागले नाही. उलट सैन्यशक्ती व द्रव्यशक्ती याचे अतोनात नुकसान त्याना सहन करावे लागले बराच धान्यपुरवठा संभाजीराजाच्या हाती लागला होता. या बद्दल सुरतकर इग्रंज हुगळीकरांना कळवितात की, "संभाजीच्या मुलखात मोठे सैन्य घेऊन शहाअलम गेलेला असला तरी त्याला एकही गड घेता आलेला नाही."[८१]

### ५.४.३.२ स्वराज्याची पूर्व बाजू :

स्वराज्याच्या दक्षिण भागावर आक्रमण करीत असतानाच स्वराज्याच्या पूर्व भागावर काबीज करण्याचा प्रयत्न मोगलानी केलाचा दिसून येतो; परंतु त्यानां त्यामध्ये यश आले नाही. कारण १६८३ च्या आक्टोबरपर्यंत मराठ्यांच्या ताब्यात सुपे, इंदापूर ही ठाणी होती. तसेच १६८४ च्या सुरुवातीस कऱ्हे पठारावर त्यांच्या अमल दिसतो.[८२] त्याच सुमारास औरंगजेब बादशहाने या भागावर मामूरखान यांची नेमणूक केली होती. त्याने या भागातील

---

[७९] *गोखले कमल श्रीकृष्ण : शिवपुत्र संभाजी , ज्ञान-विज्ञान विकास मंडळ, पुणे १९७१(पहिली अवृत्ती) पृ.क्र.३०१.*
[८०] *बेंद्रे वा.सी. : श्री छत्रपती संभाजी महाराज यांचे विचिकित्सक चरित्र, मनोरमा प्रकाशन,मुंबई ,२००१ (तृतियावृती) पृ.क्र.४२०.*
[८१] *गोखले कमल श्रीकृष्ण : शिवपुत्र संभाजी , ज्ञान-विज्ञान विकास मंडळ, पुणे १९७१(पहिली अवृत्ती) पृ.क्र.३०१.*
[८२] *गोखले कमल श्रीकृष्ण : उपरोक्त पृ.क.२७२.*

मराठ्यावर हल्ले करून त्याचा बिमोड केला. पुढे या परिसरामध्ये संभाजी राजांनी पुन्हा सूपे घेण्यासाठी मराठ्यांची फौज पाठविली. याची बातमी गाजीउद्दीनखानास कळता तो ताबडतोब तेथे गेला. मराठे व मोगल यांच्यात चकमकी उडाल्या यानंतर सुप्याच्या ठाण्यावर रअद अंदाजखानाची नेमणूक करण्यात आली; परंतु मराठ्यांची ये-जा या प्रदेशात सतत चालुच राहिली. या ये-जा करणाऱ्या मराठ्यांच्या फौजेशी सामना देण्याकरिता रअद अंदाजखान याच्याजवळ पुरेशी सैन्यशक्ती नसल्यामुळे लुतफुल्लाहखानाला स्वार म्हणून नेमण्याचा हुकूम देण्यात आला.[८३] पुढे इ.स. १६८७ च्या अखेरीस या भागातील पाटस, नीरथडी, सांडस, कऱ्हेपठार या ठिकणावर मोगलांचा अंमल बसवता आला.

**५.४.३.३ स्वराज्याचा मध्यभाग :**

या प्रदेशामध्ये स्वराज्याचा सर्वात महत्त्वाचा भाग म्हणजे पुणे प्रांताच्या आजुबाजूचा प्रदेश व रायगड सभोवतीचा प्रदेश म्हणजे मावळ प्रदेशाचा समावेश होतो. मोगलाची महत्त्वाची ठाणी, जुन्नर व अहमदनगर या प्रदेशापासून जवळ असल्यामुळे सर्वात पहिले आक्रमण याच भागावर केल्याचे दिसून येते. औरंगजेब बादशहा दक्षिण भारतात येण्या आगोदर अजमशहाने हसनअलीखान यास तळकोकणात जाण्याच्या पूर्वी खिल्लत आणि १० हजार फौज देऊन १६८१ च्या अखेरीस पुरंदरच्या बाजूस रवाना केले होते. तसेच मुगलखानाला ३६१५ स्वाराच्या फौजेचा सरदार करून त्याला पुरंदरच्या बाजूस जाऊन मराठ्यांना तंबी देण्याचा हुकूम मिळला होता.[८४]

औरंगजेब बादशहा दक्षिण भारतात आल्यानंतर स्वराज्याच्या मावळ प्रांतात अनेक भागात आपले सैन्य पाठवले होते. त्यामुळे मराठे व मोगल यांच्यात सतत चकमकी चालू होत्या. १६८२ च्या ऑक्टोबर महिन्यात चाकण भोवतालच्या मोगल प्रदेशात मराठ्यांनी आक्रमण केले होते. चाकणचा किल्लेदार हा आजारी पडल्यामुळे त्या परीसरातील लोक घाबरले होते. त्यामुळे त्या परिसरामध्ये शहाबुद्दीनखानाला जाण्याचा हुकूम देण्यात आला

---

[८३] *गोखले कमल श्रीकृष्ण : शिवपुत्र संभाजी, ज्ञान-विज्ञान विकास मंडळ, पुणे १९७१ (पहिली अवृत्ती ) पृ.क.२७२.*
[८४] *गोखले कमल श्रीकृष्ण: शिवपुत्र संभाजी, उपरोक्त पृ.क्र.२७०.*

होता; परंतु शहाबुद्दीन येईपर्यंत जुन्नरच्या बाजुने गेले होते. त्यामुळे तो ताबडतोब जुन्नरला पोहचला. गुरुवार दि. ९-११-१६८२ ला जादा सामान आणि बुणग्यांना जुन्नर येथे ठेवून मराठ्यांचा पाठलाग करून त्याने त्या प्रदेशातील जवळ जवळ २० गावे लुटली,जाळली काही जनावरे त्याच्या हातात पडली.[८५]

१६८२ डिसेंबरच्या पहील्या आठवड्यात शहाबुद्दीन खान चाकणमध्ये होता. त्यावेळी मराठ्यांच्या फौजा लोहगडाच्या बाजूस आल्याची बातमी समजल्यामुळे तो तेथे गेला. त्याठिकाणी झालेल्या चकमकीत ६० माणसांची कत्तल केल्याचे सांगतो. त्यानंतर मराठे तेथून चौथ वसुलीसाठी विजापुरच्या बाजुला गेल्यामुळे त्यांचा पाठलाग करत तेथे पोहचला; परंतु यावेळी मराठे कुसुरपुराला गेले होते. तो तिकडे वळला शहाबुद्दीन आणि मराठे यांच्यात युद्ध होऊन दोन्हीकडील सैनिक जखमी झाले. यानंतर शहाबुद्दीनखानाने पुण्यास तळ देऊन नंतर तेथून रायगडाच्या बाजूस लढाईचा बेत आखला.

१६८२ च्या डिसेंबरच्या शेवटी शहाअलमचा मुलगा मुइजुद्दीन पुरंदरच्या पायथ्यापर्यंत पोहोचला. मुगलखान आणि मुइजुद्दीन यांनी २७ खेड्यांना आगी लावून उध्वस्त केल्या. या दोघांचा मुकाबला करण्यासाठी धाकू वंजाऱ्याचा मुलगा आणि संभाजीचा नोकर माणकोजीला पाठवले होते; परंतु तो येण्या आगोदरच मोगल त्या भागातून पळाले होते. अशा प्रकारे पुण्याच्या आजूबाजूला मोगल सैन्य लुटमार करीत होते. त्याच्या बंदोबस्त करण्यासाठी पुढे १६८३ च्या जानेवारीच्या सुरुवातीस मराठी सैन्य राजगड, पुरंदर आणि शिवापूर येथे जमा झाले होते. मोगलाच्या प्रदेशावर हल्ला करण्याचा त्यांचा विचार होता. ही बातमी शहाबुद्दीनखानाला समजली म्हणून तो पुरंदर रायगडच्या परिसरात शिरला. त्याने मराठ्यांबरोबर मुकाबला केला. झालेल्या चकमकीत मुघलांच्या हाती ४० तलवारी नगाऱ्याचा १ जोड आणि झालरीची एक पालखी सापडली .[८६]

[८५] *गोखले कमल श्रीकृष्ण : शिवपुत्र संभाजी , ज्ञान-विज्ञान विकास मंडळ, पुणे १९७१(पहिली अवृत्ती), पृ.क.२७४.*
[८६] *गोखले कमल श्रीकृष्ण : शिवपुत्र संभाजी , उपरोक्त, पृ.क्र.२७०.*

### ५.४.३.३.१ हंबीरराव व विठोजीकडून कुलीचखानाचा पराभव :

इ.स. १६८२ सप्टेंबरच्या शेवटी शहजादा आज्जमचा टेंभूर्णी येथे मुक्काम असताना त्याने कुलीचखान व सराफराजखान यांना १३ हजार फौजेसह मराठ्यांच्या प्रदेशावर हल्ला करावयास पाठवले; परंतु दुसऱ्या बाजूस भीमा नदीपासून बारा कोसावर मराठ्यांचे सैन्य दबा देऊन बसल्याचे कळाले नाही. ज्यावेळी कुलीचखान भीमा नदी ओलांडून पलीकडे गेला. त्याच सुमारास मराठ्यांचे सैन्य दुसऱ्या बाजूने नदी ओलांडून आलीकडे मोगलाच्या प्रदेशात आले. यामागचे करण हे होते की, कुलीचखानास मराठी सैन्य आल्याचे कळू नये हे असावे. पुढे कुलीचखानाने भीमा नदी पार करून ७ कोस अंतरावर एलापूर येथे डेरा दिला. त्याचसुमारास दिलेरखानाचा नोकर शेख बंडा हा तेराशे स्वारांसह कुलीचखानाकडे खजिना आणित होता. तो कुलीचखानापासून चार कोसावर मराठ्यांच्या फौजेने त्यावर हल्ला करून, लुट करून पळून गेले.

इ.स. १६८२ च्या ऑक्टोबरच्या आखेरीस किंवा नोव्हेंबरच्या सुरुवातीला कुलीचखान भीमा नदीपासून ४० कोस संभाजीच्या मुलखात शिरला असता त्याचा प्रतिकार करण्यासाठी सेनापती हंबीरराव व विठोजी हे २० हजार स्वार व पायदळासह कुलीचखानावर चालून गेले. कुलीचखान, सरफराजखान, यलबरीखान, कमालुद्दीनखान व किशोरसिंग हाडा वगैरे सात हजार फौजेसह हरावलीस राहून त्यांनी त्याचा सामना केला. या लढाईत हंबीररावाचा विजय झाल्याचे दिसते. या लढाईमध्ये अनेक मोगल ठार झाले. शेवटी कुलीचखान माघारी फिरला आणि जीव वाचविण्यासाठी शहजादा आज्जमशहाकडे पळत सुटला.[८७] या लढाईमध्ये कुलीचखानने सपाटून मार खाल्ला होता. हंबीररावांनी त्याला ४० कोस मागे हटवले होते.

### ५.४.३.३.२ रायगड परिसरातील संघर्ष :

१६८३ सालच्या नोव्हेंबर महिन्यामध्ये शहाबुद्दीनखान पुण्यास राहीला होता. पुढे २७-१२-१९८३ रोजी तो पुण्यावरुन दौंड मार्गे देवघाट उतरुन तो रायगडाच्या उत्तरेस गेला. तेथे

[८७] *दारवटकर अनंत : अद्वितीय छत्रपती श्री संभाजी महाराज (खंड ३) श्रीशंभू प्रेरणा प्रकाशन, पुणे २०१० (प्रथमावृत्ती) पृ.क्र. १५९३.*

निजामपूर आणि आसपासची खेडी लुटली. परत पुण्याकडे वळला. यावेळी संभाजीराजे पोर्तुगीजाबरोबर संघर्ष करण्यामध्ये गुंतले होते. शहाबुद्दीनखानानी या केलेल्या पराक्रमाबद्दल औरंगजेब बादशहाने त्यास दोन मण सोने, धनुष्यबाण, पाच घोडे, दहा हजार रुपये रोख व गाझीउद्दीनखान बहादुर हा किताब देऊन पुन्हा पुणे परिसरामध्ये रवाना केले होते.

इ.स. १६८५ च्या जानेवारीच्या सुरुवातीला पुन्हा गाझीउद्दीनखानाने नोरघाट मार्गे उतरून रायगड परिसरात आक्रमण केले होते. त्यावेळी संभाजीराजे रायगडावर असल्याचे शहाबुद्दीनखान बादशहास सांगतो. रायगड जवळील पानसवडी जाळून ४ मैलावर छावणी घातली. स्वतः राजे आणि त्याचे सेनापती मुघलावर हल्ला करण्यास दक्ष होते. असे त्याने औरंगजेबास कळवले आहे. त्यावेळी शहाबुद्दीनखानाचा प्रतिकार करण्यासाठी संभाजी राजांनी हंबीरराव मोहीते आणि रुपाजी भोसले यांना १५ हजार स्वारासह पाठविले होते. मराठे-मोगल यांच्यात लढाई झाली. खानाने मराठ्यांना घेरले. खूप मोठी लढाई झाली.चौदा मैल मराठ्यांचा पाठलाग केला. या चकमकीत अनेकजन जखमी झाले, काही मेले.[८८] असे अखबारातील माहितीत सांगीतले आहे; परंतु यामध्ये सत्यता वाटत नाही मराठ्यांनी मोगलांवर गनिमीकावा तंत्राने हल्लेकरून पळून गेले असावेत. त्याचा पाठलाग करत शहाबुद्दीनखान गांगोलीस पोहचलेले दिसते. त्याचवेळी कवी कलशाने त्याच्याशी सामना केला आणि खानाला घाटावरी घातला.[८९] तेथून खान कोथळगडाकडे निघून गेला. अशा प्रकारे प्रत्यक्ष रायगडावर सुद्धा मोगलानी दोन तीन वेळेस हल्ले केले होते; परंतु त्यांना अपयश आले होते.

### ५.४.३.३.३ वाईची लढाई व हंबीररावाचा मृत्यू :

संभाजी राजांनी मोगली आक्रमणास तळकोकणात बागलाण स्वराज्याचा, मध्यभाग व दक्षिणभाग सर्वच बाजुंनी तीव्र प्रतिकार केल्यामुळे बादशहास कोठेही यश न मिळाल्यामुळे मराठ्यांच्या प्रदेशातून सैन्य काढून विजापूर जिंकण्यासाठी प्रयत्न चालवले. विजापूर

---

[८८] *गोखले कमल श्रीकृष्ण : शिवपुत्र संभाजी , ज्ञान-विज्ञान विकास मंडळ, पुणे १९७१(पहिली अवृत्ती) पृ.क्र.२७९.*
[८९] *गोखले कमल श्रीकृष्ण : शिवपुत्र संभाजी , उपरोक्त पृ.क.२७९.*

जिंकल्यानंतर तेथील मुख्य सरदार सर्जाखान यास बादशहाने पुन्हा मराठ्यांच्या मुलखावर पाठवले. इ.स. १६८७ सर्जाखान वाईपर्यंत आला; परंतु तेथे सेनापती हंबीरराव तळ देऊन होता. सर्जाखान व हंबीरराव यांच्यामध्ये झालेल्या लढाईत मराठ्यांचा विजय झाला. बरीच लुटही मिळाली; परंतु निकराची झुंज देताना हंबीररावांना गोळी लागून ठार झाले. संभाजी राजांना एक पराक्रमी सेनापती गमवावा लागला.

संभाजी राजांना कैद करेपर्यंत स्वराज्याच्या मध्यभागातील पुरंदर, प्रचंडगड, कोथरुड, सिंहगड, रायगड, रोहिडा, श्रीवर्धन, राजमाची आदि किल्ले मराठ्यांच्या ताब्यात होती.

## ५.५ संभाजी महाराजांची मोगल प्रदेशातील चढाई

मोगल बादशहाच्या आक्रमणाचा प्रतिकार करत करत मोगल सैनिकांना जेरीस आणण्यासाठी त्याकाळामध्ये संभाजी राजांनी मोगलाच्या स्वराज्यालगत असलेल्या प्रदेशावर हल्ले करण्याच्या युद्धनीतीचा अवलंब केला होता. या युद्धनीतीमुळे औरंगजेब बादशहाचे सैन्य संपूर्ण शक्तीसह आक्रमण न कराता आपल्या प्रदेशाचे सरंक्षण करण्यामध्ये त्यांची शक्ती खर्च होत असत व त्यामुळे स्वराज्याचे संरक्षण होण्यास मदत मिळत असत. मोगलाच्या प्रदेशावर हल्ले करताना गनिमीयुद्ध तंत्राचा वापर मराठी करत. यामध्ये मोगलाच्या सैन्याच्या हालचालीवर बारीक नजर ठेवून त्यांची रसद तोडणे, खनिजे लुटने, जनावरे पळवणे यांसारख्या कारवाया करत होते.संभाजी राजांनी मोगलांशी तीव्र प्रतिकार करत अहमदनगर, सोलापूर, उस्मानाबाद, बीड, औरंगाबाद, विदर्भ, खानदेश आदी मोगलांच्या प्रदेशावरही हल्ले चढवले होते.

### ५.५.१ संगमनेर परिसरातील मराठ्यांचे हल्ले :

संगमनेर हा तालुका नगर जिल्ह्यामध्ये येतो जो की, आकोल्याच्या पूर्वेला ८ ते १० मैलावर आहे. या परिसरामध्ये मराठ्यांनी अनेक वेळेस हल्ले केले. १६८२ च्या मे महिन्यातील पहिल्या आठवड्यात संगमनेरपासून ८ मैलावरील गावात २०० मराठे घोडे

स्वाराची तुकडी शिरली. ही बातमी समजताच संगमनेरचा ठाणेदार नारुजी याने इंद्रसिंह कच्छवाह आणि सय्यद मुजफ्फरखान यांना मुकाबला करण्यासाठी रवाना केले. हे दोघे तेथे पोहोचताच मराठ्यांनी नेहमीच्या पद्धतीने पळाल्याचा आव आणला. तेव्हा मुघल सैन्याने त्यांचा पाठलाग केला. तेवढ्यात एका ओढ्याच्या काठी लपून बसलेले ४००० मराठे सैनिक मुघलांच्या सैन्यावर तुटून पडले. लढाईत इंद्रसिंह कच्छवाह जखमी होऊन मराठ्यांना जय मिळाला. ही बातमी कळताच नारुजी आणि सुलेमान बेग मदतीसाठी कुमक घेऊन तेथे गेले. पुन्हा लढाई झाली. त्यात मराठ्यांचा एक मोठा सरदार आणि ६०० घोडेस्वार मरण पावले.[१०] अखबारातील नोंदीमध्ये दिले आहे; परंतु त्यामध्ये सत्यता दिसून येत नाही. सुलेमान बेगही यावेळी जखमी झाला होता. नारुजींना ही चांगलीच दहशत बसली होती. त्यामुळेच इ.स. १६८२ च्या ऑगस्ट महिन्यात संभाजी महाराजांचे २०० स्वार व ५०० प्याद्याची एक तुकडी कसबे सिन्नर येथे गेली होती. त्यांनी सिन्नरपासून एका कोसावर १५००० जनावरे ताब्यात घेतली. ही बातमी ऐकूण संगमनेरचा ठाणेदार नारुजी स्वारी करून तेथे गेला; परंतु येवढ्या कमी संख्येनी असलेल्या मराठ्यावर हल्ला करण्याचे धाडस त्याच्याने झाले नाही. आपल्या वरिष्ठांना त्यांनी सांगितले की, मराठ्यांना सामना देता येईल इतकी फौज त्याच्याजवळ नसल्यामुळे परत फिरलो.

संगमनेरचा मोगल ठाणेदार नारुजीला मराठ्याचे हल्ले रोखण्यामध्ये अपयश येत असल्यामुळे तेथील एक जमीनदार रावजी याने ता. ६ सप्टेंबर १६८२ पूर्वी बादशहास अर्ज केला की, गनिमाचे लोक तळकोकणातून ठाणे दावमीकडून येत आहेत. मला ठाणेदारीवर नेमले तर बंदोबस्त करीन तसेच मनसबीमध्ये वाढ करून शत्रूचे सामान हाती लागल्यास बादशहाने तेही माफ करावे. १००० बंदूकधारी प्याद्याची कृपा करावी. बादशहाने त्याच्या ह्या मागण्या तातडीने मान्य केल्या.[११] यानंतरही मराठ्यांचे हल्ले या भागात चालूच होते.

२८ नोव्हेंबर पूर्वी मराठ्यांची ६-७ हजार स्वारांची तुकडी संगमनेर जवळ चौथाई वसुल करण्यासाठी गेली होती. तेव्हा तेथील ठाणेदाराने मुजफ्फरखान आणि राव

---

[१०] *गोखले कमल श्रीकृष्ण : शिवपुत्र संभाजी , ज्ञान-विज्ञान विकास मंडळ, पुणे १९७१ (पहिली अवृत्ती), पृ.क्र.२९०.*
[११] *दारवटकर अनंत : अद्वितीय छत्रपती श्री संभाजी महाराज (खंड ३) श्रीशंभू प्रेरणा प्रकाशन, पुणे २०१० (प्रथमावृत्ती) पृ.क्र. १५२१.*

मोहकमसिंग यांच्या बरोबर सैन्य पाठवून त्यांना औंढा-पट्टाच्या बाजूने रस्ते अडविण्यास सांगितले. नारुजीही तेथे पोहोचला आणि त्याने मराठ्यांना घेरले. सिन्नरच्या दक्षिणेस ५-६ मैलावर असलेल्या भोजपुराजवळ बरीच मोठी लढाई झाली. त्यात लक्ष्मण किंवा लखुजी हा मराठ्यांचा सरदार रणांगणावर पडला त्याचे शीर कापून खानजहान बाहाद्दुरकडे पाठविण्यात आले. [९२] असा उल्लेख अखबारात येतो तो पूर्णपणे असत्य आहे. कारण २ डिसेंबर १६८२ मध्ये लखमाजी भोजपुराजवळ गरोजीशी लढाई देऊन तो परगने कवठे येथे चौथ वसूलीसाठी गेला होता.

पुढे इ.स. १६८४ च्या जानेवारीत संभाजीचा सरदार हिंम्मतराव हा १५००० स्वार घेऊ न या प्रदेशात घुसला. त्यावेळी कन्करचा ठाणेदार शिवसिंह याने त्याचा सामना केला. चकमकीत काही जण जखमी झाले व काही मेले... याच वर्षाच्या डिसेंबर महिन्यात मराठ्यांनी पुन्हा आक्रमण केले होते. त्याचा बिमोड करण्यासाठी एतिकादखानाला रवाना करण्यात आले. यानंतर १६८५ च्या जानेवारी महिन्यात संगमनेरच्या आसपासचा मुलूख उध्वस्त करून तेथील जनावरे आणि लोकांची लुट केली. तरीही तेथील ठाणेदाराने मराठ्यांवर स्वारी केली नाही म्हणून त्याची मन्सब कमी करण्यात आली आणि या पुढे त्याला सावध राहण्याचा हुकूम देण्यात आला.[९३] अशाप्रकारे १६८२-१६८५ या काळामध्ये मराठ्यांनी अनेक सरदारांच्या नेतृत्वाखाली संगमनेर परिसरावर हल्ले करून तेथील ठाणेदार नारुजीला हैराण केले होते.

### ५.५.२ पारनेर व पेडगाव परिसरात हल्ले :

अहमदनगरच्या पश्चिमेला १६ मैलावर पारनेर आहे. १६८४ सालाच्या अखेरीस मराठ्यांनी पारनेरच्या असपास चढाई केली, म्हणून मराठ्यांचा बिमोड करण्यासाठी एतिकादखानाला बादशहाने रवाना केले.[९४] याच वेळी बहरामंदखान पारनेरच्या जवळ होता. त्यांच्याशी लढाई करण्यासाठी संभाजीचे सैनिक गेल्यामुळे एतिकादखान मिर्झाखानासह

[९२] *गोखले कमल श्रीकृष्ण : शिवपुत्र संभाजी , ज्ञान-विज्ञान विकास मंडळ, पुणे १९७१(पहिली अवृत्ती) पृ.क्र.२८२.*
[९३] *गोखले कमल श्रीकृष्ण : शिवपुत्र संभाजी , उपरोक्त, पृ.क्र.२८३.*
[९४] *गोखले कमल श्रीकृष्ण : शिवपुत्र संभाजी , उपरोक्त, पृ.क.२८६*

२७८० स्वार घेऊन मराठ्यांना जबर बसविण्यासाठी रवाना झाला. या मोहीमेवर स्वतः संभाजीराजे ही होते. पारनेरजवळ मराठे गेल्याचे कळताच गझनफरखानाने ७०० स्वारांच्या फौजेसह जाऊन शत्रूला शासन करावे असा हुकूम दिला होता. तसेच पारनेरचा ठाणेदार अब्दुल करीम व करडेनिमोने येथे असकेल खोजा हमीद या दोघांनी परस्पराच्या सहकार्याने मराठ्यांवर हल्ला करण्याचे लुत्फुल्लाहखानने सांगीतले होते. त्याचबरोबर गझनफर खानालाही मराठ्यांच्या सैन्यास तंबी देण्यासाठी पाठविले होते.

श्रीगोदा तालुक्यात पेडगाव येते. ते श्रीगोद्याच्या दक्षिणेस आहे. "संभाजी राजांची एक तुकडी १६८३ च्या मार्च महिन्यात पेडगाव येथे हल्ला करावयास गेल्याबरोबर आज्जमशहाने त्यांना तंबी देण्यासाठी दिलावरखानला पाठविले आणि मामूरखानास त्याच्या कुमकेसाठी जाण्याचा हुकूम दिला."[९५] ता. ३० मार्च १६८३ रोजी बादशहानेसुद्धा मराठे पेडगावच्या भागात आले आहेत. म्हणून मामूरखान व दिलावरखान यांनी त्यांना तंबी दिली पाहीजे असा हूकूम केला होता.[९६] वरील हुकूमाप्रमाणे मामूरखान पेडगावास जात असताना आष्टेगावा नजीक मराठ्यांचे सैन्य दिसले. यावेळी मराठे व मामूरखानाच्या सैन्यामध्ये लहानशी चकमक झाली. तेथून मराठे पसार झाले आणि तेथून ३५ कोसावर थांबले. मामूरखान पुढे निघाला नंतर दिलावरखानही स्वतःच्या सैन्यासह मामूरखानास येऊन मिळाला. सर्वजण पेडगावला पोहोचले. त्यांच्यापासून ३५ कोसावर असलेल्या मराठ्यांचा सामना करण्यासाठी मामूरखान, दिलावरखान आणि कमालुद्दीनखान यांनी बुनग्याना पेडगाव येथेच ठेवून ते मराठ्यांवर चालून गेले. दि.२५-३-१६८३ रोजी मराठे आणि मोगल यांच्यात लढाई होऊन दोन्हीकडील बरेच लोक मरण पावले.[९७]

त्यानंतर मराठ्यांनी पुन्हा ऑक्टोबरमध्ये पेडगाव हल्ला केल्यामुळे दि. १३-११-१६८३ रोजी ख्वाजा याकूब सर बुंलदखान याला मराठ्यांचा बिमोड करण्यासाठी पेडगावकडे रवाना होण्याचा हूकूम दिला. मराठे पेडगाव परिसरामध्ये केव्हाही हल्ले करत असल्यामुळे १६८४

---

[९५] *गोखले कमल श्रीकृष्ण : शिवपुत्र संभाजी , ज्ञान-विज्ञान विकास मंडळ, पुणे १९७१(पहिली अवृत्ती) पृ.क.२८७*

[९६] *दारवटकर अनंत : अद्वितीय छत्रपती श्री संभाजी महाराज (खंड ३) श्रीशंभू प्रेरणा प्रकाशन, पुणे २०१० (प्रथमावृत्ती) पृ.क्र. १५५४.*

[९७] *गोखले कमल श्रीकृष्ण : शिवपुत्र संभाजी , ज्ञान-विज्ञान विकास मंडळ, पुणे १९७१(पहिली अवृत्ती) पृ.क्र.२८७.*

च्या जानेवारीत दिलेरखानाला पेडगावच्या सभोवती ७-८ कोसापर्यंत गस्त घालण्यासाठी ५०० स्वारांची नेमणूक करण्यास सांगीतले होते. पेडगावास बहादुरगड होता. त्याचा किल्लेदार सरबुलंदखान होता. मराठ्यांचे सतत हल्ले होत असल्यामुळे त्याच्या मदतीसाठी शहजादा आज्जम आणि त्याचा मुलगा बेदारखान यानी दि. १३-०२-१६८४ रोजी बादशहाचा निरोप घेऊन बहादुरगडाकडे आले. त्यावेळी सुद्धा मराठ्यांचा सरदार तिमाजी याने आपल्या फौजेसह त्यांच्या छावणीवर आणि आजूबाजूच्या प्रदेशावर हल्ले केले होते. त्यामुळे किशोरसिंग हाडा शहजादा आज्जम मदतीला धावून आला. झालेल्या लढाईत मराठ्यांचा पराभव झाला. असे म्हटले आहे; परंतु सत्यता वाटत नाही.

### ५.५.३ सोलापुर परिसरातील हल्ले :

मराठे टेंभुर्णीच्या आसपास वारंवार हल्ले करत होते. त्यामुळे १६८२च्या ऑक्टोबर महिन्यात आज्जमशहाने तेथे छावणी घातली होती. पुढे हल्ले तसेच चालूच राहील. त्यामुळे बहादुरखान तळकोकणातून टेंभूर्णी येथे गेला; परंतु बहादुरखान तेथे येईपर्यंत मराठ्यांनी आजुबाजूचा सर्वप्रदेश बेचिराख केला होता. त्यामुळे बहादुरखानाच्या फौजेला अन्नधान्याची टंचाई भासत होती. पुढे २० हजार मराठी स्वारांनी खवासपूर येथे तळ दिला होता. ही बातमी मुहम्मद आज्जमशहास कळता त्याने हसनअली खान आणि इतर काहींना मराठ्यांशी मुकाबला करण्यासाठी पाठविले. मुघलाचे सैन्य तेथे पोहोचल्यावर मराठ्यांनी त्याचा सामना केला. फार मोठी लढाई देऊन मराठे पळाले. शहजादा खजिल झाला. त्याच्या हुकूमानुसार मुघलांनी मराठ्यांचा ४ कोस पाठलाग केला.[१८] संभाजी राजांनी सोलापूर परिसरातील विजापूर व मोगलाच्या सिमेवरील मंगळवेढे सारख्या गावातील जहांगिरदारांना आपल्याकडे नोकरीस घेण्यासाठी पत्रे पाठवीली होती; परंतु त्यामध्ये त्यांना यश आले नाही.

सोलापूरचा किल्ला १६६८ च्या मोगल विजापूरकर तहाने मोगलाच्या ताब्यात गेला होता. संभाजी राजे गादीवर येताच या किल्ल्यावर हल्ले सुरु केले होते. खानजहान बहादुरच्या आज्ञेनुसार या किल्ल्यावरील २५ तोफा दुसरी कडे नेण्याचे काम चालू होते. ऑगस्ट १६८०

[१८] *गोखले कमल श्रीकृष्ण : शिवपुत्र संभाजी , ज्ञान-विज्ञान विकास मंडळ, पुणे १९७१(पहिली अवृत्ती) पृ.क्र.२८८.*

मध्ये मराठ्यांनी त्या हस्तगत केल्या होत्या. पुढे १६८० च्या डिसेंबर महिन्यात संभाजी राजे स्वतः सोलापूरजवळ गेले होते. त्यानंतर मराठ्यांचे सतत या किल्ल्यावर हल्ले होत राहीले. १६८५ च्या एप्रिलच्या दुसऱ्या आठवड्यात संभाजी राजांचा एक सरदार सुदजी सोलापूर तालुक्यात घुसला होता. तेव्हा शिरवळच्या ठाणेदाराने मुहम्मद ठाणेदाराला रवाना करून लवकर जाऊन मराठ्यांचा पराभव करण्यास सांगितले ठाणेदार दि. २२-०४-१६८५ रोजी तेथे पोहोचला. दोन्ही सैन्यात लढाई होऊन अनेकजण मेले. आणि जखमी झाले. मराठे तेथून पळाले.[९९]

### ५.५.४ उस्मानाबाद परीसरावरील चढाई :

मराठ्यांनी सोलापूर अहमदनगर, औरंगाबाद इत्यादी परिसरामध्ये हल्ले चालू असताना उस्मानाबादच्या परिसरात ही वारंवार हल्ले करणे व लूट करणे चालूच ठेवले होते. मराठ्यांच्या सतत हल्ल्यास व लुट मारीस परंड्याचा किल्लेदार सोहयबखान वैतागला होता. कारण त्याची जहागीरीचे मराठ्यांनी बरेच नुकसान केले होते. त्यासबंधी त्याने बादशहास अर्ज करून नुकसानभरपाई मिळवण्यासाठी प्रयत्न चालवले होते. १६८३ च्या जानेवारीत नळदुर्गला रुहल्लाखानाकडे न जाता फौजेसह परंड्याला जाण्याचा कासीमखानाला हुकूम देण्यात आला.[१००] १६८५ साली मोगल व विजापूरकर यांच्यात संघर्षाला सुरुवात झाली. त्याचा फायदा मराठ्यांनी घेऊ न परंडा किल्ल्यावर हल्ले सुरु केले. इ.स. १६८५ च्या फेब्रुवारीच्या मध्यावर संभाजीचा सरदार राणा जयसिंग परंडा किल्ल्याच्या बाजूस गेला होता. त्यामुळे नामदारखानाचा मुलगा मरहमखान यास ५००० रु. किमतीचा हत्ती आणि रोख रु.१०००० देऊन मराठ्यांना जरब बसविण्यासाठी रवाना करण्यात आले होते.[१०१]

परंड्याप्रमाणे उस्मानाबाद परीसरातील नळदुर्ग हे किल्ल्याचे ठिकाण महत्त्वाचे होते. त्यामुळे मराठ्यांनी नळदुर्ग किल्ल्यावर ही सतत हल्ले केल्याचे दिसून येते. इ.स. १६८३ मध्ये जानेवारीच्या दुसऱ्या आठवड्यात मराठ्यांनी नळदुर्गच्या परिसरात स्वारी केल्याची दिसते.

[९९] *गोखले कमल श्रीकृष्ण : शिवपुत्र संभाजी , ज्ञान-विज्ञान विकास मंडळ, पुणे १९७१(पहिली अवृत्ती) पृ.क.२९०.*
[१००] *गोखले कमल श्रीकृष्ण : शिवपुत्र संभाजी, उपरोक्त, पृ.क्र.२९१.*
[१०१] *गोखले कमल श्रीकृष्ण : शिवपुत्र संभाजी, उपरोक्त पृ.क.२९१.*

यावर कासिमखान व इल्हामुल्लाहखान हे मराठ्यांना तंबी देण्यासाठी स्वार झाले होते; परंतु मराठे ते येण्याच्या आधिच पसार झाले. यामुळेच बादशहा कासिमखान व मुहम्मद नईम यांच्यावर नाराज होऊन त्यांची उचलबांगडी केली. कासिमखानाने आपल्या फौजेसह नळदुर्गहून निघून परंड्यात येऊन राहावे आणि नईम याने पूर्वीप्रमाणे बीड येथे जाऊन सावध असावे, असा ता. ३० जानेवारी १६८३ रोजी बादशहाने हुकूम केला.[१०२] १६८३ च्या जानेवारीच्या अखेरीस संभाजीचा सरदार माणको बल्लाळ ५००० हजार स्वार घेऊन नळदुर्गपासून ५ कोस अलीकडे गेला. ही बातमी कळताच कासीमखान तेथे पोहोचला. मराठे आणि मुघल यांच्यात फार मोठी लढाई झाली. छत्र्या, निशान इत्यादी वस्तू मुघलांच्या हाती पडल्या. मुघलांकडील अबीद दिवान सेना आणि इतर गुर्जबदार लढाईत मेले.[१०३] यानंतर मराठ्यांचे सैन्य नेहमी प्रमाणे पसार झाले. त्यानंतर पुन्हा नळदुर्गवर हल्ले चालूच ठेवले. १६८३ च्या मार्चच्या तिसऱ्या आठवड्यामध्ये मराठ्यांनी नळदुर्गचा किल्ला जिंकून घेतला होता. यामुळे बादशहाने आपल्या आधिकाऱ्याच्या नावे फर्मान पाठवले होते. ता. ५ मार्च १६८३ रोजी बादशहाने मामूरखानाच्या मनसबीत ५०० स्वाराची वाढ फर्मावून त्यास नळदुर्गचा किल्लेदार म्हणून नेमले. त्यानंतर लगेच ता. २५ मार्च १६८३ रोजी नळदुर्गच्या किल्लेदारी व फौजदारीबाबत सईद यादगार हुसेन याच्या नावे फर्मान निघाले.[१०४] २८ फेब्रुवारी १६८३ रोजीच्या बादशहाच्या फर्मानाप्रमाणे खानजहान बहादुर नळदुर्गकडे निघाला; परंतु तो तेथे पोहोचण्यापूर्वीच मराठ्यांनी तो किल्ला जिंकून घेतल्यामुळे त्याना परत किल्ला जिंकण्यासाठी वेढा द्यावा लागला. वेढा देऊन किल्ला परत घेण्यासाठी त्याने 'नस्त्रतबक्ष' नावाची प्रचंड तोफ घेतली होती. जी की त्यावेळी सोलापूरात होती जर खानाने ती मागविली तर त्यास ती पाठवावी असा हुकूम ता. ८ एप्रिल १६८३ रोजी बादशहाने केला होता.[१०५]

[१०२] *दारवटकर अनंत : अद्वितीय छत्रपती श्री संभाजी महाराज (खंड ३) श्रीशंभू प्रेरणा प्रकाशन, पुणे २०१० (प्रथमावृत्ती) पृ.क्र. १५५२.*
[१०३] *गोखले कमल श्रीकृष्ण : शिवपुत्र संभाजी , ज्ञान-विज्ञान विकास मंडळ, पुणे १९७१(पहिली अवृत्ती) पृ.क्र.२१२.*
[१०४] *दारवटकर अनंत : अद्वितीय छत्रपती श्री संभाजी महाराज (खंड ३), उपरोक्त पृ.क्र. १५५२.*
[१०५] *दारवटकर अनंत : अद्वितीय छत्रपती श्री संभाजी महाराज (खंड ३), उपरोक्त पृ.क.१५५३.*

### ५.५.५ बीड परिसरातील चढाई :

१६८४ च्या जानेवारी महिन्याच्या पहिल्या आठवड्यात खानजहान बहादुर मराठ्यांना तंबी देण्यासाठी फौजेसह औसास पोहोचला.[१०६] परंतु मराठ्यांचे सैन्य उदगीरला जाणार असल्याचे त्यास कळले. त्यामुळे त्यांचा मुकाबला करण्यासाठी मुलगा मुजफ्फरखान यास पाठवणार होता. जो वऱ्हाड प्रदेशात मराठ्यांना तंबी देऊन वडिलांकडे येत होता. त्याचवेळी त्यास मराठे औरंगाबाद जिल्ह्याच्या अंबडच्या ईशान्येला ४ मैलावर सारंगपूर येथे बातमी लागताच त्याने तेथे मराठ्याबरोबर लढाई केली. तेथून मराठे पसार होऊन बीडच्या वायव्येस सोनगावापर्यंत आले मुजफ्फरखानाने त्यांचा पाठलाग केला. मराठे-मुजफ्फरखान यांच्यामध्ये मौजपुरी जवळ लढाई झाली दोन्हीकडील सैन्य यामध्ये जखमी झाले. त्यानंतर मराठे पसार झ ाले. त्याच सुमारास मराठ्यांची एक दुसरी तुकडी बीड जिल्ह्यातील पाटोदे येथे चौथ वसूल करण्यासाठी गेली होती. १६८५ पूर्वी विजापूरकडील इतर किल्यांप्रमाणे धारुरचा किल्ला घेतला होता. तो बीड जिल्ह्यात केजच्या उत्तरेस ४ मैलावर आहे. तो पुन्हा मुघल अधिकारी मुहम्मद आज्जमने १६८५ च्या फेब्रुवारीत जिंकून घेतला. या किल्याची सोन्याची किल्ली त्याने बादशहाकडे पाठविली.[१०७]

### ५.५.६ वऱ्हाडप्रांतात चढाई व चौथ वसुली :

इ.स. १६८३ च्या फेब्रुवारी महिन्याच्या शेवटी मराठे वऱ्हाडकडे चौथ वसुलीसाठी गेले होते. ही बातमी खानजहान बहादुरास समजता तो सडा घेऊन त्याना तंबी देण्यासाठी गेला; परंतु मराठे त्या अगोदरच पसार झाले होते. पुन्हा मार्च महिन्याच्या सुरुवातीस मराठे अकोल्याकडे गेल्याचे कळताच तो मराठ्यांना तंबी देण्यासाठी अकोल्याकडे गेला. तरी त्यास यश आले नाही. कारण मराठे तो येण्याआगोदरच बाळापूर जिल्ह्यात घुसले होते. तेव्हा बाळापूरचा फौजदार मुहमद हुसैन याने मराठ्यांशी सामना केला. झालेल्या लढाईत मुहमंद हुसैनचा पराभव करून मराठे पसार झाले.

---

[१०६] *गोखले कमल श्रीकृष्ण : शिवपुत्र संभाजी , ज्ञान-विज्ञान विकास मंडळ, पुणे १९७१(पहिली अवृत्ती) पृ.क्र.२९२.*
[१०७] *गोखले कमल श्रीकृष्ण : उपरोक्त पृ.क.२९३.*

मराठ्यांनी वऱ्हाडप्रांतातील जामोद्याच्या परिसरात चौथ वसुलीसाठी घुसले असता तेथील फौजदार शेख जहान यांच्यात मराठ्यांचा सामना करण्याइतकी कुमक नव्हती. त्यामुळे त्याने सईद मुनव्वरखानास कुमकेस येण्यासाठी लिहीले. मुनव्वरखानाने ही बातमी शहजाद्यास कळवली. शहजाद्याच्या हुकूमाप्रमाणे ४ मार्च १६८३ रोजी तो जामोद्याकडे निघाला. मुनव्वरखान व शेख जहान एकत्र येऊन मराठ्यांवर स्वारी केली. मराठे-मोगल यांच्यामध्ये मोठा संघर्ष झाला. या लढाईत दोन्हीकडील सैन्य ठार व जखमी झाले. त्यानंतर मराठे पळून गेले.

संभाजी राजाचे लेकराय वगैरे ९ सरदार मोठ्या जमेतीसह वऱ्हाडातील मकन (पळस) गाव येथे पोहोचून तेथे चौथ वसूली करीत होते. यामध्ये त्यांनी चौथ न देणाऱ्या ४ हजार लोकांना जनावरांसह पकडले आणि ते सर्व घेऊन परत निघाले. ही बातमी सैफुल्लाह यास कळली. तेव्हा त्याने मुखेड जवळ असलेल्या वाशीम गावाहून आपल्या लोकासह निघून मराठ्यानां तंबी देण्यासाठी स्वारी केली. झालेल्या लढाईत दोन्हीकडील लोकं जखमी झाली व ठार झाली; परंतु सैफुल्लहने बादशहास कळविले की, "बादशाही सुदैवाने ३०० लोक मारले व जखमी केले. त्याचा पराजय करून ४ हजार लोक व जनावरे परत आणली ७० घोडे हाती आल्या. तो स्वतः शत्रूचा पाठलाग करीत गेला. बादशहाने सैफुल्लाह वर खुश होऊन त्यास एक तलवार भेटी खातर वेगळी ठेवण्याचा हुकूम केला.[१०८] अशाप्रकारे मराठ्यांनी वऱ्हाडप्रांतातील अकोला, बाळापूर, जामोधा, मकन या परिसरामध्ये चढाई करून चौथ वसूली केल्याचे दिसते.

### ५.५.७ शहाजादाचे हत्ती पळवले :

इ.स. १६८३ मध्ये फेब्रुवारीच्या दुसऱ्या तिसऱ्या आठवड्यात मराठ्यांनी जालना परिसरामध्ये हल्ले करून चौथाई वसुली केली. ज्यांनी चौथाई दिली नाही त्यांचे उंट वगैरे ताब्यात घेतले. त्यावेळी मामूरखानस हुकूम पाठविण्यात आला की, त्याने बुणग्यांना मागे

---

[१०८] *दारवटकर अनंत : अद्वितीय छत्रपती श्री संभाजी महाराज (खंड ३) श्रीशंभू प्रेरणा प्रकाशन, पुणे २०१० (प्रथमावृत्ती) पृ.क्र. १५४६.*

सोडून जालन्याकडे आलेल्या मराठ्यांचा पाठलाग करून त्यांना तबी द्यावी.[१०९] परंतु मराठे तो येण्याआगोदरच पुढे निघून गेले होते. पुढे जालन्यापासून ४० कोसावर असलेल्या पाथरी भागावर हल्ला केला. ह्या भागात बादशहाचे आणि शहजादा मुअज्जम तसेच शहआलम याचे हत्ती चरण्यासाठी म्हणून ठेवण्यात आलेले होते. नेमका त्यांच्यावर मराठ्यांनी हल्ला केला आणि ते चांद्याच्या वाटेने हैद्राबादच्या सरहद्दीकडे हत्ती, उंट वगैरे घेऊन गेले. ही बातमी बादशहास समजली व ठाणेदारांना पाठलाग करून हत्ती परत मिळविण्याचे अन्यथा स्वत: जाब देण्याचा हुकूम पाठविला.[११०]

हत्ती पळवून नेण्याची बातमी शहजादा मुइझुद्दीन व खानजहान बहादुरखान यांना समजली त्याचबरोबर बहादुरखानाने शहजाद्याला बाजा बुणग्यासहीत बीदर जवळ सोडले व तो निवडक सरंजाम घेऊन निघाला.[१११] बहादुरखानाचा पाठलाग चुकविण्यासाठी तसेच त्यास वेळ लागावा म्हणून मराठ्यांनी वाटेत काही ठिकाणी शाहआलमचे हत्ती वाटेतील लोकांकडे सोपवले. मराठ्यांच्या पाठलागावर असलेल्या बहादुरखानास वाटेत सोडलेले हत्ती पकडण्यात गुंतून पडावे लागले इकडे शिल्लक हत्ती आणि मराठे बहादुरखानाच्या हाती शेवटपर्यंत लागले नाहीत.[११२]

### ५.५.८ बगांल व पाटण्यावर चढाई :

संभाजी राजाच्या दूरदर्शीपणा व राजनीती कुशलतेचा परिपाक म्हणजे औरंगजेबास जेरीस आणण्यासाठी गंगाराम गुजराती यांच्या माध्यमातून उत्तर भारतात केलेली चढाई होय. गंगाराम गुजराती नावाचा वाणी खानजहान बहादुरचा नोकर होता. अलाहाबाद परगणा हा खानजाहान बहादुरखानाचा जहांगिरीचा परगणा होता. याची व्यवस्था पाहण्याचे काम त्याने गंगारामकडे सोपविले होते. यासाठी रुहुल्लाहखानाचा मुन्शी बालकिशन व तापीदास हे

---

[१०९] *दारवटकर अनंत : दारवटकर अनंत : अद्वितीय छत्रपती श्री संभाजी महाराज (खंड ३) श्रीशंभू प्रेरणा प्रकाशन, पुणे २०१० (प्रथमावृत्ती) , पृ.क.१५४०.*

[११०] *दारवटकर अनंत : अद्वितीय छत्रपती श्री संभाजी महाराज (खंड ३) , उपरोक्त पृ.क.१५४०.*

[१११] *पगडी सेतू माधवराव(संपा.) :मोगलआणि मराठे - तारीख दिल्कुशा, श्री लेखन वाचन भंडार, पुणे १९७० पृ.क्र. ८२.*

[११२] *दारवटकर अनंत : अद्वितीय छत्रपती श्री संभाजी महाराज (खंड ३), उपरोक्त, पृ.क्र. १५४२.*

दोघेजण जामीन राहिले होते; परंतु प्रत्यक्ष अलाहाबादेची व्यवस्था पाहत असताना गंगाराम गुजराती व खानजहान बहादुरखान यांच्यात काही वाद झाले. यावर गंगारामला खानजहानने परत बोलविले; परंतु त्याने खानजहानचा हुकूम मानला नाही. उलट त्याने तेथे धामधूम सुरु केली.[११३]

बंडाचा झेंडा उभारल्याला गंगाराम बहादुरखानाची नोकरी सोडून बऱ्याच संपत्तीसह संभाजी महाराज आणि अकबर यांच्या आश्रयास आला. गंगारामला मुघल दरबारातील कपटी व लबाडीचा अनुभव आलेला होता. त्यामुळेच त्याने बंडाचा पवित्रा घेतला होता. तसेच त्याला उत्तर भारत, बंगाल या प्रांताची माहिती असल्यामुळे त्यांच्या मार्फत उत्तरभारतात चढाई करायची योजना संभाजीने आखली. त्यासाठी संभाजी राजांनी गंगारामाला १०००० सैन्याची तुकडी देऊन बंगालच्या सरहद्दीवर पाठविले. तेथे गंगारामाने गुप्तरीतीने माहिती काढून रक्तपात न करता पाटणा आणि मोंगीर ही शहरे घेतली. तेथील रहिवाशांचे त्याने काही नुकसान केले नाही. ही चढाई तेथील प्रजेविरुद्ध नसून राजाला पदच्युत करण्यासाठी केलेली होती. गंगाराम १६८२ च्या जुलै-ऑगस्ट महिन्यात पाटण्यास गेला होता. त्याच वर्षाच्या डिसेंबर महिन्यात गंगारामाला पाटणा येथून हाकलल्यामुळे तो दक्षिणेत आला. तेव्हा त्याचे सैन्य २५-३० हजारापर्यंत वाढले होते. पुन्हा एकदा अकबराच्या नावाने बंगालमध्ये जाण्याचा त्याचा बेत होता.[११४] यावेळी संभाजी राजांनी अकबर व दुर्गादास राठोड यांच्या माध्यमातून गुजरातमार्गे दिल्लीच्या दिशेने हालचाली करणे, त्याचवेळी गंगारामच्या माध्यमातून बिहार, बंगालमधून दिल्लीच्या दिशेने हालचाली करणे, तसेच रजपूताच्या साहाय्याने राजपूताण्यातून उठाव करणे म्हणजे दिल्लीच्या तिन्ही बाजूने उठाव करण्याची अत्यंत उत्कृष्ट योजना संभाजी महाराजांनी आखली होती . त्याचाच भाग म्हणून अकबर व दुर्गादास राठोड यांनी भडोचपर्यंत बंडाचा झेंडा उभारल्याचे सापडते. यानंतर गंगाराम गुजराथ्याने पुढे काही हालचाली केल्या असल्याची माहिती हाती लागत नाही.

---

[११३] *दारवटकर अनंत : अद्वितीय छत्रपती श्री संभाजी महाराज (खंड ३) श्रीशंभू प्रेरणा प्रकाशन, पुणे २०१० (प्रथमावृत्ती) पृ.क्र. १५७०.*

[११४] *गोखले कमल श्रीकृष्ण : शिवपुत्र संभाजी , ज्ञान-विज्ञान विकास मंडळ, पुणे १९७१(पहिली अवृत्ती) पृ.क्र.२९३.*

## ५.६ औरंगजेबाची बदलती मानसिकता आणि नवीन व्यूहरचना

इ.स. १६८१ ते १६८४ चार वर्षांमध्ये औरंगजेबाने संभाजीचे राज्य नष्ट करण्यासाठी आकाश पाताळ एक केले होते; परंतु त्याला कोठेच यश मिळण्याचे चिन्ह दिसत नव्हते. यामुळे औरंगजेब चिडखोर बनला होता. याबाबत ३० जुलै १६८२ रोजी कारवारकरांनी सूरतेस लिहिलेल्या पत्रात याचा उल्लेख येतो. कारवारकर लिहितात, "औरंगजेब संभाजी राजांवर इतका चिडलेला आहे की, त्याने आपल्या डोक्यावरची पगडी फेकून दिली. संभाजी राजांना पकडल्याशिवाय किंवा ठार मारल्यावाचून ती पुन्हा डोक्यावर घालणार नाही. असा त्याने पण केला आहे."[११५] संभाजीच्या राज्याच्या चहूबाजूंनी एकदाच आक्रमणं केली की, अल्पावधितच त्याचे राज्य नाहीसे करता येईल असा समज औरंगजेबाचा होता; परंतु झाले त्याच्या उलट. संभाजीराजांनी औरंगजेबाच्या प्रत्येक आघाडीला यशस्वीपणे तोंड देऊन त्याचे हल्ले परतविले. एवढेच नव्हेतर औरंगजेबाच्या प्रदेशावर चढाई करून ती लुटली व चौथाई वसूल केली. या अपयशामुळे औरंगजेबाचा कोणावरही विश्वास राहीला नाही. तो निराश होऊन दिल्लीला परत जाण्याचा विचार करू लागला होता. याबाबत औरंगजेबाच्या मन:स्थितीचे वर्णन सुरतकरांनी १९ जून १६८३ फोर्ट सेंट जॉर्जला लिहिलेल्या पत्रात सापडते, "मोगल (बादशहा) अद्यापपावेतो तेथून हलला नाही; परंतु दाट वदंता आहे की, तो परत दिल्लीस जाण्याच्या विचारात असून सुलतान अकबर व संभाजीराजे यांच्या बरोबरील लढाईची सूत्रे आपल्या उमरावांच्या हाती सोपवणार आहे. तो अतिशय चिडखोर झाला आहे. त्याच्या मनाची अस्थिरतासारखी वाढत आहे. त्यामुळे त्याचे उमराव फार नाराज झालेले आहेत. जर त्याचे आयुष्य (म्हातारपणामूळे) लवकर संपले नाही तर त्याला ते फार काळ जगू देणार नाहीत. त्यामुळे आम्हास मात्र भीतीदायक वातावरणात दिवस काढावे लागत आहेत."[११६]

[११५] *गोखले कमल श्रीकृष्ण : शिवपुत्र संभाजी , ज्ञान-विज्ञान विकास मंडळ, पुणे १९७१(पहिली अवृत्ती) पृ.क्र.३०२.*
[११६] *दारवटकर अनंत : अद्वितीय छत्रपती श्री संभाजी महाराज (खंड ३) श्रीशंभू प्रेरणा प्रकाशन, पुणे २०१० (प्रथमावृत्ती) पृ.क्र. १४६७.*

औरंगजेब लढाईची सारी सुत्रे आपल्या अधिकाऱ्यांवर सोपवून दिल्लीला परत जाण्याच्या बेतात असल्याचे तत्कालीन फारसी बातमीपत्रात नमुद केलेले आहे. औरंगजेबाने आपला दिल्लीला परत जाण्याचा विचार आपल्या उमरावाना सांगितल्यावर ते भयभीत होऊन बादशहास म्हणतात की, "तुम्ही स्वतः दक्षिणेत असूनही मराठ्यांविरुद्ध लढण्यात यश मिळत नाही तर तुम्ही गेल्यानंतर आमचे कसे होणार? औरंगजेबाच्या या मनःस्थितीचा विचार केला म्हणजे त्याच्या अफाट सामर्थ्याला आव्हान देऊन मराठ्यांनी त्याला किती हैराण केले असेल याची चांगली कल्पना येते."[११७] औरंगजेबाच्या तुलनेत संभाजी हा वयाने अनुभवाने लहान, सर्वसामर्थ्याने कमी असून चार पाच वर्ष औरंगजेबाशी यशस्वी प्रतिकार करून त्यास हैराण केले यावरुन संभाजी राजाचे श्रेष्ठत्व सिद्ध होते.

मराठ्यांविरुद्ध यश मिळत नही असे दिसताच औरंगजेबाने आपला पवित्रा बदलला. मराठी राज्यावरील आपले आक्रमण धोरण बदलून त्याने आपल्या अधिकाऱ्यांना अनेक ठिकाणचे वेढे उठविण्यास सांगितले आणि आपला मोर्चा आदिलशाहीकडे वळवला. दुसरीकडे संभाजी राजांच्या राज्याचे रक्षण करत असलेल्या सरदारांना फोडण्याचा प्रयत्न औरंगजेबानी सुरू केला.

## ५.७ संभाजी राजाच्या कर्नाटकातील हालचाली

छत्रपती शिवाजी महाराजांनी आपल्या राज्याभिषेकानंतर इ.स. डिसेंबर १६७६ ते जून १६७८ या काळामध्ये कर्नाटक मोहिम हाती घेऊन कर्नाटकातील त्यांनी जिंजी, बेलूर, तंजावर, कोलार, होसकोट, दोड्डबाळापूर इत्यादी प्रदेश जिंकला होता. त्यानंतर कर्नाटकातील सत्ता आपला बंधु संताजी भोसले यांच्यावर सोपवून रायगडला आले होते. कर्नाटक प्रदेश अतिशय संपन्न होता. त्यामुळे ते राज्य महत्त्वाचे वाटत असल्यामुळे त्याभागावर आपला युवराज संभाजी राजे यांची नियुक्ती करावी असा शिवाजी महाराजांचा मानस होता; परंतु बखरकारांनी या घटनेचा वेगळाचा अर्थ लावला. त्यानंतर शिवाजी राजांनी संभाजीस कर्नाटकामध्ये पाठवले कारण १६८० च्या जानेवारीच्या अखेरीस संभाजीराजे

[११७] *गोखले कमल श्रीकृष्ण : शिवपुत्र संभाजी , ज्ञान-विज्ञान विकास मंडळ, पुणे १९७१(पहिली अवृत्ती) पृ.क्र.३०३.*

कर्नाटकातील चिक्काबाळापूर तालुक्यातील 'नदीदुर्ग' येथील गडावर राहावयास गेले होते. तेथे त्यांचा मोगलाशी संघर्ष झाला. याची माहिती दि. २१ मार्च १६८० च्या शिलालेखात अशी आहे. "कर्नाटकाच्या पूर्वेस असलेल्या उंच आणि अवघड नंदी डोंगरावर जाण्याचा एकच मार्ग असून तेथे चंपक व अश्वत्थ वृक्ष आहेत. शत्रुपासून संरक्षण करण्यासाठी या डोंगरावर तटबंदी केलेली आहे. हा गड घेण्यासाठी म्लेछाने स्वारी केली, पण त्याचा पराभव झाला. छत्रपतीचा पुत्र संभाजीराजे चिक्काबाळापुरी राज्यात शांततेने राज्य करीत आहे. जगदेव किल्ल्याचा बाळाजी कृष्ण दुर्गाधिकारी होता. त्याने रघुनाथ पंडिताच्या आज्ञेवरुन नंदी किल्ल्याचा अधिकार आपल्याकडे घेतला."[११८]

छत्रपती शिवाजी महाराजाना यानंतर कर्नाटकातील राजकारणावर लक्ष देण्यास वेळ मिळाला नाही. इ.स. १६८० मध्ये शिवाजी महाराजांच्या मृत्यूपूर्वी संताजी, रघुनाथपंत व गोपाळदादाजी असे तिघे कर्नाटकचा कारभार पाहात होते.[११९] परंतु सर्वाधिकार सेना ही शिवाजी राजानी आपला भाऊ संताजीराजे भोसले यांच्याकडे दिला होता. रघुनाथपंत तेथील मजमुचा कारभार पहात होते. शिवाजी महाराजाच्या मृत्यूनंतर संभाजीराजे स्वराज्याच्या गादीवर आले व त्यांनी कर्नाटकाच्या राज्यकारभारावर लक्ष केंद्रीत केले. तेथील दिवाण रघुनाथ नारायण हणमंते यांना हिशोबाची विचारना केली; परंतु त्याने हिशोब देण्याचे नाकारल्यामुळे संभाजी राजाने १६८० च्या डिसेंबरमध्ये रघुनाथ पतांस कर्नाटकात कैद केले. इ.स. १६८१ च्या जानेवारीत संभाजी राजांनी मेहुणे हरजीराजे महाडिक यांची कर्नाटकचा सरसुभेदार म्हणून व शामजी नाईक पुंडे यांची दिवाण म्हणून नेमणूक केली. संभाजी राजांच्या आज्ञेवरुन हरजी राजे, शामजी नाईक पुंडे, जैताजी काटकर आणि दादाजी काकडे हे सैन्यासह दि. ११ मार्च ते ८ एप्रिल १६८१ च्या दरम्यान कर्नाटकात निघाले.[१२०]

यावेळी कर्नाटकात म्हैसून, मदुरा, तंजावर, रामनाड, इक्केरी इत्यादी छोटी छोटी पालेगारांची राज्ये होती. त्यामध्ये सर्वात शक्तिशाली म्हैसूर राज्य होते. इ.स. १६७२ ते

[११८] *मोहोड शालीनी मधुकरराव : शिवपुत्र छत्रपती संभाजीमहाराज,कलादत्त प्रकाशन पुणे, २०१२पृ.क्र.२६६.*

[११९] *बेंद्रे वा.सी. : श्री छत्रपती संभाजी महाराज यांचे विचिकित्सक चरित्र, मनोरमा प्रकाशन,मुंबई ,२००१ (तृतियावृती) पृ.क्र.५९७.*

[१२०] *गोखले कमल श्रीकृष्ण : शिवपुत्र संभाजी , ज्ञान-विज्ञान विकास मंडळ, पुणे १९७१(पहिली अवृत्ती) पृ.क्र.३२१.*

१७०४ या कालावधीत चिक्कदेवराय हा राजा होता. तो अतिशय महत्त्वकांक्षी होता. त्याला संपूर्ण कर्नाटकावर आपली सत्ता प्रस्थापित करायची होती. त्यामुळेच छत्रपती शिवाजी महाराजानी कर्नाटकात आपले राज्य प्रस्तापित केल्यामुळे मराठे व म्हैसूरच्या नाईकामध्ये वैमनश्य निर्माण झाले होते. तसेच एकोजीराजांनी आपली राजधानी बेंगलोरहून तंजावरला नेली होती. त्यामुळे बेंगलारच्या उत्तरेकडील भागावर राज्यविस्तार संधी मिळाली होती; परंतु मराठ्यांना तो प्रदेश त्याच्या ताब्यात जाऊ द्यायचा नव्हता.

दुसरीकडे मदुरेच्या चोक्कनायकाला तंजावरच्या राजाच्या मुलाशी लग्न करावयाचे होते; परंतु त्यास तंजावरच्या नायकाचा विरोध होता. यामुळे तंजावर व मदुरेच्या नायकामध्ये वैर निर्माण झाले. मदुरेच्या चोक्कनाथाने इ.स. १६७३ मध्ये तंजावरचा राजा विजय राघव यांचा पराभव करून तेथे आपला सावत्र भाऊ आलगिरी नायक याची नेमणूक केली; परंतु तेथील प्रजेला त्याचे राजेपद मान्य नव्हते. याचा फायदा एकोजीराजानी घेतला व तंजावर जिंकून तेथील प्रजेला विश्वासात घेऊन अखेरपर्यंत तजांवरचे राजे म्हणून सत्ता प्रास्थापित केली. तसेच मदुरेच्या चोक्कनाथाच्या काळात मदुरेच्या राज्याचा ऱ्हासा होऊन लागला. त्यानंतर त्याचा मुलगा रंगा कृष्णा मुट्टु विरप्पा हा १६८२ मध्ये गादीवर बसला. त्याच्या राज्याचा बराचसा भाग म्हैसूरचा राजा, संभाजी राजे, एकोजी आणि रामनाडच्या सेनापतीने जिंकला रंगा कृष्ण मुट्टुने आपल्या राज्याचा गेलेला मुलूख परत मिळविला.[१२१]

अशाप्रकारे कर्नाटकात छोटी छोटी पाळेगारे स्वतःचे राज्य टिकविण्यासाठी परस्परात संघर्ष करत होती. त्यामध्ये म्हैसूरकरांची स्वारी मदुरेवर होत असे तेव्हा सर्व पाळेगार मदुरेला मदत करत. अशा एकंदर गोंधळलेल्या राजकीय परिस्थिचा फायदा संभाजी राजांनी घ्यायचे ठरवून हरजीराजे महाडिक यांना कर्नाटकात पाठवले होते. संभाजी राजेनी आपले मेहुणे हरजीराजे यांना कर्नाटकाचे सर्वाधिकार तसेच तेथील सर्व गडकोटाचाही अधिकार सोपविला होता. त्याचबरोबर कर्नाटकातील सर्व सुभेदार व इतर अधिकाऱ्यांना

[१२१] *गोखले कमल श्रीकृष्ण : शिवपुत्र संभाजी , ज्ञान-विज्ञान विकास मंडळ, पुणे १९७१(पहिली अवृत्ती) पृ.क्र.३२०.*

हरजीच्या आज्ञेत वागण्यासाठी आज्ञा केली होती.[१२२] इंग्रजाना कर्नाटकात वखार काढण्यासाठी संभाजी राजांना पत्रे लिहिली; परंतु त्या संदर्भात त्यानी काहीही उत्तरे न दिल्यामुळे कर्नाटकाचा नवीन नेयुक्त सुभेदाराशी बोलणी करण्याचे ठरविले. हरजीराजे महाडिक कर्नाटकात पोहोचताच त्यांना भेटण्यासाठी दि. ७ ऑगस्ट १६०१ रोजी गोपाळ दादाजी आणि इंग्रजाचा वकील चंद्रशेखर पोर्टो नोव्होहून निघाले. इग्रंजानी हरजीला दोन मोठे नजराणे, त्याच्या बायकोस (संभाजी राजांच्या बहिणीस) मोठा नजराण; हरजीचा पेशवा नरसो व्यंकटादी आणि दिवाण कारभारी यांना नजराणे देण्याचे ठरविले होते.[१२३]

हरजी राजे महाडिक कर्नाटकात पोहोचताच तेथील पाळेगाराच्या आपापसातील संघर्षाचा फायदा घेण्याचे ठरविले म्हैसूरचा नायक चिक्कदेवरायशी संघर्षाचे धोरण अंगीकरले चिक्कदेवरायांनी आपला सेनापती कुमारय्या याला मदुरेवर आक्रमणासाठी पाठविले होते. त्यांनी मदुरेवर आक्रमण करून चोक्कनाथाच्या राजधानीतील त्रिचनापल्लीच्या किल्याचा वेढा दिला. यामुळे चोक्कनाथने हरजीराजे व एकोजीराजे यांना मदत मागीतली. यावेळी मारवाडच्या सेतूपतीने मदुरेच्या मदतीसाठी सैन्य पाठविले; परंतु ते सैन्या मदतीऐवजी लुट करण्यामध्ये दंग राहीले. हरजीराजेना म्हैसूकरांना मदुरेच्या राज्यातून हुसकावून देण्याची चांगलीच संधी मिळाली. मराठ्यांनी यावेळी म्हैसूरच्या सेनापती कुमारय्याला हाकलून देऊन मदुरेच्या राज्यातील बराच प्रदेश काबीज केला. मराठ्यांशी लढा देणे कुमारय्यास कठीण जात होते. त्यामुळे मदुरेच्या नायक चोक्कनाथाशी संगनमत करून हरजीराजे व एकोजीना मदुरेच्या हाद्दीतून हाकलून देण्याचा तह केला; परंतु चोक्कनाथाचा कुमारय्यावर विश्वास नसल्यामुळे हा तह तडीस गेला नाही. त्यानतंर कुमारय्याची हरजीराजेना पैसाचे अमिष दाखवून जिंजीस परत जाण्याची विनंती केली. मराठ्यांशी बोलणी चालू ठेवून म्हैसूरच्या नायकास मदत मागविली; परंतु कोणत्याही प्रकारची मदत न आल्याने माघार घ्यायचे ठरविले. माघार घेताना कुमारय्या मराठ्यांच्या हाती सापडला. या वेळच्या लढाईची अत्यल्प

[१२२] *गोखले कमल श्रीकृष्ण : गोखले कमल श्रीकृष्ण : शिवपुत्र संभाजी , ज्ञान-विज्ञान विकास मंडळ, पुणे १९७१(पहिली अवृत्ती) पृ.क.३२१.*
[१२३] *गोखले कमल श्रीकृष्ण : शिवपुत्र संभाजी , उपरोक्त , पृ.क्र.३२२.*

माहिती जेधे शकावलीत सापडते "चैत्र शके १६०४, मार्च एप्रिल १६८२ कर्नाटकात श्रीरंगपट्टणकर व हरजी महाडिक जइतजी काटकर, दादाजी काकडे हे त्रिचनापल्लीस मदतीस गेले २००० घोडी पाडाव झाली श्रीरंगपट्ठणकराचा सरदार कुमार हाही पांडाव झाला."[१२४]

### ५.७.१ संभाजी महाराजांची कर्नाटकातील पहिली स्वारी :

हरजीराजे महाडिक यांनी कर्नाटकामध्ये म्हैसूरकराच्या सेनापतीचा पराभव केला तरी मदुरेच्या राज्यातील मदुरा आणि इतर काही गड म्हैसूरकराच्या ताब्यात होते. त्यामुळे मराठ्यांच्या जिंजी व तंजावर या मुख्य ठाण्यांना धोका होता. म्हैसूरकराच्या आक्रमक धोरणास रोखण्यासाठी स्वतः संभाजीराजांनी म्हैसूरवर स्वारी करण्याचे ठरविले. संभाजी राजाना म्हैसूरचा नायक चिक्कदेवरायच्या सामर्थ्याची जाणीव असल्याने कर्नाटक मोहीमवर जाण्याआगोदर इक्केरीचा नायक आणि गोवळकोंड्याच्या सुलतानाशी त्यांनी तह केला होता.[१२५] या दोघाचे आर्थिक आणि सैनिकी सहकार्य होऊन संभाजी राजानी म्हैसूरवर आक्रमण केले चिकमंगळूरच्या ईशान्येला आणि चिकनहळीच्या पश्चिमेस असलेल्या बाणावर येथे राजांनी तळ ठोकला.[१२६] अनपेक्षितपणे चालून आलेल्या मराठ्यामुळे चिक्कदेवराय चकित झाला. जून १६८२ च्या सुमारास संभाजी आणि म्हैसूरचा नायक चिक्कदेवराय यांच्यात मोठे युद्ध झाले. या युद्धामध्ये संभाजीराजे व त्यांच्या मदतीसाठी आलेल्या एकोजीराजे याचा पराभव झाला. असे चिक्कदेवरायच्या पदरी असणारा कवी निरूमलार्य याने लिहिलेल्या 'अप्रतिम वीरचरीतम् ' या काव्यामध्ये म्हटले आहे. तसेच श्रीरंगपट्टणच्या शिलालेखात संभाजी, कुतुबशहा आणि बसप्पाच्या यांच्या पराभवचा उल्लेख सापडतो.

संभाजी राजानी बाणावर येथील पराभवानंतर आपला युद्धाचा तळ बाणावर येथून त्रिचनापल्लीला हालविला. कारण तेथून तंजावर-जिंजी ही मराठ्यांचे प्रमुख केंद्र जवळ होती.

---

[१२४]. *गोखले कमल श्रीकृष्ण : शिवपुत्र संभाजी , ज्ञान-विज्ञान विकास मंडळ, पुणे १९७१(पहिली अवृत्ती) पृ.क्र.३२४.*
[१२५] *गोखले कमल श्रीकृष्ण : उपरोक्त पृ.क.३२५.*
[१२६] *गोखले कमल श्रीकृष्ण : उपरोक्त पृ.क.३२६.*

त्यांच्या सहाय्याने आक्रमण करणे सोपे जाणार होते. संभाजी राजांनी त्रिचनापल्लीचा गड जिंकून घेतला. याच सुमारास मदुरेचा नायक चोक्कनथाचा मृत्यू होऊन त्यांच्या मुलगा मुट्टु विरप्पा हा गादीवर आला होता. तो दुर्बल असल्यामुळे मराठ्यांच्या हाता खालचे बाहुले बनला होता. यानंतर संभाजी राजांनी तेहानापट्टण व पोर्टो नोव्हो ही शहरे जिंकून घेतल्यामुळे तेथील डच व्यापाराचे नुकसान झाले होते. या लढाई पूर्वी तेथे बराच माल विकला जात असे आता व्यापार खूपच घटला होता. या लढाईत एकोजीने मदुरेच्या आणि टूव्हर्सच्या लोकांनी संभाजी राजाना साहाय्य दिले होते.[१२७]

संभाजी राजानी म्हैसूरकराविरुद्ध आक्रमक पवित्रा तसाच चालू ठेवला. मदुरेच्या आजूबाजूच्या प्रदेशात चढाई चालू असताना मराठ्यांनी म्हैसूरच्या उत्तरेच्या प्रदेशावर हल्ले करून गड घेतले. धर्मपुरीच्या भोवतालचा प्रदेशातही मराठ्यांनी हस्तगत केला. मदुरेच्या राज्यातील म्हैसूरकरांची सत्ता जवळ जवळ नष्टच केली. एकाचवेळी चिक्कदेवरायला स्वतःच्या राज्यात व मदुरेच्या राज्यात मराठ्यांशी लढावे लागत असल्यामुळे त्याला मदुरेच्या प्रदेशात कुमक पाठविता येईना. शेवटी मराठ्याविरुद्ध लढणे कठीण जात असल्यामुळे म्हैसूरकरांनी माघार घेतली. संभाजी राजाशी तहाची बोलणी करून मराठ्यांना खंडणी देण्याचे कबूल केले १६८३ च्या सुमारास राजे महाराष्ट्रात परत गेले.[१२८]

अशाप्रकारे संभाजी राजांनी म्हैसूरच्या नायक चिक्कदेवरायाचा विरोधामध्ये बसप्पा नायक, कुतुबशहा, एकोजी, बेदनूरची राणी, मदुरेचा नायक या सर्वाचे सहाय्य घेऊन त्यास एकाकी पाडून जेरीस आणले. यासर्व परिस्थितीत चिक्कदेवरायाला औरंगजेबाला मदत मागण्याशिवाय पर्याय नव्हता. म्हैसूरकरांनी मोगलाकडे २० नवंबर १६८३ ला वकील पेशकश घेऊन पाठवला होता. तेव्हा औरंगजेबाने शुजायतखानाला सफशीखनखां असा किताब देऊन श्रीरंगपटणाच्या मदतीला जाण्यास १७ एप्रिल १६८४ रोजी हुकूम केला.[१२९]

---

[१२७] *गोखले कमल श्रीकृष्ण : शिवपुत्र संभाजी , ज्ञान-विज्ञान विकास मंडळ, पुणे १९७१(पहिली अवृत्ती) पृ.क्र.३२७.*
[१२८] *गोखले कमल श्रीकृष्ण : उपरोक्त पृ.क.३२८.*
[१२९] *बेंद्रे वा.सी. : श्री छत्रपती संभाजी महाराज यांचे विचिकित्सक चरित्र, मनोरमा प्रकाशन,मुंबई ,२००१ (तृतियावृती) पृ.क्र.६०८.*

### ५.७.२ संभाजी महाराजांची कर्नाटकातील दुसरी स्वारी :

१६८३ मध्ये चिक्कदेवरायाशी झालेला तह त्याने न पाळता मराठ्यांना कोणत्याही प्रकारची खंडणी दिली नव्हती याउलट त्याने मोगलाशी हातमिळणी करून विजापूरकराच्या विरोधात साहाय्या दिले होते. कर्नाटकात मराठ्यांच्या विरोधात सहकार्य मागीतले होते. तसेच यावेळी म्हैसूरकराच्या प्रदेशातील अनेक छोटे पाळेगार त्याच्या विरुद्ध उठले होते. महाराष्ट्रामध्ये औरंगजेबाने आपले सैन्य स्वराज्यातून काढून घेऊन विजापूर आणि गोवळकोंडा जिंकून घेण्यात गुंतवले होते. यासर्व पार्श्वभूमीवर संभाजी राजांनी १६८६ मध्ये कर्नाटकाची दुसरी मोहीम हाती घेऊन म्हैसूरवर स्वारी केली. या स्वारीत मोरस, तिगुड, कोडग व मलेय येथील नायकांनी संभाजीराजाना मदत केली. या नायकांना संभाजीराजांनी मानमरातब देण्याचे आमिष दाखवून त्यांना घेऊन संभाजी राजांनी म्हैसूर राज्याचे केंद्रस्थान श्रीरंगपट्टणवर हल्ला केला. मोरस, निगुड, कोडग, मलेय या प्रांताच्या नायकांनी मराठ्यांचा शौर्यावर भिस्त ठेवून दोन्ही बाजूंनी चिक्कदेवरायला त्रास दिला. [१३०] यावेळच्या कर्नाटकातील वस्तुस्थिती वर्णन लुई द मेलो आपल्या १६८६ च्या पत्रात असे करतो, "...या भागातील नायकांच्या राज्यांची परिस्थिती मागील वर्षाप्रमाणेच परस्पर कलहामुळे फार गोंधळाची अशीच आहे. मदुरा नायकाचे पूर्वीचे लहान लहान मांडलिक राजे आता म्हैसूरकराचे प्रभुत्व झुगारुन देत आहेत. करण म्हैसुरकरात आपल जिंकलेला मुलुख सांभाळण्याइतका त्राण राहीला नाही. मरवाचे चोर एकोजीचे सैन्यात चोरुन मारुन शिरुन नाश करण्याचा प्रयत्न करीत आहेत. संभाजी राजे निकराने म्हैसूरकराविरुद्ध लढत आहेत. त्यांनी म्हैसूरप्रांतावरच स्वारी केली असून म्हैसूरकराच्या लढाईसाठी द्याव्या लागणाऱ्या कराने कंटाळल्यामुळे प्रजा बंड करून हरजीस मदत करीत आहे... संभाजीराजांनी म्हैसुरकरांच्या राज्यांतच शिरुन दगंल चालविली आहे. त्यामुळे संरक्षणास लागणारा पैसा म्हैसुरकर आपल्या प्रजेपासून जुलूमजबरदस्तीने घेत असल्याने सर्व प्रजा राजा व त्याचे मंत्र्याविरुद्ध उठली आहे... ७० हजार बंडखोरांचा एक पुढारी खास म्हैसुरच्या कोटावरच चालून गेला आहे आणि राजाला

[१३०] *गोखले कमल श्रीकृष्ण : शिवपुत्र संभाजी , ज्ञान-विज्ञान विकास मंडळ, पुणे १९७१(पहिली अवृत्ती) पृ.क्र.३३०-३१.*

त्यात कोंडला आहे. दुसरा पुढारी ३० हजारानिशी सत्यमंगलमच्या व त्या सभोवतालीच्या प्रदेशात धुडगूस घालित आहे."[१३१] १० जानेवरीस १६८७ ला याबाबत लिहितात, "...संभाजी राजाच्या स्वारीमुळे या बाजूच्या प्रदेशातील सर्व राज्ये विस्कळीत झालेली आहेत व त्यांच्या भीतीने व लुटालुटीने सर्वत्र घबराट पसरली आहे. त्याने पुष्कळ किल्ले व शहरे घेतली आहेत आणि आणखी घेण्याची खटपट चालू आहे. त्याला प्रतिकार करण्यास फारसे कोणी धजत नाही. त्याच्या पारिपत्यार्थ मोगली सेनाही आलेली नाही".[१३२] श्रीरंगपट्टणचा वेढा चालू असतानाच मराठ्यांनी म्हैसूर राज्यातील प्रदेश लुटला या संबंधात एडवर्ड स्कॉट वॉरीग लिहितो, औरंगजेब विजापूर जिंकून घेणार असे दिसताच संभाजीराजांनी विजापूर राज्यातील गड घेण्यास सुरुवात करून चिक्कदेवराय आणि औरंगजेबावर आघाडी मारली.[१३३] याचवेळी औरंगजेब पन्हाळ्याला वेढा देण्याच्या बेतात असल्याचे समजताच १६८६ च्या आक्टोंबर-नोव्होबंरमध्ये परत स्वराज्यात गेले.

### ५.७.३ कर्नाटकातील मोगल-मराठा संघर्ष :

मोगलांनी विजापूरचा पडाव केल्यानंतर गोवळकोंडा घेण्याच्या मार्गी लागले. त्यानंतर ते पुन्हा मराठ्यांच्या प्रदेशावर आक्रमण करणार हे उघड होते त्यामुळेच महाराष्ट्रातील स्वराज्याचा प्रदेश व दुरवरचा कर्नाटक प्रांताचा बंदोबस्त करणे गरजेचे होते. त्यासाठी स्वतः संभाजीराजे रायगडच्या परिसरामध्ये अनेक अधिकाऱ्याच्या नेमणूका करून स्वतः त्याच्यावर नियंत्रण प्रस्तापित केले होते. मुघल आणि म्हैसूरकरांच्या विरुद्ध कर्नाटकात हरजी महाडिकाला एकट्यांनाच तोंड द्यावे लागू नये म्हणून राजांनी आक्टोंबर-नोव्हेंबर १६८६ मध्ये केशव त्रिमल आणि संताजी घोरपडे यांना तिकडे जाण्याची आज्ञा केली. या आज्ञेनुसार ते दोघे फेब्रुवारी १६८७ मध्ये १२०० सैन्यासह कर्नाटकात पोहोचले.[१३४] यापूर्वीच

---

[१३१] *बेंद्रे वा.सी. : श्री छत्रपती संभाजी महाराज यांचे विचिकित्सक चरित्र, मनोरमा प्रकाशन,मुंबई ,२००१ (तृतियावृती) पृ.क्र.६०८.*
[१३२] *बेंद्रे वा.सी. : श्री छत्रपती संभाजी महाराज यांचे विचिकित्सक चरित्र, मनोरमा प्रकाशन,मुंबई ,२००१ (तृतियावृती) पृ.क्र.६०९.*
[१३३] *गोखले कमल श्रीकृष्ण : शिवपुत्र संभाजी , ज्ञान-विज्ञान विकास मंडळ, पुणे १९७१(पहिली अवृत्ती) पृ.क्र.३३१.*
[१३४] *गोखले कमल श्रीकृष्ण : उपरोक्त पृ.क.३३३.*

हरजीराजांनी मोघलानी जिंकलेल्या प्रदेशावर हल्ले करून लुटालुट चालू केली होती. १६८७ च्या सुरुवातीलाच कावेरी पाक आणि चेटपट या किल्ल्याना मराठ्यांनी वेढे दिले होते. तसेच मुघलाचे सैन्य कर्नाटकात उतरताच हरजी महाडिकाने कांजीवरम् येथे असलेल्या गोपाळ दादाजी आणि विठ्ठल पल्लीरावला मुघलांचा बंदोबस्त करण्यास रवाना केले. त्याच्या आज्ञेनुसार त्या दोघांनी मुघलांचा पाठलाग करून त्यांना पळवून लावले. दादाजी आणि विठ्ठल पल्लीराव यांनी आपले अधिकारी चेनापट्टम् येथे पाठवून त्याभोवतालचा प्रदेश त्याना घेण्यास सांगितले.[१३५]

दुसरीकडे केसो त्रिमळ यांच्या कर्नाटकातील अगमनामुळे अनेक अफवांना उत आला होता. त्यात पहिली अफवा अशी होती की, संभाजी राजांचा मृत्यू झाला असून त्याच्या जागी रामराजा राजा सत्तेवर येऊन त्याने कर्नाटकचा सुभेदार म्हणून केसो त्रिमळ नियुक्ती करून हरजी राजे कैद करण्याचे आदेश दिले. दुसरी अफवा अशी होती की, हरजीराजे गुप्तपणे मोगलांशी मैत्री करून जिंकलेला प्रदेश मोगलांना देणार असल्यामुळे संभाजी राजांनी त्याला पकडण्याचा आदेश दिला आहे; परंतु या अफवामध्ये कोणत्याही प्रकारचे सत्य नव्हते. अशा प्रकारच्या अफवा पसरवून कर्नाटकातील राजकारणात गोंधळ निर्माण करण्याचा मोगलांचा प्रयत्न होता.

२२ सप्टेंबर १६०७ला कुतुबशाही औरंगजेबाच्या हातामध्ये आली; परंतु त्यापूर्वीच औरंगजेबाने १६८७ च्या सुरुवातीलाच गोवळकोंडा हाती येण्यास उशीर होतो हे जाणून कुतूबशाहीचे गडकोट व प्रदेश घेण्यासाठी आपल्या सरदारांना पाठवले होते. १७ एप्रिल १६८७ च्या सुमारास मोगलाचे सैन्य कर्नाटकात बाळापुरम्पर्यंत गेले होते. त्यांनी कोडपिला हा महत्त्वाचा गड घेऊन मछलीपट्टमपर्यंत लुटमार केली होती. तुमकूर, चिकनहल्ली, चंद्रगिरी, पेनुगोडा, ही म्हैसूर राज्यातील शहरे त्यांनी जिंकली ते बंगलोरपर्यंत गेले.[१३६]

---

[१३५] *गोखले कमल श्रीकृष्ण : शिवपुत्र संभाजी , ज्ञान-विज्ञान विकास मंडळ, पुणे १९७१(पहिली अवृत्ती) पृ.क.३३३.*
[१३६] *गोखले कमल श्रीकृष्ण: शिवपुत्र संभाजी , उपरोक्त पृ.क्र.३३४.*

बंगलोर व त्याच्या आजूबाजूच्या प्रदेशावर मोगल व म्हैसूरकर चालून येत आहे हे कळताच एकोजी राजाना समजताच त्यांच्यासमोर आपला निभाव लागणार नाही. म्हणून म्हैसेरचा नायक चिक्कदेवरायाना बंगलोर विकण्याचे ठरवून बोलणी सुरु केली; परंतु त्याच वेळी कासीमखानाने म्हैसूरकरांच्या मदतीने बंगलोर आपल्या ताब्यात घेतले. कासीमखान बंगलोर चालून येत आहे. हे समजताच हरजीराजे व केशवपंत बंगलोर वाचविण्यासाठी निघाले होते; पण ते तेथे जाईपर्यंत कासिमखानाने बंगलोर घेतल्याचे पाहून ते जिंजीला परत गेले. कासीमखान नंतर बंगलोर चिक्कदेवरायला विकले मुघल सैन्याने बंगलोर सेवा गुंडा ही शहरे काबीज केल्यामुळे मराठ्यांना तेथून माघार घ्यावी लागली. हरजीराजे जिंजीजवळ ८ मैलावर असलेल्या मात्येनूर आणि संताजी तिरुवनमलाई येथे परतले. मात्र मुघलांचा प्रतिकार करण्यासाठी केशव त्रिमल जगदेवगडच्या परिसरातच थांबला.[१३७]

इ.स. १६८७ मध्ये एकोजी राजे मरण पावल्यामुळे मोगल आणि म्हैसेरकराच्या सयुंक्त आघाड्यापासून मराठ्यांच्या कर्नाटकातील प्रदेशाचे संरक्षण करण्याची जबाबदारीही हरजीराजे महाडिकावर आलेली होती. नोव्हेंबर १६८७ च्या सुमारास कासीमखान बंगलोर, पुलिकत, सॅन थाना हा परिसर जिंकून जिंजी आणि त्याच्या आजुबाजूचा प्रदेश घेण्यासाठी निघाला तर दुसरीकडे मच्छलीपट्टणच्या दिशेने मोगलाची एक तुकडी पाठवलेली होती. हरजीराजांनी मोघला विरुद्ध प्रतिकार चालूच ठेवून कुतूबशाहीच्या राज्यातील अनेक शहरे त्यांनी घेतली होती. त्याबाबत माहिती मद्रासकरच्या २६ डिसेंबर १६८७ च्या बातमीत येते "कंजीवरम्, चिगेलपुट आणि इतर मराठा सैन्याच्या छावण्यातून बातमी आली की, हरजीराजे २ हजार घोडेस्वार व ५ हजार पायदळ आणि त्याशिवाय शिड्या लावून चढणारे वगैरे कसबी लोक बरोबर घेऊन स्वारीवर निघाले असून त्याने मागे गोवळकोंड्याच्या राज्यात असलेलली कित्येक शहरे लुटून काबीज केली आहेत. शनिवार २४ डिसेंबरला त्याने हल्ला चढवून अर्काटचा किल्ला मोगलापासून घेतला. किल्लेदार व किल्यावरील लोकांना ठार मारले. अर्काट घेतलेले पाहून सर्वत्र फार घबराट उडाली आहे. कंजीवरम् व इतर शहरातील

---

[१३७] *गोखले कमल श्रीकृष्ण : शिवपुत्र संभाजी , ज्ञान-विज्ञान विकास मंडळ, पुणे १९७१(पहिली अवृत्ती) पृ.क्र.३३६.*

लोक आपल्य मौल्यवान वस्तू व बायकामुलास घेऊन इकडे आले आहेत. अशा तऱ्हेने लुटमारीपासून सुरक्षिततेसाठी पुष्कळ लोक येथे येऊन राहिले आहेत. तेथून महाराजाचे सैन्य सहा कोसावर असून कदाचित रात्रीही घोडदळासह अकस्मात घाला घालण्याच्या संभव आहे ... पुढे २७ डिसेंबरला विठ्ठलपंत निमाजी कस्तवार आणि गोपाळ पंडित यांना घोडदळासह हरजीराजे यांनी पुढे पाठविले. त्यानी जाऊन सैदापेठ लुटून तेथील कावेरीपटनम येथील कापसाच्या पिकाची जाळपोळ केली. हरजी त्रिणामल्लीस राहिले. त्यामुळे व्यापारी लोकांची फार पळापळ झाली व इंग्रजानाही आपला बदोबस्त वाढवावा लागला."[१३८]

इ.स. १६०८ च्या जानेवारीच्या सुरुवातीला पुन्हा हरजीराजाने शत्रुच्या प्रदेशातील जवळची शहरे लुटण्याचा सपाटा चालवला होता. याची माहिती मद्रासकर इग्रंजाच्या बातमी पत्रात सापडते. २ जानेवरीस केनिनेरच्या उत्तरेकडील ९ मैलावरचे मराकण लुटूले तेथुन गुरे, घोडे, हिरे व द्रव्य बरेच लुटून आणले. तेथील ५ लोकांना कैद करून आणले त्याचवेळी मराठ्यांच्या दुसऱ्या तुकडीने आपली आघाडी कंजिवरमच्या बाजूने रेटून तेथील कावेरीपट्टणम् व चिगंलपुट या गडाना वेढे दिले होते. १३ जानेवारीच्या बातमी पत्रात म्हटले आहे की, संभाजीच्या सैन्याने कंजीवरम् लुटले व समारे ५०० लोक ठार मारले आणि चिंगलपुनच्या बातमीप्रमाणे २ हजार घोडेस्वार व ५ हजार पायदळ मद्रासकडील भाग लुटण्यास पाठविले.[१३९] काजीवरम् येथे मराठ्यांचे सैन्य वाढत होते. फोर्ट सेंट जार्जपासून १२ मैलावर असलेल्या गावी मराठ्याचे २०००० घोडदळ आणि पायदळ सज्ज होते. शहरे घेणे आणि लुट मिळवणे चालूच होते.[१४०] इ.स. १६८८ च्या जानेवारी महिन्यापर्यंत मद्रासकरांच्या माहितीप्रमाणे मराठ्यांनी कुतुबशहीच्या प्रदेशातील व कर्नाटकातील जवळपास १४० शहरे व किल्ले घेतले होती.

---

[१३८] *बेंद्रे वा.सी. : श्री छत्रपती संभाजी महाराज यांचे विचिकित्सक चरित्र, मनोरमा प्रकाशन,मुंबई ,२००१ (तृतियावृती) पृ.क्र.६१९.*

[१३९] *बेंद्रे वा.सी. : उपरोक्त पृ.क्र.६१९-२०.*

[१४०] *गोखले कमल श्रीकृष्ण : शिवपुत्र संभाजी , ज्ञान-विज्ञान विकास मंडळ, पुणे १९७१(पहिली अवृत्ती) पृ.क्र.३३८.*

मराठ्यांचे कर्नाटकातील वाढते वर्चस्व कुतुबशाही प्रदेशातल घातलेला धुमाकूळ रोखण्यासाठी औरंगजेबाने रुहूल्लाहखान व कासीमखान यांची नेमणूक कर्नाटकाच्या तेलंगणा भागावर झाली. त्याची तिमण्णमानाय काला पाच हजार घोडदळ व दहा हजार पायदळ देऊन मद्रास बाजूने रवाना केले होते. या नंतरच्या मोगल-माराठा संघर्षाची माहिती मद्रासकर इंग्रजाच्या ९ फेब्रुवारी १६८८ च्या बातमीत येते, "एक दोन दिवसापूर्वी संभाजीच्या तीनशे घोडदळ व ७०० पायदळाने पुल्लीमल्ली घेण्याचा प्रयत्न केला. त्यात त्यास यश आले नाही. थोडे लोक मारले गेले महमद सादीक सेनापती, मक्का इस्माइलखान, रुस्तुमखान आणि याचमनायक हे चार-पाच हजार घोडदळ व सात हजार पायदळासह कांजेवरमला येत असल्याची बातमी १३ फेब्रुवारीलाच आली; परंतु ते पुढे कांजीवरम्ला २५ फेब्रुवारीला येऊन दाखल झाले. तेव्हा तेथील संभाजी राजाच्या सैन्याने कांचीसोडून उत्तमलोरच्या पलीकडे जाऊन बराच मूलूख लुटला. गुरे मालमत्ता वगैरे नेली. मोगली सैन्य चेतपुडकडे गेले. कोनीमेर पासून बारा मैलावर एक भांडण झाले. त्यात दाहा-बारा लोक दोन्ही बाजूचे मारले गेले. नंतर मार्चच्या सुरुवातीस याचप्पा नायक दोन हजार घोडदळ व चार हजार पायदळ बरोबर घेऊन कांजीवरमूहन निघाला. संभाजी राजाच्या सैन्याची व त्याची वांदीवॉशला गाठ पाडली. झगडा झाला. दोघांची सारखीच; परंतु बरीच नुकसानं झाली तेव्हा महमद सादीक बाकीच्या सैन्यानिशी त्याच्या मदतीस गेला."[१४१] ३० सप्टेंबर १६८८ ला लंडनला लिहिलेल्या पत्रात कर्नाटकातील परस्थितीचे वर्णन मद्रासकर असे करतात, की कुतूबशाहीच्या मुलूखात सर्वत्र जुलूमजबरदस्ती व अस्थीरता चालू आहे. जिंजीपासून पोर्टो नोव्होपर्यंत प्रदेश संभाजीच्या सैन्याच्या ताब्यात आहे आणि त्यानी सेंट थॉमेपर्यंतचा मुलूख लुटून फस्त केला आहे. त्याच्या सत्तेचे चिन्ह म्हणून हिरवी पाने सर्वत्र रस्त्यात टांगलेली आहे हे गडकिल्ल्यात बंदोबस्ताने असून मोगली फौजांशी टक्कर देऊ शकतील.[१४२] अशा प्रकारे हरजीराजे महाडिक यांने कर्नाटकामध्ये मोगलाच्या सैन्याचा प्रतिकार करून मराठ्यांचे राजे वर्धीस नेऊन त्याचा चांगला बदोबस्त केला होता.

---

[१४१] *बेंद्रे वा.सी. : श्री छत्रपती संभाजी महाराज यांचे विचिकित्सक चरित्र, मनोरमा प्रकाशन,मुंबई ,२००१ (तृतियावृती) पृ.क्र.६२०-२१.*

[१४२] *बेंद्रे वा.सी. : उपरोक्त पृ.क.६२२-२३.*

१२ जुलै १६८९ ला बातमी आली की, डचांनी मद्राहून औरंगजेबासाठी पाठवलेला फार मोठा नजराणा वाटेत संभाजी राजाच्या लोकांनी लुटला. या भांडणात जरी मोगलाची सैना सारखी वाढत होती तरी दोघांनाही चढाईत निश्चित विजय मिळत नव्हता. २७ ऑगस्ट १६८९ ला मद्रासे इंग्रज लिहितात की, "मोगली आणि जिंजी प्रांतातील संभाजीराजाच्या सैन्यात लढाया चालूच आहे. मराठ्यांनी तितक्याच यशस्वीपणे प्रतिकार केला आहे. मराठे जरी इतराप्रमाणे बहुसंख्ये नसले तरी निर्धारित आहेत."[१४३] २९ सप्टेबर १६८९ ला हरजीराजे महाडिक यांचा आजारपणामुळे मृत्यू झाला. यानंतर त्यांची पत्नी संभाजी राजाची थोरली बहीण अंबिकाबाई व संताजी भोसले यांनी आपल्या सहकार्यासोबत कर्नाटकचा कारभार सांभाळला. यांच सुमारास स्वराज्यामध्ये राजाराम सत्तेवरती येऊन २६ सप्टेबर १६८९ ला पन्हाळ्यावरुन जिंजीच्या दिशेने निघाला होता. २ नोव्हबर १६८९ रोजी राजाराम जिंजीस सुखरुप पोहचला. तेव्हा कर्नाटकाचा संपूर्ण कारभार त्याच्याकडे सोपविला. या बाबत ६ नोव्हबर १६८९ च्या कोनीमेरच्या पत्रातील मजकूर, "राजाराम जिंजीच्या किल्ल्यात आल्यनंतर त्यानी सर्व अधिकाऱ्यास भेटीस बोलाविले. त्याप्रमाणे त्यांनी आपली बहीण अंबिकाबाई हिला ही सरकारी खजान्याबद्दल विचारना केली. तेव्हा तीने राजारामाल तीन लाख पगोडे व संताजी राजे याजकडून एक पगोडे दिले."[१४४]

एकंदरीत असे की, संभाजी राजाच्या कारकिर्दीत मराठ्यांचे कर्नाटकातील राज्यात दुप्पटीने वाढ झालेली होती व ते योग्य बंदोबस्तातही ठेवले होते. कर्नाटक राज्याचे महत्त्व ओळखून संभाजी राजानी आपला मेव्हुणा हरजीराजे महाडिक याची कर्नाटकाचा सरसुभेदार म्हणून नेमणूक केली व त्यांना तेथील सर्व अधिकार दिले होते. तसेच त्यांच्यावर पूर्ण विश्वास ठेवून त्यांना वेळोवेळी मदत व प्रत्साहान दिले. त्यामुळेच कर्नाटकातील मराठ्यांचे राज्ये आबादीत राहीले. ते राज्य जर राहीले नसते तर संभाजी राजानंतर मराठ्यांचे राज्य हे लवकरच नष्ट झाले असते. त्याचप्रमाणे राजारामाला कुठे ठावठिकाणाच मिळाला नसता.

---

[१४३] *बेंद्रे वा.सी. :उपरोक्त श्री छत्रपती संभाजी महाराज यांचे विचिकित्सक चरित्र, मनोरमा प्रकाशन,मुंबई ,२००१ (तृतियावृती) पृ.क.६२४.*

[१४४] *बेंद्रे वा.सी. : उपरोक्त पृ.क्र.६२९.*

त्याचबरोबर संभाजी राजानी आपले चुलते व्यंकुजीराजे भोसले यांच्याशी चांगले संबंध वृंधीगत करून कर्नाटकामध्ये मराठ्यांची स्वतंत्र्य आघाडीच निर्माण केली होती. यामुळेच पुढे राजाराम महाराज संकटात असतानाच तंजावरच्या व्यंकोजी राजाच्या वारसाने दुसरे शहाजीराजे भोसले यांनी मोलाचे सहकार्य केले. कर्नाटकातील खजीना व शहाजीराजा यांच्या सहकार्यावर सुरुवातीच्या काळामध्ये राजारामाने मोगलाशी संघर्ष चालू करून स्वराज्याचे संरक्षण केले होते.

## ५.८ संभाजी महाराजाचा सागरी सत्तेशी झालेला संघर्ष

छत्रपती शिवाजी महाराजांनी आपल्या स्वराज्याच्या सीमा वाढवून संपूर्ण कोकणचा प्रदेश आपल्या ताब्यात आनला होता. त्यामुळे त्याचा संबंध तत्कालीन सागरी किनारपट्टीवर असलेल्या सत्तेशी सिद्दी, इंग्रज, पोर्तुगीज, डच, फ्रेंच या आरमारी सत्तेशी आला. त्याचा प्रतिबंध करण्यासाठी प्रथम शिवाजी राजांनी आरमाराची स्थापना केली व आरमारच्या तळावर सागरी सत्तांना शह देण्याचा प्रयत्न केला. शिवाजी महाराजांच्यानंतर संभाजी राजांनीही सागरी सत्ताशी संघर्ष चालूच ठेवला. त्यामध्ये मोगल बादशहाने सागरी सत्तांना मराठ्यांच्या विरुद्ध लढण्यास प्रवृत्त केल्यामुळे अधिकच तीव्र झालेला दिसतो.

### ५.८.१ जंजिऱ्याचा सिद्दी व मोगल आरमार :

ॲबेसियानातून भारतामध्ये आलेल्या सिद्दीनी मुरुड जंजिराच्या सभोवतालच्या परिसरामध्ये आपली सत्ता प्रस्तापित केली होती. सिद्दीच्या याच प्रदेशाला हबसाण म्हणून संबोधिले जात होते. या हबसाणात जंजिरा कोट, मुरुड, नांदगाव, मांडले, श्रीवर्धन, म्हसळे, गोवळे व पंचायतन असे महाल होते. त्याचे एकूण क्षेत्रफळ सूमारे ३२५ चौरस मैल होते. या हबसाणाच्या उत्तरेस कुंडलिका नदी किंवा रोहयाची खाडी पूर्वेस कुलाबा जिल्हातील रोहा, माणगाव व महाड तालुक्याचा भाग, दक्षिणेस सावित्री नदी किंवा बाणकोटची खाडी आणि

पश्चिमेस अरबी समुद्र आहे.[१४५] छत्रपती शिवाजी महाराजांनी कोकणात आपली सत्ता प्रस्तापित केली. त्यावेळी जंजिऱ्याची सत्ता सिद्दी अंबरचा मुलगा युसूफजान याच्याकडे होती. १६५९ मध्ये शिवाजीराजानी व्यंकोजी दत्तोंना पाठवून त्याचा बराच प्रदेश आपल्या ताब्यामध्ये आणला होता. तसेच १६०० च्या सुमारास इंग्रजांच्या मदतीने जंजिरा गड घेण्याचे प्रयत्न चालवल होते; परंतु त्यात यश आले नाही. पुढे इ.स. १६६७ मध्ये शिवाजी राजांनी जंजिऱ्यास वेढा देऊन त्यावेळीचा हवलदार फत्तेखान यास जेरीस आणल्यामुळे त्याने हा किल्ला शिवाजी राजास देऊकेला; परंतु इतर सिद्दीनी त्याचा विरोध करून त्यास एका रात्रीत ठार केले. खैरातखानने जंजिऱ्याची सत्ता आपल्या हातामध्ये घेऊन मोगलाची मदत मागीतली. यावेळी सिद्दी रतबंळ व सिद्दी कासम यांनी मोगली आरमारासह खैराजखानास मदत केली. यामुळे जंजिरा किल्ला बचावला शिवाजी राजांची जंजिऱ्यावरील हल्ले थंडावले. जंजिऱ्याचा सिद्दी पुढे इंग्रज व पोर्तुगीजाच्या सहयाने शिवाजी महाराजांच्या प्रदेशात उपद्रव करत असे. त्याला पायबंद घालण्यासाठी इंग्रजांना धमकावले. इ.स.१६७२च्या सुमारास इंग्रजांची मुंबईवरुन सिद्दीला कोणतेही मदत मिळू नये म्हणून खादेरी गड बांधण्याचा बेत केला. तेव्हा मोगल व सिद्दीनी मराठ्यांवर आक्रमण केले. त्यामुळे खांदेरी येथे गड बांधणे शक्य झाले नाही. त्यानंतर १६७४ दौलतखान, मोरोपंत १६७८, चौल सुभेदार, कल्याण भिवंडी सुभेदार दौलतखाना मार्फत जंजिऱ्याच्या सिद्दीवर आक्रमण करून जंजिरा घेण्याचा प्रयत्न शिवाजी महाराजांनी केला; परंतु त्याना यश आले नाही.

छत्रपती संभाजीराजे यांनी आपल्या वडिलांप्रमाणे जंजिऱ्याच्या सिद्दीबरोबर संघर्ष चालूच ठेवला. संभाजीराजे सत्तेवर आल्यानंतरही सिद्दीच्या स्वराज्याच्या प्रदेशातील कारवाया चालूच होत्या. त्यामुळे इंग्रजाना तंबी देऊन चालणार नाही. हे जाणून इंग्रजांच्या राजापूरच्या वखारी जवळ दौलतखानाच्या नेतृत्वाखाली ४-५ हजाराचे सैन्य ५० गलबते देऊन सज्ज ठेवले. यामुळे इंग्रज, पोर्तुगीज व सिद्दी तिघांवर वचक बसला. पुढे डिसेंबरच्या पहिल्या दोन

---

[१४५] *बेंद्रे वा.सी. : श्री छत्रपती संभाजी महाराज यांचे विचिकित्सक चरित्र, मनोरमा प्रकाशन,मुंबई ,२००१ (तृतियावृती) पृ.क्र. ४२५.*

आठवड्यात सिद्दीचे आरमार वेंगुर्ल्याकडे लुटालुट करावयास गेले. त्याचा प्रतिकार करण्यासाठी दौलतखान आपले आरमार घेऊन त्याच्या पाठलागावर गेला.[१४६]

२० नोव्हबर १६८० रोजी संभाजी महाराजानी सिद्दीचा बंदोबस्त करण्यासाठी अपला निष्णात वकील आवजी पंडित यास इंग्रजाकडे मुंबईला पाठविले. इंग्रजाच्या व सिद्दीच्या मुंबईतील हालचालीवर गुप्तपणे नजर ठेवण्याचे सांगितले होते. याबद्दल आवजी पंडितांनी इंग्रजाना सांगितले, "शिवाजी महाराजांशी झालेल्या तहाप्रमाणे मुंबईकरांनी सिद्दीचा बंदोबस्त केला नाही तर संभाजीराजे इंग्रजाविरुद्ध युद्ध पुकारतील संभाजी राजांचा वकील आलेला पाहताच सिद्दीने आपले आरमार बंदराबाहेर नांगरले संभाजी राजांच्या आरमारला तोंड द्यावयाची त्याची तयारी नव्हती. सिद्दीचा कायमचा बदोबस्त झाला नाही तर त्याच्या अमानुष लुटमारीच्या बंदोबस्तसाठी किनाऱ्यावर सतत दहा हजार माणसे निष्कारण आडवावी लागतील संभाजीराजे इंग्रजाशी मैत्री ठेवण्यास तयार असले तरी ते यापुढे हा उपद्रव सहन करणार नाहीत. सिद्दीची मदत ताबडतोब थांबवून त्याला आरमारासह बाहेर काढले नाही आणि त्याची मदत चालूच राहिली तर महाराजानी मुंबईवर स्वारी करण्याचा निश्चय केला आहे."[१४७]

संभाजी महाराजांनी इंग्रजांना दिलेल्या तंबीमुळे इंग्रजापुढे पेच निर्माण झाला. कारण याच काळामध्ये लंडनला माल पाठविण्यासाठी गलबते जाणार होती. त्यामुळे तो संभाजीलाही व सिद्दीला ही नाखूष करून चालनारे नव्हते. यासर्व पार्श्वभूमीवर इंग्रजानी मराठ्यांशी गोड बोलून झुलवत ठेवण्याचे धोरण अवलंबिले. सिद्दीसी बोलणी करण्यासाठी कॅगरी आणि राबर्ट थारविन यांना दि. २० डिसेंबर १६८० रोजी पाठविले. सिद्दीने मराठ्यांच्या प्रदेशात लुटमार करून तोंडी व लेखी वचन मोडल्याची जाणीव करून दिली. पुढे जर असेच चालू राहीले तर इंग्रज त्याच्याशी शत्रुत्व स्वीकारून मोगल बादशहाशी केलेला तह मोडतील असे बजावले. तसेच संभाजी राजाच्या प्रदेशात उपद्रव देणार नाही असे लेखी देण्यास तयार नसेल तर त्याला आपल्या आरमारासह मुंबईच्या बाहेर जाण्यास बजावले याचा थोडाफार उपयोग

[१४६] *गोखले कमल श्रीकृष्ण : शिवपुत्र संभाजी , ज्ञान-विज्ञान विकास मंडळ, पुणे १९७१(पहिली अवृत्ती) पृ.क्र.१२६.*
[१४७] *गोखले कमल श्रीकृष्ण : शिवपुत्र संभाजी, उपरोक्त पृ.क.१२६.*

झाला. यावेळी आवजी पंडित मुंबईत पाच-सहा महिने ठाण माडून बसल्यामुळे इंग्रज व सिद्दीला जबर बसली.

सिद्दी हा जास्त वेळ शांत बसण्याऱ्या पैकी नव्हता. त्याने पुन्हा आपल्या कुरापती चालू केल्या. इंग्रजाच्या सहकार्याने मुंबई व उंदेरीवर राहुन मराठी प्रदेशात उपद्रव करत असल्यामुळे संभाजी राजांनी उंदेरी घ्यायचे ठरवले. यावेळी मराठ्यांची २२ गलबते आणि ३००० नाविक नागोठ्यास सज्ज होते. त्यांना प्रोत्साहन देण्यासाठी महाराजांनी सहा महिन्याचा अगाऊ पगार दिला होता. शिवाय जो कोणी ही मोहीम यशस्वी करील त्याला दोन दोन शेर सोन बक्षीस म्हणून देण्याचे कबूल केले होते. यामुळे मराठ्यांनी आपल्या हालचाली सुरू करून १८ जुलैला संभाजी राजांच्या लोकांनी पहाटे उंदेरीवर हल्ला चढवला ४ तास भांडण झाले. पुष्कळ पडले व काही मारले गेले. सिद्दीच्या लोकांनी हल्ला परतवला.[१४८] यानंतर सिद्दीनी इंग्रजानाही त्रास देण्यास सुरुवात केली. त्याने इंग्रज दलालाकडून पैशाची मागनी केली मुंबईच्या वखारीची नासघूस सुरु केली. यामुळे मुंबईकरांनी त्यांच्याविरुद्ध सुरतकराकडे तक्रार केली. त्यानी कोणीही इंग्रज नागरिकाने सिद्दीच्या नोकरीत जाऊ नये कोणी गेल्यास त्याला दंड आकारण्यात येईल असा हुकूम काढला.[१४९] इंग्रजानी दिलेल्या धमक्याची सिद्दी दखल न घेताच त्याने मराठ्यांच्या नागोठाणे, आपटे व चौऊल या परिसराची मोठी लुटमार व जाळपोळ चालूच ठेवली. या परिस्थितीत सिद्दीच्या विरुद्ध आक्रमक धोरण स्वीकारण्याचे ठरवून जंजिऱ्यावर लक्ष केंद्रित केले.

इ.स. १६८१ च्या डिसेंबर महिन्याच्या शेवटी संभाजी राजांनी स्वतःच्या नेतृत्वाखाली शहजादा अकबराला घेऊन २०,००० सैन्यासह जंजिऱ्यास वेढा दिला होता. सतत पंधरा दिवस तोफांचा मारा केल्यामुळे जंजिऱ्याच्या भिंती जमीनदोस्त झाल्या होत्या. याचवेळी मुघलाचा सुभेदार याकुतखान हा जंजिऱ्यास होता. त्याने औरंगजेब बादशहास कळविले होते की, "शिवाजीचा मुलगा संभाजी याने पाच तोफा जंजिऱ्यावर लावल्या आहेत.

---

[१४८] *बेंद्रे वा.सी. : श्री छत्रपती संभाजी महाराज यांचे विचिकित्सक चरित्र, मनोरमा प्रकाशन,मुंबई ,२००१ (तृतियावृती) पृ.क्र.४४५-४६.*

[१४९] *मोहोड शालीनी मधुकरराव : शिवपुत्र छत्रपती संभाजीमहाराज,कलादत्त प्रकाशन पुणे, २०१२ पृ.क्र.१४३.*

किल्लेदाराबरोबर मुकाबला केला तोफा चालविल्या दारुचे गोळे किल्ल्यात सतत फेकले जात होते. प्रत्येक तोफगोळ्याचे वजन पावणे चार शेर होते. या माऱ्यामुळे सिद्दी खैरात आणि सिद्दी कासम यांना एका लहान टेकडीवर आसरा घ्यावा लागला. त्यांच्या होड्या वाटेत सारख्या खेपा घालीत असल्यामुळे मराठी सैन्याला जंजिऱ्यावर जाण्यात आडचण निर्माण झ ाली. सैन्याला जाण्याचा मार्ग काढण्यासाठी संभाजीराजांनी आठशे चौरस वार रुंद आणि तीस वार लाब जंजिऱ्याची खाडी दगड, लाकूड, कापसाच्या गाठी यांनी भरुन काढण्याचा प्रयत्न केला; परंतु त्यावेळी समुद्र खवळलेला असल्यामुळे या प्रयत्नाचा फारसा उपयोग झ ाला नाही."[१५०]

या वेढ्या संदर्भात मुंबईकर इंग्रज लिहितात, "संभाजी खासा हा वेढा चालवित आहे... दंडाराजपुरीवर सारखा तोफखाना चालूच आहे. सिद्दी खैरातला आता गडावर निवाराच न राहील्याने त्यास तेथून निसटूनच जावे लागले. सारखा दारुगोळा पाठविण्यात येत आहे व जोपर्यंत सिद्दी तह करीत नाही तोपर्यंत किंवा किल्ला साफ नाहीसा करेपर्यंत तो मारुन काढण्याचा संभाजीराजानी निग्रह केला आहे. सिद्दीने आपले थोडे थोडे आरमार मुंबई बंदरात आणण्यास सुरुवात केली आहे; परंतु याचवेळी मोगल सुभेदार हसन अलीखान कल्याने भिवंडीला वेढा घातल्यामुळे संभाजीराजे व अकबर आपल्या खास सैन्यानिशी दंडाराजपुरीहुन मोगली परचकाला तोंड देण्यासाठी घाईने निघून गेले व वेढ्याचे काम दादाजी रघुनाथकडे सोपविले. वेढा चालूच राहीला."[१५१] १६८२ च्या फेब्रुवारी महिन्याच्या आखेरीस संभाजीराजे आणि अकबर जंजिऱ्याच्या आघाडीवरुन माघारे आले राजे गंगोलीला आणि अकबर शहापूरला गेला. संभाजी राजांनी जंजिऱ्याच्या वेढ्याची संपूर्ण जबाबदारी यावेळी दादाजी व विसाजी रघूनाथ यांच्याकडे सोपविली होती. त्यांच्या मदतीला मैया नाईक, गोविंदराव काटे, दौलतखान, कावजी मोहमद, गोविंद कान्हो, गोविंदजी जाधव आणि संभाजी पावला इत्यादी सरदार आणि ४००० सैनिक होते.

[१५०] *गोखले कमल श्रीकृष्ण : शिवपुत्र संभाजी , ज्ञान-विज्ञान विकास मंडळ, पुणे १९७१(पहिली अवृत्ती) पृ.क्र.१३१.*
[१५१] *बेंद्रे वा.सी. : श्री छत्रपती संभाजी महाराज यांचे विचिकित्सक चरित्र, मनोरमा प्रकाशन,मुंबई ,२००१ (तृतियावृती) पृ.क्र.४४७-४८.*

या दुर्घट कामात उत्तेजन मिळावे म्हणून महाराजांनी अर्धा शेर सोने किंवा चांदीची कडी बक्षीस दिली. सिद्दी कासमचे आरमार मुंबईस गेल्याचे कळताच दादाजीच्या सैन्याने एके दिवशी मध्य रात्रीच्या वेळी जंजिऱ्याच्या कोटाला शिड्या लावून आत शिरण्याचा प्रयत्न सुरु केला. किल्ल्यातील लोकांनी केलेल्या दगडाच्या वर्षावात मराठ्यांचे ५०० लोक मेल्यामुळे निराश होऊन दादाजी रघुनाथला माघार घ्यावी लागली.[१५२] पुढे हा वेढा १६८२ च्या ऑगस्ट महिन्यापर्यंत चालू होता. मोगलाच्या वाढत्या आक्रमणास प्रतिकार करण्यासाठी अनेक अघाडयावर सैन्य पाठवावे लागत असल्यामुळे संभाजी राजांनी जंजिऱ्यास दिलेला वेढा उठवावा लागला.

जंजिऱ्याच्या सिद्दीवर नजर ठेवण्यासाठी जंजिऱ्याना वेढा देण्याच्या आगोदरच 'एलिफंटा' या बेटा जवळचे बेट घेऊन तेथे किल्ला बांधण्यास सुरुवात केली होती. इंग्रज, पोर्तुगीज आणि आरब यांच्याशी मैत्री करून सिद्दी व मोगल यांचा बंदोबस्त करण्याचे प्रयत्न केले होते. संभाजी राजाचे खंदेरी महत्त्वाचे ठाणे होते. तेथून त्यांनी उंदेरीवरील सिद्यांचा बंदोबस्त केला होता. पुढे संभाजी राजांनी मुंबईजवळ आणखी एका खडकाळ बेटावर तटबंदी उभारण्याचा प्रयत्न चालविला होता तो कुलाबा किल्ला असावा. सागरी सत्तेचा बंदोबस्त करण्यासाठी संभाजी महाराजांनी पद्मदुर्ग व कुलाबा अशी दोन कोट बांधलेली होती इ.स. १६८९ च्या अखेर पर्यंत ही कोट मराठ्यांच्या ताब्यातच होती.

### ५.८.२ इंग्रज संभाजी राजे संबंध :

शिवाजी महाराजांचा सर्वप्रथम इंग्रजाशी सबंध सिद्दी जोहरने पन्हाळ्यास घ्यातलेल्या वेढयावेळी आला होता. कारण राजापुरच्या इंग्रजानी इ.स. १६६० च्या एप्रिलात सिद्दी जोहारला 'ग्रेनेडस्' विकून पन्हाळ्याच्या वेढ्यास मदत केली होती. यामुळे इ.स.१६६१ च्या मार्च महिन्यात शिवाजी महाराजांनी राजापूरची वखार लुटून तेथील इंग्रजाना कैदेत टाकले होते. त्यानंतर १६६४ ला सुरत लुटीच्या वेळी त्यांनी मराठ्यांचा दणका पाहिला होता. यामुळे शिवाजी महाराजांची चांगलीच दहशत इंग्रजांना बसली होती. तसेच जंजिऱ्याच्या सिद्दीस

[१५२] *गोखले कमल श्रीकृष्ण : शिवपुत्र संभाजी , ज्ञान-विज्ञान विकास मंडळ, पुणे १९७१(पहिली अवृत्ती) पृ.क्र.१३१-३२.*

इंग्रज मदत करत असल्यामुळे शिवाजी महारजांनी इंग्रजांचे शत्रू डचांच्या मदतीने जंजिरा घेण्यासाठी प्रयत्न चालवल्यामुळे इंग्रजांनी शिवाजी महाराजांशी मैत्रीचे संबंध प्रस्तापित करण्यासाठी आपला वकिल शिवाजी महाराजांकडे पाठविला. शिवाजी महाराजांनी इंग्रजानं सिद्दीला मुंबई बंदरावर आश्रय न देता कोणत्याही प्रकारची मदत करू नका. अशी ताकीद केली. तसेच इंग्रजाना तोफा दारुगोळ्याची मागणी केली; परंतु ती इंग्रजानी पूर्ण केली नाही. त्यानंतर खांदेरीच्या बेटावरुन इंग्रज-शिवाजीराजे यांच्यात संघर्ष झाला शेवटी इंग्रजानी खांदेरीवरील मराठ्याचे अधीपत्य मान्य केले. इ.स. १६८० च्या जानेवारीत शिवाजी महाराजांकडे आपला वकील पाठवून तह केला. त्यात सिद्दीला मदत न करण्याचे अश्वासन दिले. तसेच मराठ्यांच्या प्रदेशात कोणासही उपद्रव करू न देता पाहारा घालण्याचे मान्य केले होते.

संभाजी महाराज शिवाजीराजांच्या मृत्यूनंतर सत्तेवर आल्यानंतर लगेचच इंग्रजांनी इ.स. १६८० च्या मे महिन्यात राजापुरच्या इंग्रजांनी आपल्या मालमत्तेसह परत जाण्यास परवानगी मागितली. यावेळी राजापूरकर इंग्रजांनी पन्हाळगडी असलेल्या संभाजी महाराजांकडे अर्ज केला तेव्हा संभाजी महाराजांनी उत्तर दिले की, "तुर्त मला सवड नाही हातात इतर कामे आहेत सवड होताच हिशेब पाहून निकाल करू."[१५३] असे नकारार्थी उत्तर राजांनी दिले. १८ जून १६८० ला रायगडावर संभाजीराजे आल्यानंतर इंग्रजांनी आपली माणसे पाठविली आणि पुन्हा बक्षिसाचाही प्रश्न काढला. त्यावेळी संभाजी राजांनी उत्तर दिले की, हिशेब वगैरे पाहून नतंर आज्ञा होईल. यावेळी इंग्रज रायगडावर तीन महीने राहून २५-१०-१६८० ला राजापूरला परत गेली. त्या अगोदर संभाजीराजांनी आपला वकील १३ ऑगस्ट १६८० मुंबईकर इंग्रजांकडे पत्र देऊन पाठविला होता. त्यात त्यांनी सिद्दीला सर्वतोप्रकारे मदत मुंबईत मिळते. याबद्दल तक्रार केली असून शिवाजी राजाबरोबर केलेला तह पुन्हा मुकर करण्याकरिता इंग्रज वकील पाठवावा तशी वागणूक करा आणि ताबडतोब वकिलांचे हाती उत्तर द्या म्हणून लिहिले होते. रायगडावरुन परत आलेल्या राजापूरकरांनी

[१५३] *गोखले कमल श्रीकृष्ण : शिवपुत्र संभाजी , ज्ञान-विज्ञान विकास मंडळ, पुणे १९७१(पहिली अवृत्ती) पृ.क्र.१२३.*

सुरतेला कळविलेला मजकूरही तसाच होता. तो असा की, "मूळ कराराप्रमाणे सिद्दीच्या बाबतीत इंग्रज काही करीत नसल्यामुळे इंग्रजाच्या बद्दल आपल्या मनात आदर नाही असे संभाजी म्हणतो. सिद्दीला घालवून लावेपर्यंत तो आपले काहीच काम करणार नाही. उलट पूर्वी मिळालेल्या बक्षिसाच्या रक्कमेची परत मागणी करील; परंतु सिद्दी बेट सोडून जाईल तर अधणीची लूट वगैरे सर्व बाबतीत पूर्वी शिवाजीच्या वेळेपासून चालले होते तसेच स्नेहाने तो चालवी असे दिसते."[१५४]

२० नोव्हेंबर १६८० मध्ये संभाजी महाराजांनी आपला वकील आवजी पंडित यास मुंबईस पाठविले. पूर्वी शिवाजी महाराजांशी झालेला तह पूर्णपणे मान्य करून घेऊन इंग्रजांना सिद्दीचा पुरता बंदोबस्त केला नाही तर युद्ध पुकारण्याची धमकी दिली. यामुळे मुंबईकर इंग्रजांनी सिद्दीकडे आपले वकील पाठवून त्यास समज दिला; परंतु यावेळी मुंबईकरांनी दुटप्पी धोरण अवलंबिले. कारण त्यांच्या माल लंडनला पाठविण्याचा तो मोसम होता. त्यामुळे लंडनला गलबते जाईपर्यंत संभाजीराजांच्या वकीलाला व सिद्दीला गोडीने ठेवून थोडे दिवस काढायचे ठरविले होते. मुंबईकरांनी वेळोवेळी कळवूनही सुरतकर आपले सिद्दी धार्जिने धोरण सोडावयास तयार नव्हते. संभाजी राजांशी गोडीगुलाबीने वागण्याचा सल्ला ते मुंबईकराना देत असत. त्यामुळे संभाजी आणि सिद्दी यांना खूश ठेवणे मुंबईकरांना जड जात होते. यावेळी दुटप्पी धोरणाने कसे वागावे हे सांगताना सुरतकर दि. १० फेब्रुवारी १६८२ ला लिहितात, "सिद्दीची तक्रार खोटी आहे यात शंका नाही परंतु राजांना मदत देणे जरुरच असेल तर ती गुप्तपणे द्या औरंगजेब सध्या तिकडेच स्वारीवर आहे. त्याच्याजवळ फार मोठे सैन्य आहे तरी सिद्दीला दुखवू नका.[१५५] मोगलाच्या भितीमुळे सिद्दीला काहीच हालचाली करावयाची नाही असे सुरतकरानी ठरविले होते.

इ.स. १८८२ च्या ऑक्टोबर-नोव्हेंबर महिन्यात मोगलानी मराठ्यांच्या सर्वच प्रदेशावर जोरदार आक्रमण केली. अशा वेळी सिद्दी, मोगल आणि इंग्रज एक झाले तर मराठी राज्यावर मोठे संकट ओढावेल या कारणामुळे संभाजी राजांनी इंग्रजाशी मैत्री करून त्याना

[१५४] *गोखले कमल श्रीकृष्ण : शिवपुत्र संभाजी , ज्ञान-विज्ञान विकास मंडळ, पुणे १९७१(पहिली अवृत्ती) पृ.क्र.१२५.*
[१५५] *गोखले कमल श्रीकृष्ण : उपरोक्त पृ.क.१३४.*

मोगलास मदत करण्यापासून परावृत्त करणे गरजेचे होते. त्यासाठी संभाजी राजांनी (दि. २४ आक्टोंबर १६८२ पूर्वी) आपला वकील प्रल्हादपंतास मुंबईकर इंग्रजाकडे पाठविले. २०ऑक्टोबर प्रल्हाद निराजीस आणण्याकरिता मुंबईकरानी बलुन पाठविले प्रल्हाद निराजीने सिद्दी बाबत तक्रार केली त्यांनी आणलेली पत्रे सुरतेस पाठविली. पत्राच्या उत्तरासाठी पंधरा दिवस मुंबईतच ठेवून घेतले. सुरतकराची पत्रे बरीच उशिरा पोचल्यामुळे प्रल्हाद निराजी वाट पाहून कंटाळला होता. तो तेथे फार काळ राहण्यास तयार नव्हता. त्यामुळे मुंबईकरानी २८ नोव्हेबर पत्रातात लिहितात की, "स्मिथच्या बरोबर पाठविण्यास आमचेकडे कोणी नाही. शिवाय बक्षिसालायक वस्तुही येथे नाहीत. तुम्हास रुचतील त्या पाठविने मात्र लक्षात ठेवावे की, आपल्याकडून सिद्दीस कशी हरतऱ्हेने मदत होत असते ते वकीलाने प्रत्यक्ष पाहीले आहे. त्यामुळे तो गरमच आहे तरी चांगले बक्षिस व इंग्रज वकीला बरोबर न पाठविल्यास बरे होणार नाही असे वाटते."[१५६] २० डिसेंबरला प्रल्हादपंत व स्मिथ व त्याच्या बरोबरीत इतर लोकाची रवानगी केली; परंतु त्यास सिद्दीने आडविल्यामुळे ते परत आले. नंतर २२ डिसेंबरला त्याची पुन्हा रवानगी झाली. अशाप्रकारे सुरतकरांनी संभाजी राजाच्या वकीलास दोन महिने रखडून पाठविल्यामुळे स्मिथलाही रायगडावर गोड बोलून काहीही न देता पत्र आणि फर्माने नंतर पाठवितो म्हणून माघारी पाठवून दिले.

इ.स. १६८२ च्या ऑक्टोबर मध्ये संभाजी राजानी गोवेकर पोर्तुगीजाव आक्रमण करून कोळवा, दतौरा, सारगाव, सुपारा ही ठाणी घेतल्यामुळे इंग्रजांना मराठ्यांची भिती वाटू लागली त्यामुळे त्यांनी सुरतकराकडे याबाबद विचारणा केली; परंतु सुरतकरानी उलट मुंबईकराची कानउघडणी केली. भितीची चिंता न बाळगण्याचा सल्ला दिला. या सुरतकराच्या धोरणामुळे व तेथील चाइल्ड आणि वार्ड याच्या जुलमामुळे मुंबईतील जनता कंटाळली होती. त्यांनी ईस्ट इंडिया कंपनीची सत्ता झुगारुन दिली व मुंबई बेट व कोट हे स्वतंत्र राज्य म्हणून जाहीर केले. सर्वाच्या संमतीने रिचर्ड केजविन यास गर्व्हनर म्हणून निवडले. त्यास तत्कालीन इंग्लडचा राजा चार्लस याने ही मान्यता दिली. रिचर्ड केजविन

[१५६] *बेंद्रे वा.सी. : श्री छत्रपती संभाजी महाराज यांचे विचिकित्सक चरित्र, मनोरमा प्रकाशन,मुंबई ,२००१ (तृतियावृती) पृ.क्र.५०३.*

गर्व्हनर होताच त्याने मुंबईच्या संरक्षाणाची सर्व जबाबदारी स्वतःवर घेतली. त्यावेळीच्या राजकीय परिस्थितीची २८-०१-१६८४ च्या पत्रात इग्लंडच्या राजाला कळवतो, "आपल्या शेजारी असलेल्या संभाजीसारख्या बलवान राजाने पोर्तुगीजांचा ४० मैल लांबीचा प्रदेश बेचिराख करून लिंगभेद न मानता खिश्चनांची कत्तल केली आहे. आता तर त्याने आपल्या ताब्यातील एलिफंटा आणि करंजाही घेतले आहे. ३०,००० सैन्य घेऊन आपला बलवान शेजारी संभाजी सरहद्दीवर आपल्याला धमकी देत आहे आमच्याजवळ फक्त १५० इंग्रज आणि २०० काळे टोपीवाल आहेत. मुंबई राजकीय बदल झाला तेव्हा संभाजी राजांचा एक वकील मुघलांच्या कैदेत होता. त्याचा शिरच्छेद करावयाचा त्याच्या विचार होता; परंतु मुंबईत तुमचा अमल सुरु झाल्याचे समजताच तो कैदी माझ्याकडे पाठविण्यात आला. मी त्याला सुखरुपणे संभाजीकडे पाठविले. संभाजी राजांनी आमच्याकडून ४०० पिपे बंदुकाची दारु, ६० मोठया तोफा ४००० पौड कथिल, ४०० वार कापड, १५० लहान बोटी आणि एक मोठी बोह इत्यादी गोष्टीची मागणी केली आहे. या गोष्टी पुरविल्या नाहीत तर राजाने आपला नाश करण्याची धमकी दिली आहे.[१५७] ही माहिती इग्लंडच्या राजाना कळवण्यामागचा हेतू संभाजीराजाशी तह करावा हा होता.

नवीन मुंबईच्या गव्हर्नरने संभाजीराजाशी मैत्रीचे सबंध ठेवण्यासाठी आपला वकील २६ एप्रिल १६८४ पूर्वी संभाजी राजाकडे पाठविला. यावेळी संभाजीराजे बिखाडीस होते. तेथे कॅप्टन गॅरी थॉम्स विल्केन्स आणि राम शेणवी हा दुभाषी हे तिघे संभाजीची भेट घेऊन मुंबईचा गव्हर्नर केजविनची मैत्री करण्याची इच्छा राजाना सांगितली व तह केला त्याचवेळी संभाजी राजांनी केजविनला पत्र लिहिले त्याच्या इंग्रजी मसुद्याचा सारांश असा, "सन्मान्य (राजश्री) कॅप्टन गॅरी थॉम्स विकलेन्स आणि राम शेवणी यांनी आम्हास जाहीर केले की, तुम्ही आम्हाशी मैत्री व सामोपचाराचा पत्रव्यवहार ठेवू इच्छिता. आमची तशीच फार इच्छा आहे. आता तुम्ही तुमचा मनोदय तपशिलवार लिहून पाठविला त्या तहाच्या अटीस आम्ही संमती पाठविली आहे ती मिळेलच तरी तुम्ही त्या अटीचे परीपालन करावे. आम्हीही त्या

[१५७] *गोखले कमल श्रीकृष्ण : शिवपुत्र संभाजी , ज्ञान-विज्ञान विकास मंडळ, पुणे १९७१(पहिली अवृत्ती) पृ.क्र.१४४.*

पाळू आमच्या वचनावर विश्वास ठेवुन  वागणे दिवसेंदिवस आपल्या मैत्रीचे संबंध दृढ होत जातील असे करणे ज्या ज्या वेळी आमचे प्रीतीतील कवी कलश किंवा आमचे वकील तुम्हास लिहितील त्या त्या वेळी आपण त्याची नीट दखल घ्यावी. कॅप्टन गॅरीनी आम्हास सांगितले की तुमचे व सिद्दीचे वितुष्ट आले आहे. त्यास्तव आपण त्याला काढून लावण्यासाठी आमच्या साहयाची आपेक्षा करिता तरी सिद्धी आमचा दुष्मन आणि तुम्ही मित्र म्हणून सर्वतोपरी साह्य करणे आम्हास आवश्यक आहे. तुमचा मित्र तो आमचा मित्र व तुमचा शत्रू तो आमचा शत्रू हे  जाणून तुमचे परी तुम्ही सिद्दीचा नाश करण्याचा प्रयत्न करा आणि आम्हीही तसेच करीत आहोत. तुमच्या शत्रुचा तुम्हास नाश करणे सोपे जावे म्हणून आम्ही तुम्हास सर्वतोपरी मदत करू. आपली मैत्री वृद्धिगंत होवो अधिक काय लिहावे."[१५८]

यावेळी संभाजी महाराज व इंग्रज यांच्यामध्ये झालेल्या तहामध्ये संभाजी राजांनी मुंबईसाठी ३० कलमे व कर्नाटकासाठी ११ होती त्यास मान्यता दिली होती यामध्ये मुबईसाठी तहामध्ये थोडक्यात अशा कलमे होती आतापर्यंत सर्व विसरुन मैत्रीचे संबध दृढ करण्यास मान्यता एकमेकांचा माल व कै सोडावेत एकमेकाच्या शत्रूना कोणतेही मदत करायची नाही. व्यापार वृद्धीसाठी परवानगी इत्यादी कलमे होती. कर्नाटकातील कलमामध्ये कर्नाटकामध्ये वखारी स्थापणास परवानगी इंग्रजी व्यापाराना त्रास वैगेरे देणार नाही अशी कलमे होत मुंबईकरांनी संभाजीराजाशी केलेल्या तहाला लंडहून मान्यता मिळाली व हा तह सुरतकरांना पाळण्याबाबत हुकूम देण्यात आल्यामुळे सुरतकरांची कुचंबणा झाली. तसेच सुरतकरांनी मुबईचे बेट कंपनीकडे परत मिळावे म्हणून प्रयत्न चालवले होते. त्याच्या प्रयत्नास यश येऊन १९-११-१६८५ रोजी सुरतकराना पुन्हा मुंबई बेटाचा ताबा मिळाला.

इ.स. १६८५ सालापासून इंग्रज आणि मुगलांचे संबध बिघडले. इंग्रजानी मुघलाच्य जुलमाचा प्रतिकार करण्याचे ठरविले. यासाठी संभाजी राजाशी मैत्रीचे संबंध अधिक दृढ करण्यास सुरुवात केली. थॉमस ग्रॅहम आणि केजविन लंडनला गेले होते. त्यामुळे कंपनीने तह करण्याच्या हेतूने दि. २८-१०-१६८५ रोजी सुरतकरांना जे पत्र दिले त्यामध्ये छत्रपती

[१५८] *बेंद्रे वा.सी. : श्री छत्रपती संभाजी महाराज यांचे विचिकित्सक चरित्र, मनोरमा प्रकाशन,मुंबई ,२००१ (तृतियावृती) पृ.क्र.५११.*

संभाजी महाराजाबद्दल गौरवाचे उद्गार काढून त्यांच्याशी सलोख्याचे संबंध ठेवण्याबद्दल सुचविले या पत्रात ते लिहितात,"You should enter into a close contederacy friendship with sambhaje rajah and maintain afways strict fiendship with him and then you need not feare the angr of the mogal or the Portuguese having sambhajee's country and his armes always to friend.. .. You are not to permit the mogals admiral or siddeey, nor other ships of any nation whatsoever to come wthin reach of our guns or tohave the freedom of our port of Bombay without paying duerespect to his majestg's flag... our president sir John Child shall resideat Bombay of the onvernment & Chiefship if you can obtain good terms of sambhajee rajah"[१५९] संभाजी राजाच्या गटात सामील होऊन त्याची मैत्री संपादन करा त्याच्याशी नेहमी मित्रत्वाचे संबंध राखल्याने तुम्हाला, मुघल किंवा पोर्तुगेजाना भिण्याचे कारण राहणार नाही मुंबईजवळ सिद्दी, मुघल किंवा इतर कोणलाही येऊ देऊ नका किंवा त्याना मुंबईत स्वतंत्र्य देऊ नका. याशिवाय जेव्हा जेव्हा तुम्ही कुतुबशहा, संभाजी किं वा इतर राजे किंवा राष्ट्रे याजबरोबर तह कराल त्यावेळी आमचा बादशहाचा एखादा प्रजाजन किंवा इंग्रज माणूस प्रेसिडेंटेच्या परवानगीवाचून त्याच्या देशात जाऊन राहिल्यास व त्याची मागणी केल्यास त्याला प्रेसिडेन्टकडे दिले पाहिजे.[१६०] या पत्रावरुन लंडनमध्ये संभाजी राजाशी मैत्री टिकविण्यासाठी इंग्रजानी त्याना दारुगोळा व तोफखाना देण्याचे मान्य केले. त्यसासंबंधात ३१ मार्च १६८६ ला सुरतकर आणि मुंबईकर यांना पत्र पाठवून त्यात म्हटले होते, "It wil be necessary for you to make and always keepe a strict confederacy with sambhajee rajah who is a warrlike PRINCE and the he be not the most conefat of his honour or of his keeping his leagues all those Indian princes will keepe their

---

[१५९] *मोहोड शालीनी मधुकरराव : शिवपुत्र छत्रपती संभाजीमहाराज,कलादत्त प्रकाशन पुणे, २०१२पृ.क्र.२३९.*
[१६०] *गोखले कमल श्रीकृष्ण : शिवपुत्र संभाजी , ज्ञान-विज्ञान विकास मंडळ, पुणे १९७१(पहिली अवृत्ती) पृ.क्र.१५३.*

confederacyes, so long as they agree with thrir interests and if is possible for you to make such terms with him as shall be now and for many years his interest to preserve to sweaten him wherein, you may among other things agree to fumish him constantly with so much powder, great guns and sholts and sonall arms, on reasonable terms as he shall desire proportion of powder and if you should want more you may write for what you will to fort saint George we have २६०० barsells in store, which it is full time disposet of "[१६१]

इ.स. १६८६ सालामध्ये मराठ्यांना मोगलांशी लढत असल्यामुळे संभाजी राजांनी पश्चिम किनाऱ्यावरील लक्ष कमी केले. त्यावेळी सिद्दीने मराठ्यांचे खंदेरी बेट घेण्याचे प्रयत्न चालवले. ही संधी साधून इंग्रजांनी संभाजी राजाकडे खंदेरी बेटाची मागणी केली; परंतु ती मान्य केली नाही. १६८७ सालच्या फेब्रुवारी महिन्यात त्रिबंक गोपाळ या वकीलास मुंबईकराकडे पाठविले होते. दि. १७-०९-१६८७ रोजी जार्ज वेल्डन आणि रॉबट ग्रहॅम संभाजी राजाशी बोलणी करण्यासाठी रायगडास गेले होते. त्याच्यातील काय बोलणी झाले हे मुंबईकरांनी ३० नव्होबर १६८७ च्या पत्रात लिहिले आहे. ते लिहितात "सध्या आपण धान्य सामुग्रीच्या शोधात आहोत हल्ली ते तेथे दुप्पट महाग झाले आहे. आम्ही संभाजी राजे याजवळ कार्लेबद्दल बोललो त्यात आम्ही त्याच्याशी करार केला की, त्याने आम्हास २० खंडी माल व ५०,००० रुपये रोख द्यावे आणि आम्ही त्याचा कोर्लेभाग शत्रुपासून समुद्राच्या बाजूने रक्षण करावा. त्याने आमच्यापाशी आणखीही काही करार केला असता; परंतु आम्ही सध्या एवढ्यावरच आवरते घेतले आहे. या कराराची युक्तता जाणून आम्ही मचवा व होडया पाठविल्या आहेत; परंतु अद्याप धान्य किंवा पैसा काहीच आला नाही मात्र या कराराने पोर्तुगीज व सिद्दी यांना काळजी वाटत आहे.[१६२] यानंतर १६८८ सिद्दी ने मुंबईवर आक्रमण

[१६१] *गोखले कमल श्रीकृष्ण : शिवपुत्र संभाजी , ज्ञान-विज्ञान विकास मंडळ, पुणे १९७१(पहिली अवृत्ती) पृ.क्र.१५५.*
[१६२] *बेंद्रे वा.सी. : श्री छत्रपती संभाजी महाराज यांचे विचिकित्सक चरित्र, मनोरमा प्रकाशन,मुंबई ,२००१ (तृतियावृती) पृ.क्र.५२५.*

केल्यामुळे त्याच्या संरक्षणासाठी इंग्रज गुंतून पडले संभाजी राजे मोगलाशी संघर्ष करण्यात गुंतले.

### ५.८.३ गोवेकर पोर्तुगीज - संभाजी महाराज संघर्ष :

युरोपीयन सत्तामध्ये पोर्तुगीज सर्वप्रथम भारतात आले. त्यांनीच सर्वात पहिल्यांदा आपली सत्ता भारतात स्थापन केली इ.स. १५१० मध्ये अदिलशहाकडून गोवा शहर काबीज केले. सर्वात शेवटी ते भारतातून गेले १९६१ मध्ये त्याने भारत सोडला छत्रपती शिवाजी महाराजांच्या स्वराज्य स्थापनेच्या काळात दिव, दमण, वसई, चेऊल, गोवा, साष्ट व बारदेश या प्रदेशावर पोर्तुगीजांचा ताबा होता. शिवाजी महाराजांनी स्वराज्याच्या सीमा वाढवून त्या कोकण किनारपट्टीला भिडवल्या. त्याच्या रक्षणासाठी इ.स. १६५९ मध्ये मराठी आरमाराची स्थापना केली. त्यामुळे पोर्तुगीजाला मराठी आरमाराची धास्ती बसली. शिवाजी महाराजांच्या वाढत्या सामर्थ्यास भिऊन पोर्तुगीजांनी शिवाजी महाराजांशी मित्रत्वाचे संबंध प्रस्थापित केले. इ.स. १६६० मध्ये शहीस्तेखान प्रचंड सैन्य घेऊन स्वराजावर चालून आला; परंतु त्याचा विशेष परिणाम जाणवला नाही. त्यामुळे पोर्तुगीजांनी यात शिवाजी महाराजांना विजय मिळावा म्हणून गोव्याचा  पोर्तुगीज व्हाईसराय आंतोनियु द मेलू द कास्त्रू यांने दि. २७ एप्रिल १६६३ रोजी महाराजांना पत्र पाठवून त्यात लिहिले की,"... मी आपणाला वचन देतो की, माझ्याकडून आपणाला जी काही मदत हवी असेल ती देण्यास मी कधीच कुचराई करणार नाही. मला अशा आहे की, आपण विजयी व्हाल आणि किर्ती आणि आपल्या देश बांधवाचा दरारा सर्वत्र पसरेल.[१६३]

पोर्तुगीज स्वतःला आरबी समुद्राचे सत्ताधीश समजत त्यांच्या परवान्याशिवाय कोणासही आरबी समुद्रात फिरता येत नव्हते. त्यावेळी ज्यांना कोणास समुद्रात जायचे आहे त्यांनी पोर्तुगीजाकडून 'दस्तक' (परवाना) घ्यावा लागत. शिवाजी महाराजांनी याचा विरोध केला. त्यामुळे मराठ्यांचे आरमार पोर्तुगीज पकडून नेहत. तसेच पोर्तुगीज जंजिऱ्याच्या

---

[१६३] *दारवटकर अनंत : अद्वितीय छत्रपती श्री संभाजी महाराज (खंड ४) श्रीशंभू प्रेरणा प्रकाशन, पुणे २०१२ (प्रथमावृत्ती) पृ.क्र. १७९२.*

सिद्दीला मदत करत आसल्यामुळे मराठे-पोर्तुगीज यांच्यामध्ये संघर्ष निर्माण झाला. शिवाजी महाराजांच्या अखेरच्या काळात पोर्तुगीजांशी मराठ्यांचे संबंध फारसे सलोख्याचे नव्हते. कारण इ.स. १६७५ मध्ये शिवाजी राजांने अदिलशहाच्या ताब्यातील फोडा गड जिंकून घेतला. त्यानंतर कारवार, शिवेश्वर आणि अकोल्यापर्यंतचा प्रदेश त्यांच्या ताब्यात होता. यामुळे मराठे गोव्यावर स्वारी करतील अशी भीती पोर्तुगीजांना वाटत होती; परंतु शिवाजी महाराजांच्या मृत्युमुळे हे संकट टळले.

शिवाजी महाराजां मृत्युनंतर पन्हाळगडावर असताना संभाजी राजांनी मराठी सत्तेची सर्व सुत्रे हाती घेऊन पोर्तुगीजांशी शांततेचे आणि मैत्रिचे संबंध ठेवण्यासाठी आपला वकील म्हणून रामाजी नाईक ठाकूर यास गोव्यास पाठविले होते. त्याचवेळी कोकणात शांतता राखण्यासाठी गेलल्या रायाजी पंडितानी गोव्यास जाऊन विजरईची भेट घेतली. विजरईने संभाजीला उत्तर धाडून शिवाजी महाराजांच्या मृत्यूबद्दल दुखवटा व्यक्त केला आणि संभाजीनी स्वतःच्या हातात सुत्रे घेतल्याबद्दल समाधान दर्शविले. शिवाजी महाराजांच्या वेळेपासून असलेले शत्रुत्वाचे संबध बदलल्याचेही संभाजीला कळविले. वर उल्लेख केल्याप्रमाणे संभाजीच्या तहाच्या सूचनेस गर्व्हनरने मान्यता देऊन तह कायम करण्याचे सुचवले. गर्व्हनरने रायाजी पंडिताला सांगितले की, मी माझ्या साष्ट व कुडाळ येथील फिरंगी अधिकाऱ्यांना युद्धविषयक हालचाली बंद करण्याचे हुकूम दिले आहेत. रायाजी पंडिताला परतण्याची घाई असल्यामुळे विजरईने पत्र न देता तहासंबधी तोंडी सांगुन संभाजीला भेट म्हणून सोन्याचा मुलामा दिलेली बंदूक आणि चार कापडाचे नग दिले.[१६४] २९ मे १६८० ला पोर्तुगीज विजरईने संभाजी महाराजाकडे पत्र पाठवून शिवाजी महाराजांच्या मृत्यूबद्दल दुःखवट्याचा संदेश पाठविला त्या पत्रात विजरई लिहितात की, "संभाजी राजे यास, आपले दूत रामजी नाईक ठाकूर यांच्याकडून पाठविलेले आपले पत्र मिळाले. आपल्या आरोग्याची जी वार्ता आपल्या पत्रात आहे ती वाचून आनंद झाला. आपले वडील शिवाजी महाराज यांच्य मृत्युबद्दल आम्हास जे दुःख झाले ते आम्ही प्रस्तुत पत्रातून व्यक्त करीत आहोत. मृत्यू हा

[१६४] *गोखले कमल श्रीकृष्ण : शिवपुत्र संभाजी , ज्ञान-विज्ञान विकास मंडळ, पुणे १९७१(पहिली अवृत्ती) पृ.क्र.१६२.*

कोणालाच चुकलेला नाही आणि चूकत नाही. दैवी इच्छेविरुद्ध कोणाचीच मात्रा चालत नाही. आपल्यासारखा शांततेने राज्य करणारा राजा आपल्या प्रजेला लाभला याबद्दल आपली प्रजा अभिनंदनास पात्र आहे. प्रजेच्या दृष्टीने न्याय आणि शांतेता यासारखे सुख दुसरे कोणते नसते. आपण लिहिता की, आमच्याशी मैत्रीचे आणि शांततेचे संबंध ठेवण्याची आपली इच्छा आहे. या संदर्भात आपले दूत रामजी नाईक ठाकूर यांनी मला भावी करारातील काही कलमे सादर केली आहेत. या कलमाची जी उत्तरे मी पाठविली आहेत. ती आपल्या निदर्शनास येतीलच करार कायम टिकावा म्हणून मी माझे काही विचारही व्यक्त केले आहेत. हा होऊ घातलेला करार कायम टिकावा, इतकेच नव्हे तर तो दृढ आणि खराखुरा व्हावा अशी माझी इच्छा आहे. आपणाला तहाची कलमे आणि माझे विचार कळावेत म्हणून मी रामजी नाईक ठाकूर यांच्याकडे ते पाठविले आहेत. आपल्या निर्णयाची वाट पहात आहे. आपल्या दुताला आपण खास अधिकार देऊन आमच्याकडे पाठवावे, म्हणजे तो आपल्या दुताला आपण खास अधिकार देऊन आमच्याकडे पाठवावे, म्हणजे तो आपल्या वतीने करारावर सही करील. माझ ो स्वामी पोर्तुगालचे जे राजे यांच्या वतीने त्या करारावर मी सही करीन.

आपले सेनापती रामाजी पंडित याचे वर्तन उल्लेखनीय आहे. ते चतुर आणि धोरणी आहेत आपले दूत रामजी नाईक ठाकूर हेही त्याबाबती काही कमी नाहीत. दोघेही आपणाकडे जाण्याच्या घाईत असल्याने त्यांच्याशी मी माझे सर्व विचार आणि प्रेम व्यक्त करू शकलो नाही. रामजी नाईक ठाकुर यांचेकडून पाठविलेला नजराना त्यानी मला सादर केला. आता मी त्याच्याकडेच आपणासाठी परत भेट म्हणून एक नजराणा मैत्रीचे प्रतिक म्हणून पाठवित आहे तरी आपण त्याचा स्वीकार करण्याची कृपा करावी."[१६५] अशा प्रकारे संभाजी-पोर्तुगीज याच्यामध्ये प्रारंभीस चांगले सहलोख्याचे संबंध होते.

छत्रपती शिवाजी महाराजाच्या काळापासून डिचोलीचा सुभेदार मोरो दादाजी होता. त्याची पोर्तुगीजांच्या कारवायावर बारकाईने नजर ठेवली होती. तो मराठ्यांच्या हद्दीत बिनापरवाना आलेली जहाज पकडत होता. त्यामुळे पोर्तुगीज व मोरो दादाजी याच्यात चांगले

---

[१६५] *दारवटकर अनंत : अद्वितीय छत्रपती श्री संभाजी महाराज (खंड ४) श्रीशंभू प्रेरणा प्रकाशन, पुणे २०१२ (प्रथमावृत्ती) पृ.क्र. १८८४.*

संबंध नव्हते. पुढे डिसेंबर १६८० मध्ये संभाजी महाराजाच्या हद्दीतील देसायानी काही अनुचित प्रकार करून तो गोव्याला पळून गेला. याबद्दल मोरो दादाजीने पोर्तुगीज विजरईस त्यांची ताबतोब तक्रार केली होती. यावर ९ डिसेंबर १६८० रोजी पोर्तुगीज विजरईने मोरो दादाजीस पत्र पाठवून आश्चर्य व्यक्त केले." ते (देसाई) संभाजी राजे याचे प्रजाजन असता व त्याच्या राज्यास राहात असता अशा अनुचित गोष्टी करण्यास कसे धजतात आणि मग आमच्या राज्यात कसे येतात... तुमच्या हद्दीतील देसायांनी अथवा अन्य माणसांनी आमच्या हद्दीत येऊन वास्तव केलेले मला खपणार नाही.. मला सुगावा लागल्यापूर्वीच हे लोक चोऱ्यामाऱ्या करून पसार होतात. शांततेची व तहाची मला चाड आहे पण, दुसऱ्या बाजूलाही हे धोरण अवलंबिले जाणे आवश्यक आहे."[१६६] असे आपल्या पत्रात जरी नमूद केले सर्व वरकरणे होते. त्याच्या मूळ उद्‌देश देसायाना प्रोत्साहन देऊन संभाजी महाराजाच्या प्रदेशात कुरापती काढण्याचा होता. ही बाब मोरो दादाजीना माहिती होती. त्यामुळे त्याने स्वराज्याच्या हद्दीत आलेल्या पोर्तुगीजच्या हिरेमाणकांच्या व्यापाऱ्याना अटक करण्याचा हुकूम केला. यामुळे पोर्तुगीजाचा त्या प्रदेशातील सर्व व्यापार बंद करावा लागला. याची तक्रार पोर्तुगीजानी संभाजी महाराजांकडे केली होती; परंतु संभाजी राजाना यामागील सत्यता माहित असल्यामुळे मोरो दादाजीच्या विरोधात कोणतेही पाऊल उचालले नाही.त्यानंतर डिसेंबर १६८१ मध्ये गोव्यात नवीन विजरई दो फान्सिस्कू द ताव्हर कोंदि द आल्व्होर आले त्याचवेळी संभाजी राजांनी डिचोलीचा सुभेदार मोरो दादाजी यांना बदलून तेथे शिवाजी बडनाईक याची नेमणूक केली.

### ५.८.३.१ आजंदीव बेट :

संभाजी पोर्तुगीज यो सलोख्याचे संबंध असतानाच १६८२ च्या जानेवारीतच संभाजी राजांनी काखारजवळील अजंदीव बेट घेऊन त्यावर किल्ला बांधण्याची तयार केली. त्यासाठी त्याने नकाशा काढून लागणारा पैसा व सामान जमवा जमव करण्याचे आदेश दिले होते; परंतु संभाजी राजांची ही बातमी पोर्तुगीजांस कळताच गोव्याच्या विजरईने आपल्या मत्र्यांची

[१६६] *दारवटकर अनंत : अद्वितीय छत्रपती श्री संभाजी महाराज (खंड ४) श्रीशंभू प्रेरणा प्रकाशन, पुणे २०१२ (प्रथमावृत्ती) पृ.क्र. १८८३.*

बैठक बोलावून अजंदीव पूर्णपणे मराठ्याच्या हातात पडण्यापूर्वी तो ताब्यात घेऊन तेथे किल्ला बांधून तोफा ठेवण्याचा निर्णय घेतला. कारण पोर्तुगीजाच्या दृष्टीने हे बेट मराठ्याच्या ताब्यात जाणे धोक्याचे होते. हे बेट गोव्यापासून बारा कोसावर गोवा-कर्नाटक समुद्र मार्गावर होते. तेथूनच धान्यसामुग्री कर्नाटकातून गोव्यास जात असे त्यामुळे पोर्तुगीजाची पूर्ण कोंडी होणार होती.

यापूर्वी शिवाजी महाराजांनी खंदेरी ताब्यात घेऊन तेथे किल्ला बाधून बंदोबस्त केल्यामुळे पोर्तुगीजाच्या चेऊलला उपद्रव होत होता. याबाबद कारवाकर २८ एप्रिल १६८२ ला लिहितात, "संभाजी राजाने अजंदीव बेटावर बंदोबस्तासाठी कोट वगैरे बांधण्याचा विचार करून एक सुभेदार पाठवला होता. तो तेथे येऊन थोडे दिवस झाले. तो माणसांच्या वगैरे मदतीची वाट पहात आहे; परंतु अद्याप कोणी आले नाही त्यामुळे त्याने माणसाचे अभावी काही हालचाल केली नव्हती. यपुढे तो करील असे आता वाटत नाही. कारण दोन दिवसापूर्वी तेथे पोर्तुगीजाची चार गूरबे आली असून २०० लोक बेटावर उतरविले आहेत व बेटावर कोट बांधण्याकरिता आणखी माणसे चुना वगैरे सामान येत आहे. अशी गावातील बातमी आहे."[१६७] दि. ५ मे १६८२ रोजी पोर्तुगीजानी अंजदीव बेटाचा ताबा घेतला दि. २ जुलै १६८२ रोजी कॅप्टन आमारु सिमोइस पेरैर याने तेथील किल्याचा पहिला दगड बसवून सहा महिन्याच्या आत किल्ला बांधून काढला. पावसाळ्यात अंजदीव बेटावर ७०० सैनिक आणि इतर गवंडी, सुतार व लोहार, मजूर इत्यादी मिळून १००० माणसे काम करीत होती. ही गोष्ट संभाजी राजाना कळली. त्यानी आपल्या वकिलामार्फत व अकोल्याच्या सुभेदाराकडून विजरईकडे वरील कृत्याबद्दल तक्रार केली; परंतु हे बेट पोर्तुगीजाचेच असून त्याबाबत बोलण्यास संभाजीला अधिकार नाही असे विजरईने उत्तर दिले. यामुळे अजदीव बेटामुळे पोर्तुगीज-संभाजी यांच्यात वाद निर्माण झाला.[१६८] संभाजी राजानी आरबांशी मैत्री प्रस्तापित केली होती आरब हे पोर्तुगीजाचे शत्रू होते. दुसरीकडे पोर्तुगीजांनी सिद्दीला चौल बंदरात

---

[१६७] *बेंद्रे वा.सी. : श्री छत्रपती संभाजी महाराज यांचे विचिकित्सक चरित्र, मनोरमा प्रकाशन,मुंबई ,२००१ (तृतियावृती) पृ.क्र.३५४.*

[१६८] *गोखले कमल श्रीकृष्ण : शिवपुत्र संभाजी , ज्ञान-विज्ञान विकास मंडळ, पुणे १९७१(पहिली अवृत्ती) पृ.क्र.३४९.*

आश्रय दिल्यामुळे त्याने संभाजीच्या प्रदेशात उपद्रव केला. तसेच मोगलाशी संबंध ठेवून त्यांना आपल्या प्रदेशातून जाण्यास धान्य पुरवठ्यास सुरुवात केली. यासर्व पार्श्वभूमीवर पोर्तुगीस व संभाजी याच्यातील संबध बिघडले पोर्तुगीजाचे सिद्दी व मोगल धार्जिणी धोरणामुळे संभाजी राजानी पोर्तुगीजास शह देण्याचे ठरविले. यातूनच पुढे पोर्तुगीज-मराठे युद्ध सुरु होऊन ही लढाई प्रथम चेऊल, वसई, दमण या प्रदेशात सुरु झाली. याबाबत त्यावेळी त्या प्रदेशात असलेल्या फांदर पिएर जेसिक द आर्लिन्स लिहितो, "त्याचा प्रत्याघात.. पोर्तुगीजांना झाला. मोगली सैन्याला आपल्या मुलुखातून जाऊ दिल्यामुळे संभाजी राजानी चौलाजवळील एका कोटावर हल्ला चढविला त्यावेळी तेथील पोर्तुगीस गाफिल होते; परंतु तो कोट छापा घालून घेता आला नाही. म्हणून संभाजी राजांनी खास चौलालाच वेढा घातला.[१६९]

### ५.८.३.२ चौलवर हल्ला :

इ.स. १६८२ च्या जून मध्ये मराठ्यांनी चोऊल प्रातात जाऊन किल्ल्याला घेरले होते. त्यावेळी तेथ असलेल्या शेख हबीबुल्ला याने मराठ्यावर हल्ला केल्यामुळे मराठे पळाले. यानंतर मराठ्यानी दि. २३-०७-८२ रोजी रेवदंडयाच्या किल्यावर हल्ला केला. एकाच वेळी त्यांनी ह्या किल्ल्यावर व सदरहू शहराच्या तटावर आणि कोरलाईच्या किल्यावर हल्ला केला.[१७०] यानंतर संभाजी राजांनी एका वर्षानंतर २२ जुलै १६८३ रोजी मराठ्याच्या २००० घोडदळे व ६००० पायदळा सह चौल किल्ल्यास वेढा घातला. याबाबत सुरतकर ३१ जूलैला लिहितात, "संभाजीराजा व पोर्तुगीज याचे वैर आले आहे. आम्हास समजले की, राजाने मोठया सैन्यानिशी चौलास वेढा घातला असून तो ते घेण्याच्या बेतात आहे."[१७१] ज्या दिवशी मराठ्यांने किल्ल्यावर हल्ला केला तेव्हापासून पडत असल्यामुळे पहारा तेवढा कडक नव्हता त्यामुळे मराठ्यांनी शिड्या लावून किल्ल्यात प्रवेश केला. त्याची माहिती पोर्तुगीजाना झाल्यामुळे त्यांनी लावलेल्या शिड्या फेकून दिल्या. मराठ्याचा हल्ला परतवून लावला.

---

[१६९] *बेंद्रे वा.सी. : श्री छत्रपती संभाजी महाराज यांचे विचिकित्सक चरित्र, मनोरमा प्रकाशन,मुंबई ,२००१ (तृतियावृती) पृ.क्र.३४९.*
[१७०] *गोखले कमल श्रीकृष्ण : शिवपुत्र संभाजी , ज्ञान-विज्ञान विकास मंडळ, पुणे १९७१(पहिली अवृत्ती) पृ.क्र.१७२.*
[१७१] *बेंद्रे वा.सी. : श्री छत्रपती संभाजी महाराज यांचे विचिकित्सक चरित्र, मनोरमा प्रकाशन,मुंबई ,२००१ (तृतियावृती) पृ.क्र.३५३.*

चौलावर ज्या दिवशी मराठ्यांनी हल्ला केला होता. त्याच दिवशी कोरलाईच्या किल्ल्यावर ही हल्ला केला मराठ्याकडील सहा गुप्तहेरानी कोणतेही गडबड न करता गडावर प्रवेश करून तेथील पहारेकऱ्याना मारले; परंतु नंतर ती गुप्तहेर पकडले गेले. तेव्हा पोर्तुगीजानी हल्ला परतवण्यासाठी तोफाचा मारा करून हल्ला परतवला.

१२ सप्टेबर १६६३ मध्ये मराठ्यानी वसई तालुक्यातील अंजूर गावावर हल्ला केला तेथील कापणीला आलेले पिक कापून नेऊ लागले. तेव्हा पारसिक गढीवरील कॅप्टनने आपले पंचवीस पोर्तुगीज त्यांना हाकलून लावण्यास पाठविले. हे त्या मराठ्यांवर चालुन गेले. त्यांनी पळतो अहोत असे दाखवून पोर्तुगीजास आपल्या अंगावर घेत घेत ज्या जागी संभाजीराजांचे पाचशे लोक तळ देऊन बसले होते तिकडे नेले ते पोर्तुगीजांवर चालून गेले. पोर्तुगीज पळू लागले मराठे धावण्यात चपळ असल्याने त्यांनी एकोणीस पोर्तुगीजाना धरुन ठार मारले व तेथून पळाले.

जुलै महिन्यामध्ये चौलाचा वेढा मराठ्यांनी चालूच ठेवला होता सप्टेबर १६८३ मध्ये या वेढा अधिक कडक करण्यासाठी पेशवा निळो मोरेश्वर याला ८ हजाराची सैन्य देऊन पाठविले त्याने पोर्तुगीजाच्या उत्तरेकडील बराचसा प्रदेश उदध्वस्त केला. मराठ्यांच्या केलेल्या हल्ल्यामुळे पोर्तुगीज हैराण होऊन लढाईसोडून गोवाला पळ काढत होते. ८ ऑक्टोंबरच्या बातमीपत्रात या वेढ्याविषयी मुंबईकर सांगतात, "चौलला खंबीर वेढा घातला आहे. संभाजी राजाच्या फौजेने जवळील एका टेकडाचा ताबा घेतला असून त्यावर ते धमधमे रचीत आहेत. त्यावर ते मोठ्या तोफा चढवून चौलवर मारा करणार आहेत. सर्वाचा समज असा आहे की, तोफाचा मारा सुरु झाल्यावर किल्ला पाच दिवसापेक्षा अधिक लढवला जाणार नाही."[१७२] मराठ्यांच्या विरुद्ध निभाव लागेना म्हणून चौलच्या लोकांनी गोव्याच्या विजरईकडून मदत मागितली; परंतु याचवेळी संभाजी राजानी जुने साष्ट व बारदेश येथे चढाई केल्यामुळे पोर्तुगील विसरईने मोगल अधिकारी सिद्दी याकुदखान व खैरातखान यांच्याकडून मदत मागितली. याकुत खानाने ४०० सैनिकांची व्यवस्था केली, पण मराठ्यांचा

[१७२] *बेंद्रे वा.सी. : श्री छत्रपती संभाजी महाराज यांचे विचिकित्सक चरित्र, मनोरमा प्रकाशन,मुंबई ,२००१ (तृतियावृती) पृ.क्र.३५५.*

चौलचा वेढा चालूच राहिला. मराठ्यांनी चौलचा वेढा उठवावा म्हणून पोर्तुगीज विजरईने मराठ्यांच्या फोंड्यावर हल्ला केला; परंतु मराठ्यानी चौलचा वेढा न उठविता फोंडा लढविला. एवढेच नव्हेतर निळोपंताने पोर्तुगीजाच्या ताब्यातील चेंबूर, तळोजा व कोळवे जिंकून घेतले. २३ डिसेंबर १६८३ च्या मुंबईकराच्या पत्रात याबाबत असा तपशील येतो, "त्याने (मराठ्यांनी) पोर्तुगीजाचा बहुतेक सर्व मुलूख घेतला माहिम, उलवे, दतोरा, सारगाव, सुपारा ही घेतला साबाजी जाळले; परंतु काल त्यांनी कारंज्यावर उतरुन तेथील उंच टेकडी घेतल्याने आम्हास बराच धक्का बसला. त्या टेकडीवर चर्च होते. त्याच्याजवळ नागोण्ठयास २००० लोक असल्याने ते आता सहजासहजी तो किल्ला सोडणार नाहीत व ते कारंजात जाऊन राहातील."[१७३] त्यानंतर मराठ्यांनी कारंजा व एलिफंटा घेऊन पोर्तुगीजाच्या ताब्यातील ४० मैलाचा प्रदेश उदध्वस्त केला. पोर्तुगीज-मराठ्यात तहाच्या वाटाघाटी चालू झाल्यामुळे चौलचा वेढा उडवला. उत्तर कोकणात संभाजीराजांनी केलेल्या आक्रमणाची माहिती देणारे लुईज गोसाल्व्हिस कोत याने मे १६८४ च्या सुरुवातीस विजरईस कळविली "शत्रूने चेऊलचा वेढा उठविला, पण वसईच्या प्रदेशामध्ये त्याने पुष्कळ नुकसानी केल्या आहे. कल्याण, सायबान आणि मानोर ही तर घेतलीच, पण असेरीचा गड ही पुन्हा काबीज केला. करंजा, माहिम व तारापूर ह्या किल्ल्याकरिता तो लढत असून कसबे वसईचा मद्रापूरपर्यंत त्याने ताबा घेतला आहे. 'आतोनियु तैशेर द मासेहु' हा बेलापूरचे आणि आतोनियु कामेव्ल शसाष्टी बेटाचे रक्षण करीत आहे. असेरीच्या किल्लेदारास मराठ्यांनी कैद केले. तारापुरास पळालेल्या सैनिकांना कैदेत टाकण्यात आले वसईहून आलेला पाद्री आतोनियु व्हाज रिस्काद यांने सांगितले की, पोर्तुगीजांचे पुष्कळ लोक कैदेत आहेत त्यात स्त्रियां, पुरुष व मुले आहेत. त्यापैकी पुष्कळाचे हात, पाय, कान, नाक शत्रूने छाटले असून सर्व लोक भयभीत झाले आहेत. ज्या ठिकाणी शत्रू पोहोचला तेथील चर्चे त्याने ताब्यात घेतली मनोर येथील किल्ला व चर्च त्याने जमीनदोस्त केली."[१७४]

---

[१७३] *बेंद्रे वा.सी. : श्री छत्रपती संभाजी महाराज यांचे विचिकित्सक चरित्र, मनोरमा प्रकाशन,मुंबई ,२००१ (तृतियावृती) पृ.क्र.३५६.*

[१७४] *गोखले कमल श्रीकृष्ण : शिवपुत्र संभाजी , ज्ञान-विज्ञान विकास मंडळ, पुणे १९७१(पहिली अवृत्ती) पृ.क्र.१७५.*

मुंबईचा इंग्रज गव्हर्नर केजविन पोर्तुगीजांच्या हालाखीविषयी १५ सप्टेंबर १६८४ च्या पत्रात लिहितो, "पोर्तुगीजाचा गर्व पार उतरला आहे. संभाजी राजांनी त्याचे करंजा आणि इतर सात गडकोट घेतले. आहेत धान्यसाठा इतक्या थराला गेला आहे की, भुकेसाठी आई-बाप, मुले विकीत आहेत. तरीदेखील आमच्याशी त्याच्या गर्वोक्ति चालूच आहेत."[१७५] इ.स. १६८४ च्या सुरुवातीस मराठा व पोर्तुगीज यांच्या मध्ये तह झाला होता; परंतु तो पूर्णपणे कृतीत न आल्याने मराठे-पोर्तुगीज संघर्ष चालूच होता. पोर्तुगीजांनी कोकणातील देसायांशी गुप्त संगनमत करून संभाजीराजांनी जिंकलेला प्रदेश मिळण्यासाठी चालवला. १६८७ पर्यंत या हालचाली चालूच होत्या.

### ५.८.३.३ फोंड्याचा संग्राम :

फोंड्याचा किल्ला हा पोर्तुगीज मराठा यांच्या सरहद्दीवर होता १६७५ मध्ये छत्रपती शिवाजी महाराजांनी हा आदीलशाहीकडून जिंकून घेतला होता. सरंक्षणाच्या दृष्टीने अतिशय मजबूत होता. किल्ल्याच्या सभोवती भक्कम तट आणि खंदक होते.

मराठ्यांनी चौलच्या किल्ल्याला वेढा उठविण्याच्या हेतूने व दक्षिण कोकणावर कब्जा करण्याच्या इराद्याने पोर्तुगीजानी मराठ्याच्या फोंडा किल्ल्यावर हल्ला करण्यासाठी निघाला. दि. २७ ऑक्टोंबर १६८३ रोजी विरजई गोवा शहरातील सुमारे ४० घोडेस्वार यांना बरोबर घेऊन या लोरेसूला रवान झाला तेथून त्याने प्रयाण करून त्याच दिवशी तो सैन्यासह आगाशी येथे दाखल झाला.[१७६] व्हिसरायासोबत १२०६ पोर्तुगीज शिपाई व अडीच हजार गोव्याच्या साष्टीतील ख्रिस्ती शिपाई सहा तोफा होत्या २८ ऑक्टोबर रोजी दुभाटे येथे आला. तेथेच फोंड्याचा देसाई दुलबा नाईक पूर्वीच पोर्तुगीजांशी मिळालेला होता. तो आपल्या सत्तर शिपायासह विजरईस येऊन मिळाला. दुभाटेवरुन १ नोव्होबर पहाटे फोंड्यास पोहचताच हल्ल्यास सुरुवात केली.

---

[१७५] *बेंद्रे वा.सी. : श्री छत्रपती संभाजी महाराज यांचे विचिकित्सक चरित्र, मनोरमा प्रकाशन,मुंबई ,२००१ (तृतियावृती) पृ.क्र.३५७.*

[१७६] *दारवटकर अनंत : अद्वितीय छत्रपती श्री संभाजी महाराज (खंड ४) श्रीशंभू प्रेरणा प्रकाशन, पुणे २०१२ (प्रथमावृत्ती) पृ.क्र. ११५२.*

या वेळी फोंडा किल्ल्यावर मराठ्यांचा सरनोबत येसाजी कंक आणि त्याचा मुलगा कृष्णाजी कंक हा पदाती नायक होता. किल्ल्यात मराठ्यांचे ६०० शिपाई होते. याशिवाय सुमारे २०० शिपाई रानात योग्य संधीची वाट पहात लपून बसले होते. पोर्तुगीजांनी किल्ल्याच्या मुख्य दरवाज्याच्या समोरील टेकाडावर तोफांचा मारा करण्यास सुरुवात केली. मराठ्यांनी ही त्याच्या प्रत्युत्तरात गडावरील तोफांचा भडीमार सुरु केला. तेव्हा पोर्तुगीजांनी मराठ्यांच्या तोफा काढण्याचा प्रयत्न केला. तीन दिवस तोफांचा भडिमार केल्यानंतर पोर्तुगीजांना मराठ्यांच्या डागलेल्या तोफा काढण्यात यश आले. त्यानंतर पोर्तुगाजानी आपल्या तोफा टेकडीवरुन काढून किल्ल्याजवळील रस्त्याच्या तोंडाजवळ डागल्या व तेथून तटावर मारा करण्यास सुरुवात केली. या प्रसंगीही मराठ्यानी किल्ल्याचे रक्षण करण्याचा हिरीरेने प्रयत्न केला; परंतु पोर्तुगीजाच्या तोफांच्या माऱ्यामुळे किल्ल्याच्या आतील तटास भगदाड पडले आणि मराठ्याचा विरोध एकाएकी बंद झाला. पडलेल्या भगदाडापासी कुंपन करण्यासाठी विजरईने तीन तुकड्या धाडल्या. भगदाडापाशी त्यानी ताराची भेडोळी रचली तेथून त्यांनी गडामध्ये प्रवेश करण्यासाठी खंदक ओलांडून गडाच्या आतील बाजुच्या दरवाजापर्यंत पोहोचले आणि दरवाजा उघडण्याचा प्रयत्न केला.

मराठ्यांनी या प्रसंगी अतिशय चतुराई दाखवली पोर्तुगीजाच्या सैन्याला त्यांनी दरवाजापर्यंत येऊ दिले. संधीची वाट बघत असलेल्या मराठ्यांनी शत्रू आपल्या टप्प्यात येतात. त्याच्यावर एकदम तूटून पडले हा हल्ला एवढा जबरदस्त होता की, पोर्तुगीजांना माघार घेण्याशिवाय पर्याय नव्हता. या लढाईत अनेक सैनिक मारले गेले अनेक जखमी झाले.

संभाजी महाराजसुद्धा या वेढ्याकडे लक्ष देऊन होते. मराठ्यांनी जरी पोर्तुगीजांचा हल्ला परतवून लावला तरी एका बाजूस पोर्तुगीज विजरई तर दुसऱ्या बाजूस दॉय रॉद्रिगा द कॉस्ता यांनी हल्ले सुरु केले होते. यावर ४ नोव्हेबर १६८३ रोजी घोड्याच्या ४ तुकड्या आणि २०० पायदळाची कुमक फोंड्यास धाडली हे पाठवलेले सैन्य फोडा किल्ल्याच्या दुसऱ्या बाजूने पायथ्याशी पोहचताच त्यांची पोर्तुगीजाबरोबर चकमक झाली. त्यात मराठ्यांचे

चार सैनिक मारले गेले. त्यानंतर पाचव्या दिवसी पोर्तुगीजाचे फोंड्यावर हल्ला चालूच होता. यावेळी फोंड्यामध्ये मराठ्यांचे केवळ ६०० सैन्य जवळपास साडेतीन-चार हजार पोर्तुगीजांशी मुकाबला करत होते. तरी सुद्धा पोर्तुगीजांना कोणत्याही प्रकारचे यश यावेळी येत नव्हते. त्यामुळे पोर्तुगीज व्हाईसराय निराश होऊन आपल्या तंबूत जाऊन बसला. कोणासही बोलेनासा झाला. "ज्या फादर्सनी गड एका दिवसात घेऊन देतो म्हणून त्यांना वेढ्यास प्रवृत्त केले होते ते आता परत जाण्याची भाषा बोलू लागले."[१७७] परंतु व्हाईसरायने किल्ल्यावर तोफेचा भडीमार चालू ठेवला होता. सततच्या तोफेचा भडीमारामुळे दोन दिवसानंतर किल्ल्याच्या आतील तटासही भगदाड पडले. तिथे शिड्या लावून हल्ला चढविण्याचा पोर्तुगीजा विचार होता; परंतु संभाजी राजांना याची बातमी आगोदरच कळाली असल्यामुळे ९ नोव्हेबर १६८३ रोजी संभाजी महाराज तातडीने राजापुराहून फोंड्यास पोहोचले आणि पोर्तुगीजाच्या नजरेसमोर सुमारे आठशे स्वारांच्या सरंक्षणासाठी आपले सहाशे पायदळ सैनिक त्यांनी किल्ल्यात घातले आणि आश्चर्य असे की, संभाजी महाराजांना समोर पाहून पोर्तुगीजाची सर्व शस्त्रे थंडगार झाली. पोर्तुगीज विजरईची हिम्मत हरपली आणि तो जागेवरच थिजला गेला. त्याच्या डोळ्यांसमोर संभाजी महाराज येत होते. संभाजी महाराजांच्या तुकडीत पायदळाच्या दोन्ही बाजूस घोडदळाची तुकडी शिस्तीने चालली होती.[१७८] संभाजी राजे फोंड्यावर येतात मराठी सैनिकाचा उत्साह द्विवीगुणीत झाला. पोर्तुगीजावर अतिशय जोरदार हल्ला केला यात पोर्तुगीजाचा पराभव झाला.

पोर्तुगीज व्हाईसराय फोंड्याला आल्यापासून सततचा पाऊस, वादळी हवा थंडी आणि त्यातून मराठ्यांचे हल्ले यामुळे वैतागला होता. स्वतः संभाजी राजे गडावर आल्यामुळे माघार घेण्याचे ठरवून सर्व अधिकाऱ्याची बैठक बोलावून सांगितले की, "आपली फौज मराठ्याच्या मानाने थोडी आहे आपण वेळेवर माघार घेतली नाहीतर परत जाणेच शक्य होणार नाही. व्हाईसरायच्या म्हणण्यास सर्वानी मान्यता देऊन दि. १० नोव्हेबर १६८३ रोजी

---

[१७७] *बेंद्रे वा.सी. : श्री छत्रपती संभाजी महाराज यांचे विचिकित्सक चरित्र, मनोरमा प्रकाशन,मुंबई ,२००१ (तृतियावृती) पृ.क्र.३६२.*

[१७८] *दारवटकर अनंत : अद्वितीय छत्रपती श्री संभाजी महाराज (खंड ४) श्रीशंभू प्रेरणा प्रकाशन, पुणे २०१२ (प्रथमावृत्ती) पृ.क्र. ११५९.*

पोर्तुगीजांनी माघार घेण्यास सुरुवात केली. मराठ्यांनी हे पहाताच त्याच्यावर छापे घातले. पोर्तुगीजांनी परत जाताना तोफा व बंदूका घेऊन जाण्याचा प्रयत्न केला; परंतु मराठ्यांच्या हल्ल्यापुढे पोर्तुगीजांना हात हालवत परत जावे लागले. यावेळी मराठ्यांना तीनशे पोते तांदूळ व दोनशे बैल आणि बरीच खाजगी मालमत्ता मिळाली. पोर्तुगीज व्हाईसराय मराठ्यांचे गनिमी युद्धतंत्राची माहित झाल्यामुळे अतिशय सावधगीरी मागार घ्यावी लागत होती. मराठ्यांच्या घोडदळाचा हल्ला होऊ नये म्हणून आपले घोडेस्वार आंबराईमागून वळसा घालून जाण्यास सांगितले होते नदीपार करतानाही पोर्तुगीजांना अनेक हाल सहन करावे लागले.

फोंड्याच्या युद्धामध्ये सरनौबत येसाजी कंक व त्याचा मुलगा कृष्णाजी कंक यांनी मोठा पराक्रम गाजवला होता. दि. ११ नोव्हेबर १६८३ रोजी विजरई आपल्या सैन्यासह दुर्भाट येथे पोहोचला त्या जागी खाडीवरी टेकडीजवळ मराठ्यांनी पोर्तुगीजावर हल्ला करून त्याची धूळधण उडविली. येसाजी कंक या युद्धात जखमा लागोन चकाचुर झाला.[१७९] दुर्भाट बेटावर पोर्तुगीज पोहचल्यानंतर आपल्या हद्दीत जाण्याअगोदर तेथे मराठ्यांची टेकडी होती तिच्यावर हल्ला केला पोर्तुगीज टेकडीवर हल्ला करताच मराठ्यांनी पळून जाण्याचे सोग केले. पोर्तुगीजांनी त्याचा पाठलाग केला मराठ्यांना तेच हवे होते. पोर्तुगीज योग्य टप्प्यात येताच मराठ्यांच्या घोडदळानी त्याच्यावर जोरदार हल्ला केला. या धामधुमीत मानुयल द सिल्व्हा आणि इतर २०० सैनिक मारले गेले; परंतु येसाजी कंक व त्याचा मुलगा कृष्णाजी कंकसुद्धा या लढाईमध्ये गंभीतरित्या जखमी झाल्यामुळे संभाजी राजानी बापलेकास घरी पाठवून औषधउपचाराची सोय केली. येसाजी बरा झाला; परंतु त्याचा मुलगा या जखमेतून वाचला नाही. त्याच्या शौर्यबद्दल गौरव केला. दोघांस १००० होन परितोषिक दिले. कृष्णाजीच्या मुलास सुभा दिला आणि लोकांचा जमाव करण्यासाठी व कायमस्वरुपी चाकरीसाठी चाहुजी कंकाला कारभार चालविणेस सांगितले. या व्यतिरिक्त कृष्णाजीच्या सुभ्याची आसामी चालवावी व त्याचा आज्ञान पालनकर्ता म्हणून चाहुजीला वार्षिक ६०० होन द्यावेत असा हुकूम केला.

---

[१७९] *दारवटकर अनंत : अद्वितीय छत्रपती श्री संभाजी महाराज (खंड ४) श्रीशंभू प्रेरणा प्रकाशन, पुणे २०१२ (प्रथमावृत्ती) पृ.क्र. १९६३.*

दि. १२ नोव्हेबर १६८३ रोजी ८ वाजता सकाळी पोर्तुगीजांचे सैन्य गोव्यास पोहचले यावेळी इटालियन प्रवासी डॉक्टर मनुची हा गोव्यात होता. यावेळी त्याने अनेक बोटी पाहिल्या. ज्या मेलेल्या आणि जखमी मणसांच्या वजनाने भरलेल्या होत्या संभाजी महाराजांनी विजरईस हरविल्याचा तो पुरावा होता.[१८०] या पराभवाने तो पुरता हदरुन गेला होता की, निराश होवून जुन्या गोव्यातील बो जेजूस या चर्चशेजारील मठात जाऊन राहीला. युद्धात पराभव झाल्यामुळे त्याने कोणाचीही भेट घेतली नाही. पोर्तुगीजानी माघार घेतल्यानंतर संभाजी राजांनी फोंडा किल्ला हा पोर्तुगीजांच्या हल्ल्यासमोर टिकाव धरणार नाही म्हणून तो किल्ला पाडून त्याच्या जवळ एका टेकडीवर नवीन गड बांधला त्यावे नाव 'मर्दनगड' ठेवले.

फोंड्याच्या वेढावरुन परतल्यानंतर संभाजी राजे पन्हाळ्यास जातील असे पोर्तुगीज व्हाईसराय यांना वाटले होते; परंतु पोर्तुगीजांचा हा आंदाज पूर्णपणे चुकीचा ठरला. यावेळी संभाजी राजानी पोर्तुगीजास पुरता धडा शिकवण्याचे ठरविले होते. त्यासाठी त्यांनी गोव्यावर स्वारी केली.

### ५.८.३.४ जुवे बेटावर वेढा :

जुवे बेटास पोर्तुगीजांनी सातु इस्तेंव्हव असे नाव दिले होते. हे बेट धावजी या तिस वाडीतील गावाच्या पैलतीरास असून ओहोटीच्या वेळी त्या बेटातून पायवाटेने गावे शहरात जात येत होते. या पायवाटेच्या संरक्षणासाठी पोर्तुगीजांनी जुवे बेटावरील डोंगरात एक किल्ला बांधला होता दि. २४ नोव्हेबर १६८३ रोजी रात्री ८ वाजता ४० मराठ्यांची तुकडी या बेटावर गेली. त्यावेळी पहारेकरी नसल्यामुळे मराठे शिड्या लावून किल्ल्यातच गेले. गडावर मातारा किल्लेदार व काही ख्रिस्ती लोक होते. त्याना ठार करून मराठ्यांनी तो किल्ला आपल्या ताब्यात घेतला. विजयाची निशान म्हणून तोफा डागल्या. तोफाचे आवाज गोव्यात ऐकू गेले तेव्हा किल्ल्यावर काहीतरी गडबड आहे असे समजून व्हाईसराय जे लोक मिळतील ते बरोबर घेऊन सेंट स्टीफेन समोरील डोगी नावाच्या गावी आला. तेथे त्यास सेंट स्टीफेनचा

[१८०] *चौबळ ज.स.(अनु.) : असे होते मोगल - निकोलस मनुची, महाराष्ट्र राज्य साहित्य-संस्कृती मंडळ,मुंबई १९७४ (प्रथमावृत्ती) पृ.क्र. २६४.*

किल्ला मराठ्यांच्या ताब्यात गेल्याचे समजले मराठ्यांनी केलेल्या तोफेचा आवाज दुसऱ्या तुकडीस बोलावण्यासाठी आहे असे समजून त्याचा मार्ग बंद करण्याकरिता शेजारील शेताचे बांध फोडून सेंट स्टीफन सभोवती पाणीच पाणी केले.

२५ नोव्हेबर १६८३ रोजी सकाळी सात वाजता पोर्तुगीज व्हाईसरायाने ४०० शिपायासह जुवे बेटावर गेला. त्याच्यसोबत तीनशे लोक खडकाळ टेकडी चढून किल्ल्याच्या पायथ्यापाशी गेले. मराठी सैनिकावर जोरदार हल्ला चढवला पोर्तुगीजांनी हल्ला करताच मराठ्यांनी पळण्याचे नाटक केले. योग्य टप्प्यात येताच पुन्हा आपल्या ३०० घोडस्वारासह सर्वानी मिळून एकदाच पोर्तुगीजावर जोराचा हल्ला केला. यामुळे व्हाईसरायने आपल्या लोकास शिस्तीने माघार घेण्यास सांगितले. जीव वाचविण्यासाठी अनेक पोर्तुगीज शिपाई डोंगरावरुन नदीतीराकडे पळत सुटले तेव्हा विजरईने त्यास न पळता तोंड देत देत चला म्हणून डोळ्यांत पुष्कळ अश्रु आणुन विनवले; परंतु त्याचा काहीही उपयोग झाला नाही. या धामधुमीत मराठ्यांनी चार घोडेस्वारासह पोर्तुगीज व्हाईसरायावरच तलवारीने हल्ला केला. तो कैद होणारच होता तेव्हा त्याच्या सेनापती दो रोद्रिगो द कास्ता हा घोडा घेऊन त्याच्या मदतीला धावल्यामुळे तो बचावला. माघार घेणाऱ्या पोर्तुगीजावर मराठ्यांच्या सैनिकांनी टोकदार दगड व गोठे याचा मारा केला. मोठमोठी दगडे ढकलून दिली त्यामुळे अनेक पोर्तुगीजाची डोकी फुटली व कित्येकजन जखमी झाले. त्या दिवशी पोर्तुगीजांनी पूर्वेकडील वसाहतीत पूर्वी कधीही अनुभवला नव्हता असा दुर्दैवी प्रसंग त्यांना त्यावेळी अनुभवास आला. व्हाईसरायच्या दडांत गोळी लागली होती आणि दोम रॉडिगो द कोस्तच्या तोंडावर दुसरी गोळी लागून तो जखमी झाला होता. त्या स्वारीतील दिडशेपेक्षा अधिक लोक मेले होते राहिलेल्या लोकामध्ये कोणीही जखमी झाल्याशिवाय राहिले नव्हते. सर्वाची घोडी मराठ्यांच्या हाती लागली होती. शेवटी एका खाडीच्या खंदकातून सैनिक परत जाण्यास निघाले. काही सैनिकाला नौका न मिळाल्याने भरती वादळ्याने वाहून गेले. काही गाळात रुतले राहिलेल्या सर्वांना मराठ्यांनी कापून काडले. या लढाईचे नेतृत्व स्वत: संभाजी राजांनी केले होते. हा सर्व प्रसंग गोव्याच्या आजुबाजूच्या लोकांनी व गोवेकरांनी टेकड्यावर चढून पाहत होते. पण

कोणीही त्याच्या मदतीला आले नाही यावेळी संभाजी राजांनी पोर्तुगीजांचा पाटलाग करून गोव्यावर हल्ला करण्याचा बेत आखला होता; परंतु नदीला भरती आल्यामुळे ते शक्य झाले नाही. याचा उल्लेख खडो बल्लाळ याच्या त्रोटिक हकीगतीत येतो, "ते दिवशी गोवे घ्यावयाचेच परंतु फिरगीयाचे दैव समुद्राने राहीले."[१८१]

१० डिसेंबर १६८३ रोजी गोव्याच्या विजरईने पोर्तुगालच्या राजास जुवे बेटावरील लढाई बाबत लिहितो की, "मी गोव्याला येऊन पोहचल्यानंतर अवघ्याच दिवसात शत्रूने सां इश्तेव्हवं (सेंट स्टिफन) या बेटावर हल्ला चढविला. ती बातमी कळताच माझ्या हाताशी जे मूठभर लोक होते त्यांना घेऊन दुसऱ्या दिवशी मी शत्रूवर चाल करून गेलो. आम्ही ज्या निश्चयाने शत्रुवर हल्ला चढविला तो निश्चय पाहून शत्रू त्याने पळ काढण्यास सुरुवात केली; परंतु आमच्या सैनिकांच्या हातून ते वर्तन घडले ते अतिशय लाजीरवाने होते. शत्रूचे एक लाहानसे घोडदळ तेथे होते ते घोडेस्वार पाहून आमच्या सैनिकांना ते आपणावर चालून येत असावेत असे वाटले व त्यांनी शत्रूला पाठ दाखवून पळ काढण्यास सुरुवात केली. शत्रूची आमच्या सैन्याने एवढी दहशत घेतली की, त्या भरात त्यांनी एकदम नदीत उड्या टाकल्या काही सैनिक नदीत बुडून मेले. शेवटी ५० माणसासह मी माघारी परतलो. शत्रुने आमचा पाठलाग केला, पण नंतर त्याने तो नाद सोडून दिला..." [१८२]

या नंतर मराठ्यांचे सैन्य जास्तकाळ सेंट स्टीफेन बेटावर न राहता तेथून लवकरच निघून गेले. कारण पोर्तुगीज आरमारचा पुन्हा वेढा पडण्याची शक्यता होती. तसेच शहाअलम प्रचंड मोघल सैन्य घेऊन कोकणात उतरला होता. तेव्हा पोर्तुगीज व मोगल यांच्या कचाट्यात सापडावयास नको म्हणून हे बेट सोडले. पोर्तुगीज विजरईने राजाला लिहिलेल्या पत्रात म्हटले, संभाजी महाराजांना माघार घेण्याची एवढी घाई झाली ही त्याने केवळ आपला तोफखानच नव्हे तर पुष्कळ सामान मागे टाकले. त्याने वापरलेली हत्यारे नदीत सापडतात. प्रत्यक्षात या लढाईमध्ये मराठ्यांनी तोफा वापरल्याच नव्हत्या. युद्धाला वर्णणात तोफाचा

---

[१८१] *गोखले कमल श्रीकृष्ण : शिवपुत्र संभाजी , ज्ञान-विज्ञान विकास मंडळ, पुणे १९७१(पहिली अवृत्ती) पृ.क्र.१८५.*
[१८२] *दारवटकर अनंत : अद्वितीय छत्रपती श्री संभाजी महाराज (खंड ४) श्रीशंभू प्रेरणा प्रकाशन, पुणे २०१२ (प्रथमावृत्ती) पृ.क्र. १९७९.*

उल्लेख ही येत नाही. पोर्तुगीजच तोफखाना येण्याची वाट पाहत होते; परंतु मराठ्यांच्या हल्ल्यामुळे ते तेथेच ठेवून परतले आसावे. नदीच्या पात्रात हत्यारे  सापडल्याचे सांगतो ती पोर्तुगीजाची ४०० सैनिक जुवे बेटावर हल्ल्यासाठी गेले होती. त्यातील फक्त ५० सैनिक जीवंत परतलीत यावरुन ती कोणाची असावेत हे सहज समजते.

मोगलाचे सैन्य जवळ येत आहे हे जाणून संभाजी राजांनी गोवा घेण्याचा विचार सोडून ते त्याच्या हद्दीतून बाहेर पडण्यासाठी वेळ हवा होता. त्यासाठी त्यांनी पोर्तुगीजासोबत बोलणी करण्यासाठी २ डिसेंबरला दुर्गादास राठोडला गोव्यास पाठवले. यावेळी पोर्तुगीजांचा मानस आजमावण्याचा त्याने प्रयत्न केला; परंतु दुर्गादासाजवळ संभाजीराजांचे खास पत्र नसल्याने व्हाईसरायने त्याला भेट दिली नाही. यानंतर मोगलाचे सैन्य दक्षिण कोकणात पोहोचण्यास अवधी आसल्यामुळे आपल्या सैन्याचा मोर्चा पोर्तुगीजच्या साष्ट व बारदेशाकडे वळवला. दि. ११ डिसेंबर १६८३ रोजी मराठ्यांनी साष्ट व बारदेशावर हल्ले केले यावेळी मराठ्याच्या सैन्यात ६०००घोडे  स्वार १० हजार पायदळ होते.

**५.८.३.५ साष्ट :**

११ डिसेंबर १६८३ रोजी मराठ्यांचे एक हजार घोडदळ व तीन हजार पायदळ सालसेत प्रांतात शिरुन लुटालुट करू लागले. गुरेढोरे, धान्य वगैरे जे मिळेल ते लुटीत होते. मरगोव येथील एका चर्चमध्ये व बाजुच्या घरात चार फादर्स व तीन पोर्तुगीज सैनिक होते ते भिवून १० दिवसापर्यंत दडून बसले. मराठी सैन्यास तोंड देणे शक्य नाही म्हणून गोव्यास गेले. चर्चच्या इतर लोकांनी शरणांगती पत्करली शरणांगतानी गाव सोडून जाण्याची अट त्यांना मराठ्यांनी घातली होती. जाताना अंगावर नेतायेईल तेवढी संपत्ती बरोबर न्यावयाची होती; परंतु मराठ्यांने आपले वचन पाळले नाही. त्यांनी पोर्तुगीज लोकांच्या जवळच्या सर्व वस्तू काढून घेतल्या काहींना कैद केले. त्या चर्चमध्ये २०० बायका होत्या त्याच्याजवळच्या वित्तविषक वस्तू हिरावून घेतल्या काही सैनिकांनी त्यांच्यावर आत्याचार केला. त्यामुळे अनेक स्त्रीयांनी विहीरीत उड्या टाकून जीव दिला तर काही स्त्रियांस स्वता:ची लाज

राखण्यासाठी सॉव लॉरेन्स नदीत पळून जाऊन गळाभर पाण्यात शिरुन बोटीची वाट पाहात बसल्या.

यानंतर मराठे असाळणे येथे शिरले रिओ दो साल बंदरावर यांचे चर्च होते त्यास चागंल्या प्रकारची तटबंदी असून त्याच्या रक्षणास तीनशे बंदुकधारी सैनिक होते. मराठी सैन्य येण्याची बातमी कळताच गोव्यास पळून गेले. चर्चमधील लोकांनी दारुगोळा नदीत टाकून राचोलच्या दिशेने पळ काढला. थोडे पळत जाताना त्यानी आपापसात चर्चा केली. मराठ्यांच्या हातात घरे देऊन पळून जाणे योग्य नाही हे त्याच्या लक्षात आले तेवढ्यात कुकळीच्या लोकांनी पोर्तुगीजाना उत्पन्न देत होते तेवढे पैसे मराठ्यांना देण्याचा करार करून आपले गाव लुटीपासून वाचविले. तेव्हा त्यांनी तसाच करार करून मराठ्यांच्या लुटीपासून आपले गाव वाचिवले. १८ हजार क्रुसेडो देण्याचे कबूल केले होते. साष्टरमधील रायतूर व मूरगाव हे दोन किल्ले सोडून बाकीचे सर्व किल्ले प्रदेश मराठ्यांच्या ताब्यात आला होता.

**५.८.३.६ बारदेश :**

मराठ्यांनी एकाच वेळी साल्ट आणि बारदेशामध्ये हल्ले केले होते. बारदेश हा द्विवकल्पासारखे असून त्यात तीन किल्ले होते त्या तीन्ही किल्ल्यावर चांगला तोफखाना होता. मराठ्यांचा कोणीही प्रतिकार केला नाही. जे गाव सहज लूट करण्यासारखी होती ती मराठ्यांनी लुटली मराठ्यांनी थिअे किल्ल्यास वेढा दिला. वेढा दिल्यानंतर १० दिवस पोर्तुगीजांनी हा किल्ला लढवला; परंतु मराठ्यांनी किल्ल्याचा पाणी पुरवठा तोडल्यामुळे हा किल्ला त्यांना मिळाला. दुसरे राहिलेले दोन्ही किल्ले न लढताच मराठ्यांना मिळाली. या वरील किल्ल्यातील ४१ पोर्तुगीज फादर्सना संभाजी राजांनी कैद करून त्याची धिंड काढली. मराठे साष्ट व बारदेशामध्ये २६ दिवस होते. या दिवसामध्ये संपूर्ण सालसेत व बाददेश प्रांत लुटून आणि जाळून फस्त केला. कोण्ही त्याचा प्रतिकार केला नाही. संभाजी राजांनी बाददेशातील किल्ल्यातून शेहेचाळीस (४६) तोफा काढून नेल्या. मराठ्यांचे साष्ट व बाददेशवरील हल्ले चालू असतानाच संभाजी गोवे बेट जिंकून घेतो की काय अशी धास्ती विजरईस वाटत होती. विजरई इतका हताश झाला होता की, तो गोव्यातील बो जेजुस या

चर्चमध्ये गेला तेथील सेंट फ्रान्सिस झेवियरच्या शवाच्या हातात आपल्या हातातील राजदंड देऊन संकटनिवारणार्थ त्याने करूणा भाकली.[१८३] पोर्तुगीजांची काय हालत झाली होती याचे वर्णन इंग्रज प्रवासी जे ओव्हिंकुटन याने आपल्या प्रवासवर्णनात केले आहे. "पूर्वी ज्या पोर्तुगीजाचा त्याच्या पूर्वसमुद्रातील वैभवाबद्दल व दराऱ्याबद्द नावलौकिक गाजला होता आणि जे ईराणच्या आखातातील व हिंदुस्तानतील संपती व दौलत यांने संपन्न झाले होते, तेच पोर्तुगीज आता आगदी निकृष्टावस्थेत किंवा अवनतावस्थेत वावरत आहेत."[१८४] शहजादा शहाआलम पोर्तुगीजाच्या हद्दीत आल्याचे कळताच संभाजीराजे गोव्याहून कुच करून १६८३ च्या आखेरीस रायगडला पोहोचले त्यानंतर २५ जानेवारी १६८४ ते ४ फेब्रवारी १६८४ या काळात मराठे-पोर्तुगीज तह झाला. हा तह दोघान्ही पाळला नाही पुढे दीड वर्ष तहातील वाटाघाटी चालूच राहिल्या. संभाजी राजांनी जिंकलेला प्रदेश जवळपास १६८८ पर्यंत तसाच राहिला होता. संभाजी राजांनी पोर्तुगीजांवर लढाई केली नसती तर संपूर्ण दक्षिण कोकण पोर्तुगीज व मोगलांच्या ताब्यात गेले असते.

### ५.८.४ संभाजी राजे फ्रेंच आणि डचं संबंध :

पोर्तुगीज, इंग्रजांच्या पाठोपाठ फ्रेंच व डचांनीही भारतामध्ये आपल्या वखारी स्थापन केल्या होत्या. छत्रपती शिवाजी महाराजाचा सबंध फ्रेंच व डचांशी आला होता. यामध्ये इंग्रज जेव्हा दारुगोळा व तोफखाना देण्यास टाळाटाळ करत होते तेव्हा फ्रेंचांकडून शिवाजी महाराजानी दारुगोळा व तोफखाना घेतला होता. तसच डचांशी चांगले संबध ठेवले होते. संभाजी महाराजांनी सुद्धा फ्रेंच व डचांशी मैत्रीचे संबध ठेवले होते. पोर्तुगीजाचा मराठ्यांची संघर्ष चालू असताना संभाजी राजे राजापूरच्या मुक्कामी असताना फ्रेंच वखार प्रमुखाकडून पोर्तुगीजास धान्य व दारुगोळा पुरवू नये असे अश्वासन घेतले होते. फ्रेंचानी ते पाळलेले सुद्धा त्याचबरोबर यावेळी फ्रेंचांकडून संभाजीराजांनी १५०० पागोडे कर्ज ही घेतले होते. जंजिऱ्याच्या सिद्दीचा धडा शिकवण्यासाठी १६८१ च्या डिसेंबर संभाजी राजानी मुरुड

---

[१८३] *गोखले कमल श्रीकृष्ण : शिवपुत्र संभाजी , ज्ञान-विज्ञान विकास मंडळ, पुणे १९७१(पहिली अवृत्ती) पृ.क्र.१८८.*
[१८४] *बेंद्रे वा.सी. : श्री छत्रपती संभाजी महाराज यांचे विचिकित्सक चरित्र, मनोरमा प्रकाशन,मुंबई ,२००१ (तृतियावृती) पृ.क्र.३३८.*

जंजिऱ्याला वेढा घातला. यावेळी पोर्तुगीज व इंग्रज याचे सिद्दी धार्जिणी धोरण असल्यामुळे या वेढ्याच्या वेळी डचांची मदत संभाजी राजांनी घेतली होती.

पूढे १६८८ मध्ये मराठे व मोगल संघर्ष चालू असताना फ्रेंचाना आपल्या सुरक्षिततेची धास्ती वाटू लागली. कारण यावेळी मोगल यशस्वी होणार अशी समजूत फ्रेंचाची झाली. त्यामुळे पांडेचेरीचा गव्हर्नर फ्रान्सिस मार्ता याने मोगल अधिकारी महमद सादिक याच्यांशी मैत्री प्रस्तापित करण्यासाठी वादीवाश येथे भेट घेतली. फ्रेंचानी मोगल अधिकाऱ्यांना नजराणे देऊन पाँडेचरीच्या वखारीवर मराठ्यांच्या परवानगीशिवाय तटबंदी बांधण्यास सुरु केली. याबाबत मराठ्यांचा कर्नाटकचा सरसुभेदार संभाजीचा मेव्हणा हरजीराजे महाडिक फ्रेंचाकडे तक्रार करून १६८८ च्या जुलै महिन्यात तटबंदीचे काम थांबवण्याचा आदेश दिला. तेव्हा फ्रेंचानी हरजीराजांची जिंजी येथे भेट घेऊन तटबंदीमुळे मराठ्यांचेतही संरक्षण होईल असे पटवण्याचा प्रयत्न केला; परंतु मराठ्यांनी तटबंदी बांधण्यास परवानगी नकारली यामुळे फ्रेंच-मराठे तणाव निर्माण झाला तेव्हा फ्रेंच गव्हर्नर फ्रान्सिस मार्ता याने तटबंदीसंबंधात रीतसर परवानगी मिळण्यासाठी एम. जरमेन या वकिलाला हरजीराजेकडे पाठविले. यांच्यामध्ये बोलणी होऊन फ्रेंचांनी तजावरच्या वखारीत राहण्यास जाण्याचे कबूल केले. तसेच मराठ्यांना ५००० चक्र देऊन तटबंदीतील चार बुरुजाची उंची त्याच्या बुर्जीनुसार ठरविली जाईल असे आश्वासन दिले. दि. ०९/०१/१६८९ रोजी फ्रेंचाना तटबंदीस दर्मात रीतसर फर्मान मिळाले.[१८५]

फ्रेंचाना दिलेली परवानगीमुळे डच नाराज झाले त्यांनी फ्रेंचावर हल्ले सुरू करून मराठ्यांकडून मदत मिळविण्यासाठी हरजीराजांशी सलोख्याशी बोलणी सुरू केली. याचवेळी डचांनी मराठ्यांच्या काही अधिकाऱ्याना नजराने व इतर अभिवचने देऊन आपल्या बाजूने ओढण्याचा प्रयत्न केला. दि. २९ सप्टेंबर १६८९ रोजी हरजीराजाचा मृत्यू झाला. यानंतर राजारामानी जिंजीला असताना फ्रेंच आणि डच याच्याशी पाँडेचरीसंबंधात चर्चा केली

---

[१८५] *मोहोड शालीनी मधुकरराव : शिवपुत्र छत्रपती संभाजीमहाराज,कलादत्त प्रकाशन पुणे, २०१२पृ.क्र.२७३.*

फ्रेंचाकडून १८ रु. शेकडा व्याजाने ६०० चक्र कर्ज घेतले व डचाना २५,००० पागोड्यांना पाँडेचरी विकली अशा प्रकारे फ्रेंच व डंचाशी मराठ्याचे मैत्रीचे सबंध शेवटपर्यंत होते.

### ५.८.५ संभाजी राजे - अरब मैत्री सबंध :

छत्रपती शिवाजी महाराजांनी सागरी सत्तामध्ये अरब महत्त्वाची भूमिका बजावतात म्हणून त्याच्याशी मैत्रीचे सबंध ठेवले होते. पुढे छत्रपती संभाजी राजाने ही अरबाशी सलोख्याचे सबंध प्रस्थापित केले होते. मराठ्यांच्या कोकण किनारपट्टीवर जंजिऱ्याचा सिद्दी सुरुवातीपासूनच उपद्रव करत होता. तसेच पश्चिम किनारपट्टीवरील परकीय इग्रंज व पोर्तुगील सत्ता होत्या. त्या सिद्दीला मराठ्याच्या प्रदेशात उपद्रव करण्यास मदत करायच्या किंवा त्याच सह्याने सिद्दी असा उपद्रव करावयाचा सिद्दीच्या कारवायांना आळा घालण्यासाठी संभाजी राजांनी आरबांशी मैत्रीचे सबंध प्रस्तापित केले. आरबांच्या सहकार्याने सिद्दी, पोर्तुगीज व इंग्रज या तीनही सत्ता बंदोबस्त होणार होता. आरब या तिन्ही सत्ताचे शत्रू होते. सिद्दीच्या जंजिऱ्या किल्ल्याचा वेळी आरबाची आरमारी मदत संभाजी राजांनी घेतली होती. तसेच अनेक अरब लोकांना आपल्या सेवेमध्ये भरती केले होते. स्वतःच्या हद्दीत वखारी उघडण्यासाठी संभाजीराजानी परवानगी दिली होती. पुढे १६८३ च्या डिसेंबर महिन्यात संभाजी राजांनी पोर्तुगीजाकडून करंजा टेकडी एलिफंटा बेट जिंकून घेतले. एलिफंटा बेटावर मजबूत किल्ला बाधण्यासाठी संभाजी राजानी आरब आरमाराची मदत घेतली होती.

## ५.९ संभाजी राजांची कैद व मृत्यू

छत्रपती संभाजी महाराजांची कैद व त्यांचा मृत्यू यांची माहिती महत्त्वपूर्ण असल्यामुळे सर्व बखरकार, रॉबर्ट आर्म, मनुची, खाफिखान, साकी मुस्तैदखान, ईश्वरदास नागर यांनी दिलेली आहे; परंतु यातील कोणीही प्रत्यक्ष घटना घडताना हजर नव्हते. त्यामुळे ही सर्व माहिती ऐकीव बातम्यावर आणि घटनेनंतर काही दिवसांनी लिहिली गेल्यामुळे त्यात एकवाक्यता आढळत नाही. तसेच त्याच कारणामुळे संभाजी राजांच्या कैद व मृत्यू संदर्भात वेगवेगळया किवंदत्या प्रचलित झाल्या.

औरंबजेब बादशहा दक्षिणेत आल्यापासून मराठी राज्य हस्तगत करण्यासाठी सर्वोतोपरी प्रयत्न चालवून बागलाण, उत्तर कोकण, मध्य स्वराज्य, दक्षिण कोकण स्वराज्याच्या सर्व प्रदेशामध्ये चौफेर हत्ते केले होते. मोहिमामागून मोहिमा पाठवत होता; परंतु मराठ्यांच्या तीव्र प्रतिकारामुळे त्याला कोठेही यश आले नाही. इ.स. १६८२-१६८५ या चार वर्षामध्ये सतत त्यांनी मराठ्यांशी संघर्ष करूनही अपयश आल्यामुळे आदिलशाही व कुतुबशाही राज्य जिंकून घेण्याकडे वळवला. कारण संभाजी महाराजांनी औरंजेबाच्या विरुद्ध आदिलशाही व कुतुबशाही यांची मजबूत अशी फळी निर्माण केलेली होती. औरंगजेबाच्या विरुद्ध या सत्ता एकमेकांना साह्य करत होत्या. बादशहाने प्रथम विजापूरवर हल्ला करून १२ सप्टें. १६८६ जिंकून घेतला. आदिलशाही सुलतानास कैद केले. त्यानंतर १६८७ मध्ये गोवळकोंड्याचे कुतुशाहीचे राज्य नष्ट केले. या दोन शाह्या वर्षामध्ये गिळंकृत केल्यामुळे मोगला उत्साह निर्माण झाला. त्यांच्या सामर्थ्य व संपत्तीमध्ये वाढ झाली. यामुळे पुन्हा मराठ्याचे राज्य नष्ट करण्यासाठी सर्वसामर्थ्याने मोगल फौजा स्वराज्यामध्ये घुसवल्या. संभाजी महाराजांनी या फौजांना तीव्र असा प्रतिकार केला.परंतु या कालावधीमध्ये मोगलांनी स्वराज्याच्या सर्व भागात आघाडी उघडण्यामुळे एकटय पडलेल्या मराठी साम्राज्यावर प्रचंड दबाव निर्माण झाला. याचसुमार मराठ्यांचा सुरसेनापती हंबीरराव मोहितेंचा मोगल सरदार सजीखान यांच्याशी वाईच्या युद्धामध्ये संघर्ष करत असताना मृत्यू झाल्यामुळे संभाजी राजांना सर्व आघाड्यावर लक्ष देणे शक्य नव्हते. तरी संभाजीराजांनी कवी कलश, मोरोपंत, मालोजी घोरपडे यांना वेगवेगळ्या आघाड्यावर पाठवून स्वतः चौफेर नजर ठेवून मोगलांचा प्रतिकार चालवला होता. मोगलांच्या प्रचंड आक्रमणामुळे मराठी वतनदारांच्या मनात चलबिचल सुरू झाली. त्यांची ओढ जरी स्वराज्याकडे असली तरी मने जहांगिरीत गुंतले होते. त्यामुळे त्यांची स्वराज्यावरील निष्ठा डळमळू लागली. यामध्ये कुडाळचे खेमसावंत, पुण्याचे महादजी निंबाळकर हे मोगलांना मिळाले. त्यानंतर गणोजी शिर्केही मोगलांना मिळाले. याबाबत शकावलीमध्ये असा उल्लेख येतो. "आक्टोबर १५ ते १२ नोव्हेंबर १६८८ चे दरम्यान कवि कलश याजवरि सिरके पारखे जाले. व कवि कलश पळोन खेळणीयावर गेले."[१८६] यावेळी

[१८६] *बेंद्रे वा.सी. : श्री छत्रपती संभाजी महाराज यांचे विचिकित्सक चरित्र, मनोरमा प्रकाशन,मुंबई ,२००१ (तृतियावृती) पृ.क्र.६८१.*

कवी कलश पन्हाळा व खेळणा येथे आघाडीवर होता. मोगल याच प्रदेशावर चालून आल्यामुळे शिर्क्यांनी संधी पाहून बंड केले. त्याचवेळी फर्जंद बंधूंनी पन्हाळा किल्ला मोगलांना फितुरीने देण्यासाठी प्रयत्न करत होते. यांची माहिती संभाजीला लागल्यमुळे ती सफल झाली नाही. यासंदर्भात शकावलीमध्ये अशी "१३ नोव्हेंबर ते १२ डिसेंबर १६८८, संभाजी राजे यांनी कलशाचे बोले प्रल्हादपंत व सरकारकून व कित्येक लोकांस धरिले. मानाजी मोरे व वरकड सरकारकुन धरिले होते. ते सांडले....येसाजी व सिदोजी फर्जंद यास कडेलोट केले."[१८७] शिर्क्याच्या बंडाची बातमी संभाजी राजांना कळताच ते रायगडावरून कलशाच्या मदतीसाठी खेळण्यास आले. राजांनी शिर्क्यांचे संपूर्ण प्रदेश आपल्या ताब्यात घेताना त्यास पळवून लावून पुन्हा खेळण्यास आले. शकावलीमध्ये तशीच नोंद आहे. "तेच मासी (कार्तिक १६१० म्हणजे आक्टोबर-नोव्हेंबर १६८८) संभाजी राजे रायगडावरुन कलशाचे मदतीस आले. समागमे स्वारी शिर्कीयांसी युद्ध करून त्यास पळाऊन आपण खेळणीयास आले."[१८८] संभाजी राजांनी रायगडावरुन खेळण्यास येऊन प्रथम शिर्क्यांचा बंदोबस्त केला. तेथून पन्हाळ्यास गेले. तेथील फितूरांना पकडून शिक्षा दिल्यानंतर कवी कलशासह ते रायगडाकडे जाणार होते. परंतु पन्हाळ्यावरुन थेट रायगडावर जाणे सुरक्षित नव्हते. कारण स्वराज्यांतर्गत वरील घडामोडी चालू असताना पन्हाळा किल्ला फितुरीने न घेता आल्यामुळे औरंगजेब बादशहाने मुकर्रबखान ऊर्फ शेख निजाम याला २५ हजार फौज देऊन कोल्हापूर भागात रवाना केले होते. त्याला पन्हाळा जिंकायचा होता म्हणून त्याने कोल्हापुरात आपली छावणी टाकली होती. यांची बातमी संभाजी राजांना होती. त्यामुळे ते पन्हाळा-कऱ्हाड-सातारा-वाई-महाड मार्गे रायगडावर न जाता पन्हाळा-मलकापूर-खेळणा ऊर्फ विशालगड संगमेश्वर खेड मार्गे रायगडावर जाण्यासाठी १ फेब्रुवारी १६८९ ला खेळण्याहून संगमेश्वरा आले. कारण रायगडास मोगलाचा वेडा पडण्याची शक्यता होती. त्यापुर्वीचे शिर्के हे मुकर्रबखानास जाऊन मिळाले होते. औरंगजेब बादशाहाने आपली हेर यंत्रणा संपूर्ण स्वराज्यामध्ये पसरवली होती आणि या यंत्रणेव्दारे संभाजी महाराजांच्या सर्व

---

[१८७] *बेंद्रे वा.सी. : श्री छत्रपती संभाजी महाराज यांचे विचिकित्सक चरित्र, मनोरमा प्रकाशन,मुंबई ,२००१ (तृतियावृती), पृ.क.६८३.*

[१८८] *गोखले कमल श्रीकृष्ण : शिवपुत्र संभाजी , ज्ञान-विज्ञान विकास मंडळ, पुणे १९७१(पहिली अवृत्ती) पृ.क्र.४६४*

हालचालींवर बारीक नजर ठेवून होता. संभाजी महाराजांना जिवंत पकडण्याचा मनसुबा औरंगजेब बादशहाचा जुलै १६८८ पासून चालू असावा कारण यासंबंधात इंग्रजांना सुगावा लागला होता. मद्रासकडून लंडनला गेलेल्या पत्रात ते लिहितात, "राजाचे (संभाजी) मदतनिसांचा काटा काढल्याने व त्यांचा समूळ नाश झाल्याने आता खास आपल्यावर होणाऱ्या स्वारीला आपणास कसे तोंड देता येईल या चिंतेने राजा अगदी व्यग्र झाला आहे.मुघलांच्या छावणीतून ...भवानीदास नावाचा एक नागर ब्राह्मण येथे आला आहे. तो सांगतो की, औरंगजेब तर संभाजीला जिवंतच पकडण्याची भाषा बोलतो आहे."[१८९] औरंगजेबाला मराठ्यांशी संघर्ष करत गुंतण्यापेक्षा संभाजीला पकडून मराठी राज्य नष्ट करण्याचा हेतू होता. त्यामुळे आपल्या हेरांमार्फत बादशहानां कळले की, संभाजीराजे मोजक्या सैन्यांसह रायगडावरुन खेळण्यास गेले आहे. तेव्हा त्याने आपल्या अधिकारी आदसखान याला पत्र लिहिले की, "तुम्ही ज्या मुकर्रबखानास पन्हाळा घ्यावयास पाठवला आहे. त्यास तातडीने कळवा की, त्याने ताबडतोब येथील जहागिरदारावर (संभाजीवर) चालून जावे. तो जहागिरदार रायरीहून एकटास खेळण्यास गेला आहे. त्याचे जाण्याचे कारण म्हणजे शिर्क्यांशी भांडण देणे आहे. बहुत करून खान त्या जमिनदाराला (संभाजीला ) कैद करू शकेल आणि मुसलमानांची छळवणूक करणारा व दुराचारी यावर सूड घेईल."[१९०] या बादशहाच्या आदेशावरुन मुकर्रबखान हा संभाजीला पकडण्यासाठी कोल्हापूरहोन संगमेश्वर गेला.

संभाजी राजांना कसे पकडले याची सविस्तर माहिती आपणास मराठी कादगपत्रात व इंग्रजांच्या पकत्रव्यवहारात मिळत नाही. ती फक्त बखरकार आणि फारसी लेखक यांच्या लेखनात विस्तृतपणे येते. जेधे शकावलीत असा उल्लेख येतो, "माद्य वद्य ७ शुक्रवासरी (१ फेब्रुवारी १६८९ ) संभाजीराजे व कवी कलश रायगडास जावयास संगमेश्वरास आले असता सेक निजाम दौड करून येऊन उभयेतांस जिवंतच धरुन नेले. वरकड लोक रायगडास

[१८९] *गोखले कमल श्रीकृष्ण : शिवपुत्र संभाजी , ज्ञान-विज्ञान विकास मंडळ, पुणे १९७१(पहिली अवृत्ती) पृ.क्र.४६४*
[१९०] *गोखले कमल श्रीकृष्ण : उपरोक्त पृ.क.४६७.*

गेले."[१९१] औरंगजेबाचा चिटणीस आणि चरित्रलेखक मुस्तैदखान मासिरित संभाजीला पकडण्याचा प्रसंगाचे वर्णन असे केले आहे. "शेख निजाम हैद्राबादी ऊर्फ मुकर्रबखान, शुर सेनापती, त्याची कार्यकर्तीमुळे व नातलग लोकांस मिळून एकूण २५ हजारीच्या (२१ हजार स्वार) मनसबी आहेत. त्याला शत्रुच्या ताब्यात असलेला पन्हाळगड घेण्यास पाठविले. त्याने हुशार व चौकस माणसाप्रमाणे त्या नास्तिकाची बातमी आणली की त्याचे जवळचे नातलग जे शिर्के त्यांच्याशी झालेल्या बेबनावामुळे संभा रायरीहून खेळण्यास गेला आहे. तेथे त्या शिर्क्यांचा बंदोबस्त होता. त्याने खेळण्याची डागडुजी केली व तो संगमेश्वरी गेला आहे. तेथे तो कवी कलशने बांधलेल्या वाड्यात व सभोवतालील भागात सुखसमाधानानी मुक्काम करून राहिला आहे. तेव्हा लागलीच मानमरातबास पात्र होण्यासाठी आकांशा धरणाऱ्या व अनुयायासह बादशहावर निष्ठा धरून असलेला खान जिवाची पर्वा न करता कोल्हापूरहून निघाला. तेथून कुठेही पृथ्वीत आढळणार नाही. अशा दरी डोंगराच्या भयाण व कठीण रस्त्याने तो गेला. ती जागा ४५ कोस होती. त्याने विनाविश्रांती कूच कले. जरी संभाला त्यांच्या हेरांनी मोगली सैन्य येत असल्यची बातमी दिली तरी सत्तामदाने आणि गर्वाने धुंद झालेला तो संभा त्या हेरांवर डोळे वटारुन रागावून बोलला की, अरे बिनडोक माणसांनो, तुम्ही वेडे आहात ? मोगजी सैन्य येथे येऊ शकेल काय ? खानाने पुष्कळ श्रम साहून शांतचित्ते विजेच्या किंवा वाऱ्याच्या वेगाने अवचित येऊन संभास गाठले.तेव्हा त्या तिरस्कृत अधमाने ४-५ हजार (शे) दक्षिणी भारतासह खानावर हल्ला चढविला. कवी कलशला बाण लागून जखम होताच तो पळाला. थोड्या लढ्यानंतर तो पळाला व कवी कलशाच्या तळघरात लपून बसला. त्याला वाटले की त्याला कोणी पाहिले नाही. परंतु हेरांनी बरोबर माहिती खानाला दिली. खानाने इतर लोकांचा पाठलाग न करीता वाड्याला वेढा दिला. खानाचा मुलगा इकलासखान शुर गड्यांसह पायऱ्या उतरुन आत गेला व त्या हीन माणसाला व कवि कलशाला केस धरुन खान ज्या हत्तीवर बसला होता तेथे आणला.[१९२] यावरील वर्णनातील लेखकांची भावना तसेच काल्पनिकता सोडलीवर तत्कालीन मकरबखानच्या

---

[१९१] *बेंद्रे वा.सी. : श्री छत्रपती संभाजी महाराज यांचे विचिकित्सक चरित्र, मनोरमा प्रकाशन,मुंबई ,२००१ (तृतियावृती) पृ.क्र.६८७.*

[१९२] *बेंद्रे वा.सी. : श्री छत्रपती संभाजी महाराज यांचे विचिकित्सक चरित्र, उपरोक्त, पृ.क्र.६८७*

हालचालीची माहिती मिळते तसेच साकी मुस्तैदखान संभाजी राजा कविकलश यांच्या वाडयात पकडल्याचे वर्णने करित असला तरी तो चुकीचा वाटतो कारण महीपतरायचा सुभेदार रामचंद्र भल्लाळ भगवंतराव त्रिंबक प्रतिनिधी यास हि १९-१०-१७७१ च्या पत्रात संभाजी राजांना नावडी येथे पकडण्याचे लिहितो.[१९३] यावरुन संभाजीराजे मोगलांशी चकमक झाल्यानंतर देवळात किंवा कोणाच्याही वाडयात न जाता नावाडी म्हणजे पेढा संगमेश्वर बंदरातून शास्त्री नदीच्या खाडीमार्गे समुद्रातून निसटून जाताना पकडले गेले. पूर्वी लहान गलबते येथपर्यंत येत होती. ३ किंवा ४ फेब्रुवारी १६८९ रोजी राजे पकडले गेले.

संभाजीराजे पकडण्याच्या अगोदर मोगल-मराठ्यांमध्ये मोठी धुमश्चक्री लढाई केली. या लडाईमध्ये मराठ्यांच्या बाजूने संभाजीराजा सेनापती मालोजी घोरपडे स्वामीच्या रक्षणासाठी धारातीर्थी पडला. घोरपडे वंशावळीत यांचा उल्लेख येतो. राजाराम साहेब रायगडी होते. नंतर संभाजी महाराज यांनी मालोजी घोरपडे यांसी स (रजानी) देऊन मुखल्यारी सांगीन सरनोबतची वस्त्रे दिली आणि किले पनोळेस ठेऊन आपण रायगडास गेले. पुढे राज्यांत फौजा येऊन संभाजी महाराज मुलुक सर करीत होते. इतक्यात औरंगजेब बादशहा याची फौज चालून आली. सबब मालोजी घोरपडे महाराजांकडे संगमेश्वरास गेले. तेथे पादशहाकडील फौजेची व महाराजांची लढाई होऊन संभाजी महाराज यांसी धरून नेले. त्या गर्दीत मालोजीबाबा घोरपडे ठार जाहले.[१९४]

मुकर्रबखान ऊर्फ शेख निजाम हा कोल्हापूर-मलकापूर-अंबाघाट-सारवपे देवरुख या मार्गाने दक्षिणेकडून संगमेश्वराला आला. त्याच्यासोबत २ ते ३ हजार स्वार म्हणजे तीरंदाज होते. संभाजीजवळ मात्र ४००-५०० स्वार होते. ५ ते ६ पट अधिक असणाऱ्या सैन्यासमोर मराठ्यांचा पराभव होणे साहजिकच होते. त्या लढाईच्या धामधुमीत संताजी घोरपडे व खंडो बल्लाळ पळून जाण्यामध्ये यशस्वी झाले. यावेळी संभाजीराजे गाफिल होते. अशा दुर्गम प्रदेशात येतील याची कल्पना संभाजी राजांना नव्हती. जेव्हा मराठी हेरांकडून बातमी समजली तेव्हा फार उशीर झाला होता. मुकर्रबखान संभाजीला पकडल्यानंतर संगमेश्वर या

[१९३] *गोखले कमल श्रीकृष्ण : शिवपुत्र संभाजी , ज्ञान-विज्ञान विकास मंडळ, पुणे १९७१(पहिली अवृत्ती) पृ.क्र.४६४*
[१९४] *गोखले कमल श्रीकृष्ण : उपरोक्त पृ.क.४७०*

ठिकाणी छावणी दिली. त्यानंतर आलेल्या वाटेनेच तो कोल्हापूरकडे गेला. तेथून अतिशय वेगवान हालचाली करून कोल्हापूर-कऱ्हाड-वडूज-दहीवडी-फलटन-बारामती-बहादूरगड- अशा मार्गाने बादशाही छावणी सुखरुप पोचला.

त्यांना लष्करात आणि दरबारात आणावे. सारांश सर्वांना लष्करातून धिंड काढून फिरविण्यात आले. दिवाणे आममध्ये बादशहा बसला होता. त्यावेळी संभाजीला दरबारात आणण्यात आले. बादशहाने आज्ञा केली की, 'त्यांना कैदखान्यात घेऊन जा.' त्याचवेळी बादशहा आपल्या आसनावरून खाली उतरला. गालीच्याच्या कोपऱ्यावर बसून त्याने अल्लाहचे आभार मानले. बादशहाच्या नेत्रातून अश्रुबिंदू प्रकट होऊ लागले.[१९५] संभाजी राजांना कैद करून औरंगजेब बादशहासमोर हजर केले. त्यावेळी संभाजीराजे अतिशय बाणेदारपणे वागले. याबाबत माहिती ईश्वरदास नागर देतो. संभाजीराजांना कैद करून दिवाणखाण्याच्या प्रवेशव्दारापर्यंत येऊन पोचल्यावर बादशहाच्या आज्ञेने त्यांना न्यायालयासमोर उभे करण्यात आले. बादशहाने संभाजीकडे पाहिले. त्याची दुर्दशा पाहून बादशहाच्या मनावर परिणाम झाला. यानंतर बादशहा सिंहासनावरुन खाली उतरला आणि त्याने प्रार्थना करून परमेश्वराचे आभार मानले... पण संभाजी हा गर्विष्ठ होता. त्याची इतकी आवस्था झाली तरी त्याने बादशहाला ताजीम देण्यासाठी म्हणून यत्किंचितही मान लवविली नाही. इखलासखान आणि हमीदुद्धीनखान यांनी त्याला पुष्कळ समजाविले पण त्याचा काही उपयोग झाला नाही.[१९६] उलट बादशहा असा सिंहासनावरुन जमिनीवर आल्याचे पाहताच संभाजी महाराज व कवी कलश यांनी एकमेकांकडे पाहिले. कवी कलश हा शीघ्र कवी होता. त्याने त्या प्रसंगावर उस्फुर्तपणे एक कवनरचून संभाजीपुढे सादर केले.

"यावन रावण की सभा, संभू बंध्यो बजरणं ।
लहू लसत सिंदूर सम, खूब खेल्यो रनरंग ।
ज्यो रवि छवि लखत ही, खद्योत होत बदरगं ।

[१९५] *गोखले कमल श्रीकृष्ण : शिवपुत्र संभाजी , ज्ञान-विज्ञान विकास मंडळ, पुणे १९७१(पहिली अवृत्ती) पृ.क्र.४६४*
[१९६] *गोखले कमल श्रीकृष्ण : उपरोक्त पृ.क.४७२*

त्यो तुत तेज निहारी के लखत तज्यो अवरंग।।"

(रावणाच्या सभेत ज्या प्रमाणे हनुमानाला बांधून आणले होते त्याप्रमाणे संभाजी राजास औरंगजेबासमोर (यावन) उपस्थित करण्यात आले आहे. हनुमानाच्या अंगाला जसा शेंदर शोभून दिसतो तसे घनघोर युद्धामध्ये रक्ताने अंग माखल्याने, हे राजन, ते तुला शोभून दिसत आहे. ज्याप्रमाणे सूर्याला पाहताच काजव्याचा प्रकाश नाहीसा होतो त्याप्रमाणे तुझे तेज पाहून औरंगजेबाने आपल्या सिंहासनाचा त्याग केला आहे.)[११७]

या कठीण प्रसंगातही कवी कलशाने संभाजीराजांना उद्‌देशून पुढील अर्थाची हिंदी कविता म्हटली असे खाफीखानाने नमूद केलेले आहे, "हे राजन, तुला पाहून तुला ताजीम देण्यासाठी आलमगीर बादशहा आपल्या आसनावरुन खाली आला आहे." जरी खाफीखानाने त्या हिंदी काव्याचा अर्थ आपल्या परीने लावला तरी मतीतीर्थ तोच निघतो.

संभाजी राजे व कवी कलश या दोघांना पकडून मुकर्रबखान संगमेश्वराला छावणी घातली होती. तेव्हा औरंगजेब विजापूरहून अकलूजला पोहोचला होता. त्यानंतर तो बहादूरगडला आपली छावणी घातली. संभाजीराजांना पकडल्यानंतर मोगली प्रदेशात आल्यानंतर कशी धिंड काढून विटंबना केली याचे सविस्तर वर्णन खाफीखान देतो. "इराणच्या पद्धतीप्रमाणे त्यांना डोक्यावर लाकडी फळ्यांच्या लांबट टोप्या घालण्यात आल्या होत्या. त्यांच्या अंगावर विदूषकी थाटाचा पोशाख घालण्यात आला. त्याचासारखा छळ करण्यात येत होता. लाखो लोकांना त्याची विटंबना चाललेली दिसत होती. त्यांना उंटावर बसविण्यात आले होते. शिंगे, कर्णे, नगारे इ. वाद्ये वाजविण्यात येत होती. अशा स्थितीती कैद्यांना लष्करात आणण्यात आले. लोकांचे कान ज्यांना ऐकण्यासाठी आतुर झाले होते ते विजयसुचक नगारे झडु लागले. लाखो हिंदु आणि मुसलमान त्या दुष्ट आणि बंडखोर काफरांच्या छळामुळे होपरळून निघालेले होते. ते दुःखी होते. त्यांना या विजयसुचक नगाऱ्यांचा संदेश सुखदायक वाटला. त्यांचा आनंद गगनात मावेना."

[११७] *पवार जयसिंगरावः छत्रपती संभाजी स्मारक ग्रंथ,रिया पब्लिकेशन,कोल्हापूर ,२००९ (व्दितीयावृत्ती )पृ.कृ. १८५ १८६*

असे म्हणतात की, मुकर्रबखान कैद्यासह येण्याची बातमी आल्यापासून ४-५ दिवस भिकाण्यापासून ते थेट मोठमोठ्या लोकांपर्यंत इतका मोठा उत्साह पसरला होता की, त्यांना रात्री झोपही लागत नव्हती. १ ते २ कोसावर जाऊन त्यांच्या येण्याची मार्गप्रतिक्षा करीत होते. समानार्थाने जयघोष करत होते. ज्या रस्त्याने खान कैद्यांसह येत होता. त्या रस्त्यावरील शहरे किंवा रस्त्याजवळील सर्व शहरात व गांवात जेथे जेथे जेथे म्हणून ही बातमी गेली तेथे स्त्री-पुरुषांचे थवेच्या थवे मोठ्या उत्साहाने त्यांना पाहण्यासाठी दारोदारी, छपरावर व रस्त्यावर उभे राहत... काही दिवस तर रात्री शबेबरात (सन) आणि दिवसा ईद (सण) अशी लोकांची स्थिती झाली.[१९८]

संभाजी राजांना बहादूर गडाच्या छावणीत औरंगजेबाच्या बादशहासमोर हजर केले त्यावेळी साकी मुस्तैदखान तेथे हजर होता. त्यविषयीची हकीकत त्याने लिहीलेली आहे. तो लिहितो, "बादशहाने सरदारखान आणि हमीउदुद्दीनखान यांस आज्ञा केली की, तुम्ही मुर्करबखानास सामोरे जावे आणि संभाजीला बेड्या घालून आणावे "मुकर्रबखान युक्ती प्रयुक्तीने मराठ्यांच्या मुलखातून बाहेर पडला. आलमगीर बादशहाच्या भाग्याने संभाजीच्या साहाय्यांपैकर आणि पाठीराख्यांपैकी कोणीही त्याच्यासाठी काही धडपड करू शकले नाहीत. जेव्हा बादशाही सैन्याने अकलूजहून कुच करून बहादूरगड येथे (दि.१५-२-१६८९) छावणी केली. तेव्हा कैद्यांना लष्करात आणण्यात आले. बादशहाने आज्ञा केली की, संभाजीला लष्करापासून दोन कोसांवर तख्ता कुलाह (इराणमध्ये गुन्हेगारांच्या अंगावर घालीत तसा पोशाख आणि विदुषकासारखी उंच लाकडी टोपी) चढवावे. त्याच्या सहकाऱ्यांच्या अंगावर विदुषकी वस्त्रे घालावी. त्यांना तऱ्हेतऱ्हेने पीडा देऊन त्यांची विटंबना करावी. त्यांना उंटावर स्वार करावे आणि ढोल बडवित आणि शिंगे कर्णे वाजवित औरंगजेबाने संभाजीराजांना कैद केल्यानंतर मारण्यापूर्वी मुस्लीम धर्म स्वीकारण्यास सांगितले आणि संभाजी राजांनी त्यांची मुलगी झेबुन्निसाची मागणी केली या बखरीतील व इतर साहित्यातील माहितीला कागदोपत्री कोणताही पुरावा सापडत नाही. या गोष्टी खोट्या, काल्पनिक अशा दंतकथा आहेत.

---

[१९८] *पगडी सेतू माधवराव (संपा.) : मराठयांचे स्वातंत्र्ययुध्द-खाफिरखानाचा साधनग्रंथ,जोशी आणि लोखंडे प्रकाशन, पुणे १९६२ (प्रथमावृत्ती) पृ.क्र. १८-१९.*

संभाजी राजांना मारण्यापूर्वी काय घडले हे साकी मुस्तैदखान आणि ईरश्वरदास नागर यांनी लिहिले आहे. मुस्तैदखान लिहितो त्याच रात्री (दि.१५-२-१६८९) संभाजीचे डोळे काढण्यात आले. दुसऱ्या दिवशी कवी कलशाची दुष्ट जीभ उपटण्यात आली. संभाजीने मुसलमानांना मारले होते, त्यांना बंधनात टाकले होते आणि त्यांना विविध प्रकारे पीडित केले होते. त्याने इस्लामी राज्यातील नगरे गारद केली होती. त्याला जिवंत ठेवण्याऐवजी त्याला नाहीसा करणे बरे, असे बादशहाचे मत झाले. धर्मशास्त्राज्ञानी संभाजीच्या वधचा फतवा दिला. त्याबरोबर अमीर उमरावांनीही हाच सल्ला दिला. त्यास अनुसरुन संभाजीचा वध करणे आवश्यक आहे असे ठरविण्यात आले. बादशाही सैन्य (३-३-१६८९ रोजी) केरीगाव ऊर्फ फतेयाबाद येथे आले. तेथे (११ मार्च १६८९) रोजी संभाजी आणि कवी कलश यांना तलवारीच्या योगे ठार मारण्यात आले.[१९९] तर यासंदर्भात ईश्वरदास लिहितो, "यानंतर दोन दिवसांनी बादशहाने रुहुल्लाखान यास खालीलप्रमाणे आज्ञा केली, तुम्ही जाऊन संभाजीपाशी चौकशी करावी की, तुझे खजिने जडजवाहीर आणि इतर संपत्ती कुठे आहे,तसेच बादशाही सरदारापैकी कोण कोण तुझ्याशी पत्रव्यवहार करून संबंध ठेवित होते, पण माणासाची जिवीताची आशा सुटली की, तो मनात येईल ते बडबडत सुटतो. संभाजी हा गर्विष्ठ होता. त्याने बादशाहासंबंधी घाणेरडे शब्द उच्चारले आणि त्याची निंदानालस्ती केली. त्याने जे काही म्हटले ते जसेच्या तसे रुहुल्लाखानाने बादशहास सांगितले नाही, पण ते बोलने अशा प्रकारचे होते याचा त्याने बादशहाला इशारा दिला. यावर बादशहाने आज्ञा केली की, "संभाजीच्या डोळ्यात सळई फिरवून त्याला नवीन दृष्टी द्यावी."

डोळे काढल्यानंतरही संभाजी कसा स्वाभिमानाने वागला यासंबंधी ईश्वरदास नागर लिहितो, "संभाजीचे डोळे काडण्यात आले, पण संभाजी गर्विष्ठ आणि स्वाभिमानी होता. त्याने त्या दिवसापासून जेवणखाणे सोडले. त्याच्या पहारेकऱ्यांनी त्याला अन्न सेवन करण्यास पुष्कळ सांगितले, पण त्याचा उपयोग झाल नाही. त्याला काही उपवास घडले. शेवटी ही बातमी बादशहाला कळविण्यात आली. संभाजींचे दिवस भरले होते. बादशाहच्या

[१९९] *गोखले कमल श्रीकृष्ण : शिवपुत्र संभाजी , ज्ञान-विज्ञान विकास मंडळ, पुणे १९७१(पहिली अवृत्ती) पृ.क्र.४७४.*

आज्ञेन त्याला वधस्थानकडे नेण्यात आले. तेथे त्याच्या शरीराचे तुकडे तुकडे करण्यात आले.[२००] साकी मुस्तैदखान आणि ईश्वरदास नागर म्हणण्यानुसार १५ फेब्रुवारी १६८९ रोज संभाजी राजांना औरंगजेब बादशहसमोर उभे करण्यात आले. स्वाभिमानी संभाजीराजांना औरंगजेबास कसल्याही प्रकारची दाद देत नव्हता त्यामुळे हालहाल करून मारण्याचा आदेश दिला. ३ मार्च १६८९ ला त्यांची छावणी कोरेगाव ऊर्फ फतेयाबाद आली. तेथे ११ मार्च १६८९ रोजी संभाजी राजा आणि कवी कलश यांना ठार मारले. संभाजीरातांना बडुस मारल्याचा उल्लेख १४ जानेवारी १७१९ च्या धनकवाडीच्या कुलकर्णीच्या कागदात आला आहे. तो असा, "पातशाहा वडु कोरेगावी येऊन मुक्काम केला. तेथून लष्कर पाठवून शिवाजीराजे पहिलेच गेले होते.त्याचा लेक संभाजीराजे धरुन आणिला आणि वढू कोरेगावात मारिला. मग त्याचा लेक शाहुराजा व बाईका आपल्या जालीत ठेवली."[२०१] तसेच शाहू महाराज मोगलांच्या कैदेतून सुटल्यानंतर १७१५ मध्ये आपल्या वडिलाचे वडु बुद्रुक या ठिकाणी वृंदावन बांधून त्याच्या पूजा अर्चेची सोय केल्याची माहिती प्रत्यक्ष पेशवे दप्तरात सापडते. पहिला कागद १८ जानेवारी १७१५ चा आहे. तो "राजमंडल-वृंदावन वृंदावन महाराज राजश्री कैलासवाशी संभाजीराजे स्वामी दर जागा मौजे वढु ता ।। प्राबळप्र।। जुनर भिकाराम गोसावी व वासुदेवभेट बिन शामभट धर्माधिकारीणी वृंदावनाचे शुश्रुषेबददल देविले आहेत. नैवेद्य व नंदादीप व धूप व बाग करावयास व तुलसी लावावयास व अन्नछत्राबद्दल इनाम जमिन छ २२ मोहरम सन खमस अशर मौजे मजकुरपैकी इनामजमीन नूतन ४५ बागाईत जमीनः।।।.१५ पड जमीन-तीन प्रतीची।-आसामी इनाम घातली आहे."[२०२]

संभाजी महाराजांना औरंगजेब बादशहाने येवढे क्रूर व अमानुष मारले आसावे. त्याचे कारण म्हणजे शिवाजी महाराज त्याच्या आग्रा कैदेतून सुटुन आले होते. ती बादशहाची सर्वात मोठी चूक होती. त्यमुळे त्याला मराठी सत्ता नेस्तनाबूत करण्यासाठी संपूर्ण आयुष्यभर झटावे लागले. संभाजी हाती सापडल्यावर अशी चूक करणे शक्य नव्हते. त्यामुळे त्याने

---

[२००] *गोखले कमल श्रीकृष्ण : शिवपुत्र संभाजी , ज्ञान-विज्ञान विकास मंडळ, पुणे १९७१(पहिली अवृत्ती) पृ.क्र.४७४.*
[२०१] *बेंद्रे वा.सी. : श्री छत्रपती संभाजी महाराज यांचे विचिकित्सक चरित्र, मनोरमा प्रकाशन,मुंबई ,२००१ (तृतियावृती) पृ.क्र.६८७*
[२०२] *बेंद्रे वा.सी. : श्री छत्रपती संभाजी महाराज यांचे विचिकित्सक चरित्र, उपरोक्त, पृ.क्र.७०८.*

संभाजीला ठार केले. येवढ्या क्रूर मारण्याचे कारण मराठी राजांना असे मारले म्हणजे मराठी जनतेमध्ये दहशत बसवावी जेणे करून मराठी राज्य आपल्या ताब्यात लवकर येईल; परंतु याच्या उलट औरंगजेबाला अनुभव आला. त्याला स्वतःचा शेवट या दक्षिण भारतात करावा लागला.

# प्रकरण सहावे

# समारोप

भारतात इतिहास एक शास्त्र म्हणून फार उशिरा प्रगत पावले. आजही इतिहासलेखनाकडे तितक्या गांभीर्याने पाहिले जात नाही. त्यामुळेच आपल्या इतिहासाच्या पुस्तकावर किंवा सर्वसामान्य जनमनावर कांदबऱ्या आणि नाटकांचा प्रभाव जाणवतो. याशिवाय कोणत्याही ऐतिहासिक व्यक्तीच्या मूल्यमापनाची एक सोपी आणि सोयीस्कर पद्धत लेखकांनी शोधून काढली आहे. ती म्हणजे एखादी व्यक्ती यशस्वी झाली तर तिला सर्व गुण चिकटवायाचे. छत्रपती संभाजी महाराजांच्या बाबतीत नेमके हेच झाले. स्वराज्याचे रक्षण करत असताना संभाजीरोजे संगमेश्वर येथे आकस्मितपणे पकडले जातात. त्यांना कैद करून ठार केले जाते. यामुळे मराठी बखरकारांनी व साहित्यिकांनी आपल्या साहित्यकृतीमध्ये दुर्गुणयुक्त संभाजीराजांची प्रतिमा रंगवली. तत्कालीन ऐतिहासिक कागदपत्रे व साधन यांचे संशोधन केले तर संभाजीराजांचे वास्तविक चरित्र आपल्या समोर येते. ज्यामध्ये संभाजीराजे धैर्य, धाडस, चिकाटी, दूरदृष्टी इत्यादी गुणांचे आदर्श होते. ते ज्ञानपिपासू, प्रेमळ, प्रजाहितदक्ष, रणझुंजार व मुलकी कारभारात तज्ञ असल्याचे दिसून येते.

प्रस्तुत संशोधनाच्या पहिल्या प्रकरणामध्ये संशोधन विषयांच्या संबंधित ऐतिहासिक पार्श्वभूमी मांडली आहे. यात संपूर्ण भारतावरती अधिपत्य गाजवणाऱ्या मोगल सत्तेला आव्हान देण्याचे कार्य संपूर्ण भारतात दक्षिण भारतातील ज्या भोसले घराण्यांनी केले, त्या भोसले घराण्याचा इतिहास व संभाजीराजांच्या पूर्वजांची थोडक्यात माहिती मांडली आहे. भोसले घराण्याची सुरूवात ही मारीचीच्या पुत्रापासून सुरू झालेल्या सूर्यवंशातून होते. भोसल्याचे मूळ पूर्वज हे राजस्थानातील शिसोदे वंशातील होते. त्यांच्याच वंशातील देवराजराणाजी दक्षिण भारतात आला व त्यांच्या २०० व्या पिढीत बाबाजी राणाजीपासून भोसले घराण्यांची सुरूवात होते. २०१ व्या पिढीत मालोजी व त्यानंतर शहाजीराजे. बाबाजी

भोसले निजामशाहीच्या पदरी सेवेत होते. त्यानंतर त्यांची दोन मुले मालोजी व विठोजी ही पराक्रमी निघाली. त्यांनीही निजामशाहीचीच सेवा केली. त्यावेळी भोसले प्रतिष्ठित क्षत्रीय घराणे असल्यामुळे त्यांचे नाते संबंध जाधव व निंबाळकर या घराण्यांशी होते. शहाजीराजांची आई दिपाबाई उर्फ उमाबाई या वणगोजी नाईक निंबाळकराच्या कन्या होत्या आणि वणगोजी राजांची बहिण अंबिकाबाई या लखोजी जाधवाच्या पत्नी होत्या. त्यांचीच कन्या जिजाऊ होत. म्हणजे शहाजीराजाच्या आईच्या आत्याची मुलगी जिजाऊ होत्या. शहाजीराजेच्या वयाच्या नवव्या-दहाव्या वर्षी त्यांचा विवाह जिजाबाईंशी झाला. भातवडीचे युद्ध शहाजी राजांच्या आणि मराठ्यांच्या इतिहासला कलाटणी देणारी घटना आहे. या युद्धानंतर शहाजी राजाचे व्यक्तिमत्व राजकीय पटलावर विशेष चमकू लागले.

दक्षिण भारताच्या राजकारणात त्यांचे वजन वाढते. यामुळे निजामशाहीचा वजीर मलिकांबर त्याचा द्वेष करू लागल्यामुळे त्यांनी आदिलशाहीचा स्वीकार केला. आदिलशाहीमध्ये दुसरा इब्राहीम आदिलशाह असेपर्यंत ते राहिले. त्यानंतर त्यांनी पुन्हा निजामशाहीचा स्वीकार केला; परंतु दरम्यानच्या काळामध्ये सासरे लखुजी जाधवांचा व त्याचे दोन पुत्र व एक नातवाची हत्या निजामशाहाने दौलताबाद येथे बोलावून केल्यामुळे निजामशाहीचा त्याग करून स्वतंत्र राज्याचा पहिला प्रयत्न केला. शहाजी राजांनी स्वराज्याची संकल्पना पहिल्यांदा मांडली व त्यासाठी आपल्या कारकिर्दीमध्ये तीन वेळेस प्रयत्न केला. स्वराज्याचा पहिला प्रयत्न लखुजी जाधवांच्या खुनानंतर बंडखोर मोगल सरदार लोदीला हाताशी धरून जुन्नर आणि संगमनेरपासून नगर आणि दौलताबादपर्यंतचा निजामशाहीचा सर्व प्रदेश जिंकून 'भिमगड' किल्ला दुरूस्त करून त्यास 'रायगड' असे नाव देऊन सर्व कारभार चालवण्यास सुरूवात केली; परंतु मोगल व दक्षिण भारतातील शाह्यासमोर त्यांचा टिकाव लागणे अशक्य असल्यामुळे ते मोगलाईत गेले. स्वराज्याचा दुसरा प्रयत्न त्यांनी मलिकांबरचा मुलगा फत्तेखानाने मोगलाशी हातमिळवणी करून निजामशाही बुडवण्याचा प्रयत्न चालवला. त्यावेळी शाहीजीराजांनी मोगलाईचा त्याग करून निजामशाहीच्या एका लहान वारसाला गादीवर बसवून जुन्नर येथे स्वतंत्र निजामशाहीचा कारभार सुरू केला.

जवळपास तीन वर्ष मोगलांशी झगडा दिला. शेवटी मोगल व आदिलशाहीच्या सामर्थ्यापुढे तग धरणे अशक्य असल्यामुळे निजामशहास मोगलांच्या ताब्यात देऊन स्वतः आदिलशाहीत प्रवेश केला. स्वराज्याचा तिसरा प्रयत्न त्यांनी आदिलशाहीत असताना कर्नाटकातील बहुतांश भाग जिंकून शांतता व सुव्यवस्था निर्माण करून बंगलोर येथे स्वतंत्र राजदरबार भरवून कारभार चालवला. तेव्हा नाममात्र आदिलशाहीचे अधिपत्य होते.

शहाजी राजापासून स्वराज्याची प्रेरणा शिवाजी महाराजांनी घेऊन मातोश्री जिजाऊच्या मार्गदर्शनाखाली वडिलांच्या जहागिरीतून स्वराज्य स्थापनेस सुरूवात केली. प्रारंभी आपल्या जहांगिरीतील किल्ले ताब्यामध्ये घेतले. यानंतर आदिलशाहीतील जावळीचा प्रदेश संरक्षणाच्या दृष्टीने अधिक महत्त्वाचा असल्यामुळे जावळीवर हल्ल करून चंद्रराव मोरे यशवंतरावाचा पराभव करून जावळी स्वराज्यात सामील केली. आदिलशाहीने शिवाजी महाराजांच्या वाढत्या वर्चस्वाला पायबंद घालण्यासाठी अफजलखानाची नियुक्ती केली. अफजलखानाची स्वराज्यावरील मोहिम म्हणजे स्वराज्याच्या अस्तित्वाला धोका आणि त्याला शरण जाणे म्हणजेच राजकीय आत्महत्याच हे शिवाजीराजांना माहित होते. त्यामुळे अफजलखानाशी मुकाबला करण्याची योजना आखून त्यास प्रतापगडावर भेटीस बोलावून भेटी दरम्यान त्यास ठार केले. यानंतर आदिलशाहाने सिद्दी जोहरची शिवाजी महाराजांच्या विरूद्ध नेमणूक केली. सिद्दी जोहरने शिवाजी राजे पन्हाळ्यावर असताना वेडा देऊन त्यांना जेरीस आणण्याचा प्रयत्न केला; परंतु शिवाजी महाराज पन्हाळ्याच्या वेढ्यातून सुखरूप बाहेर पडले. त्यानंतर शिवाजी महाराजांनी आदिलशाहींशी सलोख्याचे संबंध प्रस्तापित केले. कारण मोगल सरदार शाहिस्तेखान हा स्वराज्यावर चालून आला होता. त्यापूर्वी १६५७ मध्ये शिवाजी महाराजांनी मोगलांची जुन्नर व अहमदनगर ठाणे लुटून मोगल-मराठा संघर्षाला सुरूवात केली होती.

मराठ्यांच्या स्वातंत्र्य युद्धाच्या पहिल्या पर्वास सुरूवात झाली होती. शाहिस्तेखान हा स्वराज्याचा बराच मुलूख ताब्यात घेऊन पुण्याला येऊन ठाण मारून बसला होता. त्यांनी उत्तर कोकण घेण्यासाठी पाठवलेल्या कारतलब खानाचा शिवाजी महाराजांनी उंबरखिंडीत

पराभव केला. तसेच पेणवर चालून आलेल्या नामदार खानाचाही पराभव केला; परंतु शाहिस्तेखानावर काहीच परिणाम होत नव्हता. त्याच्या दिवसेंदिवस कारवाया वाढतच होत्या. त्यामुळे शाहित्सेखानावरच हल्ला करण्याची योजना आखूण ती पूर्णपणे यशस्वी केली. त्यामधून शाहिस्तेखान बचावला गेला; परंतु त्याची तीन बोटे कापली गेली. शाहिस्तेखानाने दुसऱ्याच दिवशी स्वराज्य सोडले; परंतु शाहिस्तेखानाच्या स्वारीमुळे स्वराज्याचे प्रचंड नुकसान झाले होते. त्याच्या भरपाईसाठी मोगलाचे संपन्नशाली असलेले सुरत शहराची पहिली लूट केली व प्रचंड संपत्ती स्वराज्यात आणली. यानंतर औरंगजेबाने शिवाजी महाराजांच्या विरोधात मिर्झाराजे जयसिंगाची नेमणूक केली. मिर्झा राजांनी शिवाजी महाराजांची चहुबाजूनी कोंडा करून स्वराज्यावर आक्रमण केले. स्वराज्यातील जनतेचे होत असलेले हाल शिवाजीराजांना पाहवले नाही. त्यांनी शरणागती पत्करून मिर्झा राजांशी पुरंदरच्या मोगलांचे अधिपत्य मान्य केले. औरंगजेबाच्या बोलवण्यावरून मिर्झाराजे जयसिंगाने जीवीताची हमी घेऊन आगऱ्यास गेले; परंतु आग्रा येथे शिवाजी महाराजांना अपमानास्पद वागणूक दिली. त्यामुळे शिवाजी बादशहावर नाराज होऊन दरबाराचा त्याग केला. त्यांना नजरकैदेत ठेवून मारण्याचा मनसुबा औरंगजेबाचा होता. त्यामुळे शिवाजीराजाने आजारी पडल्याचे नाटक करून मिठाई-पेढ्यांचे दान देण्यास सुरूवात केली. पेटाऱ्यावाल्याचा वेश धारण करून स्वतःची सुटका केली. परत स्वराज्यामध्ये येऊन सवराज्याची सुव्यवस्था करून ५ जून १६७४ ला स्वतःचा राज्याभिषेक करवून १६७६ च्या शेवटी कर्नाटक मोहिम हाती घेऊन कर्नाटकातील उत्तर व दक्षिण अर्काटचा प्रदेश बंगलोर, कोलार, बाळापूर व शिरा इत्यादी प्रदेश जिंकून स्वराज्यात सामील केले. जून १६७८ ला परत रायगडाला आले. त्यानंतर अल्पावधितच त्यांचे निधन झाले.

संभाजी राजांचा जन्म १४ मे १६५७ रोजी पुरंदरवर सईबाईच्या उदरी झाला; परंतु संभाजी राजे दोन-अडीच वर्षाचे असताना सईबाईचे निधन झाल्यामुळे संभाजीच्या पालण-पोषणाची जबाबदारी मातोश्री जिजाऊ व शिवाजीने पूर्ण केली. पहिले बारा-तेरा वर्ष संभाजी हे सर्व बहिणीमध्ये एकमेव पुत्र असल्यामुळे सर्वांचा लळा त्याच्याप्रती होता. संभाजी राजांच्या

शिक्षणाची उत्तम सोय जिजाऊ व शिवाजी महाराजांनी केली होती. संभाजी राजाचे संपूर्ण बालपण जिजाऊच्या छत्रछायेखाली गेल्यामुळे सर्वगुणसंपन्न, सुसंस्कारीत असे बाळ संभाजी राजे तयार झाल्याचे दिसून येते. शिवाजी महाराजांनी संभाजी राजांना अतिशय लहान वयापासून राजकीय अनुभव देण्यास सुरूवात केली होती. संभाजीराजे दहा-अकरा वर्षाचे झाल्यापासून त्याच्यावर काही प्रमाणात राज्यकारभारही सोपवला होता. लष्करी मोहिमांचाही अनुभव संभाजी राजांना यावा म्हणून युद्ध मोहिमेवर पाठविण्यास सुरूवात केली होती. संभाजी राजांनी वयाच्या सोळाव्या-सतराव्या वर्षी हाती घेतलेल्या युद्ध मोहिमेचे व पराक्रमाचे वर्णन फ्रेंच प्रवासी अनेकर यांनी आपल्या प्रवास वर्णनात केले आहे. संभाजीराजे शूर, पराक्रमी, युद्धनीती कुशल तर होतेच; परंतु त्याचबरोबर ते एक उत्तम साहित्यिक होते. त्यांना तत्काळातील अनेक भाषा येत होत्या. संस्कृत भाषेचे ते प्रकांड पंडित होते. हे त्यांनी पाठविलेल्या रामसिंह हाडा यांना लिहिलेले पत्र व बाकरेशास्त्रींना दिलेले दानपत्र यावरून समजते. याशिवाय संभाजी राजांनी चार ग्रंथाची निर्मिती केली 'बुधभूषणम्', 'नायिकाभेद', 'नखशिख' आणि 'सातसतक' त्यातील बुधभूषणम् हा ग्रंथ संस्कृत भाषेत असून राजनीतीवर आधारित आहे. इतर तीन हिंदीमध्ये असून नायिकाभेद आणि नखशिख शृंगारप्रधान आहेत तर सातसतक हा आध्यात्मवादी आहे. संभाजीराजे सर्वात मोठे युवराज असल्यामुळे ते स्वराज्याचे धर्मसिद्ध व जन्मसिद्ध वारस होते. त्यामुळेच शिवाजी महाराजांच्या राज्याभिषेकाप्रसंगी त्याचाही युवराज्याभिषेक करण्यात आला होता.

साहित्य आणि इतिहास यांचा अतिशय घनिष्ठ संबंध आहे. इतिहासाची सुरूवात मुळामध्ये साहित्याच्या स्वरूपात होऊन आधुनिक काळामध्ये ते एक शास्त्र म्हणून विकास पावले आहे. इतिहास आणि साहित्याचा 'मानवी जीवन' हा समान विषय आहे. इतिहासकार व साहित्यिक हे त्यांच्या काळाचे प्रतिनिधीत्व करतात. ऐतिहासिक घटनांचा साहित्यकार व साहित्याचा इतिहासावर परिणाम पडतो. इतिहास लेखनात जी बंधने व मर्यादा इतिहासकारांना पाळावी लागतात तिच बंधने कमी अधिक प्रमाणात साहित्यिकांना पाळणे अत्यावश्यक असते. ज्यातील सर्वश्रेष्ठ समजल्या जाणाऱ्या साहित्यकृती या बहुतांश

ऐतिहासिक असल्याचे दिसून येते. मराठी साहित्यावर मराठ्यांच्या इतिहासाचा प्रभाव मोठ्या प्रमाणावर जाणवतो. त्यामुळेच मराठी सत्तेचे संस्थापक छत्रपती शिवाजी महाराजांपासून ते शेवटच्या पेशवा दुसरा बाजीरावपर्यंत अनेक व्यक्तिमत्वावर मराठीतील अनेक ऐतिहासिक साहित्याची निर्मिती झाली.

दुसऱ्या प्रकरणामध्ये संशोधकाने बखरकारांनी निर्माण केलेल्या संभाजी राजांच्या अनैतिहासिक प्रतिमेचा शोध घेतला आहे. यामध्ये बखर वाङ्मयाचे अर्थ, स्वरूप, प्रकार व वैशिष्ट्ये सांगून छत्रपती शिवाजी महाराजांवर लिहिलेल्या; परंतु संभाजी महाराजांची माहिती देणाऱ्या बखरीतून अनैतिहासक प्रतिमेचा शोध घेतला आहे. सभसद बखरकारांनी आपल्या संपूर्ण बखरीमध्ये छत्रपती संभाजी महाराजांच्या युवराज काळातील कोणत्याही दुवर्तनाचा उल्लेख केला नाही; परंतु सभासदकारांने शिवाजी महाराजांच्या मृत्युसमयी संभाजी राजांविषयी भविष्य शिवाजी महाराजांच्या तोंडी वदवून संभाजीराजांची मलिन प्रतिमा निर्माण केली. एक्यान्नव कलमी बखरकाराने संभाजीराजांच्या अंगी चांगले गुण यावेत म्हणून रामदास स्वामींच्या सानिध्यात सज्जनगडावर ठेवल्याचे सांगतो. शिवदिग्विजय बखरकाराने संभाजीस रामदास स्वामींनी उत्तम गुण येण्यासाठी उपदेश केल्याचे सांगतो. याशिवाय शिवदिग्विजयकाराने संभाजीराजांच्या दुवर्तनाबद्दल चिंता सईबाईच्या तोंडून वदवून संभाजीला समज देतानाचा प्रसंग निर्माण करून संभाजी राजांची अनैतिहासिक प्रतिमा निर्माण केली आहे. शेडगावकरकरांनी आपल्या बखरीमध्ये शिवाजी महाराजांनी संभाजीस राज्य आवरणार नाही म्हणून राजारामाला गादीवर बसवून राज्यकारभार चालवण्याची आज्ञा मंत्र्यांना दिली असल्याचे सांगतो.

औरंगजेबाने संभाजीस कैद केल्यानंतर धर्मांतराची मागणी केल्यास संभाजी राजांनी झेबुन्निसाची मागणी केल्याचे अनैतिहासिक विधान केले आहे. मल्हार रामराव चिटणीसाने सप्तप्रकरणात्मक बखरीमध्ये हळदी कुंकवांच्या समारभांस रायगडावर आलेल्या एका ब्राह्मण विवाहित स्त्रीबरोबर संभाजी राजांनी बदकर्म केले, त्या बदकर्माबद्दल शिवाजी महाराज शिक्षा करतील म्हणून संभाजीराजे दिलेरखानाकडे गेल्याचे सांगतो. मल्हाररावांनी संभाजी

महाराजांच्यावर लिहिलेल्या स्वतंत्र बखरीमध्ये संभाजी राजांनी राज्य मिळविण्यासाठी काय काय केले यांची माहिती देताना सोयराबाईंना भिंतीत चिणून मारणारा, अष्टप्रधान मंडळातील मुत्सुद्दी मंत्र्यांना ठार मारणारा, कवी कलशाच्या संगतीने बेबंदेशाही कारभार करणारा अशी अनैतिहासिक संभाजी राजांची प्रतिमा मांडलेली आहे.

तिसऱ्या प्रकरणामध्ये कथा, कादंबरी व नाटकातून निर्माण झालेली संभाजी महाराजांची प्रतिमा मांडली आहे. कथा, वाङ्मयामध्ये श्री. द. ग. गोडसे यांनी रायगडवाडीतील एका धनगराने सांगितलेली 'गोदावरीची लोककथा' दिलेली आहे. त्यामध्ये संभाजी राजांचा गोदावरीशी संबंध जुळवून संभाजी राजांची स्त्रीशौकीन प्रतिमा निर्माण केल्याचे दिसून येते. कांदबऱ्यामध्ये ना. वि. बापटांची 'छत्रपती संभाजी महाराज' या १८८९ च्या सभांजीराजांच्या पहिल्या कांदबरीपासून ते अनंत तिबेले यांनी १९७८ मध्ये लिहिलेल्या 'शापित राजहंस' या कांदबरीपर्यंत दहा कांदबऱ्यातील संभाजी राजांची प्रतिमा रेखाटली आहे. ना. वि. बापटांनी आपल्या 'छत्रपती संभाजी महाराज' या कादंबरीमध्ये संभाजीराजांची बदफैली, व्यसनी, लहरी, खुनशी, दुवर्तनी अशी प्रतिमा निर्माण केली आहे. संभाजीराजांची स्त्रीशौकीन प्रतिमा रेखाटण्यासाठी तुलशी, गोदावरी, रोशणार या काल्पनिक पात्रांचा आधार घेतला आहे. संभाजीराजे कवी कलशाच्या आहारी जाऊन पूर्वीच्या शिवकाळातील सर्व शिस्त मोडल्याचे चित्रण रेखाटले आहे. तसेच स्वराज्यातील मुत्सद्दी २०० पेक्षा व्यक्तींना ठार करून यमाजी भास्कराचा दरबार सुरू केल्याचे चित्रण लेखकाने रेखाटले आहे. ह. ना. आपटे यांनी 'केवळ स्वराज्यासाठी' या राजारामावरील कादंबरीमध्ये दुर्गणयुक्त संभाजीराजेच्या व्यक्तिमत्वाचे चित्रण करून त्याच्यावर अनेक विविध अरोप केले आहेत. कवी कलशाच्या संगतीने मदिरा आणि मदिराक्षीमध्ये गुंतून असणाऱ्या संभाजीचे चित्रण केले आहे. शेवटी मोगलांच्या कैदेत पाश्चातापाच्या अग्नित जळत असलेला संभाजी दाखवला आहे.

नाथमाधवानी स्वराज्यमालिकेतील 'स्वराज्याचा कारभार' व 'स्वराज्यावरील संकट' दोन्ही कादंबऱ्यामध्ये संभाजीराजांची नादान, आडदांड, हट्टी, दुर्वर्तनी, व्यसनी, क्रूर अशी अनैतिहासिक प्रतिमा निर्माण केली आहे. संभाजीची विषयासक्त प्रतिमा तयार करण्यासाठी

जमुना, यशोदा आणि राधा या काल्पनिक स्त्री पात्राचा आधार घेतला आहे. मनमोहन नातु यांनी 'संभवामि युगे युगे व छत्रपती संभाजी' या दोन्ही कादंबऱ्यामध्ये जमुना, शेवंता, तुळशी, झेबुन्निसा आणि रोशन या काल्पनिक स्त्री पात्राच्या आधारे संभाजीचे प्रेम व प्रणयाचे अतिरंजक चित्रण रंगवून संभाजीराजांची विषयासक्त प्रतिमा निर्माण केली. कवी कलशाच्या संगतीने व वरील स्त्रियांबरोबर दारूच्या धुंदीत असलेल्या संभाजीचे चित्रण रेखाटले आहे. शेवटी धर्मवीर संभाजीची प्रतिमा निर्माण केली आहे. रणजित देसाई यांचया 'श्रीमानयोगी' कादंबरीमध्येही संभाजीराजांची अनैतिहासिक प्रतिमा रेखाटली आहे. शिवाजी महाराजांच्या जीवनाचे मूल्यमापन करताना आपल्या राजकीय जीवनाचे अनेकवीध उतुंग शिखरे पार करणारे शिवाजी स्वतःच्या कौटुंबिक जीवनात अपयशी ठरल्याचे दाखवून त्यास संभाजीराजास जबाबदार धरले आहे. वा. ना. देशपांडे यांची 'आम्ही यातनांचे स्वामी' या कादंबरीमध्ये मोगलाच्या कैदेतील संभाजीराजांच्या व्यक्तिमत्वाचा मनोविश्लेषणात्मक वेध घेण्याचा प्रयत्न केला आहे. मोगलांच्या कैदेतील संभाजी पश्चातापाग्नित जळत असलेला दाखवून स्वतःच्या नशीबाला कोसणारा, आपली तुलना शिवाजी महाराजांशी करताना संपूर्ण कादंबरीमध्ये दाखवले आहे. नयनतारा देसाई यांची 'अर्घ्य' व अनंत तिबेलेची 'शापित हंस' या कादंबऱ्यामध्ये व्यसनी, हट्टी, भावनिक, संतापी अशी संभाजीची प्रतिमा निर्माण करून मातृसुखासाठी आतृप्त असलेला संभाजी रेखाटला आहे.

नाटकामध्ये वासुदेवशास्त्री खरे यांचे 'गुणोत्कर्ष' या १८८५ मध्ये लिहिलेल्या नाटकापासून ते वसंत कानेटकरांच्या १९६८ मध्ये लिहिलेल्या 'इथे ओशाळला मृत्यू' या नाटकापर्यंत वीस नाकटातील संभाजी राजांची प्रतिमा रेखाटली आहे. वासुदेवशास्त्री खरे यांनी 'गुणोत्कर्ष' या संभाजी राजांवरील पहिल्या ऐतिहासिक नाटकामध्ये देशद्रोही, बदफैली, संभाजी राजांची प्रतिमा निर्माण केली आहे. यानंतर आत्माराम पाठारे यांनी 'संगीत श्री छत्रपती संभाजी' या नाटकामध्ये संभाजीचे दुर्वर्तनी, स्त्री शौकीन, व्यसनी अशी प्रतिमा निर्माण केली आहे. विषयासक्त संभाजीची प्रतिमा निर्माण करण्यासाठी तुळशी व रोशणार या काल्पनिक पात्राचा आधार घेतला आहे. पाठारेच्या पट्टीतील नाटक सोनाबाई केरकर यांनी

'संगीत छत्रपती संभाजी' नाटक लिहून त्यामुळे तुळशी, गोदावरी, रोशणार या पात्राच्या आधारे संभाजीच्या प्रेम व प्रणय प्रसंगाचे अतिरंजित वर्णन करून बदफैली संभाजीची प्रतिमा निर्माण केली. वा. ना. शहा यांचे 'प्रणयी युवराज' या नाटकामध्ये संभाजी व झेबुन्निसाचे प्रेमप्रकरण रंगवून प्रेमवीर संभाजीची प्रतिमा निर्माण केली. राम गणेश गडकऱ्यांनी 'राजसंन्यास' या नाटकामध्ये मोगलांच्या कैदेत विनाशाच्या काठावर उभा असलेल्या संभाजीचे स्वतःच्या दोषाचे अभिज्ञाने आत्मपरीक्षण करताना दाखवून स्वच्छंदी, बेजबाबदार आणि रंगेल संभाजीची प्रतिमा निर्माण केली. वि. ह. औंधकराने 'बेबंदशाही' नाटकामध्ये संभाजी राजाचे विलासी, बेजबाबदार व्यसनी, कवी कलशाच्या आहारी गेलेल्या संभाजीची प्रतिमा नाटककारांनी निर्माण केले आहे. दत्तात्रय सुळे यांचे 'संगीत राजसंन्यास' नाटकाची पुरवणी हे नाटक गडकऱ्यांच्या धरतीवर असून त्यामध्ये विषयासक्त, बेजबाबदार, लहरी संभाजी राजाची प्रतिमा रेखाटली आहे. विठ्ठल वामन हडपांचे 'रायगडाची राणी' या नाटकामध्ये संभाजीच्या दुर्गुणामुळे महाराणी येसुबाई किती यातना सोसाव्या लागतात. ते चित्रित केले असून कमळजा स्त्री पात्राचा आधार घेऊन कामांध संभाजीची प्रतिमा रेखाटली आहे. यशवंत टिपणीसाचे 'शिवाजीचा शह' नाटकामध्ये संभाजी राजांची स्वच्छंदी, व्यसनी, बेजबाबदार आणि स्त्री शौकीन प्रतिमा चित्रित केली आहे. स्त्री शौकीन प्रतिमेसाठी राधा व हिरकणी या पात्रांचा आधार घेतला आहे. ना. के. सोनसुरकरांचे 'थोरातांची कमळा' आणि मा. आ. कामत यांचे 'शककर्त्याचा न्याय' ही दोन्ही नाटके संभाजी राजे व थोराताची कमळा यांच्या प्रेमकथेवर आधारित आहेत. मा. हा. कोचरेकरांचे 'संगीत मानी मराठा' या नाटकामध्ये स्त्रीलंपट, उताविळ, कवी कलशाच्या तंत्राने चालणारा संभाजी अशी प्रतिमा निर्माण केली आहे. आबासाहेब आचरेकरांचे 'धर्मवीर', 'अमर जहाले छत्रपती', 'संभाजी' व 'सह्याद्री सांगे कथा शंभुची' या दोन्ही नाटकामध्ये व्यसनी उताविळ, विषयासक्त, कवी कलशाच्या आहारी गेलेला संभाजी राजांची प्रतिमा निर्माण केलेली आहे. गजरा या स्त्री पात्रासोबत संभाजीचे संबंध जुळवून बदफैली संभाजीची प्रतिमा निर्माण केली. लक्ष्मण साडवांच्या 'छत्रपती संभाजी' या नाटकामध्ये अष्टप्रधान मंडळातील मंत्र्याना ठार करणारा, शिर्क्यांचे शिरकाण करणारा, कवी कलशाच्या आहारी गेलेल्या संभाजीची प्रतिमा निर्माण केली आहे. द. ग.

गोंडसे यांचे 'राजाचा पुत्र अपराधी देखा' व शंकर बळवंत चव्हाण यांच्या 'सती गोदावरी' हे दोन्ही नाटके सती गोदावरीच्या लोककथेवर आधारित असून त्यातून कामांध संभाजीची प्रतिमा निर्माण केली आहे. अर्जुनराव झेंडे यांचे 'अश्रु ढळले रायगडाचे' या नाटकामध्ये तुळशी व मदिरेच्या आहारी गेलेला रंगेल व रगेल संभाजीची प्रतिमा रंगवून शेवटी मोगलांच्या कैदेत पश्चातापाग्नित जळत असलेला संभाजी रेखाटला आहे. वसंत कानेटकरांचे 'इथे ओशाळला मृत्यू' या नाटकात व्यसनी, नाटकशाळा बाळगणारा, कवी कलशाच्या आहारी गेलेला व्यभिचारी संभाजी रंगवलेला आहे.

चौथ्या प्रकरणात वास्तविक छत्रपती संभाजीराजे यामध्ये बखरकारांनी व साहित्यिकांनी संभाजी राजांची आपल्या साहित्यकृतीमध्ये जी अनैतिहासिक प्रतिमा रंगवलेली आहे. त्यांची ऐतिहासिक पुराव्याच्या आधारे चिकित्सा करून वास्तविक इतिहास या प्रकरणात मांडला आहे. संभाजी राजाविषयी सर्वप्रथम बखर वाङ्मयामध्ये अनैतिहासिक प्रतिमा रंगवले गेली. बहुतांश बखरी पेशवाईत लिहिलेल्या असल्यामुळे त्या ऐकीव माहितीच्या आधारे लिहिल्या गेल्यात. त्यामुळे त्यातील लेखन हे प्रमाण मानता येणार नाही. सर्वप्रथम सभासद बखरीमध्ये शिवाजी महाराजांच्या तोंडून संभाजी राजांचे भविष्य वदवून संभाजी राजांची प्रतिमा मलिन केली आहे. ते नंतरच्या काळातील नकलाकाराचे कारस्थान असल्याचे प्रसिद्ध इतिहासकार व बखर संपादककार रा. न. जोशी सांगतात. त्याचबरोबर तत्कालिन इतिहास संभाजी राजाबद्दल शिवाजी असे उद्गार काढतील असे काहीही घडले नव्हते. शिवदिग्विजयकाराने सईबाईच्या तोंडी संभाजी राजाबद्दल चिंता वदवून संभाजीला दुर्वर्तनी ठरवण्याचा प्रयत्न केला आहे. तोही नकलाकारांची करामतच असावी. कारण ज्यावेळी सईबाईंचा मृत्यू झाला त्यावेळी संभाजी राजाचे वय दोन-अडीच वर्षांचे होते. एवढ्या लहान वयातील मुलामध्ये दुर्गुण काय असणार. एक्यान्नव कलमी बखर व शिवदिग्विजय बखरीमध्ये रामदास स्वामी संभाजीराजांमध्ये सुधारणा व्हावी म्हणून उपदेश करताना दाखवले आहेत. हे छत्रपती शिवाजी महाराजांशी रामदास स्वामींचा संबंध जोडण्यासाठी त्यांच्या अनुयायाचे कृत्य आहे. शेंडगावकर बखर व मल्हार रामराव

चिटणीसांनी लिहिलेल्या सप्तप्रकरणात्मक बखर व संभाजी राजावरील स्वतंत्र बखरी या अतिशय अलिकडील आहेत. शेंडगावकर बखरीतील माहिती तर सभासद व मल्हाररावांच्या बखरीवर आधारित असल्याचे दिसून येते. मल्हाररावांनी सप्तप्रकरणात्मक बखरीमध्ये संभाजी राजांनी एका ब्राह्मण स्त्रीबरोबर बदकर्म केल्यामुळे शिवाजी महाराज शिक्षा करतील म्हणून संभाजीराजे दिलेरखानाकडे गेल्याचे सांगते. कारण इतर कोणत्याही बखरकाराने दिले नाही. ही काल्पनिक कथा मल्हाररावांनी संभाजीची बदनामी करण्यासाठी लिहिली आहे. तसेच जेव्हा संभाजीराजे दिलेरखानास जाऊन मिळाले तेव्हा ते रायगडावर नव्हते तर शृंगारपुरास होते. तसेच मल्हार रामराव चिटणीसाने संभाजी राजाच्या स्वतंत्र्य बखरीमध्ये सोयराबाईंना भिंतीत चिणून मारल्याचा, अष्टप्रधान मंडळातील मंत्र्यांना ठार केल्याचे जे आरोप केले सर्व तथ्यहीन खोटे आहेत. मल्हाररावांनी आपल्या बखरीमध्ये बाळाजी आवजीस दोष मुक्त करण्याचा प्रयत्न केला आहे. संभाजीच्या काळातील बेबंदशाही कारभाराबद्दल वास्तविक इतिहास कोणताही पुरावा सापडत नाही.

मराठी साहित्यिकांनी आपल्या साहित्यामध्ये अनेक काल्पनिक स्त्री पात्रांशी संबंध संभाजीराजांशी जोडून स्त्री शौकीन व विषयासक्त अशी संभाजी राजांची प्रतिमा तयार केली. त्यांच्याशी संबध जोडणाऱ्या स्त्रियांचा वास्तविक इतिहास शोध घेतल्यावर त्याबाबद कोणताही पुरावा सापडत नाही. सर्वप्रथम साहित्यिकांनी संभाजीराजांचा संबंध गोदावरीशी जोडला. ही गोदावरीच्या लोककथेवर आधारलेली असून मूळची गुजराती चंद्रगुजरी ही मराठीत गोदावरी झाली. रायगड येथे गोदावरीची समाधी सांगितली जाते. ती सवाई माधवरावांची पत्नी यशोदाबाईची आहे. झेबुन्निसा किंवा रोशणार या औरंगजेब मुलींचा संबंध संभाजीशी जोडून त्यांच्या प्रेम व प्रणय प्रसंगाचे वर्णन अनेक साहित्यिकांनी व बखरकारांनी करून कामांध संभाजीची प्रतिमा निर्माण केली. त्या झेबुन्निसा किंवा रोशणारचा शोध घेतला असे समजते. औरंगजेबाला एकूण पाच मुली होत्या त्यापैकी तीन मुलींचे लग्न झाले होते. सर्वात मोठी जिचे नाव झेबुन्निसा होते. ती संभाजी महाराजांपेक्षा वयात १९ वर्षाने मोठी असून दक्षिण भारतामध्ये ती केव्हा आलीच नाही. औरंगजेबाची दुसरी मुलगी झिअतुन्निसा हिचा

जन्म ५ ऑक्टोबर १६४३ चा. संभाजी राजांना जेव्हा कैद केले होते तेव्हा तिचे वय ४६ वर्ष होते व संभाजी राजांपेक्षा ती १३-१४ वर्षांनी मोठी होती. यावरून हे स्पष्ट होते. संभाजी राजांना विवाह योग्य औरंगजेबाची एकही कन्या नव्हती. संभाजी राजांनी औरंगजेबास त्यांच्या मुलची मागणी केली किंवा औरंगजेब कन्या झेबुन्निसा प्रेमसंबध होते हा साहित्यिकांचा कल्पनाविलास आहे. याशिवाय तुळशी, थोराताची कमळा, राधा, गजरा, जमुना, हंसा या स्त्री पात्राचा ऐतिहासिक कागदपत्रात कोठेच उल्लेख सापडत नाहीत. हे साहित्यकारांनी रंगवलेली काल्पनिक पात्र आहेत. साहित्यिकांनी दारूबाज व व्यसनी संभाजीची प्रतिमा मोठ्या प्रमाणात निर्माण केली आहे; परंतु वास्तविक इतिहासामध्ये संभाजीचे पालण-पोषण हे जिजाऊच्या छत्रछायेखाली झाल्यामुळे सुसंस्कारीत व सुशिक्षित संभाजी निर्माण झाले होते. कवींद्र परमानंदानेही आपल्या 'परमानंदकाव्यम्' या ग्रंथात सर्वगुणसंपन्न संभाजी राजाचे वर्णन केले आहे.

औरंगजेबासारख्या प्रचंड सामर्थ्यशाली शत्रू स्वराज्यावर चालून आला असता निराशेचा एक ही उद्‌गार न काढता त्याला प्रत्येक आघाड्यावर सतत नऊ वर्षे धीराने झुंज देणारा संभाजी व्यसनी असू शकत नाही. तसेच इंग्रज, फ्रेंच प्रवाशी ॲबे करे यांनी संभाजीच्या पराक्रमाचा व किर्तीचा गौरव केला आहे. यावरून ते व्यसनी असतील असे वाटत नाही. साहित्यिकांनी इतर आरोप त्यांच्यावर केले त्यामध्ये सोयराबाईंना भिंतीत चिणून मारणारा, राजारामाला अंधार कोठडीत टाकणारा, मुत्सद्दी अनुभवी मंत्र्याना ठार मारणारा, शिर्क्यांचे शिरकाण करणारा आदी आरोपामध्ये तथ्य नाही. कारण संभाजीराजे रायगडावर आल्यानंतर सोयराबाईसाहेब सोळा-सतरा महिनेच जिवंत होती. इंग्रजाच्या बातमीनुसार त्यांचा रक्तातिसाराने मृत्यू झाला. संभाजी राजांनी आपल्या लहान भावास राजारामास अंधार कोठडीमध्ये टाकले नव्हते तर शिवाजी महाराजांच्या मृत्युनंतर त्यांना अतिशय प्रेमाने वाढवले. त्यांच्या शिक्षणाची खास व्यवस्था केली होती. शिवाजी महाराजांच्या मृत्युनंतर स्वत: संभाजी राजांनी राजारामाची तीन लग्ने लावून दिली होती. अष्टप्रधान मंडळातील मंत्र्यांनी मे १६८० ते ऑगस्ट १६८१ या दिड वर्षाच्या काळामध्ये संभाजीराजांना सत्तेपासून दूर

करण्याचा व ठार मारण्याचे तीन कट झाले. यामध्ये प्रारंभीला राजारामाला गादीवर बसवून स्वराज्याचा कारभार स्वतःच्या हातामध्ये होण्याचा पहिला कट १६८० च्या मे मध्ये झाला. त्यामुळे दोषी असणाऱ्या एकाही मंत्र्यांना त्यांनी ठार मारले नाही. फक्त कैद केले व राज्यभिषेकाच्या वेळी सोडून त्यांना पुन्हा पदे बहाल केली. त्यानंतर मात्र जून १६८१ मध्ये संभाजीराजे पन्हाळगडावर असताना विषप्रयोग करून ठार मारण्याचा प्रयत्न केला. तो फसल्यानंतर त्यांच्या पाठोपाठ अकबरांच्या मदतीने संभाजीला गादीवरून काढून टाकण्याचा तिसरा कट रचला. तो अकबरामार्फत संभाजीस समजला. त्यावेळी मात्र या कटामध्ये सामील असलेल्या देशद्रोही मंत्र्यांना ठार केले होते. इतर मंत्री पदावरती जशास तसे होते. संभाजीने निवडलेले मंत्रीच पुढे राजारामाचे व ताराबाई प्रिय होते. शिर्क्यांचे शिरकाण म्हणजे शिर्क्यांच्या संभाजी राजांनी केलेल्या कत्तली असा चुकीचा अर्थ बखरकारांनी घेतला. त्याचे अतिरंजक स्वरूप साहित्यिकांनी केले, 'शिरकाण' म्हणजे शिर्क्यांच्या ताब्यातील प्रदेश होता. अनेक शिर्के त्यावेळी जिवंत होती. मोगलांच्या चाकरीत गेल्याचे आपणास दिसते.

साहित्यिकांनी कवी कलश मोगलांना फितूर असल्याचे रंगवून संभाजी त्याच्या आहारी गेल्याचे चित्रण केले होते. वास्तविक इतिहासात कवी कलश संभाजी राजांचा सर्वात विश्वासू मित्र असून तो स्वराज्य निष्ठ असल्याचे दिसते. कवी कलश संभाजी राजाबरोबरच मोगलांच्या कैदेत गेला व ठार झाला. संभाजी राजांच्या पुढे राजारामही कवी कलशाच्या वारसाला जहांगिरी दिल्याचाही उल्लेख सापडतो. मोगलांच्या कैदेत पश्चातापाग्नित जळत असलेल्या धर्मवीर संभाजीची प्रतिमा रंगवली. अशी अनैतिहासिक प्रतिमा साहित्यिकारांनी निर्माण करून संभाजी राजाच्या कार्य व कर्तृत्वावर अन्याय करण्याचा प्रयत्न केला आहे. वास्तविक इतिहासामध्ये संभाजीराजांना औरंगजेबाने धर्मांतराची मागणी केलीच नव्हती. तसेच संभाजी मोगल आक्रमणाने हताश व निराश झाले नव्हते. त्यांनी शेवटपर्यंत अतिशय धैर्याने मोगलांचा प्रतिकार केला. शेवटीही औरंगजेबासमोर ते झुकले नाही. शेवटी वीरमरण पत्करले. त्यांच्या हुतात्म्याने संपूर्ण मराठी जनता खवळून उटली व स्वराज्य रक्षणासाठी पुढे आली.

प्रकरण पाचव्यामध्ये, स्वराज्य रक्षक संभाजी यामध्ये छत्रपती संभाजी महाराजांनी स्वतःच्या राज्याभिषेकापासून ते शेवटी कैद व मृत्युपर्यंत स्वराज्याच्या रक्षणाचा आढावा घेतला आहे. मराठ्यांच्या स्वातंत्र्ययुद्धाचे १६५७ ते १७०७ या पन्नास वर्षाच्या कालखंडामध्ये तीन पर्वामध्ये विभागणी करून पहिला कालखंड १६५७ ते १६८० छत्रपती शिवाजी महाराज कालखंड, दुसरा कालखंड १६८० ते १६८९ छत्रपती संभाजी महाराजांचा कालखंड आणि तिसरा कालखंड १६८९ ते १७०७ पर्यंतचा छत्रपती राजाराम व महारणी ताराबाईचा कालखंड अशा तीन कालखंडाच्या पर्वामध्ये मराठ्यांच्या स्वातंत्र्य युद्धाची विभागणी करून छत्रपती शिवाजी महाराजांच्या मृत्युनंतर मराठ्यांच्या स्वातंत्र्य युद्धाचे छत्रपती संभाजी महाराजांनी नेतृत्व केले. १६ जानेवारी १६८१ रोजी स्वतःचा राज्याभिषेक करून घेऊन मराठी सत्तेची सर्व सुत्रे हाती आल्यानंतर मोगलांशी चालू असलेला लढा पुढे तसाच चालू ठेवून मोगलांच्या प्रदेशावर चढाई केली. त्यात बऱ्हाणपुरची लुट, औरंगाबादवर हल्ला, अंतूरवर स्वारी इत्यादी समावेश होतो.

औरंगजेबाचे दक्षिण भारताकडे आगमण होईपर्यंत मोगलांनी अनेक प्रदेशावर आक्रमण केले. त्यात धरणगावची लुट, बऱ्हाणपुरचा बालेकिल्ला उडवून देण्याचा प्रयत्न, कल्याण-भिवंडी संघर्ष, अहमदनगर हल्ला, सोलापूरवर आक्रमण हे प्रमुख आहेत. त्यानंतर औरंगजेब बादशहा दक्षिण भारतात आल्यानंतर खऱ्या अर्थाने मोगल-मराठा संघर्षाला सुरूवात झाली. त्यामध्ये सर्वप्रथम नाशिक-बागलान प्रदेशातील किल्ले घेण्याचा मोगलांनी प्रयत्न केला. त्यात दहकमना किल्ला, साल्हेरचा किल्ला, रामसेनचा किल्ला, त्रिंबकगड व नाशिक जिल्हातील इतर किल्ले परिसरातील मोगलाच्या आक्रमणांना मराठ्यांनी तीव्र प्रतिकार केला. रामसेनसारखा किल्ला मोगलांना घेण्यासाठी एप्रिल १६८२ ते १६८७ मध्ये मोगलांच्या हातात गेला. म्हणजे रामसेन घेण्यासाठी मोगलांना पाच-सहा वर्ष झटावे लागले होते. यानंतर तळकोकणातील मराठा-मोगल संघर्ष. औरंगजेबाने तळकोकण घेण्यासाठी ऑगस्ट १६८२ पासून खानजहान बहादूर, बहादूरखान, दाफदखान, शहाबुद्दीनखान, मुकर्रमखान, कासिमखान, रुदुल्लाहखान, सैफुल्लाखान, पदमसिंह व इतर अनेक मातब्बर

सरदारांना पाठवूनही कोणतेही यश न आल्यामुळे १६८३ च्या एप्रिल महिन्यात सर्व सैन्य तळकोकणातून माघारी बोलावले. तळकोकणातील संघर्षामध्ये स्वतः संभाजी राजांनी सहभाग घेऊन मोगलांशी प्रतिकार करणाऱ्या मराठी सरदारांना प्रेरणा व प्रोत्साहन दिले. बक्षीसे व इनामे दिली. स्वराज्याच्या इतर प्रदेशातील मोगल-मराठा संघर्षामध्ये स्वराज्याच्या दक्षिण बाजुच्या संघर्षामध्ये पन्हाळगडाजवळ हंबीररावांनी शहजादा आज्जमशहाचा पराभव केला. तसेच दक्षिण कोकणाच्या स्वारीत शहाअलमचा दारूण पराभव केला. स्वराज्याच्या मध्यभागाच्या लढ्यामध्ये हंबीररावांनी व विठोजींनी कुलीचखानाचा पराभव केला. रायगड परिसरातील शहाबुद्दीनखानाचा प्रतिकार हंबीरराव मोहिते, रूपाजी भोसले यांनी केला. कवी कलशानेही त्याचा प्रतिकार करून घाटावर घातले. पुढे वाईच्या लढाईमध्ये मराठ्यांना यश मिळाले; परंतु हंबीररावांचा मृत्यू झाला.

मोगलाच्या आक्रमणाचा प्रतिकार करत करत मोगल सैनिकांना जेरीस आणण्यासाठी त्याकाळामध्ये संभाजी राजांनी मोगलांचा स्वराज्यालगत असलेल्या प्रदेशावर हल्ले करण्याची युद्धनीतीचा अवलंब केला होता. मोगलांच्या परिसरातून लुट व चौथाई वसूल केली. संगमनेर परिसरावर केलेले हल्ले, पारनेर व पेडगाव परिसरावरील हल्ले, सोलापूर परिसरातील हल्ले, उस्मानाबाद परिसरावरील चढाई, बीड परिसरातील चढाई, वऱ्हाडप्रांतात चढाई व चौथ वसूली, शहजादांचे हत्ती पळवले, बंगाल व पाटण्यावर चढाई या मोगलांच्या प्रदेशावर संभाजी राजाने चढाई करून मोगल बादशहास हताश केले होते. इ.स. १६८१ ते १६८४ पर्यंत मोगलांना कोणताही प्रदेश जिंकता आला नव्हता. त्यामुळे त्यांनी आपला मोर्चा आदिलशाही व कुतुबशाही जिंकण्याकडे वळवला.

स्वराज्य रक्षणाच्या दृष्टीने संभाजी राजांची कर्नाटकातील कामगिरी अतिशय महत्त्वाची आहे. कर्नाटकातील स्वराज्याचे महत्त्व ओळखून संभाजी राजांनी आपला मेव्हणा हरजीराजे महाडिक यांची कर्नाटकचा सरसुभेदार म्हणून नेमणूक केली. त्यांना तेथील सर्व अधिकार सोपवले. कर्नाटकातील राज्य अबादीत राहण्यासाठी हरजीराजांनी त्यांनी वेळोवेळी मदत व प्रोत्साहन दिले. स्वतः संभाजी राजांनी कर्नाटकातील मराठ्यांच्या स्वराज्याचा

विस्तार करण्यासाठी जून १६८२ व १६८६ मध्ये कर्नाटकच्या दोन युद्ध मोहिमा हाती घेऊन. म्हैसूरचा नायक चिक्कदेवराय यांच्या विरोधात बसप्पानायक, कुतुबशहा, एकोजी, बेदनूरची राणी व मदुरेसचा नायक या सर्वांची सहाय्य घेऊन त्यांचा बहुतांश प्रदेश स्वराज्यात सामील केला होता. तसेच मोगलांनी कुतुबशाहीचा पराभव करून ती नष्ट केल्यानंतर मराठ्यांनी कुतुबशाहीच्या परिसरातील प्रदेश व महत्त्वाची किल्ले हस्तगत केली होती. मराठ्यांचे कर्नाटकताील राज्य हे राजाराम जिंजीस येईपर्यंत अबादीत होते.

मोगलासारख्या प्रचंड शक्तीशाली शत्रू बरोबरच संभाजीराजांनी जंजिऱ्याचा सिद्दी, गोवेकर पोर्तुगीज व इंग्रज या सागरी सत्तेपासून स्वराज्याचे रक्षण केले. जंजिऱ्याचा सिद्दी शिवाजी महाराजांच्या काळापासून स्वराज्याच्या प्रदेशात उपद्रव करत होता. संभाजी राजे सत्तेवर आल्यावरही त्याच्या कारवाया चालूच होत्या. त्यासाठी संभाजीराजांनी इंग्रजांना सिद्दीला कोणत्याही प्रकारची मदत न करण्याची तंबी देऊन इंग्रजांच्या राजापूरच्या वखारी जवळ दौलतखानाच्या नेतृत्वाखाली ४-५ हजाराचे सैन्य ५० गलबते देऊन सज्ज ठेवले. सिद्दीच्या उंदेरीवर पहाटे अचानक हल्ला करून त्याचा बंदोबस्त करण्याचा प्रयत्न केला. त्यातही यश आले नाही तेव्हा १६८१ च्या डिसेंबर महिन्यात संभाजीराजांनी स्वतःच्या नेतृत्वाखाली वीस हजार सैन्यासह वेढा देऊन सतत पंधरा दिवस तोफेचा मारा केला. सिद्दीच्या होड्या वाटेमध्ये गस्त घालत असल्यामुळे मराठ्यांना जंजिऱ्यावर जाण्यास अडथळा, सैन्यास जाण्याचा मार्ग काढण्यासाठी संभाजी राजांनी आठशे चौरस वार रुंद आणि तीस वार लांब जंजिऱ्याची खाडी, दगड, लाकूड, कापसाच्या गाठी यांनी भरून काढण्याचा प्रयत्न केला. परंतु समुद्र खवळलेला असल्यामुळे त्यांना यश आले नाही. मोगलांच्या वाढत्या आक्रमणास प्रतिकार करण्यासाठी संभाजीला जंजिऱ्याची मोहिम अर्धी सोडून यावे लागले.

संभाजी राजांनी गोवेकर पोर्तुगीजांशी प्रारंभी मैत्रीचे संबंध प्रस्तापित करण्याचा प्रयत्न केला; परंतु पोर्तुगीजांचे सिद्दी धार्जीने धोरण, मोगलांना देऊ केलेली मदत, अजदीव बेटाचा वाद या कारणांमुळे संभाजीराजांनी पोर्तुगीजांना शह देण्याचे ठरविले. १६८२ च्या जूनमध्ये चौलवर हल्ला करून बराच प्रदेश कब्जात आणला. चौलवरील मराठ्यांचा वेढा ढिला

करण्यासाठी पोर्तुगीजांनी मराठ्यांच्या फोंड्याच्या किल्ल्याला वेढा दिला; परंतु मराठ्यांनी चौलचा वेढा उठवताच फोंड्याचा संग्राम चालू ठेवला. फोंड्याचा किल्लेदार येसाजी कंक व त्याचा मुलगा कृष्णाजी कंक यांनी मोठा पराक्रम गाजवला. संभाजीराजे स्वतः फोंड्याचा किल्ला वाचवण्यासाठी गेले होते. संभाजीराजे फोंड्याच्या संरक्षणासाठी येतांच पोर्तुगीजांनी फोंड्यावरून काढता घेतला. त्यानंतर संभाजी राजांनी पोर्तुगीजांच्या जुवे बेटावर हल्ला केला व मराठ्यांच्या ताब्यात घेतला. या लढाईत पोर्तुगीजांचे आतोनात हाल झाले. साल्ट व बारदेशाचा बहुतांश प्रदेश संभाजीराजांनी जिंकलेला होता. संभाजीराजानी स्वराज्याच्या पश्चिम किनारपट्टीचे संरक्षण करण्यासाठी पदमदुर्ग, कुलाबा ही महत्त्वाची कोट बांधले होते. खंदेरी शिवाजी महाराजांनी बांधलेला किल्ला पूर्वीपासूनच होता. संभाजीराजांनी सिद्दी, मोगल आरमार व पोर्तुगीजांना शह देण्यासाठी फ्रेंच, डच आणि अरब व इंग्रजांशी मैत्री संबंध ठेवून त्यांच्याकडून पश्चिम किनारपट्टीचे संरक्षण केले.

**निष्कर्ष :**

प्रस्तुत प्रकरणात संशोधकाने संशोधन कार्यासाठी निवडलेल्या उद्दिष्टांची सिद्धता आणि गृहीतकृत्याची पडताळणी करीत असताना प्राप्त झालेले निष्कर्ष खालील प्रमाणे नोंदविण्यात आली आहेत.

१. इतिहास व साहित्याचा अतिशय घनिष्ठ संबंध आहे. इतिहासाची सुरूवातच मुळात साहित्याच्या स्वरूपात होऊन ते आधुनिक काळामध्ये एक शास्त्र म्हणून विकास पावले आहे. इतिहास व साहित्याचा 'मानवी जीवन' हा समान विषय आहे. ऐतिहासिक घटनांचा साहित्यकार व साहित्यांचा इतिहासावर परिणाम होत असतो.

२. इतिहासाकडे लक्ष वेधण्याच्या कामात ललित साहित्याने जी प्रचंड कामगिरी केली आहे. ती इतिहासाच्या अभ्यासकास मान्य आहे; परंतु त्यांच्याबरोबर ललित लेखकाकडून आवश्यक असलेल्या माफक अभ्यासाची अपेक्षा इतिहासकार करतो. ललित साहित्यिकांचे स्वातंत्र्य तो पूर्णपणे मानतो; पण ललित साहित्यिकास काही मर्यादा असतात हे तो विसरता कामा नये.

३. प्रसिद्ध कादंकबरीकार ना. वि. बापट यांनी इतिहास व ऐतिहासिक ललित साहित्य या दोघांचा संबंध शुक्र रंभेसारखा आहे असे म्हटले आहे. इतिहास हा शुक्राचार्यासारखा स्पष्टवक्ता व सत्यवक्ता तपोनिधी आहे. त्याला मोहजाळात गुंतविणारी ऐतिहासिक ललित कृती ही रंभेचा अवतार आहे.

४. इतिहासकार आणि साहित्यिक यांचयातील साम्य सांगताना प्रा. अरविंद देशपांडे म्हणतात, स्थलकालांनी बंदिस्त केलेल्या घटना वा व्यक्तीची गोष्ट सांगण्याचा इतिहासकाराचा प्रयत्न असतो. साहित्यिक लेखकाचा प्रयत्नही असाच असतो. दोघांनाही एक सुसूत्र, सुसंगत अशी कथा सांगावायाची असते. एकाची बंधने जास्त स्पष्ट असतात; पण दुसऱ्यालाही ती किंवा तत्सम बंधने असतातच.

५. ललित साहित्याच्या जगात गणल्या गेलेल्या सर्वश्रेष्ठ व प्रसिद्ध साहित्यकृती या ऐतिहासिक आहेत.

६. ऐतिहासिक मराठी साहित्यावर मराठ्यांच्या इतिहासाचा प्रभाव अधिकच दिसून येतो. मोरोबा कान्होबा विजकरांचा पहिला ऐतिहासिक मराठी कथासंग्रह 'घाशीराम कोतवाल' (१८६३), पहिली ऐतिहासिक मराठी कादंबरी रा. भी. गुजीकरांची 'मोचनगड' (१६८७), मराठीतील पहिले बुकिश नाटक आणि पुस्तक रूपाने प्रसिद्ध झालेले नाटक विनायक जनार्दन कीर्तने यांचे 'थोरले माधवराव पेशवे' (१६८१) हे मराठ्यांच्याच इतिहासांशी संबंधित आहेत.

७. मराठी बखर वाङ्मयामध्ये सर्वात जास्त बखरी छत्रपती शिवाजी महाराजांवर लिहिल्या गेल्यात व इतर मराठीशाहीतील व्यक्तीवर एकाद दुसरी बखर लिहिली गेली.

८. छत्रपती शिवाजी महाराजांच्या बखरलेखनामध्ये छत्रपती संभाजी महाराजांची बरीच माहिती मिळते. सर्वप्रथम सभासद बखरीमध्ये बखरकारांनी शिवाजी महाराजांच्या तोंडी संभाजी महाराजांचे भविष्य वदवून संभाजीराजांची प्रतिमा मलिन केली आहे.

९. एक्यान्नव कलमी बखरकाराने संभाजीराजाने निळोपंताशी भांडण केल्यामुळे त्यांच्या वर्तनात सुधारणा घडवून आणण्यासाठी संभाजीराजांना सज्जनगडावर ठेवल्याचे सांगितले आहे.

१०. शिवदिग्विजयकारही संभाजी राजांची चाल चांगली नसल्यामुळे त्यांना सुधारण्यासाठी शिक्षागार ठेवले, समर्थ रामदासांनी उपदेश केला; परंतु संभाजी महाराजांमध्ये कोणताही गुण आला नसल्याचे सांगितले आहे.

११. सभासदकाराप्रमाणे शिवदिग्विजयकारांनी मृत्युशय्येवर असलेल्या सईबाईंच्या तोंडून संभाजी राजांविषयी चिंता वदवून समज देतानाचे प्रसंग रंगवून संभाजी राजांची अनैतिहासिक प्रतिमा निर्माण केली आहे.

१२. शेडगावकराने आपल्या बखरीमध्ये सभासदकाराप्रमाणे शिवाजी महाराजांच्या तोंडून भविष्य वदवून व इतर अनैतिहासिक अरोप करून संभाजीराजांची विकृत प्रतिमा निर्माण केली आहे.

१३. सप्तप्रकरणात्मक बखरीमध्ये मल्हार रामराव चिटणिसांनी संभाजीराजांनी हळदी-कुंकवाच्या सणानिमित्त रायगडावर आलेल्या विवाहित स्त्रीशी बदकर्म केल्यामुळे शिवाजी महाराज शिक्षा देतील. म्हणून संभाजीराजे दिलेरखानाकडे गेल्याचे मल्हाररावाने सांगितले आहे. तसेच पिता-पुत्राच्या पन्हाळगडावरील भेटी दरम्यान संभाजीस त्याच्या दुर्वर्तनीबद्दल समज देतानाचे चित्र रंगवून संभाजीराजाची अनैतिहासिक प्रतिमा निर्माण केली आहे.

१४. छत्रपती संभाजी महाराजावरील स्वतंत्र बखरीमध्ये मल्हाररावाने संभाजीराजांवर अनेक अरोप करून त्यांची प्रतिमा मलिन केली आहे.

१५. बखरकारांच्या संभाजीराजांच्या अनैतिहासिक प्रतिमेत मराठीतील साहित्यिकांनी अधिकच रंग भरण्याचा प्रयत्न केल्याचे दिसते.

१६. मराठी सत्तेचे पहिले युवराज म्हणून छत्रपती संभाजी राजांच्या जीवनाचे आकर्षण मराठीतील अनेक साहित्यिकांना असल्याचे दिसून येते.

१७. मराठीतील ऐतिहासिक नाटकामध्ये सर्वात जास्त नाटके छत्रपती संभाजीराजांच्या जीवनावर लिहिली गेलीत.

१८. बहुतांश ऐतिहासिक नाटक व कादंबऱ्यातून संभाजी राजांची व्यसनी, बदफैली, क्रूर, नविचारी, दुर्वर्तनी अशी अनैतिहासिक प्रतिमा निर्माण केली आहे.

१९. मराठीतील ललित साहित्यकांनी आपल्या साहित्यामध्ये गोदावरी, झेबुन्निसा, तुळशी, कमळा, रोशणार, शेवंता, राधा, जुगल अशा अनेक काल्पनिक स्त्री पात्राचा संबंध संभाजीराजांशी जुळवून प्रेम व प्रणय प्रसंगाच्या वर्णनातून स्त्री शौकीन व रंगेल संभाजीराजांची प्रतिमा निर्माण केली आहे.

२०. साहित्यिकांनी आपल्या साहित्यकृतीमध्ये कवी कलशाच्या संगतीने संभाजीराजे चंडीमातेचा प्रसाद म्हणून मदिरा प्राषण करताना दाखवनू आणि सतत अनेक स्त्रियांच्या सहवासामध्ये मद्यधुंद संभाजी रंगवून संभाजीराजांची व्यसनी, दारूबाज अशी प्रतिमा निर्माण केली आहे.

२१. संभाजीराजावरील मराठीतील ऐतिहासिक कथा, कादंबऱ्या, नाटक व बखर वाङ्मय आधारित असल्यामुळे संभाजीराजांवर सोयराबाईंना भिंतीत चिणून मारणारा, राजारामाला अंधार कोठडीत टाकणारा, मुत्सद्दी मंत्र्यांना ठार करणारा व त्यांच्या घरादारवरून नांगर फिरवणारा, शिर्क्यांचे शिरकाण करणारा असे अनेक अरोप करून त्याची क्रूर, खुनशी प्रतिमा निर्माण केली.

२२. औरंगजेबाच्या कैदेत संभाजीराजे पश्चातापाग्नित जळतांना दाखवून आणि आपल्या दुर्वर्तनी कृत्याचा पाढा संभाजीराजांच्या तोंडी वदवून साहित्यिकांनी संभाजीराजावर अनेक आरोप केले आहेत.

२३. साहित्यिकांनी आपल्या साहित्यकृतीमध्ये छत्रपती शिवाजी महाराज, मातोश्री जिजाऊ व येसुबाई यांच्या तोंडी संभाजीराजांच्या दुर्वतनाचे भाष्य वदवून संभाजीराजांची दुर्वर्तनी अशी प्रतिमा निर्माण केली आहे.

२४. संभाजीराजांच्या कारकिर्दीमध्ये कोणीही शहाणी माणसे राहिली नाहीत. सर्वत्र अराजकता, अत्याचार सुरू झाला. शिवकाळातील सर्वशिस्त मोडल्या गेल्या, सर्व खजिना रिक्त झाला. अशा प्रकारचे चित्रण साहित्यिकांनी आपल्या साहित्यकृतीमध्ये करून संभाजीराजांच्या कारकिर्दीतील कारभाराचे बेबंदशाही चित्र निर्माण केले.

२५. सर्वात प्रथम बखर वाङ्मयामध्ये संभाजी राजाविषयी अनैतिहासिक लेखन केल्याचे दिसून येते.

२६. बहुतांश बखरी या पेशवाईच्या काळात लिहिल्या असल्यामुळे त्या संभाजीराजांच्या काळानंतर शंभर-दिडशे वर्षांनी लिहिल्याकारणाने बखर वाङ्मयातील लेखनात सत्यांश व वस्तुनिष्ठता असणे अशक्य आहे.

२७. प्रसिद्ध इतिहासकार व बखर संपादककार श. ना. जोशी म्हणतात, "सभासदकाराने बखरीच्या शेवटी जे शिवाजी महाराजांच्या तोंडून संभाजीराजांचे भविष्य वदवून जी संभाजीराजांची मलिन प्रतिमा निर्माण केली ती प्रमाण नसून नंतरच्या काळातील नकलाकारांचे कारस्थान आहे."

२८. शिवदिग्विजयकाराने सभासदाप्रमाणे सईबाईच्या अंतकाळामध्ये त्यांच्या तोंडून संभाजी राजांच्याबद्दल चिंता व खंत वदवून संभाजीराजामध्ये अनेक अवगुण असल्याचे सांगण्याचा प्रयत्न केला; परंतु वास्तविक इतिहासामध्ये सईबाईचा मृत्युच्या वेळी संभाजीराजे अवघे दोन-अडीच वर्षाचे होते.

२९. अनेक बखरकारांनी संभाजीराजांचे वर्तन चांगले नसल्यामुळे त्यांच्यामध्ये सुधारणा घडावी म्हणून शिवाजी महाराजांनी रामदास स्वामीकडे पाठवल्याचा उल्लेख केला आहे. हा बखरकारांनी शिवाजी व रामदास स्वामी संबंध दर्शविण्यासाठी केलेला प्रयत्न आहे.

३०. मल्हार रामराव चिटणीसांनी आपल्या पूर्वजांना छत्रपती संभाजी महाराजांनी मारल्याचा राग धरून संभाजी महाराजांविषयी लेखन केल्यामुळे ते तथ्यहीन, खोटे व पूर्वग्रह दुषित होऊन केलेले आहे.

३१. ऐतिहासिक नाटक व कादंबऱ्यातून संभाजी राजांबाबत रंगवलेल्या प्रणयकथांना वास्तविक इतिहासात मात्र कोणताच ऐतिहासिक आधार नसल्याचे दिसते.

३२. मराठी साहित्यांत कवी कलशाची महापापी, कारस्थानी, फितूरी प्रतिमा रेखाटली; परंतु वास्तविक इतिहासात मात्र कवी कलश संभाजीराजांचा विश्वासू मित्र, पराक्रमी, स्वराज्यनिष्ठ, विद्वान, कवी अशी प्रतिमा समोर आली आहे.

३३. साहित्यिकांनी आपल्या साहित्यकृतीमध्ये संभाजीराजांना धर्मवीर ठरवून त्यांनी केलेल्या कार्य व कर्तृत्वाकडे दुलर्क्ष केले आहेत.

३४. संभाजीराजांनी छत्रपती शिवाजी महाराजांच्या ध्येयधोरणानुसार स्वराज्याचा कारभार सांभाळला. त्यामुळे संभाजीराजांच्या कारकिर्दीमध्ये कोठेही बेबंदशाहीची परिस्थिती असल्याचे आढळून येत नाही.

३५. बखरकारांनी झेबुन्निसांशी संभाजीराजांचा संबंध जोडला आहे. त्या संदर्भात वा. सी. बेंद्रे म्हणतात, "ज्या बखरकारांना मृत्युच्या जागेचा किंवा दिवसाचाही उल्लेख करता येत नाही, त्यांनाही औरंगजेबाच्या मुलीची जनानखान्यातील संवादासह गुप्त बातमी कल्पनेशिवाय किंवा कुंभाड रचण्याच्या मनोगताशिवाय कळणेच शक्य नाही."

३६. संभाजीराजांच्या व्यसनी आणि बदफैलीपणाबद्दल इतिहासकार सेतू माधवराव पगडी म्हणतात, "औरंगजेबाच्या रूपाने मराठ्यांच्या लहानशा स्वराज्यावर प्रचंड संकट येऊन कोसळले असता निराशेचा एकही उद्‌गार न काढता प्रत्येक आघाडीवर सतत नऊ वर्षे धीराने झुंजणारा संभाजी हा भयंकर व्यसनी आणि बदफैली असू शकेल अशी कल्पनाही करवत नाही."

३७. संभाजीराजांना औरंगजेबाने धर्मांतराचा प्रस्ताव ठेवला नसल्याचे ऐतिहासिक पुराव्याच्या आधारे स्पष्ट होते.

३८. संभाजीराजांची कैद व धर्मांतराच्या संदर्भात इतिहासकार सेतू माधवराव पगडी म्हणतात, "संभाजीराजे हे आकस्मिकपणे कैद झाले. औरंगजेबाने त्यांना ठार मारण्याचे ठरविलेच होते. शिवाजीच्या बाबतीत झालेली चूक त्याला पुन्हा करायची नव्हती त्याप्रमाणे घडून आले. धर्मांतरांची मागणी किंवा परधर्माची निंदा किंवा तथाकथित प्रेम प्रकार या गोष्टी खोट्याच नव्हते तर गृहणीय आहेत."

३९. छत्रपती संभाजीराजाचे भोसले घराणे हे महाराष्ट्रातील एक प्रतिष्ठित मराठ्यांच्या ९६ कुळापैकी एक असून त्याचे मूळ पूर्वज हे राजस्थानातील शिसोदे वंशातील होते. भोसले घराण्याचे नाते संबंध हे महाराष्ट्रातील निंबाळकर, यादव, मोहिते, शिर्के, गायकवाड, पवार इत्यादी क्षत्रीय व प्रतिष्ठीत घराण्यांशी प्रस्थापित झालेले होते.

४०. स्वराज्याची संकल्पना सर्वप्रथम शहाजीराजांनी मांडणी व ती प्रत्यक्षात उतरवण्यासाठी त्यांनी तीन वेळेस प्रयत्न केले.

४१. छत्रपती शिवाजी महाराजांनी माता जिजाऊच्या मार्गदर्शनाखाली वयाच्या पंधरा-सोळाव्या वर्षी मनोमन निर्धार करून स्वराज्य स्थापनेच्या कार्यास सुरूवात केली व स्वराज्य स्थापनेमध्ये येणारी अडथळे जावळीचे मोरे, अफजलखान, सिद्दी जोहर इत्यादी दूर करून स्वराज्याची स्थापना केली.

४२. मराठ्यांच्या स्वातंत्र्य युद्धाचे पहिल्या पर्वाचे नेतृत्व छत्रपती शिवाजी महाराजांनी केले. औरंगजेबाने पाठवलेल्या शाहिस्तेखान, मिर्झाराजा जयसिंग, शहजादा मुअज्जम, महातबखान, बहादुरखान, दिलेरखान यांसारख्या मातब्बर मोगल सरदारांपासून स्वराज्याचे रक्षण केले.

४३. बाल संभाजीराजांचे पालन-पोषणाची व शिक्षणाची जबाबदारी राजमाता जिजाऊने स्वतःवर घेऊन त्याची उत्तम व्यवस्था केली होती. यामुळे संभाजीराजे शिक्षित आणि सुसंस्कारीत होते.

४४. कवींद्र परमानंदानी आपल्या 'परमानंदकाव्यम्' ग्रंथामध्ये संभाजी महाराजांच्या सर्वगुण संपन्न अशा अष्टपैलू व्यक्तिमत्वाचे वर्णन केले आहे.

४५. संभाजीराजांसारखा विद्वान, साहित्यिक राजा आपणास संपूर्ण मध्ययुगीन इतिहासामध्ये पाहवायास मिळणार नाही. संभाजीराजांनी वयाच्या बत्तीस वर्षांच्या काळामध्ये त्यांनी बुधभूषणम्, नायिकाभेद, नखशिख आणि सातसतक अशी चार ग्रंथ लिहिलीत.

४६. संभाजीराजांचे राजनीती, शृंगारीक आणि आध्यात्मिक अशा ग्रंथ संपदेवरून त्यांचे बहुअयामी व्यक्तिमत्व दृष्टीस येते. याबाबत हिंदी साहित्यामधील प्रसिद्ध साहित्यिक आणि विद्वान संशोधक डॉ. कृष्ण दिवाकर म्हणतात की, 'संभाजीराजे केवळ पराक्रमी, शूर राजनीतिज्ञ, कर्तृत्वसंपन्न प्रशासकच नव्हते तर ते उत्कृष्ट कवी होते.

४७. छत्रपती संभाजीराजे हे स्वराज्याचे जन्मसिद्ध व धर्मसिद्ध उत्तराधिकारी असून ज्या-ज्या वेळी इंग्रज वकील ऑक्सिडन व फायर शिवाजीराजेंना बोलण्यासाठी गेला त्या-त्या वेळी संभाजीराजे शिवाजी महाराजांच्या जवळ बसल्याचे दिसले.

४८. युवराज संभाजीराजांच्या पराक्रमाचे व कीर्तीचे वर्णन अबॅकर या फ्रेंच प्रवाशाने केले आहे. तो म्हणतो, 'संभाजीराजाचे पराक्रम व वर्णन शिवाजी महाराजांना हेवा वाटावा असे होते.'

४९. छत्रपती शिवाजी महाराजांच्या मृत्युनंतर मराठ्यांच्या स्वातंत्र्ययुद्धाच्या दुसऱ्या पर्वास सुरूवात होते. (इ.स. १६८०-१६८९) या दुसऱ्या पर्वाचे नेतृत्व छत्रपती संभाजी राजांनी केले.

५०. मोगलाची प्रचंड फौज एकत्रितरित्या स्वराज्यावर चालून आलीतर स्वराज्य लवकर नष्ट होईल. म्हणून संभाजी राजांनी मोगल फौजेस फोडून तुकड्या तुकड्यात पांगवण्याची उत्कृष्ट व्यूहरचना आखून ती यशस्वी केली.

५१. संभाजी राजांनी मोगल सैन्यांचा तळकोकण, बागलाण, दक्षिण कोकण, मध्य स्वराज्य अशा अनेक आघाड्यावर प्रतिकार स्वराज्याचे रक्षण केले.

५२. संभाजीराजांनी प्रचंड अशा मोगल सैन्यापासून स्वराज्याचे रक्षण करण्यासाठी गनिमी युद्ध तंत्राचा वापर केला. यामध्ये मोगलांच्या हालचालीवर बारीक नजर ठेवणे, त्यांची रसद तोडणे, खजिना लुटणे, जनावरे पळविणे, अचानक हल्ला करून पळून जाणे आदींचा समावेश होता.

५३. संभाजीराजांनी स्वराज्याचे रक्षण करत असतांना मोगलांच्या प्रदेशावर चढाईचे धोरण अवलंबून त्याने बऱ्हाणपूर, अहमदनगर, खानदेश, वऱ्हाड, विदर्भ, सोलापूर, उस्मानाबाद, औरंगाबाद, जालना व बीड आदी मोगलांच्या प्रदेशावर चढाई करून लुटली व चौथाई वसूल केली.

५४. मोगलांसारखा प्रचंड शक्तिशाली शत्रू बरोबरच तत्कालीन जंजिऱ्याचा सिद्दी, गोवेकर, पोर्तुगीज व इंग्रज या सागरी सत्तेपासून स्वराज्याचे रक्षण केले.

५५. संभाजीराजाची स्वराज्य रक्षणाच्या दृष्टीने कर्नाटकातील कामगिरी महत्त्वाची आहे. कर्नाटकातील स्वराज्याच्या संरक्षणासाठी व विस्तारासाठी स्वतः दोन युद्ध मोहिमा हाती घेतल्या तसेच मेहुणे हरजीराजे महाडिक यांनी कर्नाटकाचा सरसुभेदार म्हणून नेमणूक

केली. त्यांना वेळोवेळी मदत व प्रोत्साहन दिले. यामुळे कर्नाटकातील स्वराज्य अबादीत राहिले व पुढे राजारामास याच राज्यातून स्वराज्य रक्षणांसाठी मदत मिळाली.

५६. संभाजीराजांनी कर्नाटकामध्ये आपले चुलते व्यंकोजी राजे यांच्याशी चांगले संबंध प्रस्तापित करून मराठ्यांची कर्नाटकात स्वतंत्र आघाडी निर्माण केली होती. यामुळेच राजारामाला सुरूवातीच्या काळामध्ये व्यंकोजी राजाच्या वारसानी स्वराज्य रक्षणात मोलाचे सहकार्य केले.

५७. जंजिऱ्याचा सिद्दी, मोगल आरमार व पोर्तुगीज या सागरी सत्तांना शह देण्यासाठी संभाजी राजांनी इंग्रज, फ्रेंच, डच आणि अरब या सागरी सत्तांशी मैत्रीचे संबंध प्रस्तापित केले होते.

५८. स्वराज्याचे रक्षण करण्यासाठी संभाजीनी मोगल सैन्यातील महत्त्वाच्या सरदारांना फोडण्याचा प्रयत्न केला तसेच मराठी सरदारांना प्रोत्साहन देण्यासाठी रोखरक्कम, इनामे, मान सन्माने प्रदान केली.

५९. संभाजीराजांनी मोगलांचा प्रतिकार करण्यासाठी सेनापती हंबीरराव मोहिते, रूपाजी भोसले, मानाजी मोरे, रंभाजी पवार, मोरोपंत, कवी कलश, मालोजी घोरपडे या सरदारांच्या नेतृत्वाखाली अनेक आघाड्याकरून गनिमी युद्धातंत्राचा अवलंब करून स्वराज्याचे रक्षण केले.

६०. रामसेजसारखा किल्ला मोगलांना घेण्यासाठी पाच-सहा वर्ष झटावे लागले. यावरून संभाजी राजांचा मोगलाशी केलेला प्रतिकार किती तीव्र होता हे समजते.

# *संदर्भग्रंथ सूची*

## मराठी संदर्भग्रंथ सूची :


१. आचरेकर आबासाहेब, (१९५७), 'अमर जहाले राजे छत्रपती संभाजी', त्रिदल प्रकाशन, मुंबई.

२. आचरेकर आबासाहेब, (१९६८), 'सह्याद्री सांगे कथा शंभुची', त्रिदल प्रकाशन, मुंबई.

३. आपटे द. वि., केळकर न. चि., (संपा), (१९३०), 'शिवकालीन पत्रसार संग्रह, खंड १ व २', श्री शिवचरित्र कार्यालय, पुणे.

४. आपटे हरि नारायण, (१९७२), 'केवळ स्वराज्यासाठी', आवृत्ती पाचवी, रम्यकथा प्रकाशन, पुणे.

५. औंधकर वि. ह. , (१९७५), 'बेबंदशाही', आ. ११, परचुरे प्रकाशन मंदिर, मुंबई.

६. कदम रामकृष्ण आनंदराव, (२०१२), 'छ. संभाजी महाराज विरचित बुधभषण-राजनीती', राजमयूर प्रकाशन, पुणे.

७. कानेटकर वसंत, (१९६८), 'इथे ओशाळला मृत्यू', पॉप्युलर प्रकाशन, मुंबई.

८. कामत माधव आप्पाजी, (१९५२), 'शककर्त्याचा न्याय', ग. पा. परचुरे प्रकाशन मंदिर, मुंबई.

९. कुलकर्णी अ. रा., खरे ग. ह. (संपा.), (१९८४), 'मराठ्यांचा इतिहास, खंड प्रथम', आ. १ली, कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे.

१०. कुलकर्णी भिमराव (संपा.), (१९८४), 'संपूर्ण गडकरी', खंड १, सरीता प्रकाशन, पुणे.

११. कुलकर्णी श्री. र., (१९७०), 'प्राचीन मराठी गद्य, प्रेरणा आणि परंपरा', आ. १ली, सिंधू पब्लिकेशन्स प्रा. लि. मुंबई.

१२. केरकर सोनाबाई चिमाजी, (१८९६), 'संगीत छत्रपती संभाजी', जगदिश्वर छापखाना, मुंबई.

१३. कोरेकर ना. घ., (१९५२), 'संगीत मानी मराठा', ग. पा. परचुरे प्रकाशन मंदिर, मुंबई.

१४. खरे वासुदेव शास्त्री, (१८८५), 'गुणोत्कर्ष', मुंबई.

१५. गर्गे स. मा. (संपा.), (२०१०), 'मराठी रियासत, गोविंद सखाराम सरदेसाई', खंड १, आ. २री, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई.

१६. गोखले कमल श्रीकृष्ण, (१९७१), 'शिवपुत्र संभाजी', आ. १ली, ज्ञान-विज्ञान विकास मंडळ, पुणे.

१७. गोडसे द. ग., (१९६४), 'राजाचा पुत्र अपराधी देखा', पॉप्युलर बुक डेपो, मुंबई.

१८. घोरपडे आनंद, (२०००), 'स्वराज्यरक्षक छत्रपती संभाजी', आ. २री, लोकशक्ती प्रकाशन, मंबई.
१९. चव्हाण शंकर बळवंत, (१९६७), 'सती गोदावरी', चंद्रकांत शेट्ये प्रकाशन मंदिर, कोल्हापूर.
२०. चौबळ ज. स. (अनु.), (१९७४), 'असे होते मोगल', महाराष्ट्र राज्य साहित्य-संस्कृती मंडळ, मुंबई.
२१. जोग स. श्री. (संपा.), (१९६५), 'मराठी वाङ्मयाचा इतिहास, खंड चौथा', आ. १ ली, महाराष्ट्र साहित्य प्रकाशन, पुणे.
२२. जोग स. श्री. (संपा.), (१९७३), 'मराठी वाङ्मयाचा इतिहास, खंड पाचवा', भाग एक, महाराष्ट्र राज्य साहित्य-संस्कृती मंडळ, पुणे.
२३. जोशी द. प., जोशी उषा (संपा.), (२०१०), 'समग्र सेतुमाधव पगडी (खंड १ ते ६)', मराठी साहित्य परिषद, आ. १ ली, हैदराबाद.
२४. जोशी प्र. न., (२०००), 'अर्वाचिन मराठी वाङ्मयाचा इतिहास (१८८०-१९५०)', स्नेहवर्धन प्रकाशन, पुणे.
२५. जोशी शं. ना. (संपा.), (१९३७), 'शिवकालीन पत्रसार - संग्रह, खंड ३', भा. इ. सं. मंडळ, स्वीय ग्रंथमाला, पुणे.
२६. जोशी शं. ना. (संपा.), (१९४९), 'संभाजीकालीन पत्रसार - संग्रह', भा. इ. सं. मंडळ, स्वीय ग्रंथमाला, पुणे.
२७. जोशी शं. ना. (संपा.), (१९६०), 'कृष्णाजी अनंत सभासद विरचित छत्रपती श्री शिवाजीराजे यांची बखर', चित्रशाळा प्रकाशन, पुणे.
२८. झेंडे अर्जुनराव, (१९६७), 'सं. अश्रु ढळले रायगडचे', आ. १ली, त्रिदल प्रकाशन, मुंबई.
२९. टिपणीस यशवंत नारायण, (१९३३), 'शिवाजीला शह', परचुरे पुराणिक मंडळी माधवबाग, मुंबई.
३०. तिबिले अनंत, (२०१२), 'शापित राजहंस', रिया पब्लिकेशन्स, कोल्हापूर.
३१. तेंडूलकर मालती माधव, (१९३३), 'मराठ्यांचा राजा', प्रकाशन गणेश महोदय आणि कंपनी, पुणे.
३२. दारवटकर अनंत, (२०१०), 'अद्वितीय छत्रपती श्रीसंभाजी महाराज', खंड १ ते ५, श्रीशंभू प्रेरणा प्रकाशन, पुणे.
३३. दिवेकर स. म. (संपा.), (१९६०), 'सूर्यवंश कवींद्र परमानंदकृत', शब्दवेध प्रकाशन, पुणे.

३४. देशपांडे वामन, (१९७३), 'आम्ही यातनांचे स्वामी', आ. १ली, साहित्य प्रसार केंद्र, मुंबई.
३५. देसाई नयनतारा, (१९७८), अर्घ्य कुलकर्णी ग्रंथासार, पुणे.
३६. देसाई रणजित, (२०१४), 'श्रीमानयोगी', आ. २७ वी, मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे.
३७. देसाई स. श. (अनु.), (१९६८), 'मराठ्यांच्या इतिहासाची साधने, पोर्तुगीज दफ्तर - खंड तिसरा', आ. १ ली, महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई.
३८. नातु मनमोहन, (१९७०), 'छत्रपती संभाजी', आ. १ ली, सुरस ग्रंथमाला, सोलापूर.
३९. नातु मनमोहन, (१९८४), 'सभवामि युगे युगे', आ. २ री, सुरस प्रकाशन, सोलापूर.
४०. नंदुरबार पां. रा, दांडेकर ल. का. (संपा.), (१९९५), 'श्री शिवदिग्विजय श्री शिवाजी महाराजांची बखर', पुरातनेतिहास प्रकाशन मंडळाची ग्रंथमाला, बडोदे येथे फत्तेसिंह छ. छा.
४१. पगडी सेतुमाधवराव (संपा.), (१९६२), 'मराठ्यांचे स्वातंत्र्ययुद्ध', जोशी आणि लोखंडे प्रकाशन, पुणे.
४२. पगडी सेतुमाधवराव (संपा.), (१९६३), 'मोगल आणि मराठे', श्री लेखन वाचन भांडार, पुणे.
४३. पवार जयसिंगराव भाऊसाहेब, (२००५), 'छत्रपती संभाजी एक चिकित्सा', सुमेरू प्रकाशन कोल्हापूर.
४४. पवार जयसिंगराव भाऊसाहेब, (२००९), 'छत्रपती संभाजी स्मारक्र ग्रंथ', आ. २ री, रिया पब्लिकेशन्स, कोल्हापूर.
४५. पाठक अरूणचंद्र (संपा.), (२०१४), 'मध्ययुगीन कालखंड', राजकीय व सामाजिक इतिहास, दर्शनिका विभाग, महाराष्ट्र शासन, मुंबई.
४६. पाठारे आत्माराम मोरेश्वर, (१८९१), 'संगीत श्री छत्रपती संभाजी', प्रसिद्ध करणार बाळकृष्ण लक्ष्मण पाठक, मुंबई.
४७. पितळे द्वारकानाथ माधव (नाथमाधव), (१९२३), 'स्वराज्यावरील संकट', आ. १ ली, वरदा प्रकाशन, पुणे.
४८. पितळे द्वारकानाथ माधव (नाथमाधव), (१९४७), 'स्वराज्याचा कारभार', आ. १ ली, कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे.
४९. बापट नागेशराव विनायक, (१८८९), 'छत्रपती संभाजी महाराज', आ. २ री, निर्णयसागर छापखाना, मुंबई.
५०. बापट प्रभाकर वासुदेव, (१९७३), 'मराठी कादंबरी तंत्र आणि विकास', व्हिनस प्रकाशन, पुणे.

५१. बेंद्रे वा. सी., (२००१), 'श्री छत्रपती संभाजी महाराज यांचे विचिकित्सक चरित्र', मनोरमा प्रकाशन, मुंबई.
५२. भावे वि. ल. (संपा.), (१९१७), 'श्रीमंत महाराज भोसले यांची बखर', मराठी दफ्तर रूमाल, आ. १ ली, ठाणे.
५३. मोहोड शालिनी मधुकरराव, (२०१२), 'शिवपुत्र छत्रपती संभाजी महाराज', कलादत्त प्रकाशन, पुणे.
५४. लोही मधुकर नारायणराव, (२००६), 'मराठी नाटक आणि रंगभूमी : एक अभ्यास', लाखे प्रकाशन, नागपूर
५५. वाकसकर वि. स. (संपा.), (१९३०), श्री मंत्री दत्ताजी वाकेनिविस विरचित शिवछत्रपतीची 'एक्यान्नव कलमी बखर'
५६. व्यास प्रकाशचंद्र, (१९९९), इतिहास लेखनशास्त्र, अभिजीत प्रकाशन, लातूर.
५७. शहा वालचंद्र नानचंद्र, (१९१७), 'प्रणयी युवराज', आ. १ ली, वालचंद्र रामचंद्र कोठारी, पुणे.
५८. शिंदे अशोकराव सरकार, (१९९०), 'महापराक्रमी व परमप्रतापी छत्रपती संभाजी महाराज', सह्याद्री प्रकाशन संस्था, इस्लामपूर.
५९. सरदेसाई गो. स. (संपा.), (१९५२), 'कवींद्र परमानंदोच 'परमानंद काव्यम्', ओरिएंटल इंन्स्टिट्युट बडोदा.
६०. साने ह. श्री. (संपा.), (१९९५), 'सामाजिकशास्त्रे आणि साहित्य : अतः संबंध', प्रतिमा प्रकाशन, पुणे.
६१. सावंत शंकरराव, (१९८४), 'हुतात्मा संभाजी-एक विवाद्य व्यक्तिमत्व', आ. १ ली, इनामदार बंधु प्रकाशन, पुणे.
६२. सुळे दत्तात्रय सदाशिव, (१९३०), 'संगीत राजसंन्यास नाटकाची पुरवणी', प्रकाशन विदर्भ वैभव ग्रंथमाला, अमरावती.
६३. सोनसुरकर ना. के., (१९५१), 'थोरातांची कमळा', आ. १ ली, अनंत प्रकाशन, मुंबई.
६४. सोहमी भालचंद्र कृष्ण (संपा.), (१९७३), 'भाऊसाहेबांची बखर', आ. १ ली, श्री प्रसाद प्रकाशन, नागपूर.
६५. संकपाळ बापूजी, गोरे दादा (संपा.), (२००३), 'निवडक बखर वाङ्मय', आ. १ ली, कैलाश पब्लिकेशन्स, औरंगाबाद
६६. सांडव लक्ष्मण विठोबा, (१९६४), 'छत्रपती संभाजी', आ. १ ली, महानंद प्रकाशन, मुंबई.
६७. हडप विठ्ठल वामन, (१९६४), 'रायगडची राणी', प्रकाशक परचुरे पुराणिक मंडळी माधवबाग, मुंबई.

६८. हेरवाडकर र. वि. (संपा.), (१९६७), 'मल्हार रामराव चिटणीस विरचित शककर्ते श्री शिवछत्रपती महाराज यांचे सप्तप्रकरणात्मक चरित्र', व्हिनस प्रकाशन, पुणे.
६९. हेरवाडकर र. वि. (संपा.), (१९७२), 'मल्हार रामराव चिटणीस विरचित श्रीमंत छत्रपती संभाजी महाराज आणि थोरले राजाराम महाराज यांची चरित्रे', व्हिनस प्रकाशन, पुणे.
७०. हेरवाडकर र. वि., (१९७२), 'मराठी बखर', व्हिनस प्रकाशन, पुणे.

## इंग्रजी संदर्भग्रंथ सूची :

1. Bal Krishna, (1932), *Shivaji the Great*, Vol. 1. Part I & II, Taraporewala & Sons, Bombay.
2. Duff Grant, (1958), *History of the Marathas* Ed. S. M. Edwards Oxford.
3. Hatallkar V. G., (1958), *Relations between the French & the Marathas (1668-1815)*, Bombay.
4. Kulkarni A. R., (1969), *Maharashtra in the age of Shivaji*, R. J. Deshmukh & Co., Pune.
5. Muddachari B., (1969), *Mysore - Marathe relations in the 17th Century*, Prasaranga University of Mysore.
6. Pagadi Setumadhav Rao, (1974), *Chhatrapati Shivaji*, Continental Publication, Pune.
7. Ronad M. G., (1966), *Rise of the Maratha Power*, Publication Division, Delhi.
8. Sardesai G. S., (1657), *New History of the Marathas*, K. B. Dhavale, Bombay.
9. Sarkar Jadhunath, (1952), *History of Aurangzib*, Vol. IV, V, Calcutta.
10. Sarkar Jadhunath, (1961), *Shivaji & His Times*, 6th Ed. Calcutta.
11. Sen Surendra Nath, (1931, *Foreign Biographies of Shivaji*, Vol. II, Book Company Lt., Calcutta.
12. Shiva Charitra Karyalaya (1931), *English Records of Shivaji*, Vol. VI, (1659-1682), Pune.